# लढाऊ राजकारण

लेखक :

अनंत जनार्दन करंदीकर

प्रस्तावनालेखक :

प्रो. श्री. व्यं. पुणतांबेकर,

बनारस युनिव्हर्सिटी

१९३९

# लोकमान्यांचे परराष्ट्रमंत्री



## दे. भ. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर

यांस

## सादर समर्पण

अ. ज. करंदीकर

# प्रस्तावना

अलब्ध लाभार्था,
लब्ध परिरक्षिणी,
रक्षितस्य विवर्धिनी,
विवर्धितस्य तीर्थेषु प्रतिपादिनी ॥

कौटिल्याच्या अर्थशास्त्रामध्ये राजकारणाचे सूत्र वर दिल्याप्रमाणे आहे. त्यांतील 'लाभपालनाचा' मुख्य हेतू 'लढाऊ राजकारणा'नेच प्राप्त होतो. युरोपीय राष्ट्रांचे राजकारण अशा प्रकारचे आहे. त्या राजकारणांत कांही व्यंगे अथवा व्यसने उत्पन्न झाली की त्यांच्या उठावाच्या व कीर्तीच्या राजकारणाचा ऱ्हास व नाश होतो. आज आपण जर्मनी, जपान व इटली यांचे नेटाचे व चढावाचे राजकारण, आणि इंग्लंड व फ्रान्स यांचे पिछेहाटीचे व बचावाचे राजकारण, यांची मीमांसा केली असता आपणास राजकारणाच्या हालचालीचे व राष्ट्राच्या बलाबलाचे क्षेत्र व स्वरूप समजते.

संरक्षण व स्वातंत्र्य ही राष्ट्राची मुख्य कार्ये पण ती फार व्यापक असतात. ज़ूल कांबो ( Jules Cambon ) हे फ्रेंच मुत्सद्दी म्हणतात

"Security signifies more indeed than the maintenance of the homeland of a people, or even of their territories beyond the seas It also means the world's respect for them, the maintenance of their economic interests, everything in a word which goes to make up the grandeur, the life itself, of the nation."

व्हायकाउंट इशियी ( Viscount Ishii ) एक जपानी मुत्सद्दी यांचेहि मत असेच आहे. अशा संरक्षणाच्या व स्वातंत्र्याच्या कार्याला 'लढाऊ राजकारण' लागते. राजकारण हे नुसते राज्यघटनेच्या अथवा नागरिक स्वातंत्र्याच्या चळवळीतच उत्पन्न व समाप्त होते असे नाही. त्याची अनेक अंगे व उपांगे

आहेत. त्यामध्ये राज्याचे स्वातंत्र्य, संरक्षण, वाढ इत्यादि, ज्या उपायाने व व मार्गाने केले जाते त्या सर्वांचा समावेश होतो. त्यामध्ये सैन्याची व्यवस्था, युद्धाची तयारी, मुत्सद्देगिरी, परराष्ट्रीय धोरण, हालचालीचे मार्ग, आर्थिक बल, इत्यादि अनेक प्रश्नांचा विचार केला जातो.

श्रीयुत अ. ज. करंदीकरांचा 'लढाऊ राजकारण' हा ग्रंथ, अशा राजकारणासंबंधी आहे. तो त्यांनी १९२६ ते १९३९ पर्यंत वेळोवेळी, मुख्यतः केसरीत, लिहिलेल्या लेखाचा संग्रह आहे. त्यामध्ये अनेक विषयांची माहिती व चर्चा आहे. १९२० नंतरच्या देशांतील राजकीय परिस्थितीचे व चळवळीचे आणि राष्ट्राराष्ट्रातील बलाबलाचे विविध प्रवाह व धागेदोरे यांचे सूक्ष्म अवलोकन व विशदीकरण त्यांत केलेले आहे. राजकारण खेळणारे मुत्सद्दी, त्यांचे मनसुबे व डावपेच, त्यामुळे घडणारे प्रसंग व घटना, त्यांच्या मागील सूत्रे, राष्ट्रांतील संरक्षणाची व युद्धाची तयारी, त्यांचे संधिविग्रह याबद्दलचे धोरण व नीति, या सर्व राजकीय अंगांचा विचार या लेखात प्रसंगानुसार देशपरत्वे केलेला आहे.

आज आंतरराष्ट्रीय राजकारणाचे धोरण, धागेदोरे व तहनामे, राष्ट्रांचे गट व मैत्री ही सर्व बदलली आहेत. जुनी स्थिति व सलोखे जाऊन त्या ठिकाणी नवे संबंध व संधि निर्माण होत आहेत. त्यामुळे जुन्या समृद्ध साम्राज्यांना धोके उत्पन्न झाले आहेत.

महायुद्धानंतर ग्रेटब्रिटन व फ्रान्स यांचे राजकारणांतले वर्चस्व ( Hegemony ) १९२० पासून १९३१ पर्यंत टिकले. त्यांनी जगाची वांटणी व व्यवस्था आपल्या इच्छेप्रमाणे केली. पण १९३१ पासून त्या वर्चस्वाला ओहटी लागली. त्याला कारण जपान, जर्मनी व इटली यांची आकांक्षा व विरोध. त्यांनी राष्ट्रसंघाची व्यवस्था आणि व्हेर्सायचा व वाशिंगटनचा तह व वाटणी मोडली. त्यामुळे राजकारणाच्या चालू व्यवस्थेचा व धोरणाचा मोड होऊन राष्ट्रांराष्ट्रांच्या संबंधांमध्ये, व व्यवहारांमध्ये नवे धोके व नवी धोरणे उत्पन्न झाली आहेत. जपान, जर्मनी व इटली यांच्या चढाईच्या धोरणामुळे व आक्रमणामुळे इंग्लंड व फ्रान्स अशा बलवान राष्ट्रांच्या शक्तीचा ऱ्हास झालेला आपणाला दिसत आहे. त्यामुळे इंग्लंडसारख्या राष्ट्राला आपले तटस्थपणाचे, शांततेचे व एकलकोंडे धोरण सोडून, नवें मध्यस्थीचें, युद्धाचे व गटबंदीचे धोरण स्वीकारावे लागत आहे.इतर लढाऊ राष्ट्रांचे जगांत वर्चस्व

होऊं नये व आपले साम्राज्य व वर्चस्व अबाधित रहावे, हाच इंग्लंडचा मुख्य उद्देश आहे. जपान, जर्मनी व इटली यांच्या जय्यत लष्करी तयारीच्या व चढावाच्या नीतीमुळे इंग्लड व फ्रान्स याचे धाबे दणाणले आहे आणि स्व-संरक्षणाचे व सामन्याचे बळ तुलनेने कमी झाले आहे. इंग्लंडचे नाविक, सैनिक व वैमानिक बळ हें तुलनेने फार नाही. मोठ युद्ध सुरू झाले तर त्याला फ्रान्स, अमेरिका व रशिया यांचे साहाय्य घेतल्यावांचून गत्यंतर नाही. इतर मोठ्या राष्ट्रांच्या वाढत्या आकांक्षेमुळे व सामर्थ्यामुळे इंग्लडच्या साम्राज्याला नवा धोका उत्पन्न झाला आहे. अशा जागतिक राजकारणाच्या परिस्थितीत आपल्या देशाची स्थिति काय होईल व आपण काय करावयास पाहिजे असे प्रश्न आपणा-पुढे सहज उभे राहतात. त्याचाहि विचार लेखकाने आपल्या कांही लेखांत केला आहे. नव महायुद्ध सुरू झाले तर हिंदुस्थानची काय स्थिति होईल ! वैमानिक युद्धाने पूर्वीच्या युद्धप्रकारांत कितीतरी बदल केला आहे. या दृष्टीने इग्लंडचा आजचा कुमकुवतपणा लक्षांत घेतला तर हिंदुस्थानची स्वसरक्षणाची काहीच तयारी नाही. इंग्लंडला जर नव्या महायुद्धांत हार खावी लागली, किंवा त्याची कांहीशी पिछेहाट झाली तर हिंदुस्थानच्या स्वातन्त्र्याचे व स्वरक्षणाचे काय होईल? सैनिक संख्या व सघटना, युद्धविषयक ज्ञान व कौशल्य, शस्त्रांचे कारखाने व लढाईची सामुग्री इत्यादि बल आपल्यापाशी फार थोडे आहे. ते आपल्या हातांतहि नाही. त्याच्यावाचून आपल्या राजकारणात काहीच सामर्थ्य व उप-योगिता उत्पन्न होत नाही. त्यामुळे इग्रजाच्या बळावर अधिष्ठित झालेली आपली राजकीय चळवळ व स्वराज्याची कल्पना ही पोकळ ठरते. तेव्हा आपल्या देशा-तील स्थिति व सभोवतालची परिस्थिति लक्षांत घेऊन आपणास आपली सघटना केली पाहिजे. देशामध्ये क्षत्रिय बल व राष्ट्रीय दले ही निर्माण झाली पाहिजेत, म्हणजे अडचणीच्या व धोक्याच्या काळात त्याचा आपणास उपयोग होईल.

मराठीमध्ये अशा दृष्टीने राजकारणाचे विचार पुढे मांडणारे एखादे पुस्त-कच नव्हते. नुसत्या ध्येयात्मक राजकारणाच्या गप्पा मारणारे लोक, लेख व पुस्तके आहेत. पण वास्तवात्मक राजकारणाकडे आपले बरेच दुर्लक्ष झालेले आहे. त्याच्यांतील प्रसंग, पेच व पवित्रे याची ओळख देशाच्या संरक्षणासाठी व स्वातंत्र्याच्या दृष्टीने करून देणे हेंहि काम विद्वान लेखकांनी केले पाहिजे.

आपल्या देशाच्या राजकारणांत एकीच्या, स्वातंत्र्याच्या व संरक्षणाच्या चळवळीला फार महत्त्व आहे. त्यांना विरोध करणाऱ्या अंतस्थ लोकांच्या मसलतीवर, गुप्त कारस्थानांवर व देशद्रोही हेतूंवर पाळत ठेवणे व त्यांना पायबंद घालणें, हे प्रत्येक नागरिकांचें कर्तव्य आहे. अशा दृष्टीने या पुस्तकाच्या लेखकाने कांही मुसलमानांच्या देशद्रोही राजकारणाचे गुप्त हेतू, बेत व चळवळी यांच्यावर बराच प्रकाश पाडला आहे. त्यांच्या पुढाऱ्यांच्या Pan Islamism, Pakistan वगैरेच्या कल्पना व कारस्थाने यांचाहि विचार केला आहे. त्यांच्या जातिनिविष्ट राजकारणापासून आपल्या देशाला किती धोका आहे याचे दिग्दर्शन केले आहे.

याशिवाय त्यांनी क्रान्तिकारकांच्या चळवळींचे समालोचन, त्यांचे हेतु व मार्ग, त्यांची हालअपेष्टा व हेळसांड, राजबंदी लोकांच्या सुटकेबद्दलच्या मागण्या, हिंदुमुसलमान दंग्यांचीं कारणे, युरोपांतील गुप्त हेर व त्यांची कारस्थाने, रशियांतील राज्यक्रान्तीचे हेतु व मार्ग, स्पेनमधील दुही व पक्ष, भावी रूसोजपानी युद्ध आणि युरोपांतील स्थानिक राजकारण यांचा अनेक दृष्टीने या पुस्तकांत विचार केलेला आहे.

राजकारण हे एकाच प्रकाराने चालत नसते. त्यामध्ये मैत्री, शत्रुत्व, तटस्थपणा, संधिविग्रह ही निश्चित स्वरूपाची नसतात. प्रत्येक राष्ट्राला आपल्या 'योगक्षेमा' च्या, 'लाभपालना'च्या, 'संरक्षण स्वातंत्र्या' च्या दृष्टीनेच राजकारणाची सूत्रे हालवावी लागतात. स्वदेशाच्या सीमांचे क्षेत्र आणि परराष्ट्रसंबंधाचे स्वरूप ही ज्या त्या कालाच्या आवश्यकतेप्रमाणे ठरवावी लागतात.

आज जर आपणास आंतरराष्ट्रीय लढाऊ राजकारणाच्या अभ्यासाने कांही शिकावयाचे असेल तर ते म्हणजे आपल्या देशाचे स्वातंत्र्य कसे मिळवितां येईल व राखतां येईल. त्याकरिता आपणास देशामध्ये एकीची भावना व संघटना उत्पन्न केली पाहिजे, लोकांमध्ये शिस्त व शास्त्रीय ज्ञान यांची वाढ केली पाहिजे, आणि देशाच्या संरक्षणाकरिता युद्धकौशल्य व ज्ञान, लढाईची सामुग्री व कारखाने, ही सर्व साधने वाढविली पाहिजेत. आपले आजचे राजकारण जित्याच्या भावनेचे, पिछेहाटीचे, निष्क्रियतेचे व बेबंदशाहीचे बनत चालले आहे. ते पुनः जेत्याच्या भावनेचे, चढावाचे, एकोप्याचे व लढाऊ, बनले पाहिजे. त्यामध्येच आपला तरणोपाय आहे.

लेखकाने स्वतंत्र बुद्धीने या सर्व विषयांचा अभ्यास व चर्चा केली आहे. त्यांच्या ग्रंथाच्या वाचनाने लोकांना बरीचशी राजकारणाची अंगे व उपांगे समजण्यास मदत होईल.

आज सात मोठी राष्ट्रे ( ग्रेटाब्रिटन, फ्रान्स, जर्मनी, इटली, रशिया, अमेरिका व जपान ) आपसांत जगाची पुन्हा वांटणी व व्यवस्था करू पहात आहेत. ते आपणास समजून घेतले पाहिजे. ह्या कामी या पुस्तकाचा फार उपयोग होईल.

अशी महत्त्वाची लेखमाला लिहून त्यांचे एक स्वतंत्र पुस्तक छापल्याबद्दल मी श्रीयुत **अ. ज. करंदीकर** यांचे अभिनंदन करतो व त्यांच्या या 'लढाऊ राजकारणा'चे स्वागत करतो.

**पुणें** ता. १५।६।३९ — **श्रीकृष्ण व्यंकटेश पुणतांबेकर,** एम्. ए, ( आक्सफर्ड ), बॅरिस्टर ॲट् लॉ, प्रोफेसर हिंदुविश्वविद्यालय, **बनारस.**



# अनुक्रमणिका


| क्रमांक | विषय | पृष्ठ |
|---|---|---|
| १ | क्रांतिकारकांच्या चळवळीचे समालोचन ... ... | १ |
| २ | सर नृपेंद्रनाथांची निराधार व चुकीची विधाने ... ... | ५० |
| ३ | बंगाल प्रांतांतील राजबंद्यांची करुण कहाणी ... ... | ५६ |
| ४ | सुभाषबाबू यांच्यावरील आरोपांना प्रत्युत्तर ... ... | ६२ |
| ५ | राजबंद्यांच्या सुटकेची मागणी ... ... ... | ८१ |
| ६ | अंदमानच्या राजबंद्यांची मागणी ... ... ... | ९१ |
| ७ | राजबंद्यांची करुण कहाणी ... ... ... | ९८ |
| ८ | परस्थ हिंदी देशभक्तांची मागणी ... ... ... | १०७ |
| ९ | राजबंदिनीच्या मुक्ततेची मागणी ... ... ... | ११३ |
| १० | राजबंदिनीचा छळ ... ... ... ... | ११८ |
| ११ | इंग्रज व मुसलमान... ... ... ... | १२१ |
| १२ | मुसलमानांचे परराष्ट्रसंबंध ... ... ... | १२३ |
| १३ | आगाखान व त्यांचे डाव ... ... ... | १२८ |
| १४ | दंगे कशा रीतीने घडून येतात ... ... ... | १३३ |
| १५ | ब्रिटिश हेरांचे डावपेच ... ... ... | १३९ |
| १६ | इस्लामी राष्ट्रांतील इंग्रजांचे हेर ... ... ... | १५० |
| १७ | गेल्या महायुद्धांतील गुप्त हेरांची कारस्थानें ... ... | १५५ |
| १८ | कर्नल लॉरेन्सची कामगिरी ! ... ... ... | १६२ |
| १९ | सांकेतिक भाषा कशी उकलतात ?... ... ... | १६८ |
| २० | सर बेसिल झाहारॉफ यांची कारस्थाने ... ... | १७४ |
| २१ | बोल्शेव्हिकांचे राज्यक्रांतीचे मार्ग ... ... ... | १८१ |
| २२ | स्पेनमधील राज्यक्रांति ... ... ... | १९८ |

२३ स्पेनमधील यादवीची पूर्वपीठिका ... ... ... २०३
२४ रशियाची फ्रान्समधील कारस्थानें ... ... ... २१९
२५ नवे महायुद्ध इतक्या लवकर होईल काय ? ... ... २२६
२६ युद्धांत आकाशदलाची कामगिरी ... ... ... २२९
२७ वैमानिक युद्धाची रूपरेखा ... ... ... २३७
२८ भावी रूसो–जपानी युद्धाचा लष्करीदृष्टया विचार ... २४५
२९ स्पॅनिश युद्धापासून आलेला लष्करी अनुभव ... ... २५६
३० युद्धोपयोगी पदार्थांचा पुरवठा व हिंदुस्थान ... ... २६७
३१ इंग्लंडपुढे येऊन पडलेला आत्मसंरक्षणाचा प्रश्न ... ... २७५
३२ मित्रराष्ट्रांतील मतभेद ... ... ... २८३
३३ युद्धशास्त्रदृष्टया हिंदुस्थानाच्या संरक्षणाचा प्रश्न ... ... २९४
३४ हिंदुस्थानच्या संरक्षणाची जबाबदारी ... ... ३०९
३५ आंग्लो–जर्मन आरमारी तह ... ... ... ३१४
३६ इंग्लंडचे परराष्ट्रीय धोरण ... ... ... ३१८
३७ भूमध्यसमुद्रांतील इंग्लंडचे वर्चस्व ... ... ३२४
३८ जर्मनीच्या चढाईचे परिणाम ... ... ... ३३०
३९ पापेनचे ऑस्ट्रियांतील राजकारण ... ... ... ३३५
४० ऑस्ट्रियांतील ताज्या घडामोडी ... ... ... ३४१
४१ ऑस्ट्रियन साम्राज्याचा वारसा ... ... ... ३४६
४२ युरोपांतील राजकारण ... ... ... ३५१
४३ रशियावरील स्वारीची योजना ... ... ... ३५५
४४ मध्ययुरोपांतील राजकारण ... ... ... ३६०
४५ काऊंट चियानोंची बर्लिन येथील कारस्थाने ... ... ३६४
४६ लॉर्ड हॅलिफाक्स यांची बर्लिनला भेट ... ... ३७१
४७ जर्मनीच्या राष्ट्रैक्याची स्थापना ... ... ... ३७९
४८ ऑस्ट्रियाच्या प्रकरणांत इंग्लंडची जबाबदारी ... ... ३९०
४९ आंग्लो-इटालियन तह ... ... ... ३९६
५० रूसो-जपानी युद्धाची प्रस्तावना ... ... ... ४०६

५१ झेकोस्लोव्हाकियाचें राजकारण ... ... ... ४१३
५२ मध्ययुरोपांतील कारस्थाने ... ... ... ४२४
५३ युरोपांत सध्या चाललेली कारस्थाने ... ... ४३५
५४ जर्मनीचा अभूतपूर्व विजय ... ... ... ४४६
५५ जर्मनीच्या विजयाचे प्रत्यक्ष व परोक्ष परिणाम ... ... ४७९
५६ पश्चिम युरोपांतील राजकारण ... ... ... ४८६




# लढाऊ राजकारण

## क्रांतिकारकांच्या चळवळीचें समालोचन

### लेखांक पहिला

गतवर्षी सध्याचे स्टेट सेक्रेटरी सर सॅम्युएल होअर यांनी हिंदुस्थानांतील क्रांतिकारकांच्या चळवळीचा गेल्या बारा वर्षांचा संक्षिप्त वृत्तान्त पार्लमेंटाच्या जॉइंट सिलेक्ट कमिटीपुढे ठेवला होता. तो आता त्या सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टाबरोबर प्रसिद्ध झाला आहे. सर सॅम्युएल यांनी आपल्या विषयाचे बंगाल्या-बाहेरील क्रांतिकारकांची चळवळ व बंगाल्यांतील क्रांतिकारकांची चळवळ असे दोन विभाग करून प्रथम बंगाल्याबाहेरील क्रांतिकारकांच्या हालचालीचे थोडक्यांत वर्णन केले आहे व मग बंगाल्यांतील चळवळीचे बरेंच सविस्तर वर्णन केले आहे. तोच क्रम अनुसरून प्रस्तुत लेखांत बंगाल्याबाहेरील चळवळीचा वृत्तान्त देण्यांत येत आहे.

### पंजाबांतील संस्था

परतंत्र देशांत निर्भयपणें सनदशीर चळवळ करणारे स्वावलंबी पुढारी निर्माण झाले म्हणजे थोड्याच दिवसांत आपल्या पुढाऱ्यांना मागे टाकूं इच्छिणारे त्यांचे तरुण अनुयायी बहुधा क्रांतिकारक पक्ष स्वीकारतात. अशी परिस्थिति बंगाल्याच्या बाहेरील उत्तर–हिंदुस्थानांत प्रथम पंजाबांत उद्‌भवली व तिचा फायदा घेऊन प्रसिद्ध बंगाली क्रांतिकारक रासबिहारी बसु याने १९१० च्या सुमारास पंजाबांत क्रांतिकारकांची संघटना घडवून आणली. लाला लजपतरायांनी पुत्रनिर्विशेष प्रेमाने वाढविलेला बालमुकुंद, सध्याचे हिंदुमहासभेचे अध्यक्ष भाई परमानंद, स्वामी रामतीर्थांचे एक शिष्य लाला अमीरचंद हे सारे रासबिहारीच्या

संस्थेत सामील झाले होते. क्रांतीच्या बाल्यावस्थेंतील कट एकदोन वर्षेंपर्यंत गुप्त राहूं शकतात. त्याप्रमाणे १९१२ च्या अखेरीपर्यंत या कटाचा बोभाटा झाला नाहीं. पण १२ डिसेंबर १९१२ रोजीं बालमुकुंदने व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंजवर बॉंब टाकला व त्यानंतर १९१३ च्या आरंभी दिल्ली व लाहोर या दोन शहरांत पुनः बॉंबचे स्फोट झाले. त्यांपैकी दिल्ली येथील स्फोटाचा तपास करीत असतां पोलिसांना पंजाबांतील कटाचा शोध लागला. पुढे हे प्रकरण कोर्टांत जाऊन लाहोरच्या स्फोटाबद्दल बालमुकुंदाला व दिल्लीच्या स्फोटाबद्दल अमीरचंदाला फांशीची शिक्षा झाली.

## हिंदुस्थान रिपब्लिकन आर्मी

पुढे १९१५ साली शीख लोकांचा 'गदर' संघ व रासबिहारीचा संघ या उभयतांनी पंजाबांत बंड घडवून आणण्यासाठीं विश्वप्रयत्न केले. पण सर मायकेल ओड्वायरच्या जागरूकपणामुळे बंडाचे प्रयत्न फसून बहुतेक सारे क्रांतिकारक पोलिसांच्या हाती लागले. या प्रकरणांत भाई परमानंदांना प्रथम फांशीची शिक्षा सांगण्यांत आली होती. पण मागाहून व्हाइसरॉय हार्डिंजच्या कृपेमुळे त्यांना जन्मठेप काळेपाण्यावर पाठविण्यांत आले. पुढे १९१९ च्या अखेरीला सामान्यतः सर्व राजबंद्यांना माफी देण्याचा जाहीरनामा निघाल्याने पंजाबच्या कटांतलेहि सर्व कैदी सुटून हिंदुस्थानांत परत आले. परत आलेल्या कैद्यांपैकी भाई परमानंदासारख्या कांहीजणांनी क्रांतीचा मार्ग कायमचा सोडून दिला. पण शचींद्र सान्यालासारख्या कांहीजणांनी आयरिश क्रांतिकारकांनी इंग्लंडावर मिळविलेल्या विजयाने उत्साहित होऊन 'हिंदुस्थान रिपब्लिकन आर्मी' या बलिष्ठ क्रांतिकारक संस्थेची स्थापना केली. बंगाल्याबाहेरील क्रांतिकारकांच्या संस्थांपैकी सर्वांत अतिशय चिवट व टिकाऊ संस्था, असें या संस्थेचे सर सॅम्युएल यांनी वर्णन केलें आहे. "The object of the association shall be to establish a federated republic of the united states of India by an organised and armed revolution" असें या संस्थेचे ध्येय असल्याचें स्वतः स्टेट-सेक्रेटरी सांगतात. याप्रमाणें संस्थेच्या ध्येयाचा उल्लेख करून स्टेट-सेक्रेटरी पुढें म्हणतात, Each provincial organisation was to have its various

departments and each was to concentrate on crimes of violence with a view to collect money and arms; for the enforcement of discipline assassination was made permissible!" बिहार, संयुक्तप्रांत, पंजाब, दिल्ली व मद्रास इतक्या प्रांतांतून या संस्थेच्या शाखा प्रस्थापित झाल्या असल्याचें स्टेट-सेक्रेटरींनी सांगितलें आहे.

## काकोरी प्रकरण

हिंदुस्थान रिपब्लिकन आर्मी या संस्थेची स्थापना बहुधा १९२२ साली झाली असावी. असहकारितेची चळवळ फसून गांधी तुरुंगांत गेल्यावर दोघा बंगाली क्रांतिकारकांनी या संस्थेची स्थापना केली, असें स्वतः सर सॅम्युएलच म्हणतात. पण १९२५ च्या ऑगस्टमध्ये संयुक्त प्रांतांत काकोरी स्टेशनाजवळ आगगाडी थांबवून ती लुटण्याचा प्रसंग घडून येईपर्यंत सरकारचे या संस्थेकडे फारसे लक्ष गेले नव्हते; इतकेंच नव्हे तर काकोरी प्रकरणानंतरदेखील अधिकारी लोक असेच समजत होते की हा मुख्यतः संयुक्त प्रांतांतील बंगाल्यांचाच कट आहे आणि अद्यापि आपल्या प्रांतांतील हिंदी भाषा बोलणाऱ्या लोकांत क्रांतिपक्षाची बीजे रुजली नाहीत. आजदेखील स्टेट-सेक्रेटरी असेच म्हणत आहेत की, काकोरीचें प्रकरण हे मुख्यतः बंगाली क्रांतिकारकांचे प्रकरण होते, त्याच्याशी हिंदुस्थान रिपब्लिकन आर्मीचा कांहीहि संबंध नव्हता. पण त्यांची ही समजूत चुकीची दिसते. कारण हिंदुस्थान रिपब्लिकन आर्मीचा एक सेनापति चंद्रशेखर आजाद हा काकोरी-प्रकरणांतील एक फरारी आरोपी होता. याच प्रकरणांत भगतसिंगाला प्रथम अटक झाली होती. पण मागाहून पुराव्याच्या अभावी त्याला सोडावे लागलें. याच प्रकरणांत फांशी गेलेल्या रामप्रसाद बिस्मिलची पदे हिंदुस्थान रिपब्लिकन आर्मीची राष्ट्रगीते होऊन बसलीं आहेत. या साऱ्या गोष्टी लाहोर-कटाच्या खटल्याने सर्व हिंदुस्थानभर प्रसिद्ध झाल्या आहेत. असो; या काकोरीच्या प्रकरणांत राजेंद्र लाहिरी, रामप्रसाद बिस्मिल, रोशनसिंग आणि अश्फकुल्ला या चौघांना फांशीची शिक्षा झाली व शचींद्र सान्यालाला फिरून एकवार जन्मठेप काळेपाणी मिळालें.

## रशियांतील मताची छाप

हे सर्व पहिले पुढारी नष्ट झाल्यानंतर हिंदुस्थान रिपब्लिकन आर्मीमध्ये

एक महत्त्वाचा फरक घडून आला. कारण हे नष्ट झालेले पुढारी मुख्यतः राज्य-क्रांतीचे पुरस्कर्ते होते, सामाजिक क्रांतीची आवश्यकता त्यांच्या ईश्वरनिष्ठ मनाला तितकीशी भासत नव्हती. पण १९२४ सालांतील कानपूरच्या कम्यूनिस्ट कटाच्या खटल्यापासून या संस्थेतील तरुणांमध्ये रशियन मते पसरूं लागली आणि रशियाहून त्यांना पैशाची मदतहि होऊं लागली. स्टेट-सेक्रेटरी सांगतात की, १९२५ च्या मार्चमध्ये सरकारला अशी निश्चित खबर लागली की शचींद्र सान्याल याला मानवेंद्र रॉय यांच्यामार्फत रशियाहून मदत मिळत असते. या रशियन मतांच्या आकर्षणामुळे म्हणा, किंवा रशियन मदतीच्या आकर्षणामुळे म्हणा, हिंदुस्थान रिपब्लिकन आर्मीचे पहिले पुढारी फांशी गेल्यावर त्या संस्थेने आपले पहिले नांव टाकून 'हिंदुस्थान सोशालिस्ट रिपब्लिकन असोसिएशन' असे नवे नांव धारण केले. सोशालिझमच्या अंगीकाराबरोबरच या संस्थेंतील तरुण नास्तिकहि बनले. परिवर्तनाच्या काळांतील आपल्या मनःस्थितीचे प्रामाणिक वर्णन भगतसिंगाने 'Why I became an atheist ?' या लाहोरच्या 'पीपल' पत्रांत प्रसिद्ध झालेल्या प्रबंधांत केले आहे. काकोरीच्या क्रांतिकारकांपैकीं फांशीची शिक्षा झालेल्यांना १९२७ साली सरकारने फांशी दिलें. या राजबंद्यांची फांशीची शिक्षा रद्द व्हावी, याबद्दल सर्व हिंदुस्थानभर चळवळ झाली, पण तिला यश आले नाही. या बाबतींत मद्रासच्या कॉंग्रेसमध्ये दुखवट्याचा आणि सरकाराच्या निषेधाचा ठरावहि पास झाला. याच ठिकाणी मद्रास कॉंग्रेसमधील दुसऱ्या एक-दोन ठरावांचा उल्लेख करणे जरूर आहे. मद्रास कॉंग्रेसनेच प्रथम पूर्ण राष्ट्रीय स्वातंत्र्य हे हिंदुस्थानाचे ध्येय असल्याचा ठराव केला, याहून अधिक महत्त्वाचा तेथला दुसरा ठराव हिंदुस्थानाच्या वायव्य-सरहद्दीवर इंग्लंडाचे एखाद्या राष्ट्राशी युद्ध जुंपल्यास हिंदुस्थानाने इंग्लंडाला मदत करावी कां नाही, हे ठरविण्याचा अधिकार हिंदी लोकांचा आहे, अशा आशयाचा होता. मद्रासचाच आणखी एक ठराव अँटी-इंपीरियालिस्टिक लीग या संस्थेला कॉंग्रेस जोडण्याबद्दलचा होता. या साऱ्या ठरावांमुळे हिंदुस्थानांत भावी महायुद्धाचे वारे वाहूं लागले आणि क्रांतिकारकांनी पुनः जोराने आपल्या कार्याला सुरुवात केली.

## स्फोटक द्रव्यांचा संग्रह

आतां 'फलानुमेयाः प्रारंभाः' या न्यायाने क्रांतिकारकांच्या पूर्वतयारीचें अनुमान केले असतां असे दिसून येते की, १९२८ सालापासून क्रांतिकारकांनी स्फोटक द्रव्यांचा संग्रह करणे व त्या द्रव्यांच्या बाबतींतील नवे शोध हस्तगत करून घेणे, या गोष्टीकडे विशेष लक्ष पुरविले असावे. १९३० च्या ऑक्टोबर महिन्यांत या संस्थेचा एक सभासद कैलासपति याला दिल्ली येथे अटक झाली असता त्याच्या संग्रही सहा हजार बॉंब गोळ्यांना पुरतील इतकी स्फोटक द्रव्यें सांपडली. हा स्फोटक द्रव्यांच्या संग्रहाचा नमुना झाला. १९२९ सालाच्या अखेरीस त्यांनी व्हाइसरॉयाच्या गाडीखाली विजेच्या साहाय्याने बॉंब उडविल्याची गोष्ट प्रसिद्धच आहे. नवीन शोधांचा अत्याचारासाठी या क्रांतिकारकांनी उपयोग केल्याचा दुसरा एक प्रसंग येथे सांगण्याजोगा आहे. १९३० साली जून १९ रोजी एकाच दिवशी क्रांतिकारकांनी रावळपिंडी, लाहोर, अमृतसर, लायलपूर, गुजराणवाला व शेखपुरा येथे 'बूबी ट्रॅप बॉंबचा' प्रयोग करून दोन पोलिस अधिकारी ठार मारले व चौघे जखमी केले. १९२९ सालीच हिंदुस्थान सोशालिस्ट रिपब्लिकन असोसिएशनच्या प्रयोगांची कीर्ति क्रांतिकारक पक्षांत इतकी पसरली होती की कलकत्त्याहून रॉय नावाचे एक क्रांतिकारक १९२९ च्या अखेरीला पंजाबांत आले व आमाटोल या स्फोटक द्रव्याचे बांब करण्याची कला शिकून परत गेले.

## नवजवान सभा

याप्रमाणे गुप्त युद्धाची तयारी चालू असताच नवजवान सभेमार्फत या संस्थेचे उघड प्रचाराचे कार्य चालू होते. लाहोरच्या नवजवान सभेंत क्रांतिकारकांचा भरणा बराच होता व उत्तर-हिंदुस्थानांतील इतर नवजवान-सभा या नेहमी लाहोर-सभेच्या धोरणाने वागत असत. या नवजवान सभेच्या लोकांनी कॉंग्रेसमधील जहाल पक्षांशी सहकार्य करून खुद्द कॉंग्रेस आपल्या हातीं घेण्याचा १९२८ आणि १९२९ या दोनहि साली प्रयत्न केला पण तो प्रयत्न फसला. तथापि कॉंग्रेसने सायमन कमिशनावर बहिष्कार टाकल्याची संधि साधून हिंदुस्थान सोशालिस्ट रिपब्लिकन असोसिएशनने सरकारशीं झगडण्याला सुरुवात केली.

१९२८ च्या ऑक्टोबर महिन्यांत सायमन कमिशन मुंबईला आले. य कमिशनाच्या स्वागतासाठी दोघे बंगाली बॉब येऊन येत असतां मनमाडनजीव त्या बाँबचा स्फोट होऊन त्यांच्यापैकी एकजण जखमी होऊन पोलिसांना सांप डला. हे दोघे बंगाली बहुधा हिंदुस्थान रिपब्लिकन आर्मीपैकी असावेत. पु त्याच महिन्यांत सायमन कमिशन लाहोरला गेले असतां तेथल्या पोलिसांनं निषेधाची मिरवणूक काढणाऱ्या लोकांवर लाठीहल्ला केला. या लाठीहल्ल्यांत लाल लजपतराय यांनाहि जोराचा मार बसून हृत्क्रियेत बिघाड झाल्यामुळे १७ नोव्हें बर रोजी लाला लजपतराय मरण पावले. लाला लजपतरायांच्या मृत्यूमुळे देशां तील लोकमत अत्यंत प्रक्षुब्ध होऊन गेले. लाला लजपतरायांची मते प्रथम पासूनच जहाल होती आणि लाठीहल्ल्यानंतर झालेल्या निषेधाच्या सभेंतील त्यांच्य भाषणांत ते असेंहि म्हणाले होते की, यापुढे अधिकाऱ्यांच्या अत्याचारांमुळे राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळविण्यासाठी तरुणांना भलत्याच मार्गाला जाणे भाग पडलें तरी मं त्यांना स्वर्गांतून आशीर्वाद देईन.

## सॉंडर्सचा खून

लालाजीच्या आकस्मिक मृत्यूमुळे क्रांतिकारकांच्या मनावर भयंकर परि णाम होऊन त्यांनी लजपतरायांच्या मृत्यूचा सूड उगविण्यासाठी लाहोर पोलिसां पैकी सॉंडर्स नांवाचा एक अधिकारी व एक पोलिस यांना ठार मारले. या हत्या कांडानंतर लाहोरांत धरपकडीला सुरुवात झाली. पण सॉंडर्सवर हल्ला करणारे लोव आधींच पळून गेले असल्याने ते बरेंच दिवस पोलिसांना सांपडले नाहीत. त्यांच्या पैकीं भगतसिंगाला १९२९ च्या एप्रिलमध्ये दिल्लीच्या असेंब्लीत बॉब टाकल्यावर अटक झाली व राजगुरूला त्याच वर्षाच्या पावसाळ्यांत पुण्यांत पकडण्यांत आलें. या उभयतांचा साथीदार चंद्रशेखर आजाद हा १९३१ च्या फेब्रुवारींत अलाहाबाद येथील एका बागेंत पोलिसांशीं लढतांना मारला गेला.

भगतसिंग व त्याचे सहकारी पकडले गेल्यानंतर सरकारने लाहोर येथील कटाच्या खटल्याला सुरुवात केली. खटल्याला सुरुवात होतांच भगतसिंगप्रभृति क्रांतिकारकांनी आपल्याला राजबंद्याप्रमाणें वागविण्यांत यावें असा आग्रह धरून अन्नत्याग केला. या अन्नत्यागाला दोन महिन्यांहून अधिक दिवस लोटल्यावर

आणि त्यांत यतींद्रनाथ दास यांची प्राणाहुति पडल्यावर सरकारने क्रांतिकारकांना कांही सवलती दिल्या आणि खटल्याचें काम पुढे चालू लागलें. खटल्याचें काम चालू असतां कोर्टांत भगतसिंग, विजयकुमारसिंह वगैरे क्रांतिकारकांनी निर्भय-वृत्ति व समयसूचकता यांचें जें अपूर्व प्रदर्शन केलें त्यामुळे या खटल्याला देशभर अतिशय प्रसिद्धी मिळाली. या प्रसिद्धीमुळे क्रांतिकारकांना अधिक उत्तेजन मिळून त्यांनी १९२९ च्या डिसेंबर अखेरीला व्हाइसरॉयांची स्पेशल गाडी उडवून देण्याचा प्रयत्न केला. हा प्रयत्न फसला व त्यांतून दिल्ली येथील कटाचा खटला मात्र उद्‌भवला.

## इतर अत्याचार

१९३० च्या फेब्रुवारींत लाहोर कटाच्या खटल्यांतील प्रमुख माफीचा साक्षीदार जयगोपाळ याला मारण्याचा प्रयत्न पोलिसांच्या अटकेत असलेल्या एका क्रांतिकारकाने केला. जयगोपाळ जखमी झाला पण तो बचावला. त्याच वर्षाच्या आक्टोबर महिन्यांत हा खटला चालविणारे गुप्त पोलिसांचे अधिकारी खानबहादुर अबदुल अझीझ यांच्या मोटारीवर हल्ला होऊन त्यांचा ऑर्डर्ली ठार झाला पण खानबहादुर बचावले. याच वर्षाच्या जूनमध्ये झांशीच्या कमिशनरला मारण्याचा प्रयत्न झाला आणि डिसेंबर अखेरीला हरिकिसनने पंजाबच्या गव्हर्नराला मारण्याचा प्रयत्न केला.

१९३१ च्या आरंभी अलाहाबादेच्या आल्फ्रेड पार्कमध्ये चंद्रशेखर आजाद मारला गेला. त्यानंतर आपापसांतील विश्वासघातामुळे चंद्रशेखर पोलिसांना सांपडला असावा, अशा समजुतीमुळे या वर्षी क्रांतिकारकांत यादवी माजली. या वर्षाच्या जुलै आणि नोव्हेंबर महिन्यांत पोलिसांना फितूर झाल्याबद्दल वीरभद्र तिवारी याला मारण्याचा क्रांतिकारकांनी दोन वेळा प्रयत्न केला पण तो फसला. याशिवाय ऑगस्टमध्ये अशाच कारणासाठी राजाराम जालिम याला कोणीतरी मारून टाकलें. यावर्षी क्रांतिकारकांनी सरकारी अधिकाऱ्यांवर केलेला एकच अत्याचार विशेष महत्त्वाचा आहे. त्या वर्षीच्या जुलै २३ च्या रात्री कांही क्रांतिकारकांनी पंजाब मेलमध्ये शिरून गाडींत निजलेल्या दोघा इंग्रज लष्करी अधिकाऱ्यांना मारण्याचा प्रयत्न केला. त्या वेळीं झालेल्या जखमांनी एकजण मेला पण दुसरा बचावला.

१९३२ साली हिंदुस्थान सोशालिस्ट रिपब्लिकन आर्मीचा मुख्य सेनापति यशपाल याला अलाहाबादेला अटक झाली व त्यानंतर सहा महिन्यांनी हंसराज ऊर्फ वायरलेस हाहि पोलिसांच्या हाती लागला. १९३२ च्या अखेरीला क्रांतिकारकांनी लाहोर कटाच्या खटल्यांतील एक माफीचा साक्षीदार फणींद्र घोष याला सुऱ्या खुपसून ठार मारले. याच वर्षी अजमीरच्या कमिशनरला मारण्याचा प्रयत्न बापट याने केला.

## मद्रासमध्ये प्रसार

लाहोर कटाच्या खटल्यांतील विजयकुमारसिंह, शिववर्मा वगैरे आरोपींना सरकारने राजमहेंद्रीच्या तुरुंगांत ठेवले होते. त्या तुरुंगांत त्यांनी मद्रासी राजबंद्यांना गुप्त कट आणि राज्यक्रांति यांचे धडे शिकविण्यास सुरुवात केली असावी; कारण १९३३ च्या आरंभी मद्रास इलाख्यांत अत्याचार घडून आले. त्यांतला विशेष उल्लेख करण्याजोगा अत्याचार म्हणजे उटकमंड येथील नॅशनल बँकेवर क्रांतिकारकांनी घातलेला दरवडा होय. या प्रकरणानंतर, शिक्षा झालेल्या क्रांतिकारकांना अंदमानांत पाठविण्याचे नवे धोरण सरकारने अंमलांत आणलें.

## महाराष्ट्रांतील अत्याचार

या सगळ्या मुदतीत हिंदुस्थान सोशालिस्ट रिपब्लिकन असोसिएशनचा हात नसलेला एकच अत्याचार बंगाल्याबाहेरील हिंदुस्थानांत झाला आहे तो म्हणजे फर्ग्युसन कॉलेजांत गोगटे याने हॉटसन साहेबावर केलेला गोळीबार होय. याखेरीज नूतन मराठी विद्यालयांतील स्फोटासारखी कांही कमी महत्त्वाचीं प्रकरणे महाराष्ट्रांत उद्‌भवलीं. मुंबई इलाख्यांत क्रांतिकारकांचा प्रभाव कितपत आहे व त्यांचा इतर प्रांतांतील क्रांतिकारकाशी संबंध आहे कीं नाही या बाबतीत चौकशी करण्यासाठी मुंबई सरकारने १९३०-३१ सालीं एक खास अधिकारी नेमला होता. त्या अधिकाऱ्याने पूर्ण चौकशीअंतीं असें मत दिलें आहे कीं, महाराष्ट्रांत राजकीय अत्याचार घडवून आणण्यासाठी एखादा कट अस्तित्वांत आलेला नाही व या प्रांतांत जे फुटकळ क्रांतिकारक दिसून येतात त्यांचा परप्रांतांतील क्रांतिकारकांशींहि कांही संबंध नाही; हेंच विधान मध्यप्रांतालाहि लागू आहे.

या प्रकरणाचा समारोप करतांना स्टेट सेक्रेटरी म्हणतात कीं, सध्या जरी क्रांतिकारकांचे अत्याचार थांबले असले तरी लवकरच हिंदुस्थानांत बंड घडवून आणावे, म्हणून हिंदुस्थान सोशालिस्ट रिपब्लिकन ॲसोसिएशन, हिंदुस्थानांतील जहाल कम्युनिस्ट पक्ष आणि सानफ्रान्सिस्कोचा गदर पक्ष या सर्वांचे संगनमत घडवून आणण्याचे प्रयत्न चालले आहेत. पण आजपर्यंत जशी या तिन्ही संस्थांची सर्व अंतस्थ कारस्थाने पोलिसांना कळत आली आहेत, तशीच जर ती पुढेहि कळत राहतील, तर आम्हांला या भावी बंडाचें फारसे भय बाळगायला नको. इथे वाचकांना अशी शंका येईल की, क्रांतिकारकांची सर्व कारस्थाने जर आजपर्यंत पोलिसांना कळत आली आहेत तर इतके अत्याचार घडले कसे ? या शंकेचे उत्तर असे आहे की, पोलिसांना माहिती लागली तरी त्याच वेळी क्रांतिकारकांवरील आरोप कोर्टांत सिद्ध करण्याइतका पुरावा त्यांच्या हाती लागत नाही. म्हणून पुरेसा पुरावा हाती लागेपर्यंत त्यांना आपले हात आवरावे लागतात. यामुळे पोलिसांनी कितीहि खबरदारी घेतली तरी त्यांना एकहि अत्याचार घडूं न देणे अशक्य असते.

असो. आतां यापुढील प्रकरणांत बंगाल्यांतील अत्याचारासंबधाने भारतमंत्री काय लिहितात तें पाहूं.*

— केसरी, ता. ११ जानेवारी, १९३५.

---

## लेखांक दुसरा

आता बंगाल प्रांतांतील क्रांतिकारकांच्या चळवळीसंबंधाने भारतमंत्री काय म्हणतात ते पाहूं. बंगाल्यांतील पहिली कार्यकारी क्रांतिकारक समिति अर्थातच 'युगांतर समिति' होय. या समितीची स्थापना अरविंद घोष आणि बारींद्र घोष या उभयतां बंधूंनी वंगभंगाच्या चळवळीच्या दिवसांत कलकत्ता येथे केली ! या समितीच्या स्थापनेनंतर एकदोन वर्षांनी पुलिनबिहारी दास यांनी डाका येथे

* जॉइंट सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टाच्या आधारें.

'अनुशीलन समिति' नांवाची दुसरी एक क्रांतिकारक समिति स्थापली. महायुद्धाच्या दिवसांत या दोनहि संघांनी परस्परांशीं सहकार्य करून बंगाल प्रांतांत अतिशय धुमाकूळ घातला. त्या दिवसांत क्रांतिकारकांच्या तत्त्वांचा प्रतिकार करण्याला समर्थ अशा गांधीवादाचा अद्यापि उदय झालेला नसल्याने बंगाली क्रांतिकारकांना कोर्टापुढे खेचतां येईल, अशा तऱ्हेचा पुरावा सरकारला बहुधा मिळत नसे. रौलेट साहेबांनी म्हटले आहे कीं, १९१५ सालाच्या आरंभापासून १९१६ च्या जून अखेरीपर्यंत बंगाली क्रांतिकारकांनी आठ पोलीस अधिकारी आणि सहा इतर अशा चौदा लोकांना ठार मारले; पण या इतक्या अत्याचारांबद्दल एकाहि क्रांतिकारकावर सरकारला खटला शाबीत करतां आला नाही. अशा परिस्थितीत क्रांतिकारक पक्षापासून निदान आपल्या अधिकाऱ्यांचा बचाव तरी करतां यावा, यासाठी सरकारने डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टाचा उपयोग करून सर्व संशयित क्रांतिकारकांना चौकशीशिवाय डांबून ठेवण्याचा मार्ग पत्करला. स्टेट सेक्रेटरीच्या सांगण्यावरून असे कळतें कीं, १९१६ जूनपासून १९१९ च्या नोव्हेंबरपर्यंत एकंदर १०२९ संशयित बंगाली क्रांतिकारकांना निरनिराळ्या ठिकाणी डांबून ठेविलें होतें. पण पुढे त्या वर्षाच्या डिसेंबरमध्ये बादशहांचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला व त्यांतील आज्ञा पाळण्यासाठी चौकशीशिवाय अटकेत ठेवलेल्या सर्व क्रांतिकारकांची सरकारला ताबडतोब सुटका करावी लागली. त्यानंतर १९२० साली निरनिराळ्या कटांच्या खटल्यांतून शिक्षा झालेल्या क्रांतिकारक पुढाऱ्यांना क्रमाक्रमाने माफी देऊन सरकारने सोडून दिले.

## क्रांतिकारक नियतकालिकें

क्रांतिकारकांचा प्रत्येक पुढारी हा प्रचारक असतोच. यामुळे प्रचारकार्याला उपयुक्त असा लेखकाचा किंवा शिक्षकाचा धंदा करण्याकडे त्याची साहजिकच प्रवृत्ति असते. तेव्हां बंधमुक्त झालेल्या क्रांतिकारकांनी याच धंद्याकडे आपला मोर्चा वळवावा, हें स्वाभाविकच होतें. या वेळी बॅ. चित्तरंजन दास यांनी आपल्या 'नारायण' मासिकाची संपादकी बारींद्रकुमारांच्या हातीं दिली. ही 'नारायण' मासिकाची संपादकी बारींद्रकुमारांच्या हातीं फार दिवस टिकली नाही. कारण लवकरच 'बंगाल प्रांताने बाकीच्या हिंदुस्थानापासून विभक्त होऊन इंग्लंडशीं स्वतंत्र करार-

नामा करावा' अशा आशयाचा एक लेख त्या मासिकांतून छापून आलेला पाहून चित्तरंजन बाबूंनी बारींद्रकुमारांला संपादकपद सोडावयास लाविले. याच सुमाराला बंगाली क्रांतिकारकांनी 'प्रवर्तक' नांवाचे एक मासिक आणि 'नवसंघ' व 'स्टॅंडर्ड बेयरर' हीं अनुक्रमें बंगाली व इंग्रजी साप्ताहिकें सुरू केली. 'नवसंघ' आणि 'स्टॅंडर्ड बेयरर' या दोन्ही पत्रांतून कम्यूनिस्टांचे तत्त्वज्ञान व अरविंद-बाबूंचे तत्त्वज्ञान यांचा समन्वय करण्याच्या दृष्टीनें लेख येत असत. 'प्रवर्तक' मासिकाचे संपादक बाबू मतिलाल रॉय हे नरेंद्र गोसाव्याचा वध करणाऱ्या कन्हय्यालाल दत्ताचे मित्र होते व त्यांच्या मासिकांतून बंगाली क्रांतिकारकांची माहिती देणारे लेख नेहमी प्रसिद्ध होत असत. 'प्रवर्तक' मासिकांतूनच कन्हय्या-लालचे चरित्र मतिलाल बाबूंनी प्रथम प्रसिद्ध केले व ते पुस्तक रूपाने प्रसिद्ध होतांच सरकारने जप्त केले ! याच मासिकांतून रासबिहारी बसूंची आत्मकथाहि प्रसिद्ध झाली.

ही सारी नियतकालिकें चंद्रनगर येथे प्रसिद्ध होत असल्याने त्यांना हिंदु-स्थान सरकारच्या कायद्याचें फारसे भय नसें. ब्रिटिश हिंदुस्थानांत यावेळीं प्रेस ॲक्ट अस्तित्वांत असल्याने तेथे कोणतेंहि नवीन पत्र सुरू करणें ही मोठी दुर्घट गोष्ट होती. "पण क्रांतिकारकांच्या सुदैवाने १९२२ च्या मार्च महिन्यांत प्रेस ॲक्ट रद्द झाला व लगेच क्रांतिकारकांनी 'आत्मशक्ति,' 'सारथी,' 'मुक्तिकाम,' 'बिजली' वगैरे पत्रें सुरू केलीं" असे स्टेट सेक्रेटरींनी सांगितलें आहे. हें विधान तितकेंसे खरे नाही. कारण वर उल्लेखिलेल्या पत्रांपैकी 'बिजली' हें पत्र १९२१ सालीं म्हणजे प्रेस ॲक्ट रद्द होण्यापूर्वीच निघत होतें आणि 'सारथी' व 'आत्मशक्ति' हीं पत्रे एक वर्षानंतर म्हणजे १९२३ साली सुरू झालीं. 'मुक्तिकाम' या पत्राचें नांवहि अपरिचित असल्याने त्याच्या विषयीं कांहींच सांगतां येत नाही. याच ठिकाणीं स्टेट सेक्रेटरींच्या दुसऱ्या एका चुकीच्या विधानाचा उल्लेख केला पाहिजे.

'The terrorists, now freed from restraint, were content to watch developments while utilising every opportunity of drawing their followers together and extending their influence. Endeavours were made to organise ashrams on lines

similar to those which played so important a part in former movements.'

## भारतमंत्र्यांची चुकीची माहिती

याचा अर्थ असा होतो की, सुटल्याबरोबर साऱ्या क्रांतिकारकांनी आपापसांत संघटना करून आपले अनुयायी एकत्र आणण्याचे व जनतेमध्ये आपलें वजन वाढविण्याचे प्रयत्न केले, इतकेच नव्हे तर पूर्वीच्या धर्तीवर फिरून एकदा क्रांतिकारकाचे आश्रम स्थापण्याचाहि त्यांनी उद्योग केला. पण हें विधान १९२४-२५ च्या इंडिया रिपोर्टांत स्वतः सरकारने प्रसिद्ध केलेल्या माहितीशी विसंगत आहे. सुटलेल्या क्रांतिकारकांविषयी त्या रिपोर्टांत म्हटले आहे, 'Many forsook their connection with revolutionary crime and have not since returned to it. But a small body of irreconcilables subsequently began to reorganise their societies', म्हणजे सुटलेल्या क्रांतिकारकांपैकी पुष्कळांनी क्रांतीचा पथ कायमचा सोडून दिला; कांही थोड्या दुराराध्यांनी मात्र लौकरच आपल्या समित्यांची पुनर्घटना करण्यास सुरुवात केली.

## सुधारणांचा उपयोग

स्टेट सेक्रेटरींनी असेंहि एक विधान केले आहे की, 'Many of their leaders obtained responsible positions in District Congress Committees and used their positions to consolidate their power.' पण या बाबतीत देखील वास्तविक परिस्थिति वेगळीच होती. सुटलेल्या क्रांतिकारकांच्या मनःस्थितीचे यथातथ्य वर्णन रवींद्रनाथांनी आपल्या 'सत्येर आव्हान' या प्रबंधांत पुढीलप्रमाणे केले आहे. 'सेइ वंगविभागेर उत्तेजनारदिने एकदल युवक राष्ट्रविप्लवेर द्वारा देशे युगांतर आनबार उद्योग करेछिलेन. ताँरा परम त्यागे परम दुःखे आज एकटा कथा स्पष्ट जेनेचेन, जे राष्ट्र जखन तैरि नेई तखन राष्ट्रविप्लवेर चेष्टा करा पथ छेडे अपथे चला, पथेर चेये अपथ मापे छोट किन्तु सेटाके अनुसरण करते गेले लक्ष्ये पोंछान जाय ना; माझेर थेके पा दुटोके कांटायकांटाय छिन्न करा हय!' यावरून अंशतः आपल्याच प्रयत्नाने लाभलेल्या सुधारणांचा उपयोग करून घेण्याकडेच तेव्हा क्रांतिकारकांची

प्रवृत्ति होती हे उघड होतें. इतकेच नव्हे तर गांधींनी सुधारणांवर बहिष्कार टाकण्याचा उपदेश सुरू केला, तेव्हा यांच्यापैकी कित्येकांनी गांधींना जाहीर रीतीने विरोधहि केला. सुप्रसिद्ध 'वंदेमातरम्' पत्रांतील अरविंदबाबूंचे एक सहकारी संपादक बाबू वसंतकुमार यांनी तेव्हां आपल्या एका पुस्तकांत अरविंद-बाबूंच्या लेखांतील उतारे देऊन त्यांचेहि मत सुधारणांचा उपयोग करून घेण्याला अनुकूल असल्याचे सिद्ध केलें होते. यामुळे कौन्सिल बहिष्कार उठविण्याचा कार्य-क्रम चित्तरंजनबाबूंनी हाती घेतांच अरविंदबाबूंच्या अनुयायांनी त्यांना मनःपूर्वक साह्याय्य केले व गांधीपक्षाच्या हातून कॉंग्रेस कमिट्या जिंकून घेण्याला मदत केली. अशा रीतीने अरविंदबाबूंचे अनुयायी कॉंग्रेस कमिट्यांतून अधिकारारूढ झाले. कॉंग्रेस कमिट्यांतून पुढाकार घेणाऱ्या जुन्या क्रांतिकारकांपैकी एकालाहि पुनः क्रांतिकारक चळवळीत भाग घेतल्याबद्दल शिक्षा झाल्याचें उदाहरण सर-कारला दाखवितां आले नाही.

कोणत्याहि जिवंत पक्षाच्या कार्यक्रमांत बदल घडून येत असतां तो घड-वून आणणारे पुढारी आपल्या पूर्वीच्या पुढाऱ्यांच्या आदर्शांची व ध्येयवादाची कोरडी स्तुति नेहमीच करीत असतात. उदाहरणार्थ, १९२३ साली असह-कारितेच्या प्रणेत्यांची व त्यांच्या कार्यक्रमाची स्तुति करीत करीतच स्वराज्यवादी कौन्सिलांत गेले. अशाच प्रकारे तेव्हां कौन्सिलाभिमुख झालेले क्रांतिकारक आपल्या पक्षांतील जुन्या पुढाऱ्यांची आपल्या वर्तमानपत्रांतून मधून मधून स्तुति करीत असत. पण तो केवळ त्यांना त्यांच्या पूर्वीच्या शपथांची आठवण द्याव-याला येणाऱ्या क्रांतीच्या त्रस्त समंधाला शांत करण्याचा एक उपाय होता. मात्र परक्या सरकाराला आभास आणि सत्य यांमधील फरक कळणे नेहमीच कठिण जातें. त्यामुळे त्याची विपरीत समजूत होते. १९२३ सालीं 'सारथी' पत्रांत अनिलबरण राय यांनी यतींद्रनाथ मुखोपाध्याय व त्याचे सहकारी याच्याविषयीं लिहितांना असें म्हटलें कीं, त्यांचे व आमचे मार्ग भिन्न असतील पण तेवढ्यासाठी आम्ही त्यांचा त्याग, त्यांची देशभक्ति, त्यांचें शौर्य यांचा गौरव करूं नये, असें कोण म्हणेल ? अशाच आशयाचे लेख 'आनंदबाझार पत्रिका' व 'प्रवर्तक' या नियतकालिकांतून आल्याचा सरकारी रिपोर्टांत उल्लेख आहे. यांजबद्दल अनिलबरणबाबूंवर सरकारने दांत धरला; 'प्रवर्तका'चे अंक जप्त केले व 'आनंदबाझार पत्रिके'वर खटलाहि भरला.

## सुभाषबाबूंवर आरोप

१९२३ व १९२४ सालांतील हकीकती सांगतांना स्टेट सेक्रेटरींनी दोन्ही सालांतील हकीकतींत सरमिसळ करून घोटाळा केला आहे. वास्तविक प्रकार कसा घडला हे प्रो. रशब्रुक विल्यम्सच्या India 1924 and 1925 या पुस्तकांवरून कळून येतें. त्यांत असे लिहिलें आहे की, १९२२ सालीं गांधींना सहा वर्षांची शिक्षा झाल्यावर बंगाली क्रांतिकारकांनी 'युगांतर' आणि 'अनुशीलन' या दोन्ही समित्यांची पुनर्घटना केली व पुष्कळसे नवीन सभासद करून घेतले. हिंदुस्थानांतून व परदेशांतूनहि हत्यारे मिळवून त्यांचा संग्रह केला व अगदी नवीन तऱ्हेचे बाँब तयार केले. अशा रीतीने तयारी करून त्यांनी १९२३ च्या मे महिन्यांत हावऱ्याजवळ एक दरवडा घातला. त्याच महिन्यांत उल्टाडिंगीचें पोस्ट ऑफिसहि लुटलें गेलें. त्यानंतर जुलै महिन्यांत त्यांनी दुसरा एक दरवडा घातला व त्याच्या पाठोपाठ सांकरीतोला येथील पोस्टमास्तरचा खून झाला. या अत्याचारानंतर सरकारने सात क्रांतिकारकांना अटक करून त्यांच्यावर खटला भरला. हे सर्व क्रांतिकारक कोर्टांत निर्दोषी ठरले. पण हेच लोक खरे अपराधी आहेत, अशी सरकारची खात्री असल्याने सरकारने त्यांच्यापैकीं कांहीजणांना १८१८ च्या रेग्युलेशनखालीं पकडून अटकेत ठेवलें. यांत सुभाषबाबूंचा संबंध मुळींच आलेला नाही. परंतु याच प्रकरणाविषयी स्टेट सेक्रेटरी काय लिहितात ते पहा.

"The situation after these outrages had been committed, was serious. It was clear that the terrorists had been encouraged by the belief that Government could no longer deal with their conspiracies effectively. It was also clear that unless immediate action was taken, Bengal would again be exposed to the dangers of the previous outbreak of revolutionary crime. Accordingly, several of the important suspects, including Subash Chandra Bose, the chief executive officer of the Corporation, were incarcerated under regulation III of 1818. This action served, however, to check

the movement only for a short time. New leaders were found and operations were resumed. In December 1923 a robbery of Rs. 17000 of the property of the Assam Bengal Railway, was committed at Chittagong by four Bhadralok youths armed with revolvers."

हा उतारा थोडा लांबट झाला खरा; पण स्टेट सेक्रेटरींनी सुभाषबाबूंचा यांत संबंध आणल्यामुळे हा सारा मजकूर उतरून घेणे जरूर वाटलें. पण वास्तविक पाहतां सुभाषबाबूंना १९२४ च्या ऑक्टोबर अखेरीला सरकारने अटक केली. त्या अटकेची कारणे पुढे येतीलच. पण बंगाल्यांतील क्रांतिकारक चळवळीच्या पुनरुत्थानाच्या मुळाशीं सुभाषबाबू आहेत, असे प्रो. रशब्रुक विल्यम्स यांनी १९२४-२५ सालाच्या इतिवृत्तांत लिहिलेले नाही आणि १९२३ साली सुभाषबाबूंना इतर क्रांतिकारकांबरोबर अटकहि झाली नव्हती.

— केसरी ता. २२ जानेवारी, १९३५.

---

## लेखांक तिसरा

बंधमुक्त झालेल्या क्रांतिकारकांपैकी बहुतेकजण अनन्यगतिक होऊन सदनशीर चळवळीकडे वळूं लागले, हें पाहून युयुत्सु क्रांतिकारकांना आता आपला पक्ष नष्ट होतो की काय अशी भीति वाटूं लागली आणि कार्यक्रमाच्या अभावी कोणताहि पक्ष जिवंत राहूं शकत नाही, असा विचार करून त्यांनी१९२३ च्या आरंभापासून पुनः एकवार आपल्या कार्याला सुरुवात केली. १९२३ च्या प्रारंभीं क्रांतिकारक लोक पोलीस अधिकाऱ्यांच्या घरांवर व त्यांच्या हालचालींवर पाळत ठेवूं लागले. तेव्हां पोलीस अधिकाऱ्यांनी आपल्यावर पाळत ठेवणाऱ्या लोकांवर गुप्तपोलिसांच्या करवी उलट पाळत ठेवून क्रांतिकारकांचे कांही अड्डे शोधून काढले. याच वर्षी कलकत्त्याच्या पोलिस कमिशनरची जागा टेगार्ट या नामांकित पोलिस अधिकाऱ्याला मिळाली. टेगार्टच्या कर्तबगारीचा क्रांतिकारकांना पूर्वीपासूनच धाक वाटत होता. म्हणून त्यांनी त्याचा

कांटा काढण्याचा निश्चय केला. पण असला प्रयत्न करण्यापूर्वी आपल्या पक्षांतील लोकांना धाडसाचीं कृत्यें करण्याची संवय व्हावी म्हणून त्यांनी प्रथम दरवडे घालण्याला सुरुवात केली. स्वतः बंगाल सरकारनेच आपल्या एका पत्रकामध्ये म्हटलें आहे—

'In May 1923 one section of the terrorist party which had recently been conspiring to assassinate police officers, especially Mr. Tegart, embarked upon a campaign of dacoity and murder, partly in order to secure funds but partly also in order to accustom their men to violent action and to terrorise any who might be inclined to oppose them.'

## पोलिसांवर टीका

बंगाल सरकारच्या या विधानावरून हे स्पष्ट कळून येते की, क्रांतिकार्याला पैसे मिळविणे व टेगार्टचा कांटा काढून टाकणे हेच १९२३ च्या क्रांतिकारकांचे उद्दिष्ट होते. त्याप्रमाणें कांही दरवडे घालून त्यांनी द्रव्य मिळाविले. त्या दरवड्यामुळे व दरवड्यांत झालेल्या खुनांमुळे अलीपूर येथील कटाचा खटला उद्‌भवला, पण त्या खटल्यांत पोलिसांचीच नाचक्की झाली. कारण न्यायाधिशाने सर्व आरोपींना निर्दोषी ठरवून सोडून दिलें; इतकेच नव्हे तर मॅजिस्ट्रेट आणि पोलिस यांच्या वर्तनावर त्याने कडक टीकाहि केली. विशेषतः पोलिसांनी ज्या तऱ्हेने आरोपींचे कबुलीजबाब मिळविले व लिहून काढले त्या पद्धतीवर फार ताशेरा झाडला आहे. या खटल्यामुळे पोलिसांविषयी लोकमत कलुषित झाले असतां क्रांतिकारकांनी टेगार्टला मारण्याचा प्रयत्न केला. बरेच दिवसांच्या टेहळणीनंतर १९२४ च्या प्रारंभी गोपीनाथ साहा नांवाच्या एका क्रांतिकारकाने, डे नामक एका इंग्रज व्यापाऱ्यावर, तो टेगार्ट असावा असे समजून, भररस्त्यांत हल्ला केला व त्याला सहा गोळ्या घालून ठार मारले. पुढे गोपीनाथ साहाला पकडून पोलिसांनी त्याच्यावर खटला भरला असतां त्याने आपण आपल्या देशासाठी हें कृत्य केलें असल्याचें सांगून कसलाहि बचाव करण्याचें नाकारलें. यामुळे त्याच्या खटल्याचा लवकरच निकाल लागून त्याला फांशीं जावें लागलें.

गोपीनाथ साहाच्या फांशीमुळे बनदशीर चळवळींत सामील झालेल्या क्रांतिकारकांची वृत्ति बरीच विचलित झाली. गोपीनाथाचा मार्ग त्यांनी टाकून दिला होता पण त्यामुळे त्यांच्या विचारसरणींत कांही बदल झालेला नव्हता. उलट आपण आपल्या मार्गापासून भ्रष्ट झाल्याची टोचणी त्यांच्या मनाला लागून राहिली होती. यासाठी त्यांनी गोपीनाथ साहाविषयींचा आपला मनोभाव जाहीर रीतीने व्यक्त करण्याचें ठरविलें. या त्यांच्या निश्चयाला एका आगंतुक कारणामुळे कांही पुढारी मंडळींचीहि अनुकूलता मिळाली. डेच्या मृत्यूनंतर भरलेल्या युरोपियन ॲसोसिएशनच्या सभेंत एका इंग्रजाने 'मि. डे यांच्या हत्येचा बॅ. दास यांनी अद्यापि कां निषेध केला नाही !' असा प्रश्न विचारला होता. या प्रश्नाने चित्तरंजनबाबूच काय पण त्यांच्या विरुद्धपक्षांतील लोकहि चिडून गेले. कारण हिंदुस्थानांत इंग्रजांच्या लाथांनी किंवा गोळ्यांनी किती तरी हिंदवासियांचे प्राण गेले असतां त्यांच्या हत्येचा निषेध युरोपियन असोसिएशनच्या पुढाऱ्यांनी कधीं केला होता ? या दोन्ही कारणांचा परिणाम असा झाला की, १९२४ च्या जून महिन्यांत सिराजगंज येथे भरलेल्या बंगाल प्रांतिक परिषदेत गोपीनाथ साहाच्या आत्मोत्सर्गाविषयी आदर व्यक्त करण्याचा ठराव बहुमताने पास झाला. या ठरावाच्या परिणामाविषयी बंगाल सरकारने म्हटले आहे : "The effects of the resolution were electrical; it is the most potent recruiting instrument which has ever been placed in the hands of the organisers of violent crime and has been a continual incitement to the youth of Bengal to take to violent ways." या उताऱ्यावरून असें वाटते कीं, प्रांतिक परिषदेंत हा ठराव मांडणाऱ्या पुढाऱ्यांवर खटला करण्याचा विचार त्यावेळीं सरकारच्या मनांत आला असावा. पण परिषद संपताच त्या ठरावाची भाषा काय होती, या विषयीच बंगाली पत्रांतून भांडणें सुरू झालीं, आणि बहुधा या भांडणामुळेच आपला खटला कितपत टिकेल याविषयीं साशंक होऊन सरकारने तो विचार सोडून दिला असावा.

## रक्तबंगाल पत्रकें

डेच्या मृत्यूनंतर क्रांतिकारकांनी टेगार्टला मारण्याचा आणखी एक प्रयत्न केला. पण त्या प्रयत्नांतहि स्वतः टेगार्टवर हल्ला न होता ब्रूस नांवाच्या दुसऱ्याच

एका इसमावर क्रांतिकारकांनी हल्ला केला. मात्र या हल्ल्यांत ब्रूसलाहि त्याच्या सुदैवाने कांहीं इजा झाली नाही. हे ब्रूसवरील हल्ल्याचें प्रकरण एप्रिल महिन्यांत झालें. त्याच्या आधी मार्च महिन्यांत कलकत्त्यांत एक बॉबचा कारखाना उघडकीस आला होता. या कारखान्यांतील स्फोटक द्रव्यें, बॉंबची कवचें, बॉंब भरण्याची हत्यारे वगैरे सर्वच माल उच्च दर्जाच्या कारखान्याला शोभेल असाच होता. हे बॉंब मिल्स जातीचे असून त्यांतून अमोनियम पिक्रेट हे स्फोटक द्रव्य भरले होतें. या प्रकरणाच्या चौकशीत पोलिसांना १९१४ साली रोड्डा कंपनीच्या मालांतून चोरीस गेलेल्या मॉसर पिस्तुलांपैकीं एक पिस्तूल सांपडलें. याच सुमाराला फरीदपूर येथे एका तरुणाच्या घरीं स्फोट होऊन तो जखमी झाला.

त्यानंतर जुलै महिन्यांत 'रक्तबंगाल' पत्रकांचा पुनः प्रादुर्भाव झाला. त्यांपैकी पहिल्या पत्रकांत पोलिस अधिकाऱ्यांना मारण्याचा आपला संकल्प क्रांतिकारकांनी जाहीर केला होता व दुसऱ्या पत्रकांत क्रांतिकारक पक्षाची आवश्यकता बंगाली पुढाऱ्यांना पटविण्याचा प्रयत्न केला होता. अलीपूर कटाच्या खटल्याचा तपास करणारा एक मॅजिस्ट्रेट, गोपीनाथ साहाच्या खटल्यांतील एक साक्षीदार, दुसऱ्या एका बॉब-प्रकरणांतील न्यायाधीश व सरकारी वकील इत्यादि लोकांना क्रांतिकारकांनी ही पत्रके पाठविलीं होतीं.

या रक्तपत्रकांच्या पाठोपाठ ऑगस्ट महिन्यांत क्रांतिकारकांनी एका खादीच्या दुकानांत बॉंब टाकून एकाचा प्राण घेतला व दुसऱ्याला प्राणांतिक जखमा केल्या. या प्रकरणाबद्दल वसंत कुमार धेनकी व शांतिलाल चक्रवर्ती या दोन तरुणांवर पोलिसांनी खटला भरला. या दोघांनाहि ज्यूरींने निर्दोषी म्हणून सोडून दिले, पण न्यायाधिशाने एकट्या शांतिलालाचीच सुटका केली व वसंतकुमाराचा खटला फिरून चालविण्याचा हुकूम दिला. सप्टेंबर अखेरीला शांतिलालाची सुटका झाली व ता. ३ ऑक्टोबर रोजी त्याचे प्रेत पोलिसांना कलकत्त्याच्या रस्त्यांत सांपडलें. त्याचा शेवट कोणी, कसा व कां केला हें गूढ उघडकीस आलें नाही.

## एक गाफिल मुलाखत

बंगाल प्रांतिक परिषदेने गोपीनाथ साहाविषयींचा ठराव पास करून क्रांतिकारकांचें जनतेमधील वजन वाढविण्याला मदत केली असें वाटून पोलिस अधिकारी

आधींच विडून गेले होते. त्यांत तो ठराव पास झाल्यापासून तीन महिन्यांत क्रांतिकारकांनी निदान पांच वेळां पोलिस अधिकारी किंवा त्यांचे दूत यांना मारण्याचे प्रयत्न केले, हे पाहून तर त्यांना १९१५ सालाचीच पुनः आठवण होऊं लागली. काही महिन्यांपूर्वी अलीपूर कटाच्या खटल्यांतील आरोपी निर्दोषी म्हणून सुटले, तेव्हा पोलिसांनी १८१८ च्या रेग्युलेशनचा उपयोग करून आपली बाजू कांहीशी सांवरली होती. पण आता तो रेग्युलेशनहि त्यांना अपुरा वाटूं लागला; कारण त्या रेग्युलेशनप्रमाणे संशयितांना आपल्याच घरी डांबून ठेवणे, हजेरी द्यावयाला लावणे किंवा एखाद्या खेड्याच्या हद्दीत अडकवून ठेवणे इत्यादि प्रकारचे निर्बंध घालतां येत नाहीत. त्यामुळे पुढाऱ्यांना या रेग्युलेशनखाली अटकेत ठेवतां आलें तरी त्यांच्या सर्व अनुयायांना पोलिसांच्या नजरेखाली ठेवण्याचा हेतू त्याने साध्य होत नाही. यासाठी पोलिस अधिकारी डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टाचा पुनरुद्धार करण्याबद्दल बंगाल सरकारला आग्रह करूं लागले. आपल्या पोलिसखात्याची इच्छा पूर्ण करण्याला बंगाल-सरकार सिद्धच होते. पण इंग्लंडांत तेव्हां मजूर पक्षाचे प्रधानमंडळ अधिकारारूढ असल्याने दडपशाहीच्या कायद्यांना त्यांची सहज संमति मिळणार नाहीं, अशी त्याला शंका वाटत होती. पण याच वेळी एका बंगाली पुढाऱ्यांची एक मुलाखत प्रसिद्ध झाल्याने बंगाल-सरकारला मजूर मंत्रिमंडळाची संमति मिळविणें अगदी सुलभ झाले. या गाफिल मुलाखतीत ते पुढारी असे बोलून गेले कीं, सरकारच्या कल्पनेपेक्षाहि क्रांतिकारकांची तयारी फार पुढे गेली आहे. ही मुलाखत प्रसिद्ध होतांच सरकारने मंत्रिमंडळाची तांतडीने संमति मिळवून पोलिसांना हवे असलेले जादा अधिकार दिल्याचा ऑर्डिनन्स ( वटहुकूम ) प्रसिद्ध केला आणि त्याच दिवशी म्हणजे २५ ऑक्टोबर १९२४ रोजी १८१८ सालाच्या रेग्युलेशन खाली सुभाषचंद्र बोस, अनिलबरण रॉय, सत्येंद्रचंद्र मित्र, उपेंद्रनाथ बानर्जी इत्यादि पुढाऱ्यांना अटक केली.

## सुभाषबाबूंना मंडालेस कां धाडलें ?

या अटक झालेल्या पुढाऱ्यांपैकी उपेंद्रनाथ बानर्जी हे 'आत्मशक्ति' पत्राचे संपादक होते आणि अनिलबरण रॉय हे 'सारथी' पत्राचे संपादक व बंगाल कौन्सिलांतील स्वराज्य पक्षाचे एक सभासद होते. सत्येंद्रचंद्र मित्र हेहि

बंगाल कौन्सिलांतील स्वराज्यपक्षाचे एक सभासद होते. यांना बहुधा ते चित्ता-गांग जिल्ह्याचे सभासद असल्यामुळेच अटक झाली असावी. सुभाषचंद्र बोस हे त्या वेळीं कलकत्ता कॉर्पोरेशनचे चीफ एक्झिक्यूटिव्ह ऑफिसर होते आणि या नात्याने त्यांनी 'स्वदेशासाठी ज्यांना यातना भोगाव्या लागल्या आहेत अशा लोकांनी नोकरीसाठी आपल्याकडे अर्ज करावेत' अशा आशयाची वर्तमानपत्रांतून जाहिरात दिली होती. ही जाहिरात देण्यांत बेकार तरुणांना कामांत गुंतवून त्यांना क्रांतिकारकांच्या मार्गापासून परावृत्त करावे असा हेतु असावा. परंतु अधिकाऱ्यांनी त्याचा अर्थ अगदी उलटा केला. कलकत्ता कॉर्पोरे-शनच्या सरकारविरोधी कृत्यांच्या यादीत सुभाषबाबूंच्या या जाहिरातीला भारत-मंत्र्यांनी अग्रस्थान दिले आहे, तेव्हां याच पापासाठी त्यांना १९२४ सालीं मंडा-लेला धाडले असावें असे अनुमान करण्याला हरकत नाही.

१९२४ च्या ऑर्डिनन्सखालीं सरकारने एकंदर १८७ लोकांना अटक केली. ऑर्डिनन्स अमलांत येतांच क्रांतिकारकांनी आपले अत्याचार थांबविले. तरी सरकारने सर्टिफिकेशनच्या जोरावर त्या ऑर्डिनन्सचे कायद्यांत रूपांतर करून घेतलें. यानंतर १९२६ च्या मे महिन्यांत अलीपूर तुरुंगांतील कांही क्रांतिकारकांनी सी. आय्. डी. चे एक स्पेशल सुपरिंटेंडेंट रायबहादूर भूपेंद्रनाथ चट्टोपाध्याय यांना ठार मारले. एवढा अपवाद वगळला असतां १९२४ सालाच्या अखेरीपासून १९३० च्या प्रारंभापर्यंत बंगाली क्रांतिकारकांनी कोणताहि अत्याचार केला नाही.

—केसरी, ता. २९ जानेवारी, १९३५.

---

## लेखांक चौथा

१९२५ सालापासून क्रांतिकारकांचे अत्याचार अजीबात थांबल्याने संश-यित लोकांना डांबून ठेवण्याचें निमित्त नाहीसें झालेच होतें. तरीदेखील सरकारने त्या दुर्दैवी संशयित तरुणांना बिनमुदत अटकेंत ठेवण्याचा आपला आग्रह कांही सोडला नाही. पुढे १९२६ सालीं तुरुंगवासाच्या शारीरिक व मानसिक यातनांमुळे

सुभाषबाबूंना क्षयाचा विकार जडला आणि त्याच वर्षाच्या अखेरीला सत्येंद्रचंद्र मित्र यांना चितागांग–राजशाही डिव्हिजनच्या मतदारांनी लेजिस्लेटिव्ह असेंब्लीत निवडून दिले. त्यामुळे त्या उभयतांच्या सुटकेचा प्रश्न जनतेच्या डोळ्यांपुढे येऊन त्याबद्दल बंगालभर चळवळ सुरू झाली. सत्येंद्रबाबू असेंब्लीच्या बैठकींना कधीच हजर राहत नसल्याच्या सबबीवर त्यांची जागा रिकामी पडल्याचे जाहीर करून सरकारने फेरनिवडणूक करण्याचा हुकूम सोडला. पण सत्येंद्रबाबूंच्या विरुद्ध उभे राहावयाला कोणीहि बंगाली कबूल होईना. इकडे सुभाषबाबूंचा आजारहि दिवसेंदिवस वाढत चालला. तेव्हा सरकारने मोठ्या नाखुषीने आपल्या धोरणाचा पुनर्विचार करून १९२७ साली संशयित पुढाऱ्यांची व १९२८ साली इतर संशयित राजबंद्यांची मुक्तता केली.

सुटलेल्या क्रांतिकारकांनी देशांत स्वातंत्र्याचे ध्येय पसरविण्यासाठी प्रचारकार्याला सुरुवात केली आणि त्यांच्या संघामधून स्वातंत्र्यप्राप्तीसाठी बंड घडवून आणण्याच्या योजनांची वाटाघाट सुरू झाली. स्टेट सेक्रेटरी म्हणतात, "The Congress session of 1928 and 1929 afforded opportunities for a meeting of revolutionary leaders all over India and there is reason to believe that plans for a rising were discussed and given definite shape on these occasions." अशा रीतीने क्रांतियुद्धाच्या योजना जरी तयार झाल्या तरी अनुयायी आणि हत्यारे यांच्या कमतरतेमुळे तूर्त उठावणी करूं नये असाच सर्व पुढाऱ्यांचा संकेत ठरला।

## क्रांतीची तयारी

क्रांतिकारकांमधील या साऱ्या चर्चेचे प्रतिध्वनि गांधीजींच्या कानांवर येतच होते. त्यावरून त्यांनी तरुणांना क्रांतीच्या मार्गापासून परावृत्त करण्यासाठी कायदेभंगाची चळवळ सुरू करण्याचे ठरविले व त्याप्रमाणे १९३० च्या एप्रिल महिन्यांत सर्व हिंदुस्थानभर कायदेभंगाची चळवळ सुरू झाली. ही चळवळ सुरू होताच देशांतले हजारों स्वातंत्र्यप्रेमी तरुण गांधीजींच्या निशाणाखाली जमा होऊं लागले. हें दृश्य पाहून क्रांतिकारकांच्या पुढाऱ्यांना वाटूं लागले की, क्रांतियुद्धांत भाग घेण्याला उत्सुक अशा तरुणांचा हिंदुस्थानांत अभाव नाही; अभाव आहे

तो केवळ शस्त्रांचा. हा शस्त्रांचा अभाव दूर करण्यासाठी चितागांगच्या क्रांतिकारक पुढाऱ्यांनी तेथल्या शस्त्रागारावर हल्ला करण्याचा धाडसी संकल्प केला.

## चितागांगचें शस्त्रागार

चितागांगच्या क्रांतिकारकांचा प्रमुख पुढारी सूर्यसेन नामक एक शाळा-मास्तर होता. सूर्यसेनाच्या अनुयायांनीच १९२३ च्या डिसेंबर महिन्यांत आसाम-बंगाल रेल्वेच्या खजिन्यावर दरवडा घालून १७००० रुपये लुटून आणले होते. या दरवड्यानंतर सुमारे दहा दिवसांनी पोलिसांना बातमी लागली की, चितागांग शेजारच्या एका खेड्यांत कांही संशयित भद्रयुवक राहात आहेत. ही बातमी लागताच पोलिसांनी त्यांच्या वसतिस्थानावर छापा घातला. तेव्हा पोलिसांवर गोळीबार करून क्रांतिकारकांपैकी दोघे निसटून गेले व दोघे पोलिसांच्या हाती सांपडले. पुढे चितागांगच्या पोलिसांपैकी एका फौजदाराने या दरवडेखोराचा प्रमुख अनंतसिंग याला कलकत्त्याहून धरून आणले. पण अनंतसिंगाला चितागांग येथे आणल्यावर लौकरच त्या फौजदाराचा क्रांतिकारकांनी वध केला व त्यानंतर दरवड्याच्या खटल्यांतील एका प्रमुख साक्षीदारालाहि मारण्याचा त्यांनी प्रयत्न केला. तो प्रयत्न फसला तरी कोर्टांत अनंतसिंग व त्याचे सहकारी यांच्यावर दरवड्याचा आरोप शाबीत झाला नाही. तेव्हां पोलिसांनी त्या सर्वांना बंगाल क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्टाखालीं अटकेंत ठेवले. त्या अटकेतून त्यांची १९२८ साली सुटका झाली. या अवधीत सूर्यसेनाने सुमारें शंभर नवीन अनुयायी मिळविले होते व कांही शस्त्रसामुग्रीहि जमा केली होती. अनंतसिंग, लोकनाथ, गणेश वगैरे सहकारी सुटून येतांच सूर्यसेनाच्या अनुयायांनी लष्करी शिक्षण घेण्याला सुरुवात केली. १९३० सालापासून आपले अनुयायी आता पोलीस व लष्कर यांना तोंड देऊं शकतील असा सूर्यसेनाला विश्वास वाटूं लागला आणि त्या वर्षाच्या एप्रिल महिन्यांत १८ तारखेला रात्रीं त्याने चितागांगच्या शस्त्रागारावर हल्ला केला.

१८ तारखेला रात्रीं दहा वाजतां क्रांतिकारकांच्या चार तुकड्या गणेश घोषाच्या घरून हल्ला करण्यासाठी बाहेर पडल्या. त्यांपैकीं एका तुकडीने चितागांग येथील पोलिसांच्या शस्त्रागारावर हल्ला करावा, दुसऱ्या तुकडीने ऑक्झिलियरी

सैन्याचें शस्त्रागार लुटावे, तिसऱ्या तुकडीने टेलिफोन आणि टेलिग्राफ ऑफिसांचा विध्वंस करावा आणि चौथ्या तुकडीने युरोपियन क्लबावर हल्ला करून तेथल्या लोकांची कत्तल करावी, असा संकेत ठरला होता. पण युरोपियन क्लबावर चालून गेलेल्या तरुणांना त्या वेळीं क्लबांत कोणीच नसल्याचे आढळून आले. म्हणून ते सारे पोलिसांच्या शस्त्रागारावर चालून गेलेल्या तुकडीत सामील झाले. पोलिसांच्या शस्त्रागारावर सुमारें ५० तरुणांनी हल्ला केला. हल्ल्याच्या वेळी शस्त्रागाराजवळ येताच त्यांच्या पुढाऱ्यांनी संत्र्याला गोळी घालून ठार मारलें व मग सर्वांनी आंत घुसून शस्त्रागाराची व दारुगोळ्याच्या कोठाराची दारे फोडली आणि तेथल्या बंदुका, पिस्तुले, दारुगोळा वगैरे घेऊन त्यांनी पोलीस लाइनीवर हल्ला केला. क्रातिकारकांच्या या हल्ल्यापुढे टिकाव न लागून पोलिसांनी पळ काढला. याप्रमाणे अनंतासिंग व गणेश घोष यांच्या तुकडीने आपली कामगिरी पूर्णपणें पार पाडली.

## शस्त्रागाराला आग लावली

दुसरीकडे ऑक्झिलियरी सैन्याच्या शस्त्रागारावर अवघ्या सात तरुणांनी हल्ला केला. त्यांच्या पुढाऱ्याने एकट्यानेच पुढे होऊन शस्त्रागारावरील दोघां संत्र्यांना गोळ्या घालून ठार मारलें. हा गोळीबार ऐकून शस्त्रागारावरील मुख्य आधिकारी सार्जंट मेजर फॅरेल हा शस्त्रानिशी धावून आला, पण त्यालाहि क्रांतिकारकांनी तत्काळ ठार मारलें. मग शस्त्रागाराचीं दारें फोडून त्यांनी आंतल्या रायफली, रिव्हॉल्व्हर, पिस्तुलें व लुइसगन यांची लूट केली. शस्त्रागार फोडण्याचें काम चालू असताना वाटेने जितक्या मोटारगाड्या गेल्या तितक्यांवर क्रांतिकारकांनी गोळीबार केला व सुमारें पांच-सहा लोकांना ठार मारले. सरतेशेवटी लुटलेलीं शस्त्रें मोटारीत भरून व शस्त्रागाराला पेट्रोलने आग लावून देऊन ते अनंतसिंगाच्या तुकडीला येऊन मिळाले. टेलिग्राफ ऑफिसावर सुमारे सहा जणांनी हल्ला केला. त्यांनी टेलिफोन ऑपरेटरला धरून क्लोरोफॉर्म देऊन बेशुद्ध पाडले. आणि टेलिफोन बोर्डाचे तुकडे करून त्याला आग लावून दिली. तेव्हां तेथल्या तारमास्तराने त्यांच्यावर बंदुकीने गोळीबार सुरू केला, त्यामुळे ते तारं ऑफिसाचा विध्वंस करण्याची कल्पना सोडून अनंतसिंगाकडे निघून गेले.

या वेळेपर्यंत रात्रीचे बारा वाजून गेले होते. वद्य षष्ठीचा चंद्र वर येऊन स्वच्छ चांदणे पडले होते आणि या चांदण्यांत अनंतसिंगाचे अनुयायी नुकत्याच हाती आलेल्या रायफलींनी नेम मारण्याचा सराव करीत होते. अशा वेळी फार्मर, जॉन्सन, लुई, बॅराक्लो वगैरे पोलीस व लष्करी अधिकाऱ्यांनी एक मशिनगन मिळवून क्रांतिकारकांवर मारा करण्याला सुरुवात केली. तेव्हां पोलिसांच्या बराकी-ना आग लावून देऊन क्रांतिकारक लोक तेथून बाहेर पडले. ही आग लाव-तांना त्यांच्यापैकी हिमांशु सेन नांवाचा एक तरुण अतिशय भाजला होता म्हणून त्याला एका मोटारीत घालून चौघेजण शहरांत गेले व बाकीचे क्रांतिकारक चितागांगच्या उत्तरेच्या डोंगराळ मुलुखांत नाहीसे झाले. शस्त्रागारावर हल्ला होण्याच्या आधीच त्या दिवशी क्रांतिकारकांच्या दुसऱ्या एका टोळीने चितागांग-पासून चाळीस मैल अंतरावरील तारा तोडून टाकून आणि रेल्वेचे रूळ उपटून एक मालगाडी खाली पाडून चितागांगचा बाहेरील जगाशी असलेला संबंध तोडून टाकला होता. त्याच रात्री चितागांगपासून सत्तर मैलांवर चितागांगला येणारी मेलगाडी खाली आणण्याचा प्रयत्न झाला होता पण तो फसला.

## क्रांतिकारकांचें साहस

क्रांतिकारकांच्या या अचाट धाडसाची बातमी चितागांग बंदरांतील एका जहाजाने बिनतारी यंत्राने कलकत्त्यास कळविली. त्यानंतर एप्रिल २० रोजी डाक्क्याहून चितागांगला लष्कर आले. लष्कर आल्यावर लष्करी अधिकाऱ्यांनी क्रांतिकारकांच्या मुख्य टोळीचा डोंगरांत पत्ता काढून तिच्याशी लढाई दिली. या चकमकीत क्रांतिकारकांपैकी १७ तरुण मृत्युमुखी पडले व बाकीचे निरनिराळ्या वाटांनी पळून गेले. हा प्रकार एप्रिल २२ रोजी झाला. चितागांगच्या या अपूर्व साहसाची वार्ता बंगाल्यांत पसरताच सर्व बंगाली क्रांतिकारकांना विलक्षण स्फुरण चढलें. स्टेट-सेक्रेटरी म्हणतात—

"The news of this coup, unprecedented in the annals of terrorist crime in Bengal, was received by revolutionaries all over the province with delight. The effect was electric and from that moment the outlook of the Bengali terrorists changed. Recruits poured

into the various terrorist groups in a steady stream and the younger members clamoured for a chance to emulate the Chittagong terrorists. The leaders could no longer hope, nor did they wish to keep them back; for in the face of the results achieved at Chittagong, there seemed to be no reason, why their overcautious policy should be maintained. The romantic appeal of the raid attracted into the fold of the terrorist party women and young girls who, from this time onwards, are found assisting the terrorists as housekeepers, messengers, custodians of arms and sometimes as comrades."

या उताऱ्यांत स्टेट-सेक्रेटरीनीं केलेल्या तीन विधानांपैकीं, चितागांगच्या हल्ल्यापासून क्रांतिकारकांचा आत्मविश्वास वाढला हें विधान खरें आहे. पण या-मुळेच त्यांना नवीन अनुयायी मिळूं लागले हें म्हणणें स्वतः स्टेट-सेक्रेटरीच्या दुसऱ्या एका विधानानेंच खोटें ठरतें. क्रांतिकारकांना अनुयायी कोठून व कसे मिळतात याची चर्चा करतांना स्वतः स्टेट-सेक्रेटरीनींच म्हटलें आहे—'It is a remarkable fact that a large percentage of the recruits to the terrorist movement are found to have made their political debut as civil resisters.' त्याचप्रमाणें या वेळेपासून स्त्रिया क्रांतिकारकांच्या चळवळींत भाग घेऊं लागल्या, हेंहि विधान चुकीचें आहे. १९२३ सालीं बंगाल-च्या क्रांतिपक्षाचे कांहीं सभासद क्रांतिशास्त्राचा अभ्यास करण्यासाठीं युरोपांत गेले होते व त्यांनीं परत आल्यावर आपल्या पक्षाची पुनर्घटना केली; तेव्हांपासून बंगाली स्त्रिया क्रांतिकारकांच्या चळवळींत प्रत्यक्ष भाग घेऊं लागल्या होत्या. १९२९ सालीं रेणुका नांवाच्या एका बंगाली तरुणीला बॉंब करण्याबद्दल शिक्षाहि झाली होती.

— केसरी, ता. १५ फेब्रुवारी, १९३५.

---

## लेखांक पांचवा

## क्रांतिकारकांना कसें पकडलें ?

मागील लेखांकांत चितागांगच्या क्रांतिकारकांची एप्रिल २२ रोजीं पोलिस आणि लष्कर यांच्याशीं मोठी चकमक होऊन त्यांच्यापैकीं १७ इसम ठार व

बाकीचे फरारी झाले, येथपर्यंतची हकीकत आली आहे. त्यानंतर या फरारी क्रांतिकारकांना पकडण्यासाठी सरकारचे प्रयत्न सुरू झाले. एप्रिल २३ रोजी फेणी नांवाच्या गांवी अनंतसिंग व त्याचे तीन अनुयायी यांना संशयावरून पोलिसांनी अटक केली व त्यांची झडती घेण्याचा प्रयत्न केला. तेव्हा क्रांतिकारकांनी आपली पिस्तुले काढून पोलिसांवर गोळीबार केला व ते सारे पोलिसांच्या हातून निसटून पळून गेले! पुढे ७ मे रोजी क्रांतिकारकांची दुसरी एक टोळी चितागांग जिल्ह्यांतील एका खेड्यांतून जात असतां पोलिसांनी तिला अडविण्याचा प्रयत्न केला. पण त्याहि टोळीतील तरुण लोक पोलिसांना गोळ्या घालून निघून गेले. यानतर पोलिसांनी लष्कराच्या साह्याने सुमारे तीस तरुणांना अटक केली आणि क्रांतिकारकांच्या पुढाऱ्यांना पकडण्याचा प्रयत्न सुरू झाला. या पुढाऱ्यांपैकी सूर्यसेन व तारकेश्वर दस्तीदार हे सुमारे तीन वर्षेपर्यंत पोलिसाच्या हाती लागले नाहीत. पोलिस लाइनीवर हल्ला करणाऱ्यांचा पुढारी अनंतसिंग याच्या घरच्या बहुतेक सर्व मंडळींना अटक करून त्यांच्याकडून अनंतसिंगाची बातमी काढण्याचा पोलिसाचा प्रयत्न चालला होता. आपल्यासाठी आपल्या घरच्या मंडळीचे हाल होत असल्याचे कळतांच अनंतसिंगाने बंगालच्या पोलिसांचा प्रमुख लोमन याला पत्र लिहून कळविलें कीं, 'मी जून २८ रोजी कलकत्ता येथे आपल्याला भेटावयाला येणार आहे, तेव्हां मला अटक करण्याची आपण व्यवस्था करावी.' पत्राप्रमाणे खरोखरीच अनंतसिंग जून २८ रोजी मोटारींत बसून लोमनसाहेबांच्या ऑफिसाकडे आला व त्याला तेथे पोलिसांनी अटक केली. लोकनाथ आणि गणेश या उभयतांनी फ्रेंचांच्या हद्दीत चंद्रनगर येथे आसरा घेतला होता. ही बातमी कलकत्त्याचे पोलिस कमिशनर टेगार्ट यांना लागतांच त्यांनी फ्रेंचांच्या हद्दींत जाऊन ता. ३१ ऑगस्टच्या रात्रीं त्यांच्या निवासस्थानावर हल्ला केला. या हल्ल्यांत लोकनाथ व गणेश ज्या घरांत राहात होते त्या घराच्या मालकाचा निरपराधी मुलगा कलकत्त्याच्या पोलिसांच्या गोळीला नाहक बळी पडला आणि लोकनाथ, गणेश व त्यांचा एक साथीदार अशा तिघांना अटक झाली.

### हायकोर्टाची टोलवाटोलवी

चंद्रनगर येथे ब्रिटिश पोलिसांच्या गोळ्यांना बळी पडलेल्या मुलाच्या

वतीने जितेंद्रचंद्र बानर्जी यांनी कलकत्ता हायकोर्टाकडे दाद मागितली. तेव्हां ॲपेलेट कोर्टाच्या न्यायाधिशांनी त्यांना ओरिजिनल साइडकडे अर्ज करावयाला सांगितलें व ओरिजिनल साइडच्या न्यायाधिशांनी त्यांना ॲपेलेट कोर्टाकडे जावयाला सांगितलें. अशा रीतीने हिंदुस्थानांतील सर्वांत श्रेष्ठ अशा कोर्टाने त्या दुर्दैवी मुलाच्या हत्येची दाद घेण्याचें नाकारलें. या साऱ्या प्रकरणावर टीका करतांना 'ॲडव्हान्स' पत्राने म्हटलें आहे, " A number of police officers trespass on a foreign territory, enter a private garden-house at dead of night and shoot down a young man in the course of the scuffle which follows. The French Government take this invasion of their sovereignty lying down and forgo the right of a sovereign to punish crimes within its own borders. The Government here refuse to prosecute the men who commit this outrage and withhold their sanction for prosecution by any private party. Faced with these facts public confidence in law and order vanishes into thin air. "

## क्रांतिकारकांची पोलिसांशीं झटापट

असो; १९३१ जूनमध्ये हायकोर्टाने वर वर्णिल्याप्रमाणे टोलवाटोलवी केल्यावर बंगाल सरकारने टेगार्टला प्रथम रजा दिली व नंतर पेन्शनीत काढलें. या प्रकरणांत टेगार्टला सामील असल्याच्या संशयावरून चंद्रनगरच्या फ्रेंच पोलिस सुपरिंटेंडेटला बंगाली क्रांतिकारकांनी कांहीं दिवसांनी मारून टाकलें. अनंतासिंग, लोकनाथ, गणेश वगैरेना चितागांगला आणल्यावर चितागांग शस्त्रागारावरील हल्ल्याचा खटला सुरू झाला. या खटल्यांतील आरोपींनी फिरून कांहीं चमत्कार करून निसटून जाऊं नये, यासाठी चितागांगचे अधिकारी अगदी डोळ्यांत तेल घालून जपत होते. कोर्टांत व कोर्टाच्या वाटेवर पोलिस आणि लष्कर यांचा कडक बंदोबस्त होताच. इतकें असून सुद्धा आपल्या सहकाऱ्यांना सोडविण्याचा एक प्रयत्न सूर्यसेनाने करून पाहिला. त्याने तुरुंगावरील अधिकाऱ्यांना चकवून आंतील क्रांतिकारकांना हत्यारें व दारूगोळा यांचा पुरवठा करण्यास सुरुवात केली. अशा रीतीने आंत आलेली शस्त्रसामुग्री पुरून ठेवून तिचा योग्य

वेळी उपयोग करून आपली मुक्तता करून घेण्याचा क्रांतिकारकांचा विचार होता. पण त्यांचा विचार परिपक्व होण्यापूर्वीच तुरुंगावरील अधिकाऱ्यांना या कारस्थानाचा सुगावा लागून त्यांनी पुरलेली हत्यारें शोधून काढली व तुरुंगावरील बंदोबस्त अधिक कडक केला. १९३१ च्या मार्चमध्ये तारकेश्वर दस्तीदार व त्याचा एक सहकारी यांना चितागांगच्या गुप्त पोलिसांपैकी एका फौजदाराने अटक करण्याचा प्रयत्न केला; पण तारकेश्वराने त्या फौजदाराला गोळ्या घालून जखमी केल व ते दोघेहि पोलिसांच्या हातून निसटून गेले. पुढे ऑगस्ट १९३१ रोजी चितागांग गुप्त पोलिसांपैकी एक प्रमुख अधिकारी खान-बहादुर आशानुल्ला याला एका सोळा वर्षाच्या मुलाने क्रीडांगणावर ठार मारले.

## चितागांग येथील धुमाकूळ

आशानुल्लाच्या मृत्यूनतर मुसलमान, युरोपियन, पोलिस व लष्कर या सर्वांनी मिळून चितागांग येथे जो धुमाकूळ घातला त्याचे वर्णन करणे अशक्य आहे. तरीदेखील त्याविषयी दोनचार गोष्टी सांगणे जरूर आहे. ता. ३० व ३१ रोजी चितागांग येथे घडलेल्या प्रकारांचे सविस्तर वर्णन बॅ. यतींद्रमोहन सेनगुप्त यांनी एका बिनसरकारी चौकशी कमिटीच्या रिपोर्टातून प्रसिद्ध केले होते. तो रिपोर्ट सरकारने जप्त केला. पण 'त्यांतील विधाने खोटी असतील तर सरकारने माझ्यावर खटला भरावा,' असे सेनगुप्तांनी जाहीर आव्हान दिलें असतांहि सरकार त्यांच्यावर खटला भरण्याला धजले नाही. दुसरी गोष्ट ही की, या अत्याचारांची सरकारी चौकशी करण्यासाठी सरकारने चितागांग-राजशाही डिव्हिजनचे कमिशनर मि. नेल्सन यांची नेमणूक केली होती; पण नेल्सनसाहेबांच्या रिपोर्टात सेनगुप्तांनी केलेल्यापैकी कांही आरोप खरे असल्याचा उल्लेख आल्याने सरकारने नेल्सन-रिपोर्ट मुळी प्रसिद्धच केला नाही. या विधानाचा आधार येथेच उतरून घेणे अवश्य आहे. १९३२ च्या फेब्रुवारीत लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत भाषण करतांना सत्येंद्रबाबूंनी म्हटलें आहे,

"I know what happened at Chittagong. I know furth that there was an honourable Englishman, the Commissio er Mr. Nelson who was asked to report about the Chittagor riots. He could not swallow all the dictations of the high

authorities. He made a report and I challenge them to contradict me. He said in his report that there was deliberate action by some police and unfortunately by some non-official Europeans who burnt houses and destroyed property. It is his finding in the report that the riots were created for reprisal." सत्येंद्रबाबूंनी याप्रमाणे उघड आरोप केले असतांनाहि सरकारी सभासदांनी त्यांना उत्तर देण्याला तोंड उघडलें नाही. यावरून वाचकांना तेथल्या अत्याचारांची थोडीशी कल्पना येईलच. पण पोलिस आणि युरोपियन यांच्याप्रमाणेच लष्कराच्या अत्याचारांवर प्रकाश पाडणारा सत्येंद्रबाबूंच्या असेंब्लींतील भाषणांतील दुसरा एक उतारा देणें जरूर आहे.

### आणखी एक उतारा

"Searches are made at about 3 in the morning under the plea that the absconders may escape in the guise of women. The police search every man and woman and what happens? How can a woman prove that she is a woman? I have heard of a number of cases of women being molested in villages. A case was reported, by whom? The Indian papers are afraid even to publish this. The 'Statesman' published the case, where a woman was raped and her husband was taken away and assaulted by Pathans. The Case came before the court and there are so many cases like that. I can give any number."

असो, चितागांगमध्ये याप्रमाणे अत्याचार चालू असतानांच अनंतसिंग प्रभृतींचा खटला संपला आणि अनंतसिग, लोकनाथ, गणेश वगैरेंना जन्मठेप काळेपाणी व त्यांच्या अनुयायांना कमी अधिक प्रमाणाने शिक्षा सांगण्यांत आल्या. याच सुमारास आशानुल्लाच्या वधाचाहि खटला संपून आरोपीला जन्मठेप काळेपाणी मिळाले.

### सूर्यसेनाचें अखेरचें धाडस

१९३२ सालाच्या आरंभी चितागांग जिल्ह्यांत क्रांतिकारकांची हालचाल फारशी दिसत नाही. या वेळेपर्यंत सूर्यसेनाचे बहुतेक अनुयायी मारले गेले होते.

किंवा पोलिसांच्या हाती लागले होते. एका तारकेश्वर दस्तीदाराखेरीज त्याला कोणी बरोबरीचा सहकारीहि उरला नव्हता. तरी देखील सूर्यसेनाने नवीन अनुयायी मिळवून आपल्या पक्षाची पुनर्घटना करण्याचा प्रयत्न चालविला होता. या प्रयत्नांत तो गर्क झाला असतांना ता. १४ जून रोजी कॅप्टन कॅमेरॉन नांवाच्या एका ब्रिटिश अधिकाऱ्याने आपल्या सैनिकांच्या एका तुकडीनिशी रात्रीच्या वेळी सूर्यसेनावर छापा घातला. या छाप्यांत सूर्यसेनाचे दोन अनुयायी ठार झाले; पण तो स्वतः कॅप्टन कॅमेरॉनला मारून त्याच्या सैनिकांच्या तावडींतून निसटून गेला.

त्यानंतर २४ सप्टेंबरच्या रात्री सूर्यसेनाच्या नव्या अनुयायांनी प्रीतिलता वदेदार या तरुणीच्या नेतृत्वाखाली टॉर्चलाइट, रिव्हाल्व्हर, बॉंब, इत्यादि सामुग्रीनिशी पहाडतळी रेल्वे इन्स्टिटयूटमधील युरोपियन क्लबावर हल्ला केला. या हल्ल्याची चाहूल लागताच क्लबांतील कित्येकांनी विजेचे दिवे मालवून टाकले व ते कपाटे, खुर्च्या, टेबलें इत्यादीच्या आश्रयाने लपून बसले. क्रांतिकारकांनी टॉर्चलाइट सोडून त्यांच्यावर बॉंब टाकले व गोळ्या झाडल्या. पण त्यांचा कांही फारसा उपयोग झाला नाही. अशा रीतीने हा हल्ला विफल झालेला पाहून प्रीतिलतेने आत्महत्या केली व बाकीचे लोक परत फिरले. या हल्ल्यांत युरोपियनांपैकी एक वृद्ध स्त्री मृत्युमुखी पडली व इतर तेरा जणांना लहानमोठ्या जखमा झाल्या.

## अखेर वाट लागली !

१९३२ च्या अखेरीला या प्रकरणांतील कांही आरोपींना पोलिसांनी अटक केली व १९३३ च्या आरंभी एका जमीनदाराच्या विश्वासघाताने स्वतः सूर्यसेनहि पोलिसांच्या हाती लागला. सूर्यसेनाला सोडविण्यासाठी तारकेश्वर दस्तीदार व कुमारी कल्पना दत्त या उभयतांनी अनेक प्रयत्न केले पण ते सारे फसले; इतकेंच नव्हे तर त्या दुक्कलीलाहि १८ मे १९३३ रोजी लष्कराने छापा घालून अटक केली. पुढे या सर्वांचा खटला चालून सूर्यसेन व तारकेश्वर दस्तीदार या उभयतांना फांशी व कु. कल्पना दत्त हिला जन्मठेप काळेपाणी अशा शिक्षा झाल्या. सूर्यसेन व तारकेश्वर या उभयतांना १२ जानेवारी १९३४ रोजी

फांशीं दिलें. याचा सूड म्हणून क्रांतिकारकांनी, ज्या जमीनदाराच्या घरीं सूर्यसेनाला अटक झाली होता, त्याला मारून टाकले व चितागागच्या पोलिस सुपरिंटिंडेटवर बॉंब टाकून त्याला मारण्याचा प्रयत्न केला. हा प्रयत्न करणाऱ्या मुलावर खटला होऊन त्यालाहि फांशीची शिक्षा झाली.

बंगाली क्रांतिकारकांच्या समालोचनांत सूर्यसेन व त्याचे अनुयायी यांची हकीकत वेगळीच देण्याचे कारण असे की, सशस्त्र राज्यक्रांति घडवून आणण्याचा प्रयत्न फक्त याच लोकांनी केला. बंगल्यांतील इतर क्रांतिकारकांनी प्रत्यक्ष क्रांतीकडे इतके लक्ष दिले नसून अधिकाऱ्यांना दहशत बसविण्यापलीकडे त्यांची मजल विशेषशी गेली नव्हती.

—केसरी, ता. १ मार्च, १९३५.

---

## लेखांक सहावा

मागील लेखांकांत बंगाल प्रांताच्या पूर्व सरहद्दीवरील चितागांग जिल्ह्यांतील क्रांतिकारकांच्या चळवळीचा इतिहास सांगितला; आतां या लेखांकांत बंगालच्या पश्चिमसरहद्दीवरील मिदनापूर जिल्ह्यांतील चळवळीची कथा सांगावयाची आहे. बंगाल प्रांताच्या दोन परस्परविरोधी सीमांवर असलेल्या या दोन जिल्ह्यांच्या मनोवृत्तीतहि तितकाच फरक आहे. चितागांग जिल्ह्याला बंगाल्यांतील क्रांतिकारकांचे आगर म्हणतां येईल तर उलटपक्षी मिदनापूर जिल्ह्याला बंगाल्यांतील सत्याग्रहाच्या चळवळीचे एक प्रमुख केंद्र म्हणतां येईल. असें असूनसुद्धा सत्याग्रहाची चळवळ दडपून टाकण्यासाठी सरकारी अधिकाऱ्यांनी अवलंबिलेल्या उपायांमुळे या जिल्ह्यांत क्रांतिकारकांच्या तत्त्वांचें बीजारोपण कसे झालें, याचे विवेचन करावयाचें आहे.

सत्याग्रहाची चळवळ सुरू करतांना गांधीजीची अशी समजूत होती की सत्याग्रही लोकांना तुरुंगांत टाकून ती चळवळ मोडण्याचा सरकारने प्रयत्न केल्यास त्याला थोड्याच अवधीत चळवळीच्या पुढाऱ्यांशी समेटाचे बोलणें सुरू

करणें भाग पडेल. कारण हिंदुस्थानांतील तुरुंगांत फार तर दोन लक्ष कैद्यांची सोय होऊं शकते व तुरुंगांतील नेहमीच्या कैद्यांची संख्याच मुळीं सव्वा लाखाहून अधिक असते. पण गांधीजींचा हा डाव ओळखून निरनिराळ्या जिल्ह्यांच्या कलेक्टरांनी सत्याग्रही लोकांना तुरुंगांत न घालतां त्यांच्यावर जरब बसविण्याचे नवेनवे उपाय शोधून काढले व त्या उपायांचे प्रयोग आपापल्या जिल्ह्यांत सुरू केले.

## मिठाचा कायदेभंग

१९३० च्या एप्रिल महिन्यांत इतर प्रांतांतल्या प्रमाणेंच मिदनापूर जिल्ह्यांतहि मिठाचा कायदेभंग सुरू झाला; पण त्या कायदेभंगाचा प्रतिकार करण्यासाठी तेथल्या अधिकाऱ्यांनी अमलात आणलेले उपाय मात्र मुलखावेगळे होते. मिदनापूर जिल्ह्यातील सरकारी जुलमाचें वर्णन करताना राउंड टेबल कॉन्फरन्सचे एक सभासद व लिबरल फेडरेशनचे माजी अध्यक्ष बॅ. यतींद्रनाथ बसूंनी आपल्या बंगाल कौन्सिलांतील भाषणांत म्हटलें आहे,

"In the villages, I visited in the district of Midnapore, there were some cases of the breach of the Salt Law, that is to say, there were cases of manufacture of contraband salt. But the way in which the authorities dealt with the situation was that there was a police cordon drawn round the whole village and whether the inhabitants were offenders or not, homes were entered into, the inmates seized and beaten and the honsehold property destroyed. I personally examined several hundred such persons and found that out of those persons about 15 were real offenders and the rest were ordinary peaceful citizens who had nothing to do with breaches of law."

## अत्याचाराची चौकशी

मे महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यांत मिदनापूर जिल्ह्यांतील अधिकाऱ्यांच्या जुलमाची ही वार्ता कलकत्त्यांतील पुढाऱ्यांच्या कानांवर आली व ता. २१

मे रोजीं आल्बर्ट हॉलमध्ये एक सभा भरून त्या जुलुमाच्या चौकशीसाठी बॅ. यतींद्रनाथ बसू यांच्या अध्यक्षतेखाली एक बिनसरकारी कमिटी नेमण्यांत आली. सध्याचे असेंब्लीचे उपाध्यक्ष बाबू अखिलचंद्र दत्त, परवा असेंब्लींत निवडून आल्यावर परलोकवासी झालेले बॅ. शसमल, बाबू क्षितीशचंद्र नियोगी वगैरे सुप्रसिद्ध पुढारी या कमिटीचे सभासद होते. या कमिटीने मिदनापूर जिल्ह्यांतील कोंटाई परगण्यांत जाऊन चौकशीला प्रारंभ करतांच तेथल्या सब डिव्हिजनल मॅजिस्ट्रेटने प्रथम या कमिटीच्या सभासदांसच अटक केली, पण मागाहून त्यालाच विवेक सुचून त्याने त्यांची मुक्तता केली. या चौकशीकमिटीचा रिपोर्ट जुलै महिन्यांत प्रसिद्ध झाला. पण बंगाल-सरकारने या बिनसरकारी कमिटीच्या रिपोर्टाची यत्किंचित् पर्वा केली नाही व अधिकाऱ्यांचे जुलूम पूर्वीप्रमाणेच चालू राहिले. पुढे ऑगस्ट महिन्यांत याच मिदनापूर जिल्ह्यांतील तमलूक परगण्यांतून सरकारी दडपशाहीची वार्ता कानीं आल्यावर बसुप्रभृति सभासदांनी त्या परगण्यांत जाऊन व तेथे चौकशी करून दुसरा एक रिपोर्ट प्रसिद्ध केला. हा रिपोर्ट प्रसिद्ध होतो न होतो तोंच फिरून पूर्वीपेक्षा अधिक घोर जुलुमाची वार्ता कमिटीच्या कानांवर येऊन थडकली. कोंटाई परगण्यांतील चोरेपालिटी या नांवाच्या गांवी शेतकऱ्यांचा एक जमाव अधिकाऱ्यांकडे डेप्युटेशन घेऊन गेला असतां पोलिसांनी त्या जमावावर लाठीचा हल्ला केला. या लाठी हल्ल्यांत काय प्रकार घडला ते, लंडनचे एक प्रसिद्ध लेखक एच्. एन्. ब्रेल्सफर्ड यांच्या 'इंडियन डेली मेल'मध्ये प्रसिद्ध झालेल्या लेखांतून उतरून घेणे बरे. "At Contai in Bengal five villagers were pushed into a tank and drowned during the dispersal of a crowd which seems to have been harmless."

असो, बसु-कमिटीने सरकारी अधिकाऱ्यांवर केलेल्या आरोपांची सरकारने चौकशी तर केली नाहीच. उलट त्या कमिटीचे रिपोर्ट मात्र जप्त केले ! बंगालचे होम-मेंबर मि. प्रेंटिस यांनी बंगाल कौन्सिलांत बॅ. यतींद्रनाथ बसूंना या बाबतीत प्रश्नहि विचारला 'I ask if Mr. Basu is prepared to take responsibility for this statement ?' अर्थातच यतींद्रबाबूंनी त्या प्रश्नाला ठासून 'होय'

म्हणून उत्तर दिले. पण या जप्त केलेल्या रिपोर्टाबद्दल यतींद्रबाबूंवर खटला भरण्याची सरकारला कांही छाती झाली नाही.

## मि. पेड्डी यांचा खून

मिदनापूर जिल्ह्यांतील सरकारी दडपशाहीची दाद लावून घेण्यासाठी नेमस्त पुढाऱ्यांचे याप्रमाणे प्रयत्न चालले असतां युगांतर समितीने मिदनापुरांत क्रांतिकारकांची संघटना घडवून आणण्यासाठी सुप्रसिद्ध क्रांतिकारक दिनेश गुप्त याची रवानगी केली. या दिनेश गुप्तानेच प्रथम क्रांतीचीं बीजे मिदनापूर जिल्ह्यांत पेरली व तेव्हापासून तेथील कलेक्टर मि. पेड्डी यांना क्रांतिकारकांचीं धमकीचीं पत्रें येऊं लागली. तरीदेखील मिदनापुरच्या रहिवाशांची आपल्यावर झालेल्या अत्याचाराची सदनशीर रीतीने दाद लावून घेण्याची आशा अद्यापि नष्ट झाली नव्हती. पण पुढे १९३१ च्या मार्चमध्ये गांधीआयर्विन-समेट घडून आला व त्या समेटाच्या वेळीं सरकारी अधिकाऱ्यांनी केलेल्या अत्याचारांच्या चौकशीचा आग्रह गांधीजीनी सोडून दिला. या अनपेक्षित घटनेमुळे क्रांतिकारक तरुणांना गांधीजी व त्यांचा अनत्याचार याविषयीं जो थोडाबहुत आदर वाटत होता तो नष्ट झाला व त्यांनी एप्रिल ता. ७ रोजीं संध्याकाळी एका शाळेच्या आवारांत मि. पेड्डी यांचा खून केला !

मि. पेड्डीच्या मागून मि. जे. सी. फ्रेंच हे कांही दिवस मिदनापूरचे कलेक्टर होते. या फ्रेंचसाहेबांनी आपल्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमधील एका भाषणांत मिदनापूर जिल्ह्यांत कॉंग्रेसची चळवळ किती जोरांत होती, याचें उत्कृष्ट वर्णन केले आहे. ते म्हणतात,

## विधायक कार्यक्रम

"During my whole time in the district, I found that the Congress was organising. First of all they started with courts. The Tamluk sub-division was singularly well-organised. They organised a number of courts all over the subdivision and in Tamluk itself an appeal court. They also started sketching out a scheme of police. They had their own

Thana officers and they exercised pressure on people to attend these courts. Now Mr. President, it was very difficult to deal with this organisation, because it was always done under the name of the Congress. They could have been dealt with under the ordinary law but there was the pact. Under the cover of the pact they were forming a dual administration. They were organising the whole country. They started picketing excise shops. They started pushing on the boycott against English goods. They commenced organising a militia which drilled with lathis and patrolled the villages. This was what they did in Midnapore."

या फ्रेंचसाहेबांच्या भाषणावरून एक गोष्ट स्पष्ट दिसून येते की मिदनापूर जिल्ह्यांत लवादकोर्टाची स्थापना, मद्यपाननिषेध, ब्रिटिश मालावर बहिष्कार व स्वयंसेवकदलांची संघटना हा कॉंग्रेसचा विधायक कार्यक्रम अतिशय लोकप्रिय व यशस्वी झाला होता. आणि कॉंग्रेसचे हे यश व ही लोकप्रियता तेथल्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटांना बघवत नव्हती. आपल्या जिल्ह्यांतील कॉंग्रेसची ही चळवळ चिरडून टाकण्याची संधिच अधिकारी शोधीत होते. पण त्या जिल्ह्यांतील कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनी आपण होऊन कांही असली संधि सरकारला मिळू दिली नाही.

## राजबंद्यांची छावणी

वरील मजकुरावरून कॉंग्रेसचा विधायक कार्यक्रम मिदनापूर जिल्ह्यांत किती लोकप्रिय होता यांची कल्पना वाचकांना आलीच असेल. पण या जिल्ह्याच्या दुर्दैवाने बंगाल प्रांतांतील शेकडो संशयित राजबंद्यांना बंगाल-सरकारने या जिल्ह्यांतील हिजलनामक गांवी बंदीत ठेवले होते. पुढे सरकारला असा संशय येऊं लागला की या अटकेत ठेवलेल्या राजबंद्यांच्या हुकुमाने बंगाल प्रांतांतील सर्व अत्याचार घडत असतात. त्या वेळी बक्सा आणि हिजली या दोनच कॅपांतून संशयित राजबंद्यांना अडकवून ठेविले होते, यामुळे बंगाल्यांत होणाऱ्या प्रत्येक अत्याचाराबरोबर या कॅपांतून अडकवून ठेविलेल्या राजबंद्यांविषयी सरकारी अधिकाऱ्यांची व साऱ्या युरोपियन समाजांची मनें अधिकाधिक कलुषित होऊं लागली.

शिवाय या दोन कँपांपैकी हिजलीच्या कँपांतील राजबंदी आपल्या करमणुकीसाठी अनेकदा दीपोत्सव करीत असत; हे दीपोत्सव अधिकाऱ्यांच्या वधामुळे राजबंद्यांना होणारा आनंद व्यक्त करण्यासाठी होत असतात, अशीहि हिजली कँपावरील अधिकाऱ्यांची समजूत होऊं लागली होती. पुढे १९३१ च्या जुलै-अखेरीला राजबंद्यांनी प्रसिद्ध बंगाली कादंबरीकार बाबू शरच्चंद्र चट्टोपाध्याय यांच्या जन्म-दिनानिमित्त एक दीपोत्सव केला. पण त्याच सुमारास अलीपूरचे सेशन्स जज्ज मि. गॅर्लिक याचा वध झाला असल्याने त्यासाठीच राजबंद्यांनी दीपोत्सव केला असावा, अशी अधिकाऱ्यांची समजूत होऊन त्यांनी त्यांचा भत्ता तोडला. या वेळेपासून राजबंदी व त्यांजवरील संत्री यांच्यांतहि कुरबूर होऊं लागली. या सर्वांचा परिणाम असा झाला की, १६ सप्टेंबरच्या रात्री निःशस्त्र आणि असहाय अशा या राजबंद्यांवर सशस्त्र संत्र्यांनी हल्ला करून बंदुकीच्या गोळ्यांनी आणि संगिनींनी दोघा राजबंद्यांना ठार मारले आणि वीस जणांना लहानमोठ्या जखमा केल्या.

हिजलीच्या या अत्याचारामुळे क्रांतिकारकाची आधीच तापलेली मस्तकें एकदम भडकून गेली व त्यांनी या साऱ्या रक्तपाताचा सूड उगविण्याचा संकल्प सोडला. या वेळचे मिदनापूरचे कलेक्टर मि. डग्लस यांनी आपल्या भावाला लिहिलेल्या एका पत्रांत म्हटले आहे—

'I have received two anonymous threats from th two murderers of Mr. Peddie that I would be shortly murdered. The C. I. D. discovered that the hand-writing was identical with that of several threatening letters received by Mr. Peddie.'

डग्लससाहेबांची ही भीति खरी ठरून सरतेशेवटी ३० एप्रिल १९३२ रोजी त्यांना डिस्ट्रिक्ट बोर्डाच्या ऑफिसांत दोघा तरुणांनी ठार मारले. त्या दोघांपैकी प्रद्योतकुमार भट्टाचार्य नांवाचा एक तरुण पकडला गेला व त्या वेळीं त्याच्या खिशांत 'हिजलीच्या अत्याचाराचा किंचित् सूड' अशा अर्थाचा मजकूर लिहिलेली एक चिठी सांपडली.

या डग्लसहत्येशी मिदनापूर जिल्ह्यांतील इतर राजकारणाचा संबंध नव्हता पण तेथील रहिवाशांच्या दुर्दैवाने त्यांचा दुसरा कलेक्टर मारला गेल्यामुळे त्यांच्यावर सरकारचा भयंकर रोष झाला. तेव्हांपासून पोलिस आणि लष्कर या उभयतांनी त्या जिल्ह्यांत जो नंगा नाच आरंभिला त्याचे वर्णन बाबू सत्येंद्र मित्र आणि बाबू अमरेंद्र चट्टोपाध्याय यांनी कौन्सिलांत केले होते. असल्या अनुल्लेखनीय अत्याचारामुळे पिसाळलेल्या तरुणांनी १९३३ च्या सप्टेंबरमध्ये मि. बर्ज नांवाच्या मिदनापूरच्या कलेक्टराला ठार मारले ! त्यामुळे हा जिल्हा अजूनहि मार्शललॉसदृश अमलाखालीच आहे आणि या जिल्ह्यांतील एका डेप्युटी मॅजिस्ट्रेटाच्या जागी नुकतीच घोडदळांतील एका मेजरची नेमणूक झाली आहे.

या मिदनापूर जिल्ह्यांतील जुलूम इतका कुप्रसिद्ध झाला आहे की, बर्जहत्येचा निषेध करतांना गांधीजीनीहि असे उद्गार काढले:—

"The wrongs committed by the Government led to these crimes."

पण गांधीजीच्या या उद्गारांनी सरकारचे डोळे तर उघडले नाहीतच; उलट हिंदुस्थान-सरकारचे तेव्हाचे गृहमंत्री सर हॅरी हेग यांनी त्यांचा पुढील शब्दांत निषेधच केला आहेः—

"Mr. Gandhi alone, as far as I have observed, among Indian public men, thought fit, while deploring the murder of Mr. Burge, to explain that what he called the wrongs committed by Government led to the commission of these crimes!"

वर सांगितलेल्या हत्याकांडाखेरीज इतर कोणताहि क्रांतिकारकांचा अत्याचार मिदनापूर जिल्ह्यांत घडल्याची नोंद स्टेट-सेक्रेटरीच्या स्टेटमेंटमध्ये नाही. बंगाल प्रांताच्या इतर भागांतून जसे दरवडे, बॉबगोळ्यांचे स्फोट, आगगाडी उलथून पाडण्याचे प्रयत्न ऐकूं येतात तसला कोणताहि प्रकार मिदनापूर जिल्ह्यांत घडलेला ऐकिवांत नाही. तरी पण या जिल्ह्यांतील भद्र लोकांतील तरुणांवर, चितागांग खेरीजकरून इतर जिल्ह्यांतल्यापेक्षा, अधिक कडक निर्बंध लादलेले आहेत.

—केसरी, ता. २२ मार्च, १९३५

## लेखांक सातवा

### कायदेमंत्र्याचीं चुकीचीं विधानें

आतापर्यंत चितागांग आणि मिदनापूर या दोन विशिष्ट जिल्ह्यांतील क्रांतिकारकांच्या चळवळींचे समालोचन संपविलें आहे. आता यापुढे बंगाल्यांतील इतर क्रांतिकारकांच्या १९३० सालापासूनच्या इतिहासाचे समालोचन करावयाचे आहे. पण तसें करण्यापूर्वी हिंदुस्थान सरकारचे कायदेमंत्री सर नृपेंद्रनाथ सरकार यांनी बंगाल्यातील क्रांतिकारकांच्या चळवळीविषयी असेंब्लीत नुकतेंच जे भाषण केले आहे त्यातील कांही विधानाचा विचार केला पाहिजे.

सर नृपेंद्रनाथांनी आरंभीच असें सांगितले आहे की, महायुद्धापूर्वीच्या क्रांतिकारकांच्या संस्था फार लहान होत्या; व त्यांच्या चालकांचे सर्व व्यवहार गुप्त रीतीने होत असत. पण अलीकडे क्रांतिकारकांचे पुढारी कॉंग्रेस कमिटयां-सारख्या जाहीर रीतीने व्यवहार करणाऱ्या संस्थांतून पुढाकार घेतात आणि त्या संस्थांच्या सभासदांना व स्वयंसेवकांना क्रमाने क्रांतीच्या मार्गाला लावून आपल्या पक्षाचे सामर्थ्य वाढवितात. पण ही दोन्ही विधाने बरोबर नाहीत. १९०८ साली समित्यांचा कायदा पास झाला, त्यावेळी एकट्या अनुशीलन समितीच्या सहाशेवर शाखा बंगाल्यांत पसरल्या होत्या, असे रौलेटरिपोर्टांत सांगितले आहे. त्याखेरीज क्रांतिकारकांच्या युगांतर वगैरे इतर समित्या होत्या त्या वेगळ्याच. तेव्हा समित्यांचा कायदा पास झाला त्यावेळी बंगाली क्रांतिकारकांची संघटना बरीच मोठी होती हे उघड आहे.

त्यांच्या दुसऱ्या आरोपाबद्दल कलकत्त्याच्या ‘ ॲडव्हान्स ’ पत्राने म्हटले आहे की, एखाद्या सरकारी अधिकाऱ्याने लांच खाल्ली असे सिद्ध झाले तरी त्यावरून हे अनुमान निघत नाही व सिद्धहि होत नाही कीं लांच खाण्या-साठीच त्याने सरकारी नोकरीत प्रवेश करून घेतला होता. तोच न्याय क्रांति-कारक गुन्ह्याबद्दल शिक्षा झालेल्या कॉंग्रेसवाल्यांना लावला पाहिजे. दैवयोगाने मागाहून ते क्रांतीच्या मार्गाला लागले असले तरी त्याच उद्देशाने ते कॉंग्रेसमध्ये शिरले होते, असे म्हणणे अन्यायाचें आहे. शिवाय स्टेट सेक्रेटरीच्या कैफीयती-

मध्ये देखील क्रांतिकारक पुढाऱ्यांवर हा आरोप केलेला नाही. स्टेट सेक्रेटरी म्हणतात, " It is a remarkable fact that a large percentage of the recruits to the terrorist movement are found to have made their political debut as civil resisters.'' कॉंग्रेसच्या कायदेभंगाच्या चळवळीतून क्रांतिकारकांना अनुयायी मिळाले असतील, पण कॉंग्रेसची चळवळच क्रांतिकारक पुढारी चालवीत होते, हा सर नृपेंद्रनाथांचा आरोप खोटा आहे.

सर नृपेंद्रनाथांचे दुसरे एक विधान असेच विचार करण्याजोगे आहे. ते म्हणतात, 'क्रांतिकारकांच्या अत्याचारांची वाढ होऊं लागलेली पाहून १९२४ साली बंगाल सरकारने एक वटहुकूम काढला. या वटहुकुमाची मुदत १९२८ साली संपली आणि त्याखाली पकडलेल्या तरुणांना सरकारने सोडून दिले. वटहुकुमाचा पुनरुद्धार होत नाही असे समजतांच या तरुणानी पुन्हा एकवार आपली संघटना करण्याला सुरुवात केली आणि दीड वर्षाच्या तयारीनंतर चितागागच्या शस्त्रागारावर धाड घातली.' पण 'I am going to tell you what is absolutely true ' असे उद्गार काढणाऱ्या सर नृपेंद्रनाथांची वरील माहिती सपशेल चुकीची आहे. स्टेट सेक्रेटरी म्हणतात, " The Bengal Criminal Law Amendment Act of 1925 was due to expire on 21st March 1930" म्हणजे १९२४ च्या वटहुकुमाचे १९२५ च्या मार्चमध्ये कायद्यांत रूपांतर झाले होते व तो कायदा २१ मार्च १९३० पर्यंत अस्तित्वांत होता. आणि चितागांगच्या क्रातिकारकांनी आपली जी कांही तयारी केली, ती सारी या कायद्याचे हत्यार घेऊन सज्ज असलेल्या पोलिसखात्याला नकळतच केली, वटहुकूम रद्द झाल्यावर आहे.

## क्रांतिकारक चळवळ कां फैलावली ?

क्रांतिकारकांना त्यांच्या चळवळीत जे कांही यश प्राप्त झाले, त्याचे कारण सांगतांना सर नृपेंद्रनाथ म्हणतात, 'The main cause of their success was the praise which they had received from a section of the press and in public speeches. सर नृपेंद्रनाथांच्या या विधानांतील वर्तमानपत्रांवरील आरोपाला त्यांनी आपल्या भाषणांत पुरावा दिला

नाहीं. हाच आरोप स्टेट सेक्रेटरीच्या स्टेटमेंटमध्येहि आला आहे. तेथे ते म्हणतात, ‘When Mr. Peddie was assassinated, the attitude of the press was far from satisfactory.’ पण हे विधान चुकीचे आहे, हे खुद्द बंगाल सरकारच्याच वार्षिक रिपोर्टवरून सिद्ध करून देतां देईल. ‘When Mr. Peddie was shot and mortally wounded Mr. Sen Gupta issued a statement to the press condemning the murder and the crime was also on the whole deplored by the Congress newspapers.’ ( बंगाल अॅड्मिनिस्ट्रेशन रिपोर्ट १९३१ )

असो, बंगाली क्रांतिकारकांच्या चळवळीसंबंधी जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढे साक्ष देतांना कलकत्त्याच्या ‘स्टेट्समन’ पत्राचे माजी संपादक सर आल्फ्रेड वॅटसन यांनी म्हटले आहे, ‘It is a widely sentimental movement against a form of rule which, they consider, had never done them justice.’ सर आल्फ्रेड वॅटसन यांचे हे उद्गार १९३० सालापासूनच्या बंगाली क्रांतिकारकांच्या चळवळीला पूर्णपणे लागू पडतात.

## रवीन्द्रनाथांचें मत

१९३० सालांतील चितागांगव्यातिरिक्त बाकीच्या बंगाल्यांतील क्रांतिकारकांची चळवळ ही मुख्यतः, डाक्का आणि किशोरगंज येथील मुसलमानांच्या दंग्यांच्या वेळीं स्थानिक अधिकाऱ्यांनी हिंदूंच्याबरोबर जे विपरीत वर्तन केले, त्यामुळे उद्भवली. यापैकी किशोरगंजच्या मॅजिस्ट्रेटाने आपल्या परगण्यांतील साऱ्या मुसलमान दंगेखोरांना अटक केल्यास, साऱ्या परगण्यांतील जमीन नांगरल्यावांचून राहील, या सबबीवर कांही थोड्या प्रमुख दंगेखोरांखेरीज इतर मुसलमान दंगेखोरांना अटक करण्याचें नाकारले व बंगाल सरकारने पुढे कौन्सिलांत या मॅजिस्ट्रेटाच्या उत्तराचे समर्थनहि केले ! डाक्का प्रकरणाबद्दल रवींद्रनाथांची दोनच वाक्यें उतरून घेतली तरी तेवढ्याने तेथील अन्यायाची तीव्रता वाचकांना कळून येईल. रवींद्रनाथ म्हणतात, ‘We have not the least doubt that the most expensively and elaborately organised power which the British Government has in India is more than sufficient in checking at once any symptoms of violence in our

communal relationship. I know from my own correspondence that this event at Dacca has alienated more than anything else in Bengal the sympathies of those who were still clinging to their faith in British justice.'

## प्रांताधिपतीचें कर्तव्य

वास्तविक पाहतां डाक्क्याच्या दंग्यासारखा दंगा हा केवळ स्थानिक अधिकाऱ्यांच्या नालायकीमुळे किंवा पक्षपातामुळे उद्भवतो. यास्तव स्वतः प्रांताधिपतीने असल्या दंग्याच्या ठिकाणी जाऊन तो दंगा तावडतोब मिटवावा अशी खुद्द बादशहांचीहि अपेक्षा असते. १९२६ सालांतील कलकत्त्याच्या दंग्याच्या प्रसंगी तेव्हांचे बंगालचे गव्हर्नर लॉर्ड लिटन दार्जीलिंगाहून कलकत्त्यास न गेल्यामुळे बादशहांना नवल वाटले व ते त्यांनी इंडिया कौन्सिलांतील एका बंगाली सभासदाला त्यावेळी दिलेल्या मुलाखतींत व्यक्त करूनहि दाखविले होते. त्या मुलाखतीचें आपल्या पत्रांत वर्णन करतांना इंडिया कौन्सिलच्या त्या बंगाली सभासदानें लिहिले आहे की, 'His Majesty the King Emperor himself inquired why Lord Lytton was not then in Calcutta when all these troubles took place.' असो. हा डाक्क्याचा दंगा मे महिन्याच्या अखेरीस झाला त्यानंतर दंग्याची चौकशी करण्यासाठी एक चौकशीकमिटीहि बसली होती. पण कमिटीकडून हिंदूंना न्याय मिळाला नाही. या प्रकरणाबद्दल जुलैमध्ये असेब्लीत एक ठराव आला होता पण तोहि फेटाळला गेला.

## टेगार्टवर बॉंब !

हे सारे सदनशीर प्रयत्न चालू असतांनाच युगांतर समितीच्या पुढाऱ्यांनी डाक्क्याच्या पोलिस सुपरिंटेंडेंटला मारण्याचा संकल्प केला. पण त्याला मारण्यापूर्वी प्रथम आपला जुना शत्रु सर चार्लस टेगार्ट याला मारावे व मागाहून इतरांना मारण्याचा प्रयत्न करावा, असे त्यांनी ठरविलें. त्याप्रमाणें ऑगस्ट २५ रोजी अनुज सेन आणि दिनेश मुजुमदार या उभयतांनी टेगार्टच्या मोटारीवर बॉंब टाकून त्याला मारण्याचा प्रयत्न केला; पण त्या बॉंबच्या स्फोटाने सर चार्लसच्या ऐवजी अनुज सेन स्वतःच ठार झाला व दिनेश मुजुमदार जखमी होऊन पोलिसांच्या हाती लागला. या प्रकरणानंतर लगेच पोलिसांनी कलकत्ता

कार्पोरेशनचे एक सभासद डॉ. नारायणचंद्र राय यांच्या घराची झडती घेऊन त्यांना अटक केली. या डॉक्टरांच्या कबुलीजबाबावरून असे कळते की, १९२९ साली ते क्रांतिकारक पक्षाला मिळाले. १९२९ च्या अखेरीला हे लाहोरला गेले होते व तेथल्या क्रांतिकारकांकडून आमाटोलचे बॉंब करण्याची विद्या शिकून परत आले होते. कलकत्त्याला परत आल्यावर त्यांनी व त्यांचे चुलतबंधु गोविंद राय यांनी बॉंब करण्याला सुरुवात केली व जून महिन्यापासून त्यांनी केलेले बॉंब सर्व बंगाल्यांत वाटले जाऊं लागले.

## लोमनसाहेब बळी पडले

पुढे ऑगस्ट तारीख २९ रोजी बंगालचे इन्स्पेक्टर-जनरल ऑफ पोलिस मि. लोमन आणि डाक्क्याचे पोलीस सुपरिंटेंडेंट मि. हॉडसन हे उभयता कांही कामाकरिता डाक्क्याच्या मिटफोर्ड हॉस्पिटलमध्ये आले असता विनयकृष्ण बोस या तरुणाने त्या उभयताना पाठीमागून गोळ्या घातल्या व मग दुसऱ्या एका पिस्तुलाने पाठलाग करणाऱ्यांपासून आपला बचाव करून घेत तो विद्यार्थ्यांच्या वसतिगृहात शिरून नाहींसा झाला. विनयकृष्णाच्या गोळ्यानी लोमनसाहेब ठार झाले व हॉडसनसाहेब जखमी झाले तरी बचावले. या अत्याचारानंतर पोलिसांनी विद्यार्थ्यांच्या वसतिगृहावर हल्ला करून पुष्कळाना मारहाण केली पण त्यांना विनय बोस कांही सांपडला नाही. त्या दिवशी पोलिसांचा मार खाल्लेल्या सुमारे पन्नास विद्यार्थ्यांना इस्पितळात पोंचवावे लागले ! पुढे सप्टेंबर महिन्यात दिनेश मुजुमदारावर खटला होऊन त्याला जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा झाली. त्याचप्रमाणे डॉ. नारायणचंद्र राय व त्यांचे सहकारी या सर्वांवर खटले होऊन त्यांनाहि जन्मठेपेच्या किंवा कमी अधिक मुदतीच्या काळ्यापाण्याच्या शिक्षा झाल्या.

## दिनेश गुप्ताला फांशी

या वेळी कलकत्त्याचे सारे प्रमुख कॉंग्रेस पुढारी कायदेभंगानिमित्त अलीपूर सेंट्रल जेलमध्ये शिक्षा भोगीत होते. तुरुंगांत जाणारे मागेच कॉंग्रेस पुढारी कांही सेनापति बापटांच्याप्रमाणे तुरुंगाची शिस्त पाळणारे नसतात. यामुळे अलीपूर तुरुंगांतील कॉंग्रेस पुढाऱ्यांचे तुरुंगांतील अधिकाऱ्यांशी भांडण होऊन एके दिवशी अधिकाऱ्यांनी कॉंग्रेसवाल्यांवर लाठीचा हल्ला केला. या हल्ल्यांत

यतींद्रमोहन सेनगुप्त व सुभाषचंद्र बोस यांच्यासारख्या पुढाऱ्यांपासून नगण्य स्वयंसेवकापर्यंत बहुतेकांना लाठीचा प्रसाद मिळाला ! बंगाली आमदारांनी या प्रकरणाची दाद लावून घेण्याचा प्रयत्न केला. पण राजबंद्यांनी शिस्तीचा भंग केल्याची कबूली कांही पुढाऱ्यांनी दिल्यामुळे बंगाल सरकारने त्या प्रकरणाची चौकशी करण्याचे नाकारले. पुढे हा लाठीचा प्रसाद खाल्लेले पुढारी बंधमुक्त होऊन बाहेर आले व त्यांच्या व्याख्यानांतून या लाठीहल्ल्याचा सविस्तर इतिहास ऐकून प्रक्षुब्ध झालेल्या विनयकृष्ण बोसाने दुसरे दोघे सहकारी बरोबर घेऊन सेक्रेटरीएटच्या इमारतीत प्रवेश केला व बंगालचे इन्स्पेक्टर-जनरल ऑफ प्रिझन्स कर्नल सिम्सन याच्या खोलीत घुसून त्याना ठार मारले ! यानतर त्यांनी इतर अधिकाऱ्याना मारून निसटून जाण्याचा प्रयत्न केला; पण तो प्रयत्न फसून ते स्वतःच एका खोलींत अडकून पडले. तेव्हा त्या सर्वांनी आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला. विनयकृष्ण बोस व त्याचा एक साथीदार या उभयतांचा प्रयत्न यशस्वी झाला. आणि उरलेला दिनेश गुप्त याच्यावर मात्र पोलिसांनी खटला भरला. या खटल्यात दिनेश गुप्ताला फाशीची शिक्षा झाली व १९३१ साली जुलैच्या ७ तारखेला त्याला फांशी देण्यात आले.

## शिक्षा देणाऱ्याचा खून

दिनेश गुप्ताची फांशीची शिक्षा रद्द व्हावी यासाठी बंगाली लोकांनी पुष्कळ खटपट केली होती. त्याला फांशी दिल्यावर कलकत्ताकॉर्पोरेशनसारख्या प्रमुख नगरसंस्थेने आपली सभा एक दिवस तहकूबहि केली होती ! सामान्यतः असे घडून येते की कोणालाहि फांशी दिले म्हणजे त्याला वांचविण्यासाठी चाललेली चळवळ आपोआप थांबते व लोकहि ते प्रकरण विसरून जातात. पण दिनेश गुप्ताच्या बाबतीत तसा प्रकार घडावयाचा नव्हता. तो फाशी जातांच युगांतर समितीच्या दीर्घद्वेषी पुढाऱ्यांनी त्याला फाशीची शिक्षा सांगणाऱ्या न्यायाधिशाला मारून टाकण्याचा आपल्या अनुयायांना हुकूम केला व त्या हुकुमाप्रमाणे जुलै २७ रोजी दिनेश गुप्ताला शिक्षा सांगणारे न्यायाधीश मि. गॉर्लिक यांना एका अज्ञात तरुणाने कोर्टांत गोळ्या घालून ठार मारले. तेव्हां पोलिसांनीहि त्याला गोळ्या घालून जखमी केले; पण पोलिसांनी अटक करण्यापूर्वी त्याने विष खाऊन आत्महत्या केली.

गॅर्लिकच्या वधानंतर कलकत्त्याचे युरोपियन लोक अतिशय खवळून गेले. कलकत्ता पोलिस अॅड्मिनिस्ट्रेशन रिपोर्टांत म्हटले आहे, "The younger sections, of the European community in Calcutta formed themselves into an association, known as the 'Royalists' which in its earlier days gave some cause for anxity owing to the intensity of their resentment and to rumours of reprisals intended to be carried out against the Congress protagonists and apologists of political assassins." पण युरोपियन असोसिएशनच्या पोक्त पुढाऱ्यांनी आपल्या ज्ञातींतील तरुणांना चार विवेकाच्या गोष्टी सांगून शांत केले व त्यामुळे कलकत्त्यांतील युरोपियन तरुणांच्या हातून कांही अनिष्ट प्रकार घडून आले नाहीत !

—केसरी ता १९ एप्रिल, १९३५.

---

## लेखांक आठवा

गॅर्लिकच्या मृत्यूनतर कलकत्त्याच्या अॅंग्लो-इंडियन पत्रांनी कॉंग्रेसविरुद्ध गरळ ओकावयाला सुरवात केली. 'स्टेट्स्मन' पत्राने तर एकवार असेहि लिहिले की,

If every time a Hindu youth murdered a British Official, a young Englishman retaliates by murdering a Congress leader, the effect would be no inequality of justice ! !

'कॅपिटल' 'इंग्लिशमन' वगैरे इतर अॅंग्लो-इंडियन पत्रांतूनहि असल्याच प्रकारचा मजकूर नेहमी प्रसिद्ध होऊं लागला. तसेच हिंदुस्थानांतील कायद्यांचे यत्किंचित् भय न बाळगणाऱ्या या अॅंग्लो-इंडियन पत्रांनी राष्ट्रीय पक्षाच्या वर्तमानपत्रांतून राजकीय खुनांचे समर्थन होत असल्याच्या सबबीवर सरकारला प्रेस अॅक्टाचे पुनरुज्जीवन करण्याची सूचना केली. वास्तविक पाहतां, अत्याचारांची जबाबदारी अंशतः तरी अत्याचारी सरकारी नोकरांच्या दुष्कृत्यांवर पडते, याची सरकारला आठवण करून देण्यापलीकडे हिंदी वर्तमानपत्रे अधिक कांहीहि लिहीत नसत. सर अबदुल्ला सुऱ्हावर्दीसारख्या सरकारपक्षाच्या मुसलमान पुढाऱ्याने १९३१

सार्लो अशाच तऱ्हेचे उद्गार एकवार ॲसेंब्लीमध्येहि काढले होते. सर अबदुल्ला सुऱ्हावर्दीनी तेव्हा सरकारला सूचना केली होती—

'If the Government was anxious to crush revolutionary crimes in Bengal, they should also deport from India some of their own officials who had created a good deal of discontent in that province.'

## सरकारचे सल्लागार

अगदी अलीकडे देखील बंगालचे सध्याचे गव्हर्नर सर जॉन ॲडरसन यांच्यावर दार्जिलिंग येथे गोळीबार झाल्यानंतर ईस्ट बेंगॉल फिजिकल एज्युकेशन ॲसोसिएशन या राजनिष्ठ संस्थेने क्रांतिकारकांचे अत्याचार थांबण्यासाठी सरकारला कांही उपयुक्त सूचना केल्या होत्या, त्यांतली तिसरी सूचना अशी आहे—

"Thirdly sometimes it so happens that irresponsible oppressions indulged in by a few thoughtless Government officials turn the sufferers inimical. The inhumane and harsh behaviours that are alleged to have been sometimes meted out to the political prisoners also aggravate this feeling."

पण सरकारचे अधिकृत सल्लागार ॲग्लो-इंडियन पत्रकर्तेच असल्याने त्याला राजनिष्ठ हिंदी लोकाचा सल्ला नको असतो, त्यांचे फक्त साहाय्य तेवढे हवे असते. याच साहाय्याच्या जोरावर ९ आक्टोबर १९३१ रोजी सरकारने पुनः प्रेस ॲक्ट पास करून घेतला.

या वेळेपर्यंत चितागांग शहरातील मारपीट व लूट आणि हिजली तुरुंगांतील राजबंद्यांवरील गोळीबार हे दोन अघोर अत्याचार घडून आले होते. या दोन्ही अत्याचारांना युरोपियन ॲसोसिएशनच्या पुढाऱ्यांची चिथावणीच कारणीभूत झाली, अशा समजुतीने क्रांतिकारकांनी युरोपियनांचे असेंब्लीतील एक पुढारी व 'स्टेट्समन'चे संपादक मि. मूर यांना खुनाच्या धमक्या देण्याला सुरुवात केली व २९ आक्टोबर रोजी कलकत्याच्या युरोपियन असोसिएशनचे तेव्हांचे अध्यक्ष मि. व्हिलियर्स हे आपल्या ऑफिसांत रॉयालिस्ट असोसिएशनच्या तरुण

युरोपियनांशी चर्चा करीत बसले असतां विमल दासगुप्त या फरारी क्रांतिकारकाने त्या ऑफिसांत घुसून व्हिलियर्सला मारण्याचा प्रयत्न केला; पण तो प्रयत्न फसला व विमल दासगुप्ताला दहा वर्षें काळेपाण्याची शिक्षा झाली.

## बंगाल्यांतील लष्करी कायदा

त्याच्या आदल्याच दिवशी कांही क्रांतिकारक तरुणांनी डाक्क्याचे कलेक्टर मि. डुर्नो यांच्यावर गोळ्या झाडून त्यांच्या तोंडांवर जबर जखमा केल्या होत्या व त्याचा सूड घेण्यासाठी पोलिसांनी विद्यार्थ्यांच्या वसतिगृहावर छापे घालून आंत राहणाऱ्यांना चोपले होते आणि घरांतील सामानाची मोडतोड केली होती. एके काळी डेप्युटी मॅजिस्ट्रेट व असेंब्लीचे सभासद असलेल्या सरकारी पदवीधरांच्या घरी सुद्धां असला प्रकार घडून आला होता. असो, या अत्याचारांच्या पाठोपाठ २९ आक्टोबर रोजी हिंदुस्थान सरकारने क्रांतिकारकांचा प्रतिकार करण्यासाठी एक नवीन ऑर्डिनन्स प्रसिद्ध केलं. त्यानंतर ३० नोव्हेंबर रोजी आणखी एक ऑर्डिनन्स प्रसिद्ध करून बंगाल प्रांतात जवळ जवळ मार्शल-लॉचाच अंमल सुरू केला.

याच वेळी बंगाल सरकारने वंगीय सेवादलासारख्या अनेक सुप्रसिद्ध राष्ट्रीय संस्था बेकायदेशीर ठरवून त्या संस्थांशी संबंध असलेल्या कार्यकर्त्यांना बिनमुदत अटक करण्याला सुरुवात केली. या नव्या सत्रात कोमिल्ला येथील 'अभय आश्रम' या नामांकित संस्थेचाहि बळी पडला, या दिवसांत कोमिल्ला येथे झालेल्या दंडपशाहीचे यथातथ्य वर्णन असेंब्लीचे सध्याचे उपाध्यक्ष बाबू अखिलचंद्र दत्त यांनी असेंब्लीत नुकतेच केले आहे. अखिलबाबूंचे भाषण चालू असतांना होममेंबर एकवार उद्गारले, 'I cannot believe this'. तेव्हां अखिलबाबूंनी त्यांना आश्वासन दिले की मी स्वतः समक्ष पाहिलेल्या गोष्टीच सांगत आहे. या दडपशाहीचे नुसते वर्णन क्रेकसाहेबांना इतकें झोंबले; मग त्या दडपशाहीचा प्रत्यक्ष अनुभव घेत असतांना तेथील लोकांची मनोवृत्ति किती विचलित झाली असेल याची कोणालाहि कल्पना करतां येईल. अशा परिस्थितीत १४ डिसेंबर रोजी शांति आणि सुनीति या दोन पंधरा वर्षांच्या मुलींनी कोमिल्ला येथील कलेक्टरची कांही निमित्ताने गांठ घेतली

व त्याला गोळ्या घालून ठार मारले. क्रांतिकारकांच्या चळवळीत बंगाली मुलींनी केलेली ही पहिलीच हत्या होय. या दोघींनाहि जन्मठेप काळेपाण्याची शिक्षा मिळाली. त्यानंतर पुढच्या वर्षी २९ जुलै रोजी कोमिल्लाचे पोलिस सुपरिंटेंडेंट मि. एलिसन यांनाहि क्रांतिकारकांनी मारून टाकले.

कोमिल्लाच्या मॅजिस्ट्रेटला मारल्यानंतर तीन आठवड्यांच्या आंत कॉंग्रेसच्या सर्व संस्था बेकायदा ठरवून सरकारने कॉंग्रेसवाल्यांची धरपकड सुरू केली. १९३३ च्या बंगाल ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्टांत खालील विधान करण्यांत आले आहे—

'At the beginning of 1932 a number of prominent Congressmen in the province had been arrested and detained as State prisoners under Regulation III of 1818. Among them were Mr. J. M. Sengupta, Mr. Subhas Bose and Mr. Sarat Bose.' सेनगुप्त आणि बोस बंधूंप्रमाणे याचवेळी प्रो. ज्योतिषचंद्र घोष, पूर्णचंद्र दास, भूपेंद्रकिशोर रक्षित राय, रसिकलाल दास, सुरेशचंद्र दास आणि भूपति मुजुमदार या सर्वांनाहि अटक झाली. यांपैकी सेनगुप्तांची मृत्यूने कायमची आणि सुभाषबाबूंची आजाराने तात्पुरती सुटका झाली आहे. उरलेल्या कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना, त्यांच्यावर क्रांतिकारकांना मदत केल्याचा आरोप करून, बंगाल सरकारने बिनचौकशीने डांबून ठेवले आहे.

## वीणा दास यांची कैफियत

इ. स. १९३२ च्या प्रारंभी कॉंग्रेस आणि सरकार यांच्यामध्ये निकराचा सामना सुरू झाल्यामुळे साऱ्या देशांत दडपशाहीचा कहर झाला आणि ज्यांना डोळ्यांसमोर होत असलेल्या अन्यायांचा प्रतिकार केल्यावाचून अन्नपाणीहि रुचेनासे होते अशा भावनाप्रधान व्यक्तींना जीवन असह्य होऊन गेले. असल्याच भावनाप्रधान स्वभावाच्या एका सुशिक्षित व कुलीन तरुणीने आपल्या मायभूमीवर होत असलेल्या अत्याचारांकडे जगाचे लक्ष्य वेधावे, या इच्छेने ६–२–१९३२ रोजी युनिव्हर्सिटीच्या पदवीदानप्रसंगी बंगालचे गव्हर्नर सर स्टॅनले जॅक्सन यांच्यावर पिस्तूल घेऊन हल्ला केला. तेव्हां कलकत्ता कॉर्पोरेशनचे चीफ ऑफिसर मुखर्जी व युनिव्हर्सिटीचे व्हाइसचॅन्सेलर हुसेन सुऱ्हावर्दी यांनी तिला

हात धरून जागच्या जागीं डांबून टाकल्यामुळे गव्हर्नरसाहेब बचावले. गव्हर्नर-साहेबांना वांचविल्याबद्दल हुसेन सुऱ्हावर्दीना सर ही पदवी मिळाली. पण मुखर्जी महाशयांचे कोणी फुकटचे आभार सुद्धा मानले नाहीत.

पुढे गव्हर्नरसाहेबांवर हल्ला करणारी तरुणी वीणा दास हिच्यावर खटला सुरू झाला. या खटल्यांतील जबानीत, आपली अत्याचाराकडे प्रवृत्ति कां झाली, हें सांगतांना तिने सांगितलें—

"I studied in the Diocesan College for my B. A. degree examination and passed my B. A. with Honours in English and my father sent me to that College for an additional course of study for the B. T. examination in order to give me an opportunity to see the best side of British charactor. I gratefully acknowledge that I have immensely profited by my study under the sisters of my College. But at the same time with the comparative knowledge of things, I felt and felt with deep anguish that the Christ-Spirit was not much in evidence in the administration of a Christian Government......I am emotional in my temperament. Any suffering even to an animal would cause severest pain to me which would almost make me mad till it found expression in some work of relief. All the Ordinances, all measures to put down the noble aspiration for freedom in my countrymen came as a challenge to our national manhood and indignities hurled at it. This hardened even the feminine nature like mine into one of heroic mould."

## काळेकुट्ट वातावरण

पुढे देशांतील अनेक अन्यायांचा उल्लेख करून सरते शेवटी स्वतःची बहीण कल्याणी दास हिला अन्यायाने कशी शिक्षा देण्यांत आली व तुरुंगांत गेल्यावर प्रथम तिचे कसे हाल झाले, याची हकीगत तिने सांगितली व नंतर ती म्हणाली,

"I saw all this with my own eyes and also saw the bitter tears welling out of my dear parents. I thought such

must be the sufferings of many families and many men and women to be counted by thousands. All these and many others worked on my feelings and worked them into a frenzy. The pain became unbearable and I felt I would go mad if I could not find relief in death. I only sought the way to death by offering myself at the feet of my country and thus to make an end of all my sufferings and invite the attention of all by my death to the situation created by the measure of Government which can unsex even a frail woman like myself brought up in all the best traditions of Indian womanhood.'

( बंगाल क्रिमिनल लॉ अॅमेंडमेंट सप्लिमेंटरी बिलावरील बाबू सत्येंद्रचंद्र मित्र यांच्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लींतील भाषणामधील एक उतारा )

एका सर्वोत्कृष्ट शिक्षण संस्थेत उच्च शिक्षण घेऊन बहुमान मिळविलेल्या अशा कुलीन तरुणीचे हे हृदयभेदक उद्गार वाचले म्हणजे बंगालमधील वातावरण वेळीं निराशेच्या अंधकाराने किती काळेकुट्ट झाले होते त्याची प्रतीति येते.

— केसरी ता. १४ मे, १९३५.



# सर नृपेंद्रनाथांचीं निराधार व चुकीचीं विधानें

अलीकडे हिंदुस्थानांत दडपशाहीचे जे अनेक कायदे अस्तित्वांत आले आहेत, त्या सर्वांचा अग्रणी १९०८ चा समित्यांचा कायदा होय. या कायद्याने सरकाराला आपल्या लहरींप्रमाणें देशांतील कोणत्याहि संस्थेवर बेकायदेशीरपणाचा छाप मारून तिचे निर्मूलन करतां येतें. याच कायद्याच्या जोरावर कॉंग्रेसची कायदेभंगाची चळवळ सरकारने मोडून काढली. यामुळे कॉंग्रेस पक्षाने असेंब्लींत प्रवेश करताच हा कायदा रद्द करण्याचें बिल पुढे आणलें. या बिलाला सरकारचा अर्थातच कसून विरोध होत आहे. तो इतका कीं या बिलावर सरकारतर्फे कायदे-मंत्री सर नृपेंद्रनाथ सरकार यांनी आपल्या भाषणाला असेंब्लीच्या दिल्ली येथील बैठकीत सुरुवात करून तें परवा सिमल्याच्या बैठकींत संपविले ! या प्रदीर्घ भाषणांत सर नृपेंद्रनाथांनी बंगाल प्रांतांतील कॉंग्रेस-पक्षियांवर अनेक आरोप केले आहेत. त्यांचा संक्षिप्त समाचार या लेखांत घ्यावयाचा आहे.

## चुक्यांची मालिका

दिल्ली येथील गेल्या बैठकींत आपलें भाषण अपूर्ण ठेवतांना सर नृपेंद्र-नाथांनी म्हटलें आहे, 'I am purposely giving this House the very long time of five months to discover mistakes if I have made any.' पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, सध्याच्या असेंब्लीमध्ये सत्येंद्रचंद्र मित्र यांच्यासारखा कोणी पूर्ण माहितगार सभासद नसल्याने सर नृपेंद्रनाथांनी असेंब्लीला पुरविलेल्या माहितीवर आक्षेप घेण्याचें धाडस अजूनपर्यंत एकाहि सभासदाने केलेलें नाही !

वास्तविक पाहतां सर नृपेंद्रनाथांचे भाषण अनेक चुकीच्या व निराधार विधानांनी भरलेलें आहे. त्यापैकीं कांही चुकांची हजेरी ता. १९ एप्रिलच्या 'केसरी'त पूर्वीच घेतली आहे. पण त्या वेळीं या भाषणाचा सरकारी रिपोर्ट उपलब्ध नसल्याने त्यांतील साऱ्या बेजबाबदार विधानांचा तेव्हां परामर्ष घेता आला नाही. यामुळे पुनः एकवार या विषयाकडे वळणें भाग पडलें आहे.

सर नृपेंद्रनाथांच्या भाषणांतील मुख्य मुद्दा हा आहे की, बंगाल्यांत अत्याचारांबद्दल शिक्षा झालेले पुष्कळसे तरुण कॉंग्रेसवाले असल्याचें आढळून येतें. या विधानाला आधार म्हणून त्यांनी सुमारे ५६ कटांच्या खटल्यांतून एका किंवा अधिक कॉंग्रेसवाल्यांना शिक्षा झाल्याची उदाहरणे सांगितली आहेत. पण या बाबतीतील सर नृपेंद्रनाथांची माहिती अगदी बेभरंवसेशीर आहे, हें खालील उदाहरणांवरून वाचकांना कळून येईल.

## भारतमंत्र्यांनीच खोटें ठरविलें !

सर नृपेंद्रनाथ म्हणतात 'The next case is No. 24—attempted murder of Mr. Cassells in August 1931; the three persons who were convicted for attempted murder, were all members of the Tangail Congress Committee.' उलटपक्षीं स्टेट-सेक्रेटरींनी आपल्या स्टेटमेंटमध्ये सांगितलें आहे. 'On the evening of 21 August, at Tangail a Bhadralok youth fired at Mr. Cassells the Divisional Commissioner. The culprit escaped and a person subsequently tried for the offence was aquitted for want of sufficient identification.' म्हणजे ज्या खटल्यामध्ये तीन कॉंग्रेसवाल्यांना खुनाचा प्रयत्न केल्याबद्दल शिक्षा झाल्या, असें सर नृपेंद्रनाथ सांगतात, त्याच खटल्यामध्ये पुराव्याच्या अभावी एकालाहि शिक्षा झाली नाहीं, असें स्टेट-सेक्रेटरी सांगतात. अशा परिस्थितीत जनतेने कोणावर विश्वास टाकावा ?

## निराधार माहिती

असल्याच निराधार माहितीचा आणखी एक नमुना पहा. सर नृपेंद्रनाथ सांगतात, "Then I come to the Jorabagan Bomb Conspiracy and that was again in August 1930. Eight persons were arrested with arms, bombs, bombshells and explosives. Of the eight accused, all were convicted. In this trial Dr. Narayan Chandra Roy was figuring as one of the accused. I may also inform the House that of the other accused persons, Manoranjan, Arun and Bhupendra may be described as leaders of the Bengal Provincial Congress Committee; at

any rate they were very prominent members of the Bengal Provincial Congress Committee."

याप्रमाणे सर नृपेंद्रनाथांनी बंगाल प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे तीन पुढारी मनोरंजन, अरुण आणि भूपेंद्र यांना डॉ. नारायणचंद्र राय यांच्या कटाच्या खटल्यांत गोविलें आहे. वरील पुढाऱ्यांपैकी एकाचेहि आडनांव सर नृपेंद्रनाथांनी सांगितलेलें नाही. तरी देखील त्यांचे विधान सपशेल चूक आहे, असे आम्ही सांगूं शकतो, कारण डॉ. नारायणचंद्र राय यांच्याबरोबरीच्या आरोपींपैकी एकाचेहि नाव मनोरंजन, अरुण किंवा भूपेंद्र नाही. १९३० च्या इंडियन ॲन्युअल रजिस्टरच्या दुसऱ्या खंडात डॉ. नारायणचंद्र राय यांच्याबरोबरीच्या आरोपींची नांवे पुढीलप्रमाणे दिली आहेत. डॉ. नारायणचंद्र राय, डॉ. भूपाळ घोस, अंबिकाचरण राय, आदित्य दत्त, जतिन भौमिक, रसिक दास, सुरेंद्र दत्त आणि रवींद्र अधिकारी. उलट पक्षी बंगाल प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे पुढारी मनोरंजन गुप्त, अरुणचंद्र गुह आणि भूपेंद्रकुमार दत्त यांना कोणत्याहि कोर्टात क्रांतिकारक गुन्ह्याबद्दल शिक्षा झालेली नसून त्या सर्वांना ता. २३-११-१९३१ रोजी बंगाल सरकारने १८१८ च्या रेग्युलेशनाखाली अटकेत ठेविलें आहे व ते सरकार त्यांना त्यांच्या मासिक खर्चासाठी प्रत्येकी महिना ७५ रुपये देत असते. अशा सन्मान्य राजबंद्यांविषयी भरमसाट विधानें करणे सर नृपेंद्रनाथांना शोभत नाही, इतकेच आम्ही त्यांना सुचवितो.

## पुरावा खोटा होता काय?

असल्याच चुकीच्या माहितीचे आणखी एक उदाहरण येथे दिलें पाहिजे. सर नृपेंद्रनाथ सरकार मेचुआ-बाजार बॉंब–प्रकरणाविषयी बोलत असतां अखिलचंद्र दत्त यांनी मध्येच विचारलें, 'As regards the Mechua Bazar Bomb case was it not the finding of the court that the police evidence was manufactured'? त्याला सर नृपेंद्रनाथांनी उत्तर दिलें 'Will my Honourable friend kindly explain why then 27 persons were sentenced to long terms of imprisonment?" आता या प्रकरणाविषयीं पहिली गोष्ट ही सांगितली पाहिजे कीं, या खटल्यांत २७ आरोपी असले तरी त्यांतले

९. सेशन्स कोर्टानें सोडून दिले व ९ हायकोर्टानें निर्दोषी ठरवून सोडले व फक्त ९ जणांनाच अखेर शिक्षा झाली. (१९३१ इंडियन ॲन्युअल रजिस्टरचा पहिला खंड पान ३१.) या खटल्यांतील हायकोर्टाचा निकाल आम्हांला पहावयाला मिळाला नाही त्यामुळे या खटल्यांत कोणत्या आरोपीविरुद्ध पोलिसांनी बनावट पुरावा पुढे आणला होता ते आम्ही नक्की सांगू शकत नाही. पण खोटा पुरावा पुढे आणल्याबद्दल पोलिसांवर तीव्र टीका करूनसुद्धा आरोपीला हायकोर्टानें जन्मठेप काळेपाणी दिल्याचे उदाहरण पंजाबांत नुकतेच घडून आले आहे !

## कायद्याची माहिति हि चूक !

सर नृपेंद्रनाथांची क्रांतिकारकांच्या खटल्याविषयीची माहिती कितपत बरोबर आहे, हे आपण इतका वेळ पाहिले. आता या कायदेमंत्र्याची कायद्याविषयीची माहिती कितपत बरोबर आहे, याचा एक नमुना वाचकांना दाखविला पाहिजे. १९२८ सालापासून चितागांगच्या क्रांतिकारकांची कशी तयारी चालली होती, याचे वर्णन करून ते पुढे म्हणतात, 'The intensive preparation, as I said, lasted from the end of 1928 upto April 1930. Now Sir, what was the position ? The position was that the ordinance had expired and the people who were detained without trial, had come out. They were making extensive preparations.' पण 'I am going to tell you what is absolutely true' असे उद्गार काढणाऱ्या सर नृपेंद्रनाथांची वरील माहिती सपशेल चुकीची आहे. स्टेट-सेक्रेटरी म्हणतात, 'The Bengal Criminal Law Amendment Act of 1925 was due to expire on 21st March 1930. म्हणजे १९२४ च्या वटहुकुमाचे १९२५ च्या मार्चमध्ये कायद्यांत रूपांतर झालें होते व तो कायदा २१ मार्च १९३० पर्यंत अस्तित्वांत होता. आणि चितागांगच्या क्रांतिकारकांनी आपली जी कांही तयारी केली, ती सारी या कायद्याचे हत्यार घेऊन सज्ज असलेल्या पोलीसखात्याला न कळतच केली, तो कायदा रद्द झाल्यावर नव्हे.

## संख्या कशी फुगत गेली ?

या चितागांग प्रकरणाविषयीं बोलतांना सर नृपेंद्रनाथांनी आपल्या अपूर्व हातचलाखीचें जे प्रदर्शन केलें आहे तेंहि वाचकांच्या निदर्शनास आणलें पाहिजे.

असेंब्ली रिपोर्टाच्या ३१०० पानावर ते म्हणतात की, चितागांगच्या खटल्यामध्ये पुढे आलेल्या कागदपत्रांत क्रांतिकारकांच्या दोन Mobilisation lists सुद्धा होत्या; यांपैकी एका यादीत सुमारे १२५ नांवे होती व दुसऱ्या यादीत १२७ पेक्षा किंचित् जास्त नांवे होती पण पुढे थोड्याच वेळाने हा आंकडा २०० ते २५० पर्यंत चढला. ( असेंब्ली रिपोर्ट पान ३११२ ) आणि परवा सिमल्याच्या बैठकीत तर चितागांगच्या क्रांतिकारकांची सख्या कित्येक हजारांवर असल्याचे त्यांनी सांगितले आहे. हा सारा हातचलाखीचा खेळ पाहून कोणालाहि फाल्स्टाफने दोघा दरवडेखोरांचे बारा दरवडेखोर करून दाखविल्याची आठवण झाल्यावांचून राहणार नाही !

## भाषणाचा विपर्यास

आंकड्यांच्याप्रमाणे प्रतिपक्षियांच्या भाषणांच्या बाबतीतहि सर नृपेंद्र-नाथांनी अशीच हातचलाखी केली आहे. सर नृपेंद्रनाथांनी आपल्या भाषणांत स्थानबद्ध राजबंद्यांना 'टेररिस्ट' हा शब्द लावलेला पाहून, लाहिरी चौधरी उद्गारले 'They were not terrorists but detenus.' तेव्हा सर नृपेंद्रनाथांनी पुनः ठासून सांगितले, 'They were terrorists' त्याबरोबर सत्यमूर्ति उद्गारले 'How do you know ?' सर नृपेंद्रनाथांनी उत्तर दिले 'I know it from Mr. J. M Sengupta's description of them in his speech of the 8th March 1931. He referred to them as "violent prisoners." पण हा बॅ. सेनगुप्तांच्या भाषणाचा शुद्ध विप-र्यास आहे. गांधी—आयर्विन करारावर सह्या झाल्यावर लगेच ता. ८ मार्च १९३१ रोजी श्रीमती कमलादेवी चट्टोपाध्याय यांच्या अध्यक्षतेखाली बंगालविद्यार्थी-परिषद भरली होती. या परिषदेपुढे बोलतांना बॅ. सेनगुप्तांनी असें सांगितले की, आपल्या संघटनेच्या जोरावर आपण सत्याग्रही कैद्यांची सुटका घडवून आणली आहे, आपले सामर्थ्य आणखी वाढविल्यास आपल्याला क्रांतिकारक कैद्यांची देखील सुटका घडवन आणणे शक्य होईल. या वाक्यांतील क्रांतिकारक हा शब्द लाहोर, चितागांग इत्यादि प्रकरणांतील क्रांतिकारकांना अनुलक्षून होता, चौकशीविना अट-केत टाकलेल्या राजबंद्यांना अनुलक्षून नव्हता. या स्थानबद्ध राजबंद्यांविषयी बॅ. सेनगुप्तांनी असे उद्गार काढले होते की, या स्थानबद्ध राजबंद्यांपैकी बहुतेक सर्व

माझे मित्र आहेत व त्यांच्या मनामध्ये हिंसेचा लवलेशदेखील नाही हें मी खात्रीपूर्वक सांगूं शकतो. अशा रीतीने स्थानबद्ध राजबंद्यांविषयीं बॅ. सेनगुप्तांनी इतकी ग्वाही दिली असूनसुद्धा त्यांच्याच भाषणाच्या आधारावर सर नृपेंद्रनाथ सरकार त्या राजबंद्यांना क्रांतिकारक ठरवितात !

—केसरी ता. १ ऑक्टोबर, १९३५.



# बंगाल प्रांतांतील राजबंद्यांची करुण कहाणी

हिंदुस्थानांत सर्वत्र रविवार ता. ३ मार्च रोजी 'राजबंदीदिन' पाळला जाणार आहे. राजबंद्यांचे जे हाल होत असतील त्यांना वाचा फुटावी आणि हे दुखणे वेशीवर टांगून त्याचा परिहार करण्याचा यावच्छक्य प्रयत्न करावा असा यांतला उद्देश आहे. अशा वेळीं राजबंद्याची कशी दुरवस्था झाली आहे त्याचे चित्र जनतेसमोर यावे या हेतूने पुढील माहिती देण्यांत येत आहे.

गेल्या महिन्यांत रे. सी. एफ्. अँड्र्यूज यांनी लंडनच्या 'न्यू स्टेट्समन अँड नेशन' या वर्तमानपत्रांत बंगाल्यांतील संशयित राजबंद्यांच्या हालअपेष्टांविषयीं एक हृदयद्रावक पत्र प्रसिद्ध केले आहे. या पत्रांत त्यांनी म्हटले आहे—

"One of the deepest regrets of my life is that I did not take up this cause actively before and I would wish to redress that mistake now if I can possibly do so."

संशयित राजबंद्यांच्या हालअपेष्टांकडे दुर्लक्ष केल्याबद्दल अॅड्र्यूजसाहेबांना जर इतका पश्चात्ताप वाटत असेल तर आम्हा हिंदवासियांच्या अंतःकरणांना त्यांची उपेक्षा घडल्याबद्दल किती वेदना होत असतील, हे उघडच आहे.

या संशयित राजबंद्यांची संख्या किती आहे व ती अजून वाढत आहे कां कमी होत आहे याचीहि कोणाला बरोबर कल्पना नसते. कांही दिवसांपूर्वी बंगाल कौन्सिलाचे एक सभासद आनंदीमोहन पोद्दार यांच्या प्रश्नाला उत्तर देतांना बंगालच्या गृहमंत्र्यांनी सांगितलें कीं, आमच्या प्रांतांत स्वतः प्रांतिक सरकारच्या हुकुमाने ज्यांना चौकशीविना अटक केली आहे किंवा ज्यांच्या हालचालीवर नियंत्रणें घातलीं आहेत, असे राजबंदी २५२७ आहेत ! केवळ मॅजिस्ट्रेटांनी ज्यांना आपापल्या घरीं डांबून ठेविलें आहे अशा २१ वर्षांच्या आंतील तरुणांची संख्या सुमारें ५६० आहे आणि अशाच प्रकारच्या २१ वर्षांवरील तरुणांची संख्या आम्हांला माहीत नाही ! म्हणजे बंगाल प्रांतांत चौकशीविना नियंत्रित केलेल्या इसमांची संख्या आज

कमीत कमी सवातीन हजार आहे! या नियंत्रितांपैकी २०३ इसमांना बंगाल्यांतील तुरुंगांत, ९७४ जणांना बंगाल्यांतीलच तुरुंगवजा बराकींत, ४९७ इसमांना अजमीर प्रांतांतील देवळीच्या बराकीत व ६७८ इसमांना परक्या खेड्यांत डांबून ठेविले आहे.

## संशयित कां निर्दोषी ?

या प्रश्नाबरोबरच आनंदीमोहनबाबूंनी असा एक प्रश्न विचारावयास पाहिजे होता की, या नियंत्रितांत पुराव्याच्या अभावीं मॅजिस्ट्रेटांनीच आरोप न ठेवतां सोडून दिलेले, किंवा कोर्टांतील चौकशीत निर्दोषी म्हणून सुटलेले किंवा कायदेभंगाच्या चळवळीत झालेली शिक्षा भोगून सुटताच तुरुंगाच्या दाराशी फिरून अटक झालेले असे कितीजण आहेत? असा प्रश्न विचारून जर कोणी ही माहिती सरकाराकडून काढून घेतली किंवा वर्तमानपत्रांच्या फाइलीवरून स्वतःच संकलित केली तर या संशयित राजबंद्यांवर किती घोर अन्याय होत आहे, त्याची अंशतः तरी लोकांना कल्पना येईल. या राजबंद्यांना संशयित राजबंदी म्हणणे हा सुद्धां अन्यायच आहे. वास्तविक पाहतां ज्यांच्या मानीव अपराधांची कोर्टामार्फत आधींच चौकशी होऊन जे निर्दोषी म्हणून सुटले आहेत किंवा कायदेभंगाच्या चळवळीत झालेली शिक्षा भोगीत असतांना ज्यांना गुन्हा करण्याचे देखील स्वातंत्र्य नव्हतें, अशा निरपराधी बंद्यांना निर्दोषी राजबंदी म्हणणेंच बरोबर होईल. अशा निर्दोषी राजबंद्यांची तरी बिनशर्त सुटका व्हावयाला पाहिजे, याविषयीं देशांत दुमत होणे शक्य नाही.

आता ज्यांना कधीहि कोर्टापुढे न आणतां केवळ संशयावरून अटक करून ठेविले आहे, त्यांचा विचार करूं. आपल्या कायद्यांचा जर सरकाराला मान राखावयाचा असेल तर या संशयितांचीदेखील लगेच मुक्तता होणें जरूर आहे; कारण अड्रयूजसाहेबांनी आपल्या पत्रांत म्हटल्याप्रमाणें या संशयित राजबंद्यांपैकीं पुष्कळसे, आज पांच वर्षांहून अधिक दिवस चौकशीशिवाय तुरुंगवास भोगीत आहेत आणि खुद्द इंडियन पिनल कोडांत देखील प्रत्यक्ष अपराध्यांना पांच वर्षांहून अधिक शिक्षा फारच थोड्या गुन्ह्यांना सांगितली आहे. तेव्हा या संशयित राजबंद्यांना त्यांच्या अनुक्त व असिद्ध अपराधासाठी आजपर्यंत भोगावी लागलेली

शिक्षा गुन्हेगार ठरलेल्याला होणाऱ्या शिक्षेहूनहि अधिक आहे असेंच कोणाहि समंजस माणसाला वाटेल.

## न्यायतत्त्वांना हरताळ

वास्तविक पाहता कोणालाहि चौकशीशिवाय अटकेंत ठेवणें, हाच आधी शुद्ध अन्याय होय, या अन्यायाला हायकोर्टाची संमति मिळविण्याचा बंगाल सरकारने प्रयत्न केला होता पण तो फसला. बंगाल सरकारचा पहिला विचार असा होता की, या संशयित राजबंद्याविषयीचे कागदपत्र कलकत्ता हायकोर्टाच्या दोन न्यायाधिशांपुढे ठेवून त्यांची या संशयितांना अडकवून ठेवण्याला समति घ्यावी.

'The High Court refused to have any connection in this matter, because they considered it insulting to pass judgments, merely on untested evidence.' हायकोर्टाला जी कृति अन्यायाची वाटते, तिचा प्रतिकार करण्याला कोणतेहि कायदेशीर साधन हायकोर्टाच्या हाती नसावें, हें एक देशाचे दुर्दैवच होय !

आतां सर्व न्यायतत्त्वांना गुंडाळून ठेवून बंगाल सरकारनें हे जे अन्यायी अधिकार आपल्या हाती घेतले आहेत, त्यांची अंमलबजावणी किती कठोर रीतीनें होते ते पहा. या संशयितांसंबंधी पोलिसांनी जमा केलेली सारी माहिती सेशन्सकोर्टाचे अधिकार असलेल्या दोघां न्यायाधिशांपुढे ठेवितात. या न्यायाधिशांपुढे आरोपींना केव्हांहि आणत नाहीत; आपल्याविरुद्ध नक्की आरोप काय आहे, हे त्यांना कधीहि सांगत नाहीत. आरोपींना या नामधारी न्यायासनापुढे कोणताहि पुरावा देता येत नाही किंवा वकील देता येत नाही. अशा परिस्थितीत पोलिसांनी आपल्यापुढे आणलेला एकतर्फी पुरावा पाहून संशयितांना डांबून ठेवण्याला संमति देण्याखेरीज त्या न्यायाधिशांच्या हातून दुसरें काय घडणार ?

अशामुळे बंगाल्यांत तर केवळ पोलिसांचे राज्य प्रस्थापित झाले आहे. एखाद्या निरपराधी इसमावर एकदा पोलिसांची वक्रदृष्टि झाली की त्या हतभागी इसमाचें जन्माचें मातेरें झाले, असे समजावें. मग तो निरपराधी

इसम कितीहि प्रसिद्ध असो किंवा कितीहि थोर लोकांनी त्याच्या निरपराधीपणाबद्दल ग्वाही दिलेली असो. उदाहरणार्थ, कलकत्त्याचे एक प्रसिद्ध पुढारी बॅ. शरच्चंद्र बोस यांना बंगाल-सरकारने १८१८ च्या तिसऱ्या रेग्युलेशनखाली आज तीन वर्षे अटकेत ठेवले आहे. ही अटक झाली त्या वेळी बंगाल सरकारचे तेव्हांचे ॲडव्होकेट-जनरल सर नृपेंद्रनाथ सरकार यांनी सरकारला आपला असा अभिप्राय दिला होता म्हणतात की, बॅ. शरच्चद्र बोस यांचा क्रांतिकारकांच्या कटाशी कसलाहि संबंध असल्याचे पोलिसांच्या पुराव्यावरून सिद्ध होत नाही. तरीदेखील बंगाल सरकारने शरद्‌बाबूंना अटक केलीच; आणि आज सर नृपेंद्रनाथ सरकार हिंदुस्थानसरकारचे लॉमेंबर असूनहि त्यांना आपल्या निरपराधी मित्राची सुटका घडवून आणतां येत नाही.

## वीस वर्षे तुरुंगवास

बॅ. शरच्चंद्र बोससारख्या सुप्रसिद्ध पुढाऱ्यांची जर ही दशा तर त्यांच्या मानाने अप्रसिद्ध असलेल्या कार्यकर्त्यांची काय अवस्था होत असेल याची वाचकांना कल्पना करतां येईलच. तरी पण त्यांच्या माहितीसाठी एखाद दुसरे उदाहरण सांगणे जरूर आहे. बंगाल प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे एक प्रसिद्ध कार्यकर्ते श्री. पूर्णचंद्र दास यांचे उदाहरण नमुना म्हणून सांगण्याजोगे आहे. या पूर्णचंद्रबाबूंना १९११ साली पोलिसांनी प्रथम हत्यारांच्या कायद्याखाली अटक केली. दोन वर्षे त्यांजवर खटला चालवूनहि पोलिसांच्या दुर्दैवाने पूर्णचंद्रबाबू त्यांतून निर्दोषी ठरून सुटून आले. त्यानंतर लवकरच पोलिसांनी एका राजकीय दरवड्याच्या खटल्यांतील आरोपी म्हणून पूर्णचंद्रबाबूंना फिरून अटक केली. हाहि खटला दोन वर्षे चालून श्री. पूर्णचंद्र दास व त्यांच्याबरोबरीचे सारे आरोपी दोषमुक्त होऊन सुटले. तोपर्यंत महायुद्धाला सुरुवात झाली होती व डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्ट अंमलांत आला होता. त्यामुळे पोलिसांनी पूर्णचंद्रबाबूंवर नवीन खटला भरण्याचा खटाटोप न करता त्यांना डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टाखाली बिनमुदत कैदेंत ठेवले. या अटकेंतून त्यांची १९२० साली सुटका झाली. त्यानंतर १९२१ सालीं असहकारितेच्या दिवसांत त्यांना पहिल्या प्रथम कायदेशीर शिक्षा झाली. या शिक्षेंतून ते १९२४ च्या प्रारंभीच सुटले. पण जणुं काय त्यांना मोकळे पाहण्याची

पोलिसांना संवयच नसल्याने दोनतीन महिन्यांतच पोलिसांनी त्यांना १८१८ च्या तिसऱ्या रेग्युलेशनखाली अटक केली. या अटकेतून त्यांची १९२८ साली इतर राजबंद्यांबरोबर मुक्तता झाली. पण पुढे दोन वर्षांनी पुनः देशांतील राजकीय वातावरण बिघडतांच त्यांच्यावर खटले सुरू होऊन १९३२ च्या प्रारंभापासून आतांपर्यंत ते १८१८ च्या तिसऱ्या रेग्युलेशनखाली अटकेंत आहेत. म्हणजे १९११ सालापासून आतापर्यंतच्या २४ वर्षांपैकी त्यांची २० वर्षें तरी पोलिसांच्या वक्रदृष्टीमुळे बिनमुदत तुरुंगवासांत गेली आहेत!

अशाच तऱ्हेचे एका प्रोफेसरांचे उदाहरण अँड्यूजसाहेबांनी आपल्या पत्रांत दिले आहे. प्रोफेसर ज्योतिषचंद्र घोष यांना प्रथम डिफेन्स ऑफ इंडिया अॅक्टाखालीं अटक झाली व तेव्हापासून पूर्णचंद्रबाबूप्रमाणे त्यांच्यामागे पोलिसांचा ससेमिरा लागलेला असून तेहि सध्या रेग्युलेशनखाली अटकेत आहेत. विशेष दुर्दैवाची गोष्ट ही की, अटकेतील एकांतवासांत प्रोफेसर मजकुरांना एकवार वेडाहि लागलें होतें आणि सध्या त्यांच्या कुटुंबाची अन्नान्नदशा झाली आहे! अशा तऱ्हेची उदाहरणें कोठवर सांगावीत? अँड्यूजसाहेब आपल्या पत्रांत म्हणतात, 'Numerous instances of suicide, insanity, infection of tuberculosis have come to light and the pitiable tales of neglect, torture and cruelty are many'

## प्रकृतीविषयीं बेपर्वाई

आपल्या ताब्यांतील कैद्यांच्या प्रकृतीविषयी अधिकारी लोक किती बेपर्वा असतात याचे एक उदाहरण येथे सांगितले पाहिजे. बॅ. यतींद्रमोहन सेनगुप्त यांना 'हायब्लड प्रेशर' व 'हार्टडिसीज' हे विकार झाले होते, यासाठी त्यांना त्यांच्या डॉक्टरांनी समुद्रसपाटीपासून उंच अशा ठिकाणी जाण्याची मनाई केली होती. तरीदेखील अटक होताच त्यांना सरकारी अधिकाऱ्यांनी दार्जिलिंग येथे नेऊन ठेविले. पुढे यतींद्रमोहनबाबूंनी तक्रार केल्यानंतर पुष्कळसा पत्रव्यवहार होऊन मग त्यांना दार्जिलिंगहून हलवून जलपैगुरी येथे नेण्यांत आलें. सुभाषबाबूंच्या आजाराची कथा तर प्रसिद्धच आहे.

असो, असले 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम्' अधिकार बंगालच्या पोलिसखात्याला लाभले असल्याने त्या खात्यांत लांचलुचपतीचा अगदी बुजबुजाट झाला आहे.

अँड्र्यूजसाहेब म्हणतात, 'The very system of detention without trial is rotten to the core. The innocent suffer with the guilty. The police force has every inducement to bribery and corruption.'

तुरुंगवासामध्ये या राजबंद्यांच्या प्रकृतीवर इतका वाईट परिणाम होतो की, थोड्याच वर्षांत त्यांचे प्रकृतिस्वास्थ पूर्णपणे नष्ट होऊन ते कायमचे दुबळे आणि रोगी बनून जातात. श्री. सत्येंद्रचंद्र मित्र आपल्या असेंब्लीतील एका भाषणांत म्हणाले की, राजबंद्यांचे प्रत्यक्ष हाल न केले तरी तुरुंगांतील निस्सत्त्व अन्नाचा, वैचित्र्यशून्य जीवनाचा आणि अखंड घोर चिंतेचा परिणाम विषप्रयोगाइतका भयंकर होतो !

असो, या राजबंद्यांना तुरुंगांत कोंडून ठेविले असल्याने त्यांचे हाल रोज उठून लोकांना दिसत तरी नाहीत; जेव्हा एखादे प्रायोपवेशनाचे किंवा आत्महत्येचे उदाहरण घडते, तेव्हाच त्यांच्या दुरवस्थेकडे लोकांचे लक्ष जाते. पण त्यांच्या कुटुंबियांचे नित्य दिसत असलेले हाल उघड्या डोळ्यांनी बघणे अशक्य आहे. पति जिवंत असताना वैधव्याच्या वेदना अनुभवणाऱ्या राजबंद्यांच्या तरुण स्त्रिया, पुत्रवियोगाने वेड लागलेल्या त्यांच्या माता, किंवा पुत्रदर्शनाची उत्कंठा लागून राहिलले त्यांचे मरणोन्मुख वृद्ध पिते या सर्वांच्या वेदनांचा हाहाःकार कानी आला म्हणजे कोणाचे हृदय पिळवटून जाणार नाही ? या साऱ्या दुर्दैवी पिता-माता-पत्नींना आज एकच अंधुक आशेचा किरण दिसत आहे. कदाचित् बादशहांच्या जुबिलीच्या प्रसंगी आपल्या निर्दोषी पुत्रांची आणि पतींची सुटका होईल. या एकाच आशेवर जगणाऱ्या या हतभागी आत्मांच्या अपेक्षा सफळ होणार आहेत कां तेवीस वर्षांपूर्वी अशाच एका प्रसंगी, आपल्या मंडालेंतील पतीच्या सुटकेविषयी निराश झालेल्या एका भग्नहृदय गृहिणीचे प्राण तीव्र निराशेमुळे अखेरीस तिला टाकून गेले तशीच निराशा यांच्याहि वांट्यास येणार आहे !

— केसरी, ता. १ मार्च, १९३५.



# सुभाषबाबू यांच्यावरील आरोपांना प्रत्युत्तर

मार्च महिन्याच्या २३ व्या तारखेला दिल्लीच्या लेजिस्लेटिव्ह असेब्लीत श्री. नीलकंठ दास यांनी सुभाषबाबूंना हिंदुस्थानांत परत येण्याला सरकारने मनाई केल्याबद्दल निषेध प्रदर्शित करण्यासाठी तहकुबीची सूचना आणली होती. या सूचनेवर बोलतांना होमसेक्रेटरी मि. हॅलेट, लॉमेंबर सर नृपेंद्रनाथ सरकार आणि होममेंबर सर हेन्री क्रेक या सर्वांनी सुभाषबाबूंवर अनेक आरोप केले आहेत. त्या सर्व आरोपांचा या लेखांत क्रमाने समाचार घ्यावयाचा आहे.

सुभाषबाबूंवरील सरबत्तीला सुरुवात करतांनाच होम सेक्रेटरी मि. हॅलेट यांनी म्हटले आहे, 'Mr. Bose resigned from the I. C. S. to join the non-co-operation movement and became a politician not merely of the Left Wing but of the revolutionary Left Wing.' वास्तविक पाहतां आय्. सी. एस्. मधील नोकरीचा राजीनामा दिल्यावर सुभाषबाबू हे बॅ. चित्तरंजन दास यांना मिळाले आणि त्यांच्या अंतापर्यंत ते त्यांचेच अनुयायी होते. बॅ. दास यांच्या स्वराज्य पक्षाला कॉंग्रेसची Right Wing हीच संज्ञा मिळाली होती, ही गोष्ट कोणाहि हिंदी माणसाला सांगण्याची जरूरी नाही. असे असून सुद्धां हॅलेट साहेबांनी सुभाषबाबूंवर असले आरोप करावेत, हें त्यांच्या पूर्वग्रहदूषित मनोवृत्तीचेच द्योतक आहे.

### दास व सुभाष

बॅ. दास जिवंत असेपर्यंत सुभाषबाबू हे देशबंधूंच्याच तंत्राने कार्य करीत असत. एकदा तर महापुराने निराश्रित झालेल्या लोकांच्या साहाय्याला ते गेले असतां बॅ. दासांनी आपल्या राजकीय कामाकरिता त्यांना ताबडतोब परत बोलावून घेतलें. पुढे १९२४ साली बॅ. दास कलकत्ता-कॉर्पोरेशनचे मेयर असतां त्यांनी, स्वदेशासाठी ज्यांना यातना भोगाव्या लागल्या आहेत, अशा लोकांना कलकत्ता-कॉर्पोरेशनमध्ये नोकऱ्या द्यावयाचें ठरविलें व तशा अर्थाची जाहिरात

कॉर्पोरेशनचे चीफ एक्झिक्यूटिव्ह ऑफिसर या नात्याने सुभाषबाबूंनी दासमहाशयांच्या सांगण्यावरून दिली. कलकत्ता-कॉर्पोरेशनच्या सरकारविरोधी कृत्यांच्या यादींत सुभाषबाबूंच्या या जाहिरातीला भारतमंत्र्यांनी प्रमुखत्व दिले आहे.

पुढे मि. हॅलेट यांनी असेंब्लीत सांगितले की, Apart from his public activities Mr. Bose was personally in touch with the terrorist movement and was cognisant of many of its plots for the assassination of Government servants. पण हें सारें केवळ निराधार बरळणे आहे. कारण १९२४सालीं मुख्यतः कलकत्त्याचे पोलिस कमिशनर मि. टेगार्ट यांनाच मारण्याचे प्रयत्न झाले व त्या प्रयत्नांशी सुभाषबाबूंचा संबंध असल्याचा यत्किंचित् देखील संशय सरकाराला आला असता तर त्याने कलकत्ता-कॉर्पोरेशनच्या चीफ एक्झिक्यूटिव्ह ऑफिसरच्या जागेवर सुभाषबाबूंची नेमणूक होऊंच दिली नसती. मि. हॅलेट यांनी आणखी असेंहि सांगितलें आहे की, Mr. Subhas Bose was arrested under the Bengal Regulation in 1924. Mr. Bose's record was examined with great care by two judges, who held that there was reasonable ground for the belief that Mr. Bose was a member of a revolutionary conspiracy and if allowed freedom would be a danger to the state, more particularly because of his public position and outstanding organising ability."

हा न्यायाधिशांच्या चौकशीचा फार्स कसा करतात, याची सामान्य लोकांना कांहीहि कल्पना नाही. यासाठी त्याचे श्री. सत्येंद्रचंद्र मित्र यांनी लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्ये केलेले आविष्करण लोकांच्या नजरेला आणणें जरूर आहे. ते म्हणतात,

"As *regards the* examination of the case by two judges I have forgotten to explain it in detail. What happened in my own case was this. No definite charges are framed. The detenu is merely informed 'you are an associate of so and so, you are an enemy of British Government." In such vague terms are the charges framed against the detenu. I am speak-

ing from my own personal experience. I merely wanted to be present before the Judge to explain any thing that was considered suspicious by the police, but this humble demand was not granted. I do not even now know what were the specific allegations. If a detenu asks to be allowed to cite any witnesses that is not allowed and even if he asks to be permitted to appear before the judges to corroborate his statement and to try and convince the judges of his innocence or even to know what are the definite charges against him, even these facilities are not allowed to the detenu. The Honourable Members might be under the impression that the cases against the detenus go before two judges who are of the status of High Court Judges and that there would be some sort of trial though no lawyers were present. To disabuse their minds of this impression, I will submit in detail that this so-called examination by High Court Judges is a mere mockery and as the High Court of Calcutta decided it is insulting to ask any of the judges to pass a judgment on untested evidence."

## जमशेटपूरचा संप व सुभाष

हॅलेटसाहेब पुढे सांगतात की, पहिल्या अटकेंतून सुटल्यावर सुभाषबाबूंनी देशांतील सर्वांत अधिक ज्वालाग्राही वर्ग जे मजूर आणि विद्यार्थी त्यांच्यामधून कम्यानिझमचा प्रसार करण्याला सुरुवात केली. हा आरोप वाचून तर कोणालाहि हसूं आल्यावांचून राहणार नाही. कारण हिंदुस्थानांतील सगळे सोशालिस्ट व कम्यूनिस्ट सुभाषबाबूंना फॅसिस्ट समजतात, ही गोष्ट सर्वप्रसिद्धच आहे. सुभाषबाबूंनी १९२८ सालीं जमशेटपूर येथील मजुरांच्या संपांत भाग घेतला याबद्दलहि हॅलेटसाहेबांनी त्यांना दोष दिला आहे, हे पाहून या संपाची वास्तविक हकीकत माहीत असणाऱ्यांना नवलच वाटेल. कारण या संपाचा पुढाकार घेऊन सुभाषबाबूंनी शक्य तितक्या लौकर दोन्ही पक्षांला हितावह होईल, अशी तडजोड घडवून आणली आणि ही तडजोड बऱ्याच मजुरांना मान्य न झाल्या-

मुळे त्यांनी आपली वेगळी ट्रेडयूनियन स्थापून फिरून एकवार भांडणाला सुरुवात केली ! सुभाषबाबूंच्या जमशेटपूर येथील कामगिरीचा संक्षिप्त इतिहास असा असून हॅलेटसाहेबांनी तो एक सुभाषबाबूंचा क्रांतिकारक गुन्हाच मानावा हे नोकरशाहीला अनुरूपच आहे !

लाहोर कॉंग्रेसमध्ये सुभाषबाबूंनी पॅरॅलल गव्हर्मेंट स्थापन करण्याचा जो ठराव आणला होता, त्यावरहि हॅलेट साहेबांनी आक्षेप घेतला आहे. सुभाषबाबू हे पक्के क्रांतिकारक आहेत, असे त्या ठरावावरून निश्चित होते, असे हॅलेट साहेबांचे म्हणणे आहे. पण असे जर तेव्हा सरकारला वाटले असतें तर सरकारने त्यांच्यावर पीनलकोडाच्या १२१ व्या कलमाखालीं खटलाच भरला असता. एक लहानसे कवितांचे चोपडे छापल्याबद्दल थोरल्या सावरकरांना अंदमानाची हवा खायला पाठविणाऱ्या सरकारला सुभाषबाबूवर उघड खटला भरण्याची शंका कां वाटावी, हेच आम्हांला समजत नाही.

हॅलेटसाहेब पुढे म्हणतात 'When Mr. Gandhi held conversations with Government, Mr. Bose tried to persuade Mr. Gandhi to include prisoners accused of violence in the amnesty.' पण यांत सुभाषबाबूंचा काय अपराध आहे, हेच आम्हांला समजत नाही. देशांत शांततेचे वातावरण उत्पन्न करावयाचे असल्यास क्रांतिकारक कैद्यांना मुक्त करण्याचा धडा १९१९ सालीं स्वतः बादशहांनी घालून दिला आहे. तोच धडा १९३१ सालीं व्हाइसरॉयांनी गिरवावा अशी सुभाषबाबूंची इच्छा होती. ती इच्छा जर सफळ झाली असती तर गेल्या पांच वर्षांतील अनेक अनिष्ट प्रसंग टळले असते. शिवाय दुसरी गोष्ट अशी की, १९३१ साली व्हाइसरायांनी क्रांतिकारक कैद्यांवर दया दाखवावी, अशी इच्छा तेव्हाच्या सरकारजमा असेंब्लीनेहि प्रकट केली होती आणि भगतसिंगराजगुरूंच्या फांशीनंतर बहुतेक लोकनियुक्त सभासदांनी असेंब्लींतून उठून जाऊन अध्यक्षांना कोरमच्या अभावीं त्या दिवशीची बैठक तहकूब करणे भाग पाडलें होतें. पण तेवढ्यासाठी सरकारने त्या साऱ्या सभासदांवर दांत धरला नाही. मग एकट्या सुभाषबाबूंवरच दांत धरण्यांत काय अर्थ आहे !

हॅलेटसाहेबांनी असेंहि भासविण्याचा प्रयत्न केला आहे की, १९३२ च्या प्रारंभीं सुभाषबाबूंना जी अटक झाली, ती कायदेभंगाच्या चळवळीसाठीं झाली नसून क्रांतिकारक चळवळीत त्यांचें अंग होतें म्हणून झाली. पण १९३२ साली सुभाषबाबूंना कशाकरिता अटक झाली, ही गोष्ट स्वतः बंगाल सरकारनेच आपल्या वार्षिक अहवालांतून प्रसिद्ध केली आहे. कायदेभंगाच्या चळवळीविरुद्ध बंगाल सरकारने योजलेल्या उपायांची माहिती सांगताना वरील अहवालांत खालील विधान आलेले आहे. At the beginning of 1932 a number of prominent Congressmen in the province had been arrested and detained as State prisoners under Regulation III of 1818. Among them were Mr. J. M. Sengupta, Mr. Subhas Bose and Mr. Sarat Bose.

सरतेशेवटी १२-९-१९३५ रोजी सर नृपेंद्रनाथ सरकार यांनी असेब्लींत वाचून दाखविलेल्या श्री. कृष्णदास यांच्या पत्राचा उल्लेख करून मि. हॅलेट यांनी असे सांगितले की, ते पत्र वाचतांना सर नृपेंद्रनाथांनी दोन व्यक्तींची नांवे उघड न करतां त्यांचा केवळ मि. ए. व मि. बी. असा उल्लेख केला होता, त्यांपैकी मि. ए. हे खुद्द सुभाषबाबूच आहेत; इतकेंच नव्हे तर त्या पत्राच्या आधाराने असेंहि म्हणतां येते की, सुभाषबाबू हे युगांतरसमिति या नामांकित क्रांतिकारक संस्थेचे प्रमुख आहेत. श्री. कृष्णदास यांच्या पत्रावरून कोणकोणती अनुमाने निघतात, हे पुढे पाहूंच. त्याच्या आधी दोन वर्षांपूर्वी सरकारी अधिकाऱ्यांना सुभाषबाबू हे क्रांतिकारक वाटत नव्हते असे समजण्याला आधार आहे. १९३४ च्या ऑगस्ट-मध्ये दिल्ली येथील 'नॅशनल कॉल' या मवाळ पत्रांत सर नृपेंद्रनाथांविषयी पुढील माहिती आली आहे.

" Recently Sir Nripen came to know that a prominent Congressman, who had been ailing in Europe was badly in need of money to carry on his treatment. People seemed reluctant to raise a fund for the leader openly. Sir Nripen, I am told, courageously approached the Governor ( of Bengal ) and after securing his consent initiated the raising of a fund. He was thus able to send more than Rs. 13000 to the patriot

in exile, his own being the most substantial contribution.

**सुभाषचंद्रास मदत कोणी केली ?**

हे युरोपांत दुखण्याने पडलेले देशभक्त स्वतः सुभाषबाबूच होत, एवढेच येथे सांगणे जरूर आहे. सुभाषबाबू हे केवळ कॉंग्रेसचे पुढारी नसून ते युगांतर समितीचे प्रमुख आहेत, असे आता अट्टाहासाने प्रतिपादन करणाऱ्याच्या टीकेला कांहीं तरी आळा बसावा, ह्याकरिताच या साहाय्याचा असा उल्लेख करणे अवश्य आहे. सामान्यतः ब्रिटिश सरकार खऱ्या क्रांतिकारकावर केव्हाहि दया दाखवीत नाही. आज देखील जगत्प्रसिद्ध क्रांतिकारक श्री. मानवेंद्रनाथ रॉय हे संयुक्त प्रांतांतील तुरुगांत हृदयाच्या विकाराने आजारी आहेत. त्याचप्रमाणे काकोरी कटाच्या खटल्यांतील श्री. निगम हे आज तीन वर्षे क्षयाच्या नावडीत सांपडून मृत्युपंथाला लागले आहेत. तरी देखील त्या दोघांना सोडून देण्याची सरकारला बुद्धि होत नाही. फार काय, पण आज आयर्लंडचे लोक सर रॉजर केसमेंट या इंग्रजांनी फासावर चढविलेल्या आयरिश राष्ट्रभक्ताचे प्रेत इंग्लंड-जवळ परत मागत आहेत. पण ते प्रेतसुद्धा इंग्रजांना परत देववत नाही. क्रांति कारकांच्या बाबतीत इतक्या निष्ठुरपणाने वागणारें सरकार, सुभाषबाबू जर खरो-खरीच क्रांतिकारक असते तर त्यांना आजाराच्या निमित्ताने तुरुंगांतून सोडायला देखील तयार झाले नसते. मग गव्हर्नरसाहेबांच्या संमतीने त्यांच्या साहाय्यासाठी फंड गोळा करणे तर दूरच राहिले ! पण ज्याअर्थी १९३४ साली सुभाषबाबूंच्या सहायासाठी फंड जमविण्याला बंगालच्या गव्हर्नरसाहेबांनी आपली संमति दिली व त्यांच्या ॲडव्होकेट जनरलने १२००० हजारांवर फंड सुभाषबाबूंसाठी जमविला त्याअर्थी निदान १९३४ साली तरी सुभाषबाबू हे क्रांतिकारक पक्षाचे पुढारी नाहीत अशीच बंगालच्या गव्हर्नरसाहेबांची व सर नृपेंद्रनाथ सरकार या उभयतांचीहि समजूत असली पाहिजे, मग ही समजूत आतांच एकदम कशी बदलली ?

— केसरी ता. ७ एप्रिल, १९३६.

---

## लेखांक दुसरा

आता असेंब्लीत इतक्या वेळा उल्लेख झालेल्या श्री. कृष्णदास यांच्या पत्राची थोडी चिकित्सा केली पाहिजे. श्री. गांधींनी कॉंग्रेसमध्ये अहिंसेचे तत्त्व

घुसडून दिल्यापासून त्यांच्या अनुयायांना आपल्या प्रतिपक्षियांवर अत्याचारीपणाचा आरोप करण्याची सरकारी संवय जडली आहे आणि खुद्द सरकारी अधिकाऱ्यांना शोभेल, असा क्रांतिकारकांचा द्वेष त्यांनी आपल्या अंगी भिनवून घेतला आहे. याचा परिणाम असा झाला आहे की क्रांतिकारक चळवळीचे माहेरघर जो बंगाल प्रांत त्या सर्व प्रांताविषयीच त्यांच्या मनांत अढी बसून गेली आहे. यामुळेच बंगाल प्रांतांतील दडपशाहीकडे गांधी-आयर्विन कराराच्या दिवसांतसुद्धा गांधी-भक्तांनी कांही लक्ष दिले नाही. गांधीभक्तांच्या या साऱ्या भावना श्री. कृष्णदास यांच्या पत्रांत उत्कृष्ट रीतीने प्रकट झाल्या आहेत. श्री. कृष्णदास यांच्या पूर्वी प्रसिद्ध केलेल्या पत्रांतील मि. ए. हे सुभाषबाबूच होत, असे असेम्ब्लींत हॅलेटसाहेबांनी सांगितल्यानंतर या कृष्णदासांनी असा खुलासा केला कीं कलकत्ता आणि लाहोर येथील कॉंग्रेसमध्ये सुभाषबाबूंनी गांधींना विरोध केल्यामुळे माझे मन त्यांच्याविषयी दूषित झाले होते, म्हणून मी त्यांच्याविषयी लोकांनी पसरविलेल्या गटारगप्पावर विश्वास ठेऊन गांधीजींना तसे पत्र लिहिले ! पण हा खुलासा अप्रामाणिकपणाचा आहे. कारण सुभाषबाबूंनी एक गांधींना विरोध केला होता. पण त्या पत्रांतील मि. बी. जे बॅ. यतींद्रमोहन सेनगुप्त त्यांनी तर कधीं गांधींना विरोध केला नव्हता ना ? तरी देखील ते अनुशीलन समितीचे हस्तक असल्याचा आरोप त्यांच्यावर या कृष्णदासांनी केलाच आहे. याचे कारण त्यांनी स्वतःच सांगितले आहे.

· This much I know that judged from the standpoint of non-violence there is not much to choose between Mr. A and Mr. B. या पत्रांत श्री. कृष्णदास पुढे म्हणतात 'Bengal politics is nothing but a struggle for power ( whether in the B. P. C. C. or in the Calcutta Corporation ) between Yugantar group and the Anushilan group. Mr. A. and Mr. B. are pawns in the game.'

ही विधानें किती बेजबाबदारपणाची आहेत, हे १९२५ पासूनच्या बंगाली राजकारणाची माहिती असणाऱ्यांना ताबडतोब कळून येईल. १९२५ साली बॅ. चित्तरंजन दास परलोकवासी झाल्यापासून १९३१ सालापर्यंत बंगाल प्रांतिक कॉंग्रेस कमिटी व कलकत्ता कॉर्पोरेशन यांतून सभाषबाब व बॅ. सेनगप्त यांच्याखेरीज

श्री. तुळशीचरण गोस्वामी, श्री. नलिनीरंजन सरकार, डॉ. बिधनचंद्र रॉय, श्री. शरच्चद्र बसु वगैरे धनाढ्य लोकांचे प्राबल्य होते. या सर्वांना अनुशीलन किंवा युगांतर या समित्यांचे हस्तक बनविणे, किती हास्यास्पद आहे हे भोळे गांधी-भक्त व धूर्त सरकारी अधिकारी याशिवाय इतर सर्वांना सकृद्दर्शनीच कळून येईल. असो, आपण आपले पत्र अगदी बेजबाबदारपणे लिहिले असून त्यातील सुभाषबाबूंसंबंधीच्या विधानांना कि वदन्ति व जनश्रुति याखेरीज इतर कशाचाहि आधार नव्हता, असे स्वतः कृष्णदासांनीच आता जाहीर रीतीने कबूल केले आहे. पण सर नृपेंद्रनाथ सरकार म्हणतात,

"The authorities of Bengal are in no way indebted to Mr. Krishna Das for his statements They had come to the same conclusion from other sources."

पण सर नृपेंद्रनाथाच्या या अहंकारांत काही अर्थ नाही, हे पुढील हकी-कतीवरून कळून येईल. कृष्णदासांच्या पत्रांत श्री बिपिन गांगुली यांचा एक क्रांतिकारक पुढारी म्हणून उल्लेख आला आहे. श्री. बिपिन गांगुली हे तेव्हा कलकत्ताकॉर्पोरेशनचे एक सभासद होते. १९३१ साली श्री. कृष्णदासांचे पत्र मिळाल्यावर काही दिवसांनी सरकारने त्यांच्यावर वॉरंट काढले. दंडपशाहीचे होमकुंड पेटले म्हणजे त्यात सुक्याबरोबर ओलेहि जळून जाते, हा न्याय सेनापति बापटांप्रमाणेच श्री. बिपिन गांगुली यांनाहि माहीत असल्याने ते त्यावेळी फरारी झाले. त्यांना पकडण्यासाठी सरकारने ५०० रुपयांचे बक्षीसहि जाहीर केले. या बक्षिसाच्या आशेने जादा परिश्रम करून पोलिसांनी त्यांना दोन वर्षांनंतर अटक केली. पण इतक्या मेहनतीने पकडलेल्या पुढाऱ्यावर कोर्टांत आरोप ठेवण्याजोगा कांहीहि पुरावा सरकारजवळ नसल्याने त्यांनी खटला न भरतांच बिपिनबाबूंची दिवळीच्या वाळवटांतील तुरुंगांत रवा-नगी केली ! यावरून श्री. कृष्णदासांच्या पत्राव्यतिरिक्त सरकारजवळ कितपत पुरावा होता हे एखाद्या आंधळयालाहि दिसून येण्यास हरकत नाही !

श्री. कृष्णदासांनी सुभाषबाबूंना युगांतर समितीचे हस्तक बनविले आहे, तर हॅलेटसाहेबांनी त्यांना त्या समितीचे प्रमुखच ठरविलें आहे.

'Mr. Subhas Bose was the head of that party.' असा त्याचा सुभाषबाबूंवर आरोप आहे. पण हा आरोप सर्वस्वी निराधार आहे. कारण चितागांग येथील क्रांतिकारकांचे त्या वेळी फरारी असलेले एक पुढारी श्री. अनंतसिंग १९३० च्या जून महिन्यांत कलकत्त्यांत होते, तेव्हा त्यांच्या प्रेरणेने कलकत्त्याच्या युगांतर समितीच्या पुढाऱ्यांनी आपला क्रांतिकारक कार्यक्रम आंखला व तेव्हा तर सुभाषबाबू सत्याग्रहामुळे तुरुंगांत होते. त्याचप्रमाणे युगांतर समितीचा कोणताहि अत्याचार सुभाषबाबूंच्या आज्ञेवरून झाला नाही, ही गोष्ट सर जेम्स क्रेरार यांच्या पुढील वाक्यावरूनच सिद्ध होण्याजोगी आहे ते म्हणतात--

" We also have information which we believe to be reliable that specific instructions were issued from such places of detention." या वाक्यावरून असे दिसते की अत्याचाराच्या आज्ञा या संशयित राजबंद्यांच्या कँपांतून येतात अशी गृहमंत्र्याची समजूत होती. पण सुभाषबाबूंना अटक करून दुसरीकडेच ठेवले होते. ते या राजबंद्यांच्या कँपांत नव्हतेच. मग सुभाषबाबूंचा त्यांच्याशी संबंध कसा जोडण्यांत येतो ? मिदनापूरचे एक माजी कलेक्टर मि. फ्रेंच यांनी ता. १-२-१९३२ रोजी असेंब्लीत भाषण करतांना सुभाषबाबूंचा एका खुनाशी संबंध जोडण्याचा गर्ह्य प्रयत्न केला होता. ते म्हणतात—
'On December 6th at the Provincial Conference in Berhampore there were appeals made that the people of Bengal should prepare for the coming fight. Mr. Subhas Bose called on the women to be ready as perhaps there would not be enough men. That was on December 8th. On December 14th, Mr. Stevens in Comilla was murdered by two women.' स्टीव्हन्सच्या खुनाच्या खटल्यात सुभाषबाबूंचे कोठेहि नांव आले नसतांना वरील भाषणाच्या आधारावर त्यांचा त्या प्रकरणाशी संबंध जोडणे अगदी गर्हणीय आहे. पण असल्याच पुराव्याच्या आधारावर आज सुभाषबाबूंना स्वदेशांत पाऊल टाकण्याला मनाई होत आहे !

इतका वेळपर्यंत होम-सेक्रेटरीच्या सुभाषपुराणाची चिकित्सा केली; आता यांपुढे होम-मेंबर सर हेन्री क्रेक यांच्या भाषणाचा परामर्ष घेणे आवश्यक आहे. सर

हेन्रीचे समग्र भाषण अजून उपलब्ध नाही. तरी देखील त्यांच्या भाषणांतील एकदोन वाक्यांच्या शितांवरून एकंदर भाताची परीक्षा होण्याजोगी आहे. सर हेन्री म्हणतात, 'Mr. Bose promoted another revolutionary orgnisation in 1932 namely Samyavadi Sangha. The Samyavadi Sangha later on converted its name into Hindustan Socialist Republican Army.' आता हिंदुस्थान सोशालिस्ट रिपब्लिकन आर्मी हे नांव भगतसिंगांच्या सेनेच आहे व ती संस्था जन्माबरोबरच मरण पावलेल्या साम्यवादी संघापेक्षा पुष्कळ जुनी आहे, ही गोष्ट भगतसिंगांच्या खटल्याच्या वेळी पंजाबचे होम-मेंबर असलेले सर हेन्री कसे विसरतात याचेच आम्हाला नवल वाटते.

असलीच एक चूक लॉ मेंबर सर नृपेंद्रनाथ सरकार यांच्या भाषणांतहि आढळत येते, ते म्हणतात.

'The Yugantar party were followers of Mr. Bose...Had this party been broken up ? No. The Inter-provincial case lasting one and a half year, had showed that the ramifications of this party had spread all over India in Bengal, South India, the Punjab, and Burma.'

आता बंगाल्याबाहेरील हिंदुस्थानात 'हिंदुस्थान सोशॉलिस्ट रिपब्लिकन ॲसोसिएशन' ही एकच क्रांतिकारकाची सस्था अस्तित्वांत आहे व ती अनुशीलन समितीच्या लोकांनी काढली आहे. तिचा युगांतर समितीशी कांहीहि संबंध नाही. इंटर प्रॉव्हिन्शियल कॉन्स्पिरसी केसमधील आरोपी सारे अनुशीलन समितीचे सभासद होते, हे बंगालच्या पोलीस खात्याच्या अहवालावरून दिसून येईल. १९३४ च्या बेगाल ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्टात म्हटले आहे.

'The next occurrence of major importance was the escape of four leading accused in the Inter-provincial Conspiracy Case. Of the four, one was arrested the same evening, but the other three succeeded in getting away and devoting themselves with no little success, to the reorganisation of the Anushilan Party.'

असल्या सर्वप्रसिद्ध बाबतीत देखील सरकारी अधिकारी विपर्यस्त विधाने करतात हे पाहून त्यांची चीड आल्यावांचून राहात नाही.

सर नृपेद्रनाथांनी आपल्या भाषणांत श्री. कृष्णदासांच्या पत्रासंबंधी असा एक प्रश्न विचारला आहे.

"We know that the person concerned, Mr. Subhas Chandra Bose, has been writing letters, sending messages giving directions from Europe every week. Has he up to this moment denied the charge that at any rate in 1931 the Yugantar party were his followers and that they were supporting him throughout in his career both in the public and in the Corporation? Mr. Subhas Bose has not said that his followers did not include the Yugantar party."

हा प्रश्न करण्यापूर्वी सर नृपेद्रनाथांनी एकच गोष्ट लक्षांत घेतली नाही. ती ही की, आपण गेल्या सप्टेंबर महिन्यात सुभाषबाबूंवर जे आरोप केले ते सुभाषबाबूंचे नांव न घेताच केले होते. असल्या नांव न घेतां केलेल्या आरोपांना विदेशातून उत्तर देण्याच्या भानगडीत सुभाषबाबू पडले नाहीत, या बद्दल कोणीहि सुज्ञ मनुष्य त्याना दोष देणार नाही.

या बाबतीत दुसरी एक विचार करण्यासारखी गोष्ट ही की, आयर्लंडांतील क्रांतिकारकाच्या संस्थेचे सभासद लौकिक राजकारणांत पार्नेलचे अनुयायी असत. पण या फिनियन लोकांच्या संसर्गाने पार्नेल कांहीं क्रांतिकारक ठरला नाही मग हाच न्याय सुभाषबाबूंना कां लावू नये? युगांतर समितीच्या सभासदांची व सुभाषबाबूंची राजकीय मते कदाचित जुळत असतील; पण तेवढ्यासाठी त्यांनी क्रांतिकारकांच्या अत्याचारांचा निषेध करण्याला कधी माघार घेतली नाही. ज्या १९३१ सालाचा उल्लेख सर नृपेद्रनाथ वारंवार करीत आहेत, त्या वर्षी देखील व्हिलियर्स आणि डूर्नो या उभयतांना मारण्याचा प्रयत्न झाल्यानंतर सुभाषबाबूंच्या अध्यक्षतेखालीं कलकत्ता येथिल नागरिकांची निषेधाची जाहीर सभा भरली होती. त्या सभेत स्वतः सुभाषबाबूंचेंच मुख्य भाषण होऊन निषेधाचा ठराव पास झाला होता. या एका प्रसंगावरूनहि सुभाषबाबू हे

युगांतर समितीचे प्रमुखहि नव्हते व हस्तकहि नव्हते, हे सिद्ध होईल. असो, या साऱ्या वादाचा निकाल लावण्याचे वास्तविक स्थान कलकत्ता हायकोर्ट हे आहे व त्या ठिकाणी आपल्यावरील सर्व आरोपांना उत्तरे देण्याची सुभाषबाबूंची तयारी आहे तेव्हा त्यांनी हिंदुस्थानांत पाऊल टाकतांच सरकारने आपल्या कोर्टाकडून या वादाचा निर्णय लावून घ्यावा म्हणजे आम्हांलाहि या प्रश्नाची चिकित्सा करीत बसण्याचे कारण पडणार नाही. होममेंबर म्हणतात की, सुभाषबाबूंना कोर्टात उभे केले असतां त्यांच्या विरुद्ध साक्षी देणाऱ्यांच्या जिवाला धोका उत्पन्न होईल. या थोतांडाला असेंब्लीतील कॉंग्रेसचे पुढारी श्री. भुलाभाई देसाई यांनी असे उत्तर दिले आहेः—

'Whether it was not better that these lives be risked than a person be deprived of his liberty and of doing service to his country because the deprivation of such opportunity was worse than death to such a highminded person.'

हे उत्तर तत्वतः बरोबर आहेच, पण केवळ व्यावहारिक दृष्टीने पाहिले तरी गेल्या पंधरा वर्षांत बंगाल सरकारने अदमासे दोन हजार क्रांतिकारकांवर कोर्टात खटले भरून त्यांना जबरदस्त शिक्षा ठोठावल्या आहेत; या साऱ्या खटल्यांतून सरकारने जे हजारो साक्षीदार आपल्या बाजूने उभे केले होते त्यांपैकी फक्त एकाचाच खून झाल्याचे उदाहरण आतांपर्यंत घडले आहे. यावरून आपल्या साक्षीदारांच्या जिवाला धोका असल्याचा सरकारी कांगावा किती निराधार आहे, हे कळून येईल. शिवाय प्रत्यक्ष अत्याचार घडल्यावर आरोपीची जी चौकशी होते त्या वेळी साक्षीदार कोर्टापुढे आणले जातात; मग क्रान्तिकारक पक्षाशी संबंध असल्याचा आरोप सिद्ध करण्याला साक्षीदार कोर्टापुढे आणण्याला सरकारने माघार का घ्यावी ? अर्थातच अंदरकी बात राम जाने !

—केसरी, ता. १० एप्रिल १९३६.



# राजबंद्यांची करुण कहाणी

हिंदुस्थानातील तुरुंगांत कोणत्याहि सामान्य गोऱ्या गुन्हेगाराला ज्या सवलती मिळतात त्या सवलती सर्व हिंदी राजबंद्यांना मिळाव्या असा आग्रह धरून त्याकरिता आत्माहुति देणारे श्री. **यतींद्रनाथ दास** यांची पुण्यतिथि येत्या १३ तारखेला पडत असल्याने त्या दिवशी सर्व हिंदुस्थानाने राजबंदीदिन पाळावा अशी सूचना राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष **पंडित जवाहरलाल नेहरू** यांनी केली आहे, या राजबंदीदिनाच्या निमित्ताने तरी त्यांच्यावर होत असलेल्या अन्यायाकडे जनतेचे लक्ष्य जावे या हेतूने पुढील माहिती देण्यात येत आहे.

## पं. परमानंदांवर होणारा अन्याय

या लेखाच्या प्रारंभीच लाहोरच्या पंडित परमानंदांवर होत असलेल्या अन्यायाचा उल्लेख केला पाहिजे. पंडित परमानंदांना १९१५ साली लाहोर येथील क्रांतिकारकांच्या खटल्यांत प्रथम फांशीचीच शिक्षा झाली होती. पण मागाहून लॉर्ड हार्डिंज यांनी त्यांच्यावर दया करून त्यांना जन्मठेप काळेपाण्यावर धाडिले. तेव्हापासून आज एकवीस वर्षे ते तुरुंगवासाचे खडतर कष्ट भोगीत आहेत. वास्तविक पाहतां पंडित परमानंदांना त्यांच्या एका फाशीच्या ऐवजी दोन जन्मठेपांची शिक्षा सांगितली नसल्याने जेल मॅन्युअल्मधील नेहमीच्या नियमाप्रमाणे त्यांची सात वर्षापूर्वीच सुटका व्हावयाला पाहिजे होती. पण या दीर्घकालीन तुरुंगवासानंतर देखील पंडितजींच्या स्वतंत्र मनोवृत्तीत यत्किंचितहि फरक न पडल्यामुळे जन्मठेपेच्या इतर कैद्यांप्रमाणे ते सरकारला आपल्या सुटकेनंतरच्या वर्तनाविषयी कसलेहि आश्वासन द्यावयाला तयार नाहीत म्हणून पंजाब सरकार त्यांची सुटका करण्याचे नाकारीत आहे. पंडितजींचा हा निग्रह पाहून यतींद्रनाथांचीच आठवण होते. मृत्युशय्येवर पडलेल्या यतींद्रनाथांना जामिनावर सोडण्याला पंजाब सरकार तयार झालें असतां त्यांनी उत्तर दिले होते 'संसारकी कोइभी शक्ति मेरी स्वाधीनताका अपहरण नही कर सकती. लो, मेरी इन हड्डियोंसे जमानत् लेते रहो.''

## अंदमानांतील कैद्यांची दुःस्थिति

पंडित परमानंद हे आज निदान अंदमानात तरी नाहीत. पण त्यांच्यासारखेच इतर शेकडो राजबंदी अलीकडे त्या कुप्रसिद्ध बेटांत कोंडलेले आहेत. या बेटातील हवापाणी हिंदी कैद्यांना सामान्यतः मानवत नाही. त्याचप्रमाणे दीर्घ प्रवास करण्याची ऐपत बहुतेक कैद्यांच्या आप्तांना नसल्यामुळे या बेटांत कोंडलेल्या मान्या कैद्यांना आपल्या आप्तेष्टांच्या भेटीची आशा सोडून द्यावी लागते. तसेच हिंदुस्थानातील तुरुगांतून कैद्यांवर काही जुलूम झाल्यास त्याची बातमी देशात पसरून त्याचा प्रतिकार होण्याची जी धास्ती इथल्या तुरुगावरील अधिकाऱ्यांना वाटत असते, तिचा शतांश देखील अंदमानांतील अधिकाऱ्यांना वाटण्याचा सबब नसल्याने एकदा बंदी आणि अधिकारी यांचे वितुष्ट आले की, तेथील बंद्यावर काहीहि जुलूम झाले तरी त्यांची दाद लागणे अशक्य होते. १९३२ साली नाशिक येथील तुरुगांत श्री. अमृतलाल यांना भयंकर मारपीट झाल्याची वार्ता नाबडतोब सर्व इलाख्यांत पसरल्यामुळे त्या प्रकरणाची तात्काळ चौकशी होऊन गुन्हेगार तुरुगाधिकाऱ्यांना त्याच्या पापाचे प्रायश्चित्त मिळाले. याच्या उलट १९३३ साली अंदमानांतील राजबंद्यांनी प्रायोपवेशन आरंभिले असतां यतींद्रनाथाचे एक मित्र महावारसिंग व दुसरे एक दोघे कैदी संशयास्पद रीतीने एकाएकी मरण पावले. पण त्या प्रकरणाची जाहीर रीतीने चौकशीसुद्धा झाली नाही.

## खोटा आळ घालण्याचा मोह

गेल्या शतकामध्ये हिंदुस्थानचे एक व्हाइसरॉय लॉर्ड मेयो याचा अंदमान बेटांत एका कैद्याने खून केला. तेव्हापासून अंदमानात असा एक कायदा झाला आहे की, कोणाहि कैद्याने एखाद्या वरिष्ठ अधिकाऱ्याचा खून करण्याचा प्रयत्न केल्यास किंवा असा प्रयत्न करण्यासाठी काही शस्त्रे मिळविल्यास त्या कैद्याला फांशीची शिक्षा द्यावी व त्या कैद्याच्या अत्याचाराच्या तयारीची माहिती जर एखाद्या कैद्याने तुरुंगाधिकाऱ्यांना आगाऊ सांगितली तर त्याची मुक्तता करावी. अंदमानच्या तुरुंगांतून मुक्तता करून घेण्याच्या या मोहाने एखादा उलट्या काळजाचा कैदी अगदी निरपराध माणसावर देखील असले बालंट आणून आपली

सुटका करून घेण्याचा प्रयत्न करतो. असल्या प्रयत्नांची एकदोन उदाहरणे भाई परमानंदांनी आपल्या आत्मचरित्रांत दिली आहेत. या व असल्याच आणखी कांही वैशिष्ट्यांमुळे अंदमानच्या तुरुंगांतील नैतिक वातावरण हिंदुस्थानांतील तुरुंगापेक्षा अतिशय भीषण झाले आहे. यासाठी १९३३ साली श्री. रवींद्रनाथ ठाकूर, पंडित जवाहरलाल नेहरू, रे. सी. एफ्. अँड्रयूज इत्यादि नामांकित लोकांनी अंदमानांतील राजबंद्यांना ताबडतोब हिंदुस्थानांत परत आणावे अशी मागणी केली होती. पण तिचा काडीमात्र उपयोग झाला नाही.

## आगींतून 'निघून फोपाट्यांत

हिंदुस्थानांतील कित्येक पुढाऱ्यांची अशी समजूत आहे की, अंदमानांतील राजबंद्यांपेक्षा हिंदुस्थानांतील स्थानबद्ध कैद्याचे दैव अधिक खडतर आहे, कारण अंदमानांतील राजबंद्यांची निदान ठराविक मुदतीनंतर तरी सुटका होईल पण हिंदुस्थानांतील स्थानबद्धांना ती देखील आशा करावयाला अवकाश नाही. पण त्यांची ही समजूत चुकीची आहे. कारण अंदमानांतून सुटका झाली तरी मागाहून स्थानबद्धता कपाळी येतेच, हे पुढील उदाहरणावरून दिसून येईल. श्री. सुनिर्मल सेन यांना एका बॉंब प्रकरणांत पांच वर्षांची शिक्षा झाली. शिक्षा झाल्यावर कांही दिवसांनी त्यांची अंदमानाला रवानगी झाली. पुढे त्यांच्या शिक्षेची मुदत संपल्यावर यंदा त्यांना अंदमानाहून परत आणले असले तरी तेथील हवापाणी न मानवल्यामुळे अस्थिपंजर झालेल्या त्यांच्या कुडीची कींव न करता बंगाल सरकारने त्याना कोणत्या अज्ञात ठिकाणी स्थानबद्ध कैदी करून ठेविले आहे, हे कौन्सिलांत विचारिलें असता, बंगालच्या होममेंबरांनी तेवढीसुद्धा माहिती सांगण्याचें नाकारलें !

## महापुरांत झालेले हाल

बंगाल्यांतील स्थानबद्धांपेक्षा अंदमानांतील राजबंद्यांची स्थिति केवळ एका दृष्टीने मात्र अधिक समाधानकारक आहे. बंगाल्यांतील स्थानबद्धांप्रमाणें त्यांना अकस्मात् महापुराला तोंड देण्याची पाळी येत नाही ! १९३४ साली ट्रेड युनियन काँग्रेसच्या बंगाल प्रांतिक शाखेचे आणि ऑल इंडिया सोशालिस्ट पार्टीचे अध्यक्ष डॉ. चारुचंद्र बानर्जी यांना बंगाल सरकारने एका खेड्यांत स्थानबद्ध कैदी करून

ठेवले. पुढे १९३५ साली दामोदर नदीला महापूर आला असतां एके दिवशीं मध्यरात्रीं चारुबाबूंच्या घरांत पाणी शिरले. तेव्हा मोठ्या कष्टाने घराच्या छपरावर चढून चारुबाबूंनी आपला प्राण वांचविला. दुसरे दिवशी पुराचे पाणी अधिकच वाढत आहे असें पाहून त्यांनी पुरांत उडी घेतली व दोन तीन फर्लांग पोहून जाऊन रेल्वेच्या बंधाऱ्याचा आश्रय केला. यानंतर डॉ. अमूल्यरतन घोष यांनी बंगालच्या होम-मेंबरांना चारुबाबूंच्या राहण्याची दुसरी कांही व्यवस्था करण्याबद्दल सुचविलें असतां होम-मेंबरांनी सांगितले की, चारुबाबूंच्या घरांत पाणी शिरले तरी ते घर कांही पुरते बुडून गेले नाही, पूर उतरल्यापासून चारुबाबू तेथेच राहात आहेत, तेव्हा त्यांची त्या घरांत गैरसोय होते, असे मानावयाचे कांही कारण नाही! हे उत्तर वाचले म्हणजे बंगाल सरकार विनाकारण आपण होऊन आपल्यावर निष्ठुरपणाचा अपवाद ओढवून घेत आहे, असे वाटल्यावांचून राहात नाही. या डॉ. बानर्जींच्या पत्नीला त्यांच्या आधीच १९३१ साली अटक झाली आहे. पण हे जहाल दंपत्य एकत्र राहिल्यास क्रांतिकारकांच्या संख्येत नवी भर पडेल, या भीतीने सरकारने त्यांना वेगवेगळ्या ठिकाणी डांबून ठेविले आहे. ही गोष्ट एका परीने बरीच झाली असे आता म्हणावे लागते. कारण महापुराच्या वेळी डॉ. चारुचंद्र यांची पत्नी त्या घरांत असती तर तिने आपली सुटका कशी करून घेतली असती?

## काँग्रेसवाला म्हणजे क्रांतिकारक !

आता बंगाल सरकारच्या संशयी मनोवृत्तीचे एक नमुनेदार उदाहरण सांगितले पाहिजे. तारीख २५–१–३६ रोजी मिदनापूर जिल्ह्यांतील एक रहिवासी श्री. रवींद्रनाथ चंद्र यांच्या घरावर पोलिसांनी छापा घातला. या छाप्यांत पोलिसांना १९२२ साली जप्त झालेले 'स्वराज्य आणि खिलाफत' नांवाचें एक पुस्तक आणि फोटोप्रमाणें फ्रेम करून ठेविलेले एक वर्तमानपत्राचे कटिंग अशा दोन भयंकर चिजा सापडल्या! त्या वर्तमानपत्राच्या उताऱ्यांत या खटल्यांतील आरोपीच्या मातोश्रींच्या उत्तरक्रियेची हकीकत आली होती व त्यांत आरोपीचा नामनिर्देश काँग्रेसचे एक प्रमुख कार्यकर्ते असा केलेला होता. एवढ्या पुराव्यावरून श्री. रवींद्रनाथ चंद्र यांना तिथल्या मॅजिस्ट्रेटाने एक वर्ष सक्तमजुरीची शिक्षा दिली! पुढे सेशन्स जज्जांकडे त्या शिक्षेविरुद्ध अपील केलें असतां त्या जज्जांनी पुढीलप्रमाणें निर्णय दिला.

"The Sessions Judge at Midnapur observed that from the fact that the newspaper cutting was cherished by the accused and kept hung up in his room he ( Judge ) had no hesitation in concluding that the accused had taken a leading part in Congress activities which in Midnapur District were identical with revolutionary activities ! "

या पूर्वग्रहदूषित निर्णयाविरुद्ध श्री. रवींद्रनाथ यांनी हायकोर्टाकडे अपील केले असतां हायकोर्टाने निर्णय दिला, " Nothing however appeared to have been proved with regard to the status of the accused in the Congress movement, nor did it seem to have any real significance as to his connection with terroristic crimes. "

याप्रमाणे, कॉंग्रेसच्या चळवळीत भाग घेणारा मिदनापूरचा तरुण हा क्रांतिकारक असलाच पाहिजे, हा सेशन्स जज्जांचा निर्णय जरी हायकोर्टाने अमान्य केला, तरी आज लॉ कॉलेजांत शिकत असलेल्या २५ वर्षांच्या तरुणाच्या घरीं १९२२ साली जप्त झालेले खिलाफत चळवळीवरील एक पुस्तक सांपडल्याबद्दल सहा आठवड्यांची सक्त मजुरीची शिक्षा सांगितलीच ! बरे, ते पुस्तक तरी तसे भयंकर होते असेंहि नाही—

" The book did not *per se* encourage the terrorist movement. One could well understand the book being proscribed in 1922 but whether if it appeared for the first time during the present year, anybody would have thought it worth proscribing his Lordship did not know. " असा जस्टिस हेंडरसन यांचा अभिप्राय पडला. तरीपण श्री. रवींद्रनाथ यांची निर्दोषी म्हणून सुटका झाली नाहींच. असो, या रवींद्रनाथांच्या खटल्याने बंगाल्यांतील सेशन्स जजांच्या दर्जाच्या अधिकाऱ्यांना एखाद्या तरुणाला क्रांतिकारक ठरवून शिक्षा देण्याला किती हास्यास्पद पुरावा पुरेसा वाटतो, हे एकदाचें साऱ्या जनतेला कळून आले ही गोष्ट फार चांगली झाली.

## पत्ता सांगा नाहींतर घर जप्त

याच मिदनापूर जिल्ह्यांतील आणखी एक अद्भुत कथा येथे सांगितली पाहिजे. मिदनापूरचे एक कॉंग्रेसचे पुढारी श्री. मन्मथनाथ दास यांना बऱ्याच

दिवसांपासून मिदनापूर येथून हद्दपार केलेलें आहे. या मन्मथबाबूंचा चुलत भाऊ शैलेशचंद्र दास याचें १९३४ च्या प्रारंभी आपल्या वडिलांशीं भांडण झालें व तो आपलें घर सोडून मन्मथबाबूंच्या वडिलांकडे रहावयास आला. त्यांच्याकडे थोडे दिवस राहून तो नोकरीच्या शोधासाठी कलकत्त्याला निघून गेला. तेव्हापासून मन्मथबाबू किंवा त्यांचे वडिल यांपैकी कोणालाहि त्याचा ठावठिकाणा माहीत नव्हता. पुढे १९३५ च्या फेब्रुवारीत पोलिसांनी मन्मथबाबूंचे वडील श्री. प्रबोधचंद्र दास यांच्यावर अशी नोटीस बजावली की, तीन दिवसांच्या आंत आपण आपले पुतणे शैलेशचंद्र दास यांचा पत्ता सांगितला नाही तर आपलें घर लिलावाने विकले जाईल ! बंगाल्यांतील दडपशाहीचे हे नमुने पाहून बंगाल्याबाहेरील लोकांना विस्मय वाटल्यावांचून राहणार नाही.

## आणखी कांहीं मासले !

बंगाल्यात किती क्षुद्र कारणासाठी कशा जबरदस्त शिक्षा ठोठावल्या जात आहेत, याची आणखी कांही उदाहरणे सांगण्याजोगी आहेत. श्री. कालिदास निरोगी आणि श्री. भूपेश दत्त या दोघां स्थानबद्धांना आपल्या खेड्याबाहेरील डॉक्टरांचे औषध घेतल्याबद्दल २९ जानेवारीला एक वर्ष सक्तमजुरीची शिक्षा झाली. श्री. प्रमथचंद्र सेनगुप्त या स्थानबद्ध कैद्याला 'ऊनपंचाशी' नांवाचे एक कवितांचे पुस्तक व स्वदेशीवरील कांही हस्तलिखित बंगाली कविता जवळ बाळगल्याबद्दल दोन वर्षे सक्तमजुरी मिळाली. श्री. शिशिरकुमार सेन व श्री. नितीशचंद्र दासगुप्त हे दोघे तरुण त्यांना डांबून ठेवलेल्या खेड्याबाहेर एक गांवठी नाटक चाललें होतें, तें पहावयाला गेले, यासाठी त्यांना मॅजिस्ट्रेटाने एक वर्ष सक्तमजुरी दिली होती. पण अपील कोर्टाला त्या हतभाग्य तरुणांची दया येऊन त्याने ती शिक्षा तीन महिन्यांवर आणून ठेवली. कित्येकांना 'डायर ओ पंजाबकाहिनी', गांधीजींचें 'हिंद स्वराज्य' उपेंद्र बानर्जींचे 'स्वाधीन मानूष' असली पुस्तकें जवळ बाळगल्याबद्दल शिक्षा मिळाल्या आहेत.

## सरकारी हस्तकांच्या लीला

आता आणखी एका महत्त्वाच्या खटल्याचा उल्लेख केला पाहिजे. १९३५ सालीं गणेश नांवाच्या एका इसमाने पोलिसांना अशी माहिती दिली की, मी श्री.

रवींद्रनाथ रॉय यांच्याकरिता श्री. जोगेद्रलाल दत्त यांच्याकडून एक रिव्हॉल्व्हर विकत घेतला. या माहितीवरून पोलिसांनी प्रथम श्री. रवीद्रनाथ रॉय व श्री. जोगेद्र-लाल दत्त या उभयतांवर खटला भरला. पण मागाहून आंतून काय कळ फिरली कोण जाणे, पण त्यामुळे पोलिसांनी रवीद्रनाथास सोडून देऊन एकट्या जोगेद्र-लालावरील खटला पुढे चालविला. या खटल्याचा निकाल सांगतांना कलकत्त्या-च्या चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटांनी म्हटले आहेः—

'I am unable to discover any reason for placing Jogendra on his trial when Rabindra has been discharged.' या खटल्याचे महत्त्व अशा दृष्टीने आहे की, सामान्यतः संशयित तरुणां-वर खटला भरण्याइतका पुरावा सरकारजवळ नसतोच व यदाकदाचित् तसा पुरावा असल्यास त्यावरून हेच सिद्ध होतें की, संशयित तरुणांच्या संशयित हालचालीच्या मुळाशीं सरकारचे हस्तक स्वतःच असतात. श्री. अमरेंद्रनाथ चट्टोपाध्याय यांनी आपल्या असेंब्लीतील भाषणांत चक्कच सांगितले "Teachers in schools and colleges are asked to seduce youngmen and to become agent provocateurs. In some places teachers encourage young students to take terroristic views and when they fall a prey to that temptation, they are then handed over to the police."

अशाप्रकारे कितीतरी होतकरू तरुण केवळ संशयावरून अथवा फसून स्थानबद्ध अथवा कारावद्ध झाले आहेत, त्यांना आपण आज सोडवूं शकत नसलों तरी निदान त्यांच्या विषयीं सहानुभूति दर्शविणें आपलें कर्तव्य आहे.

केसरी, ता. ११ सप्टेंबर, १९३६.



# राजबंद्यांच्या सुटकेची मागणी

अखिल हिंदुस्थानांतील राजबंद्यांच्या सुटकेच्या प्रश्नाने फिरून एकवार उग्र स्वरूप धारण केले आहे. हिंदुस्थानांतील लोकमत त्या प्रश्नाविषयीं अधिक जागृत झालें आहे, असें मात्र मुळीच नाही. इतकेंच नव्हे तर नव्या सुधारणानंतर-देखील हिंदुस्थानांतील जनता सरकारला राजबंद्यांची सुटका करणें भाग पाडीत नाही, असा अनुभव आल्यामुळे हताश होऊन स्वतः राजबंद्यांनीच तो प्रश्न आपल्या हाती घेतला आहे आणि प्रायोपवेशनाच्या मार्गाने त्याचा सोक्षमोक्ष करून घेण्याचा त्यांनी संकल्प केला आहे.

## पूर्वींचें आश्वासन

गतवर्षीदेखील काकोरी कटाच्या खटल्यांतील एक आरोपी श्री. जोगेश चतर्जी यांनी राजबंद्यांना वागविण्याच्या पद्धतीत आमूल परिवर्तन व्हावें व साऱ्या राजबंद्यांना अंदमानाहून परत आणण्यांत यावें, असा आग्रह धरून प्रायोपवेशन केलें होतें. त्यावेळी देशांतील थोर थोर पुढाऱ्यांनी एका वर्षाच्या अवधींत हा प्रश्न सोडविण्याचे श्री. चतर्जी याना आश्वासन देऊन त्यांना त्यांचें प्रायोपवेशन बंद करायला लावलें. त्यानंतर गेल्या मे महिन्यांत श्री. चतर्जी यांनी पंडित जवाहरलालांचे मेहुणे बॅ. पंडित यांना कळविलें कीं, गतवर्षी दिलेल्या आश्वासनां-पैकीं एकहि आश्वासन अद्यापि खरें झालेले नाही, राजबंद्यांना अद्यापि अंदमाना-हून परत आणलेलें नाही, प्रत्येक प्रांतांतील राजबंद्यांना एका तुरुंगांत एकत्रित केलेलें नाही, नियतकालिके मिळण्याच्या बाबतीतहि कांही सुधारणा झालेली नाही, सर्व राजबंद्यांना एकाच पद्धतीने वागविलें जात नाही किंवा त्यांना एक-मेकांत मिसळतांहि येत नाही, गतवर्षी आपण मागून घेतलेली मुदत येत्या जुलै महिन्यांत संपते, तोंपर्यंत जर सध्याच्या परिस्थितीत सुधारणा झाली नाही तर मला पुनः प्रायोपवेशन करावें लागेल.

## वृत्ति बोथटली

श्री. चतर्जी यांचा हा निरोप कळल्यावर पं. जवाहरलालांनी श्री. मोहन-

लाल सक्सेना यांना या बाबतीत चळवळ सुरू करण्याची आज्ञा केली. पण त्या चळवळीला सुरुवात होण्यापूर्वीच काकोरी कटाच्या खटल्यांतील दुसरे एक आरोपी श्री. शचींद्रनाथ बक्षी यांनी सर्व राजबंद्यांची ताबडतोब सुटका व्हावी, अशी मागणी करून प्रायोपवेशनाला प्रारंभ केला आहे. श्री. बक्षी यांनी अन्नत्याग केल्याला आतापर्यंत एक महिना लोटला आहे. पण या अवधींत हिंदुस्थानच्या लोकमतांत कांही विशेष चलबिचल झाल्याची लक्षणे दिसत नाहीत ! कित्येक राष्ट्रीय पक्षाचीं वर्तमानपत्रें देखील देशकालमान इत्यादीचा विचार न करतां सर्व राजबंद्यांच्या सुटकेची मागणी करण्याबद्दल शचींद्रनाथांना दोषच देत आहेत ! हा विचित्र प्रकार पाहिला म्हणजे मनाला पराकाष्ठेचा खेद वाटतो. ब्रह्मदेशाच्या सरकारने प्रत्यक्ष बंड करणाऱ्या कैद्यांनाहि सोडून द्यावे व हिंदुस्थानांतील राष्ट्रीय वर्तमानपत्रांनी बंड करण्याच्या कटांत भाग घेतल्याबद्दल शिक्षा झालेल्या कैद्यांच्या सुटकेच्या मागणीवर अप्रयोजकपणाचा शिक्का मारावा, हा प्रकार पाहिला म्हणजे गेल्या सहा वर्षांत आपल्या राष्ट्रीय चळवळींची किती अधोगति झाली आहे, याची यथायोग्य कल्पना येते.

## सरकारचें धोरण

कांही वर्तमानपत्रांच्या या अधोगतीचा परिणाम असा झाला आहे की, चौकशीशिवाय अटकेंत ठेवलेल्या राजबंद्यांपेक्षा बादशहाविरुद्ध बंड करण्याबद्दल शिक्षा झालेले राजबंदी सुटकेला अधिक पात्र असें मत सरकारपक्षाचे लोक बिनदिक्कत बोलून दाखवूं लागले आहेत. बंगालच्या एका दिवाणांनी अशा आशयाचे उद्गार नुकतेच काढल्याचें आनंदबाजार पत्रिकेने प्रसिद्ध केलें आहे. हेंच जर बंगाल सरकारचें वास्तविक मत असेल तर लोकांनी तरी सुटकेच्या मागणींतून शिक्षा झालेल्या क्रांतिकारकांना कां वगळावें ? बंगाल सरकारचें मत वर उल्लेखिलेल्या दिवाणांच्या मतासारखेंच असावें असें मानावयाला थोडासा आधारहि आहे. त्या सरकारने १९३४ सालीं सर जॉन अँडरसन यांना मारण्याचा प्रयत्न करणाऱ्या एका तरुणाची नुकतीच मुक्तता करून त्याला एकदम अंदमानाहून इंग्लंडला जाऊं दिलें आहे. पण या साहसी मताचा फायदा अंदमानांतील इतर राजबंद्यांना मिळण्याचा संभव नाही हें उघडच आहे.

## अघोर पद्धत

राजबंद्यांच्या सुटकेच्या मागणींतून शिक्षा झालेल्या क्रांतिकारकांना वगळू नये, हें म्हणणें न्याय्य असलें तरी चौकशीशिवाय अटकेंत ठेवलेल्या राजबंद्यांची ताबडतोब सुटका घडवून आणण्याकडे पुढाऱ्यांनी प्रथम लक्ष देणे व्यवहारदृष्टया बरोबरच आहे. कारण चौकशीशिवाय अटकेंत ठेवण्याची अघोर पद्धत बंद पडल्याशिवाय शिक्षा भोगून झालेल्या क्रांतिकारकांचीदेखील सुटका होणें अशक्य आहे, मग मुदत भरण्यापूर्वी त्यांची सुटका होणें तर दूरच राहिलें. शिक्षा भोगून झालेल्या तरुणांना फिरून डांबून ठेवल्याचीं उदाहरणें प्रत्यही उघडकीस येत आहेत. उदाहरणार्थ, श्री. सतीशचंद्र पाकराशी नांवाच्या एका तरुणाला मेछुआबाजार बॉंब प्रकरणांत साडेसहा वर्षांची शिक्षा झाली. ही शिक्षा संपून त्याची सुटका होतांच २३-६-१९३६ रोजी त्याला फिरून एकवार एका रोगट खेड्यांत डांबून ठेवलें आहे. पूर्वीच्या तुरुंगवासाने व आताच्या कुग्रामवासाने त्याची प्रकृति अगदी बिघडून गेली आहे. तरीदेखील बंगाल सरकारला त्याची मुक्तता करावी, असें अद्यापि वाटत नाही. श्री. सुनिर्मल सेन यांच्या बाबतीत याहून अधिक अन्याय घडला आहे. अंदमानाहून त्यांची मुक्तता झाल्यावर त्यांना कोठें अडकवून ठेवले आहे, हे सांगावयाचेंसुद्धा सरकाराने नाकारलें.

## वेड कां लागतें ?

चौकशीशिवाय अटकेंत ठेवलेल्या देशभक्तांमध्ये ज्यांच्यावर सरकारचा विशेष राग आहे अशा देशभक्तांना अजमीरच्या वाळवंटांतील दिवळीच्या तुरुंगांत अडकवून ठेवलेलें आहे. या वाळवंटांतील कडक उन्हाळा बंगाली लोकांना मानवत नसल्याने त्यांच्यापैकीं अनेकांचे मेंदू तापून त्यांना वेड लागलें आहे. उदाहरणार्थ, श्री. जितेंद्रनाथ मुकर्जी या साठ वर्षें वयाच्या वृद्ध गृहस्थांना दिवळीच्या तुरुंगांत मस्तकभ्रमणाचा विकार झाला आहे आणि घरीं अन्नाच्या अभावीं त्यांच्या पत्नीला क्षयरोग झाला आहे. मे महिन्याच्या अखेरीला अशी बातमी आली आहे कीं, याच दिवळीच्या तुरुंगांतील श्री. नरेंद्र दत्त व श्री. अनंत मुजुमदार या उभयतांना वेड लागलें आहे. या शोचनीय प्रकाराबद्दल जबाबदार कोण आहे, किंवा या दुर्दैवी रोग्यांच्या औषधोपचाराची त्या तुरुंगांत व्यवस्था होऊं

शकते की नाही, याची विश्वसनीय माहिती अर्थातच बाहेर येऊं शकत नाही. पण याच तुरुंगांतील एका ॲपेंडिसिटिसच्या रोग्याने आपल्या औषधोपचाराची व्यवस्था होईना म्हणून आत्महत्या केल्याचे गतवर्षी प्रसिद्ध झाले होतें. याच तुरुंगांतील श्री. मणीद्रमोहन लाहिरी यांना प्रथम जीर्णज्वर झाला. पुढे १९३५ पासून त्यांच्या कफांतून रक्त जाऊं लागले. त्यानतर त्यांना अजमीरच्या इस्पितळात ठेवून त्यांची परीक्षा केली व तेथील डॉक्टरांनी त्यांना क्षय झाला आहे असा अभिप्राय दिला. अजमीर येथे वर्षभर चिकित्सा करून कांहीहि उपयोग झाला नाही, तेव्हा यंदा त्यांना उपचारासाठी कलकत्ता येथे आणले आहे. पण या अस्थिपंजरवत् झालेल्या राजबंद्यांची सुटका होण्याचा कांहीहि सभव दिसत नाही.

## मनाचा थोरपणा

वगभगाच्या चळवळीपासून आतापर्यंत देशसेवा करीत आलेले नामांकित पुढारी श्री. सतींद्रनाथ सेन यांना नाकांत व्याधि झाली आहे. त्याच्यावर ऑपरेशन होणें दूरच राहिलें, उलट तुरुंगाला आग लावल्याच्या आरोपावरून पजाबातील अंबाला तुरुंगांत त्यांच्यावर खटला भरला आहे. हा खटला चालवावयालाहि सतींद्रबाबूंजवळ पैसे नाहीत. अशा अवस्थेतदेखील आपल्या साहाय्यासाठी सुभाषबाबू खटपट करीत आहेत, असें कळतांच त्यांनी सुभाषबाबूंना तार पाठविली की, आपल्या प्रकृतीच्या सध्याच्या अवस्थेत आपण आमच्यासारख्या लोकांविषयी काळजी करूं नका, आपले आरोग्य ही राष्ट्राची सपत्ति आहे, हे लक्षांत ठेवून आपण वागा. सुभाषबाबूंच्या पक्षांत पुढारी व अनुयायी यांचे परस्पर-संबंध कसे आहेत, त्याचे हे एक नमुनेदार उदाहरण आहे. हिजलीच्या तुरुगांतील श्री. सुनील दास यांनाहि ॲपेंडिसिटिसची व्यथा दोन वर्षांपासून जडलेली आहे. त्यांच्यावर मात्र लौकरच शस्त्रक्रिया होणार आहे, असे समजते. श्री. मनोरजन राय हेहि पूर्वी हिजलीच्या तुरुंगांत होते. तेथे असतांना त्यांना आंतड्याचा एक असाध्य विकार जडला व त्यावर उपचार करण्यासाठी त्यांना १९३३ च्या आरंभी कलकत्त्याला आणून डॉ. डेन्हॅम व्हाइट यांचें औषध सुरू केले. या औषधाने मनोरंजनबाबूंना गुण येऊं लागला होता; इतक्यांत त्यांची परत हिजलीला रवानगी झाली. इतकेंच नव्हे तर त्यानंतर लौकरच त्यांना हिजलीहून दिवळीला पाठविण्यांत आलें. १९३४

सालापासून ते अजमीर इस्पितळांत पडून आहेत. १९३४ सालीं त्यांचे वडिल वारले, तेव्हाहि त्यांना तात्पुरती सूट मिळाली नाही व अवघड शस्त्रक्रिया व्हावयाची आहे, तरी त्यांची तात्पुरती सुटका करायला सरकार कबूल नाही. मनोरंजन बाबूंची प्रकृति इतकी बिघडली आहे कीं पातळ पदार्थाखेरीज इतर कांहीहि अन्न त्यांच्या पोटांत ठरत नाही.

## आत्महत्येचें उदाहरण

श्री. कृष्णसुंदर गोस्वामी यांना बहरमपूरच्या राजबंदीनिवासात अडकवून ठेवलेले आहे. त्यांना पित्तशूल, छातीत धडधडणे, चक्कर येणे वगैरे विकारांचा उपद्रव होत आहे. त्यांचे वडिल कृष्णशशिबाबू यांच्या विनवणीवरून त्यांना उपचार करण्यासाठी कांही दिवस घरी येण्याची परवानगी मिळाली होती. पण त्यांच्यावर उपचार करण्यासाठी त्यांना त्या तालुक्याच्या गांवांतून इतरत्र नेण्याची कृष्णशशिबाबूंनी परवानगी मागतांच सरकारने कृष्णसुंदर बाबूंना परत बहरमपूरच्या तुरुंगांत पाठवून दिले ! त्यांचे धाकटे बंधु श्री. कृष्णपंकज यांनाहि सरकारने स्थानबद्ध कैदी करून डांबून ठेवले होते. त्यांनी आपल्या हालांना कंटाळून गतवर्षीच्या नोव्हेंबरमध्ये आत्महत्या करून घेतली. आपल्या दोघा मुलांची अशी दुरवस्था झालेली पाहून कृष्णशशिबाबूंनी अंथरूण धरले आहे. फेर्णी कॉलेजांतील एक प्रोफेसर श्री. गोपाळ हालदार यांना १९३२ साली तत्त्वज्ञानाच्या विशेष अभ्यासासाठी एक रिसर्च स्कॉलरशिप मिळाली. पण याच वर्षी पोलिसांची वक्रदृष्टि यांच्याकडे वळून त्यांना तत्त्वज्ञानाचा अभ्यास टाकून देऊन बक्सा येथील बंदीनिवासांत जाऊन रहावे लागले. या तुरुंगांत असतांना त्यांची प्रकृति बिघडली व त्यांना चिकित्सेसाठी कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी जेलमध्ये आणले. तेथे दोन महिन्यांत थोडे बरे वाटू लागल्यावर त्यांना परत बक्सा येथे पाठविण्यांत आले. त्यानंतर त्यांची प्रकृति पुन्हा बिघडली व सध्या त्यांना फिरून प्रेसिडेन्सी जेलमध्ये आणलें आहे. त्यांना गालस्टोन, पायोरिया, डिस्पेपशिया वगैरे विकार झाले आहेत. तुरुंगांत असतांना त्यांनी तत्त्वज्ञानावर एक उत्कृष्ट निबंध लिहून तो विश्वविद्यालयाकडे पाठविला. पण हा निबंध लेखकाच्या गैरहजेरींत छापण्याइतका सुलभ नसल्याने युनिव्हर्सिटीने त्यांना कळविलें आहे कीं,

तुमची सुटका होईपर्यंत हा निबंध छापणें शक्य नाही. हें उत्तर मिळाल्यापासून गोपाळबाबूंची मनःस्थिति अगदी बिघडून गेली आहे. त्यांना आपल्या आयुष्यांत आशेचा एक किरणहि दिसेनासा झाला आहे.

## कितीं उदाहरणें सांगावीं ?

कलकत्त्याचे प्रसिद्ध डॉक्टर श्री. चारुचंद्र बानर्जी यांना असनसोल या खेड्यांत अडकवून ठेवलेले आहे. या चारुबाबूंच्या घरांत पुराचे पाणी शिरून त्यांच्यावर कसे प्राणसंकट ओढवले होते, याची हकीकत गतवर्षीच्या राजबंदी-दिनानिमित्त लिहिलेल्या लेखांत दिलीच होती. गतवर्षीपासूनच चारुबाबूंना कोला-यटिस व आंजिना पेक्टॉरिस हे विकार जडले आहेत. या रोगांच्या चिकित्से-साठी एकदां व त्यांच्या वडिलबंधूच्या मृत्यूनंतर घरची व्यवस्था करण्यासाठी एकदां असे दोन वेळां चारुबाबूंना सरकारने कलकत्त्याला येऊं दिले होते व या दोन्ही वेळी कलकत्त्याच्या प्रसिद्ध डॉक्टरांच्या उपचारांनी त्यांना बरेंहि वाटूं लागले होतें; पण दोन्ही खेपेला त्यांची प्रकृति पुरती सुधारण्यापूर्वीच सरकारने त्यांची कलकत्त्याहून उचलबांगडी केली.

## " पोटाला लागतें "

बंगालच्या कायद्यांनी पोलिसांच्या हातांत भलभलते अधिकार देऊन ठेवले आहेत व त्यांचा ते अत्यंत अविवेकीपणाने उपयोग करीत आहेत. गेल्या मार्च महिन्यांत मृगांक मुकर्जी नांवाच्या एका तरुणावर ठराविक हद्दीबाहेर न जाण्याचा हुकूम पोलीस खात्याने बजावला आणि ही हद्ददेखील अशी होती की त्या मर्यादेत एकसुद्धा खाणावळ नव्हती. हुकूम बजावलेल्या दिवशींच बिचाऱ्या मृगांकबाबूंनी ही गोष्ट अधिकारी वर्गाच्या नजरेस आणली; पण त्यांनी आपल्या हुकुमांत बदल करण्याचें नाकारले, त्यानंतर तीन दिवस मृगांकबाबूंनी नुसते पाणी पिऊनच काढलें; पण मग क्षुधेच्या वेदना असह्य होऊन ते हद्दीबाहेरील एका खाणावळीकडे जावयाला निघाले. त्याबरोबर पोलिसांनी त्यांना अटक करून त्यांच्यावर निर्बंधभंगाबद्दल खटला भरला व मॅजिस्ट्रेटानेहि त्यांना सहा आठवडे सक्तमजुरीची शिक्षा दिली. या शिक्षेविरुद्ध कोमिल्लाच्या सेशन्स जजांकडे अपील आलें असतां 'बंगालच्या कायद्याने डांबून ठेवलेल्या

लोकांच्या पोटालासुद्धा अन्न लागते, ही गोष्ट पोलिसांनी लक्षांत घ्यावी' असा शेरा मारून सेशन्स जज्जांनी मृगांक मुकर्जींची उरलेली शिक्षा रद्द केली. मृगांकबाबूंच्या सारखीच श्री. पंचानन बसू यांची अवस्था झाली आहे. पंचानन बाबू हे १९२९ सालापासून बारिसाल येथे वकिली करीत होते. १९३५ च्या आरंभीं पोलिसांनी त्यांच्या हालचालीवर व पत्रव्यवहारावर नियंत्रणे घालण्याला सुरुवात केली. या नियंत्रणांमुळे त्यांची वकिली बुडत आलीच होती; पण तेवढ्याने पोलिसांचें समाधान न होऊन आता त्यांनी पंचाननबाबूंना त्यांच्या घरांतून बाहेर काढून दुसऱ्या एका हद्दीत डांबून ठेविले आहे. या हद्दीत सुदैवाने खाणावळ आहे. त्यामुळे पंचाननबाबूंना दुपारी खाणावळींत जेवतां येते; पण सूर्यास्तानंतर घराबाहेर पडण्याची मनाई असल्याने रात्री त्यांना केवळ थंडा फराळ करावा लागतो.

## झोपेचाहि छळ

माणसाला अन्नाप्रमाणेच झोपेचीहि जरूर असते ही गोष्ट सामान्य माणसांना कळते; पण बंगालच्या पोलिसांना हीहि गोष्ट मान्य नाही कीं काय कोण जाणे. कांही दिवसांपूर्वी डाक्का येथील सेशन्स कोर्टांत श्री. निर्मलकांत सेन या डांबून ठेवलेल्या तरुणाने आपली हृदयद्रावक हकीकत सांगतांना पोलिसावर असा आरोप केला आहे की, दररोज रात्री तीन वेळां पोलिस लोक आपल्याला झोपेंतून उठवितात. निर्मलकांताला त्याच्या घरीं डांबून ठेवून दररोज दुपारी अकरा वाजतां पोलिस चौकीवर आणि दुपारी बारा वाजतां गुप्त पोलिसांच्या कचेरींत हजेरी देण्याचा हुकूम बजाविलेला आहे. या हुकुमाप्रमाणें चालावयाचें म्हणजे त्याला भर दुपारच्या उन्हांत रोज आठ मैल पायपिटी करावी लागते. हा हुकूम बजावल्यापासून त्याची नोकरीहि गेली आहे. पुन्हा हा रात्री कुठे बाहेर पडला नाही अशी खात्री करून घेण्याकरितां रात्रीं तीन वेळां पोलिस त्याला झोपेंतून जागे करतात. या साऱ्या उपद्रवाला कंटाळून एके दिवशी गुप्त पोलिसांच्या कचेरीतून परत येतांना त्याने अफू खाऊन जीव देण्याचा प्रयत्न केला; पण सुदैवाने किंवा दुर्दैवाने तो यशस्वी झाला नाही. गेल्या डिसेंबर महिन्यांत त्याने इतःपर हजेरी न देण्याचा संकल्प करून त्याप्रमाणे मॅजिस्ट्रेटला पत्र लिहिले. तेव्हा पोलिसांनी हजेरी चुकविल्याबद्दल त्याच्यावर खटला भरला व मॅजिस्ट्रेटने त्याला सहा महिने

सक्तमजुरीची शिक्षा सांगितली. यावर अपील केलें असतां अपील कोर्टाने ती शिक्षा तीन महिन्यावर आणून ठेवली. मिळून अन्यायाचें परिमार्जन झालें नाही तें नाहीच.

निरर्थक छळाचें आणखी एक उदाहरण येथे सांगण्याजोगें आहे. बंगालचे एक मजूर पुढारी श्री. अबदुल हलीम यांना प्लरिसी हा दुर्धर रोग झाला आहे आणि बंगाल सरकारने त्यांना तराईच्या जंगलांतील एका खेड्यांत डांबून ठेवलें आहे. तेथील दूषित हवेने त्यांचे दुखणें असाध्य होण्यापूर्वी त्यांना कलकत्त्याला चिकित्सेसाठी आणावें, अशी विनवणी श्री. अबदुल हलीम यांच्या घरची मंडळी करीत आहेत; पण तीदेखील अजून मान्य झालेली नाही.

## कुटुंबाचा निष्कारण छळ

आतांपर्यंत बंगालच्या बेकायदेशीर कायद्यांच्या तावडीत सापडलेल्या व्यक्तीचे कसकसे हाल चालले आहेत या विषयींची कांही माहिती सांगितली; पण या कायद्याचा परिणाम केवळ त्या व्यक्तीलाच भोगावा लागत नसून सबंध कुटुंबालाच कसा भोगावा लागतो, हे सांगावयाचें तसेंच राहून गेलें आहे. या बाबतीत श्री. आशुतोष काहली यांच्या कुटुंबाची कर्मकथा सांगण्याजोगी आहे. या आशुतोष बाबूंना प्रथम १९१६ साली डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टाखालीं अटक झाली. पुढे १९२० साली त्यांची सुटका झाली. त्या नंतर १९२५ साली बंगाल ऑर्डिनन्सखाली त्यांना अटक झाली व १९२८ सालीं त्यांची फिरून मुक्तता झाली. त्यानंतर १९३१ सालीं गांधी-आयर्विनसमेटाच्या दिवसांत त्यांना फिरून एकवार अटक झाली व सध्या ते दिवळीच्या तुरुंगांत आहेत. आशुबाबूंचे धाकटे बंधु श्री. सुबोधरंजन काहली हे मास्तरकी करीत होते व त्यांना १९३२ साली अटक झाली व सध्या ते बहरमपूरच्या बंदिशाळेंत आहेत. त्यांचे भाचे श्री. नलिनीरंजन भट्टाचार्य हेहि कलकत्ता येथे मास्तरकी करीत होते. त्यांना १९३२ सालीं अटक झाली व तेहि सध्या दिवळीच्या कुप्रसिद्ध तुरुंगांत आहेत. आशुबाबूंचे दुसरे बंधु श्री. रासबिहारी हे एका हायस्कुलांत आज वीस वर्षें नोकरी करीत होते. पण राजबंद्यांचे बंधु असल्याच्या पापाबद्दल त्यांना नुकतेंच नोकरीवरून काढून टाकण्यांत आलें आहे.

या काहली बंधूंचें घरहि एक वर्षभर बंद ठेवण्याबद्दल त्यांच्यावर पूर्वी नोटीस बजावण्यांत आली होती. या बंधूंच्या कुटुंबांत एकंदर चोवीस माणसें आहेत व तीं मोठ्या कष्टानें आलेले दिवस कंठीत आहेत. पण असली उदाहरणें द्यावयाची तरी किती ? गतवर्षी ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या ठरावानें राजबंदी व त्यांचे कुटुंबीय यांच्या साहाय्यासाठी कॉंग्रेसनें एक फंड उभारला होता पण तो सहा महिन्यांच्या आंतच संपून गेला. आता पंडित जवाहरलाल या बाबतीत फिरून कांही खटपट करतील, अशी आशा या फंडाचे सेक्रेटरी श्री. सुरेन्द्रनाथ मैत्री यांनी एका जाहीरपत्रकांत प्रकट केली आहे.

वर्धमान जिल्ह्यांतून ताजी बातमी अशी आली आहे की, त्या जिल्ह्यांतील दोघां स्थानबद्ध कैद्यांनी आपल्या पोटगीसाठी उपास आरंभला आहे. श्री. निर्मलदास व श्री. मनतोष चक्रवर्ती या उभयतांना त्या जिल्ह्यांतील बायना या गांवी अडकवून ठेवलें आहे. कांही दिवसांपूर्वी त्या गांवी एक मेळा झाला. तो मेळा पहावयाला वरील राजबंदी गेले होते, म्हणून अधिकारी वर्गानें या महि-न्याच्या पोटगीतून एक रुपया कापून घेतला. तेव्हा आपल्याला नेहमीइतकीच पोटगी मिळावी असा त्या राजबंद्यांनी आग्रह धरला. त्याबरोबर तेथील अधि-काऱ्यांनी त्यांना पोटगीची रक्कम अजीबातच दिली नाही. त्यामुळे आदल्या महिन्याची शिल्लक संपल्यापासून त्या दुर्दैवी तरुणांनी उपास आरंभले आहेत. सध्या त्या दोघांना वर्धमान येथील सरकारी इस्पितळांत आणून ठेविलें आहे.

## लग्नालाहि अडथळा !

देशभक्तीचें वेड लागलेले तरुण आपल्या पायांत लग्नाची बेडी अडकवून घेण्याला कबूल नसतात ही गोष्ट प्रसिद्धच आहे. तेव्हा असा एखादा तरुण लग्नाला प्रवृत्त झाला तर तो आपल्या सद्वर्तनाचा सरकाराला जामीनच देत आहे, असें समजून त्याच्या मार्गांत अडथळे न आणणें हें पोलिसांचें कर्तव्यच आहे. पण बंगालच्या अविचारी पोलिसांना ही साधी गोष्टहि पटत नाही. यशोहरहून अशी बातमी आली आहे की, एका बॉंब प्रकरणांत अंदमानला जाऊन आलेले व सध्यां यशोहर येथे डांबून ठेवलेले राजबंदी श्री. निशिकांत रायचौधरी यांचें कलकत्त्यांतील एका मुलीशी लग्न ठरलें असतां आयत्यावेळीं पोलिसांनी निशिकांत

बाबूंना कलकत्ता येथे जाण्याची परवानगी नाकारली व त्यामुळे १७ जून रोजी ठरलेले लग्न आयत्या वेळीं त्यांना लांबणीवर टाकावें लागलें आहे. चितागांग-मधील प्रसिद्ध क्रांतिकारक श्री. अनंतासिंग यांची भगिनी इंदुमती व त्याचे वडिल श्री. गुलाबसिंग या उभयतांनी बारा ते तीस वर्षांच्या तरुणाशी कसलाहि संबंध ठेवूं नये म्हणून त्यांच्यावर नोटीस बजावली आहे. इंदुमतीने तीस वर्षांच्या आंतील नवरा करूं नये असा तर या नोटिशीचा उद्देश नाही ना ? हा हुकूम बदलून घेण्यासाठी श्री. गुलाबसिंग यांनी सरकारकडे अर्ज केला आहे. पण त्याचा तरी नीट विचार होईल असें कोणी सांगावे ?

—केसरी, ता. २९ जून, १९३७.



# अंदमानच्या राजबंद्यांची मागणी

अदमानामध्ये अन्नसत्याग्रह करीत असलेल्या राजबंद्यांना सहानुभूति दाखविण्याकरिता व त्यांच्या सर्व मागण्यांना पाठिंबा देण्याकरिता सर्व हिंदुस्थानभर ऑगस्टच्या १४ तारखेला 'अदमानदिन' पाळला जावा, अशी इच्छा राष्ट्राध्यक्षांनी प्रगट केली आहे. या इच्छेप्रमाणे त्या दिवशी सभा व मिरवणुकी होतीलच. पण तेवढा दिवस साजरा केला म्हणजे कॉंग्रेसचे या राजबंद्यांविषयींचे कर्तव्य संपले, असें मात्र कोणीहि समजूं नये. वस्तुतः कॉंग्रेसने आजपर्यंत जर या क्रांतिकारक कैद्यांच्या प्रश्नांकडे दुर्लक्ष केलें नसतें तर हिंदुस्थानसरकारहि त्यांच्याशी इतक्या निर्दयपणाने वागावयाला धजलें नसते आणि हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठी ज्यांनी आपल्या सर्वस्वाचा होम केला आहे असें शेकडों देशभक्त आज मृत्युपंथाला लागले नसते. आजपर्यंतच्या या दुर्लक्षाचें कॉंग्रेसला जर परिमार्जन करावयाचे असेल व या राजबंद्यांना जर पूर्ण सहानुभूति दाखवावयाची असेल, तर कॉंग्रेसच्या पुढारी मंडळींनी येत्या कॉंग्रेसचें अध्यक्षपद सुभाषबाबूंना देणें जरूर आहे. त्याशिवाय क्रांतिकारक कैद्यांना आपल्या हालअपेष्टांकडे देशाचे दुर्लक्ष होणार नाही, असा विश्वास वाटणार नाही. अशा तऱ्हेचा विश्वास आज त्यांना वाटत नाही, म्हणूनच त्यांनी सामुदायिक प्रायोपवेशनाच्या अघोर मार्गाचा अवलंब केला आहे.

गेल्या जुलैच्या आरंभींच अंदमानाला जाऊन आलेले कॉंग्रेसभक्त रायजादा हंसराज यांनी एक जाहीर पत्रक काढून अंदमानांतील राजबंद्यांना हिंदुस्थानांत परत आणण्यासाठी सर्व देशभर चळवळ सुरू करणें किती जरूर आहे व कॉंग्रेसने अशा तऱ्हेची चळवळ हाती घेतल्यास तिला या बाबतीत यश मिळण्याची कशी खात्री आहे व तशा तऱ्हेची चळवळ हिंदुस्थानांत सुरू न झाल्यास अंदमानांतील राजबंद्यांची किती निराशा होईल हें विशद केलें होते. पण असेंब्लीमध्ये सामान्यतः कधीच तोंड न उघडणाऱ्या या मुक्या सभासदाच्या बोलण्याकडे लक्ष देण्याची कोणालाहि जरूर वाटली नाही. याच सुमाराला

अंदमानांतील सर्व राजबंदी आपल्या मागण्यांचा खलिता हिंदुस्थानसरकाराकडे पाठविण्याच्या विचारांत होते. हा खलिता हिंदुस्थानसरकारला २० जुलै रोजी मिळाला व २३ रोजी हिंदुस्थानसरकाराने त्या मागण्यांना नकार दिल्याची वार्ता त्यांना कळविण्यांत आली. त्याबरोबर त्यांनी प्रायोपवेशनाला सुरुवात केली व सध्या 'ने मजसी परत मातृभूमीला, सागरा प्राण तळमळला' हा एकच निदिध्यास मनाला लावून घेऊन १८७ राजबंदी मातृभूमि आणि मृत्यु या उभयतांपैकीं कोण आपल्या हांकेला ओ देणार याची वाट पाहात भुकेमुळे व्याकुळ होऊन पडले आहेत !

हिंदुस्थानसरकारचे गृहमंत्री सर हेन्री क्रेक यांनी एकदा अंदमानाला 'कैद्यांचा स्वर्ग' ही संज्ञा दिली होती. तेव्हा आम्हांला इतकेच वाटले होते की स्वर्गवासी झालेल्या लोकांचे जसे मृत्युलोकाशी कांही दळणवळण नसते, तसें अंदमानांतील राजबंद्यांचे स्वदेशाशी कांहीहि दळणवळण राहूं शकत नाही. १९३३ साली राजबंद्यांना पुनः अंदमानाला पाठविण्याला सुरुवात झाल्यापासून आतापर्यंत अवघ्या पांच जणांनाच आपल्या आप्तेष्टांची मुलाखत घेण्याची संधि मिळाली आहे. अशाप्रकारे आप्तेष्टांचा संबंध पूर्णपणे तुटला की मनुष्याचा विवेक देखील सुटत जातो व त्याची जगण्याची इच्छाहि कमी होत जाते. आणि यामुळेच तुरुंगांतील अन्नसत्याग्रहाचे प्रसंग उद्भवतात.

'After remaining for some time in Jail there is such a strain on the nerves that even a quiet, calm and reasonable man becomes to a certain extent unreasonable. If they are allowed to have interviews with their relatives it helps them a great deal to rehabilitate themselves to their normal condition. I have also consulted Medical Officers on this point and their verdict is also the same.'

बंगाल्यांतील वरिष्ठ कौन्सिलाचे अध्यक्ष श्री. सत्येद्रचंद्र मित्र यांनी वरील उद्गार काढले आहेत. या उद्गारांवरून तरी सामान्यतः सर्व बंद्यांना आपापल्या प्रांतांतच अटकेत ठेवण्याची आवश्यकता सर्वांना दिसून येईल.

अंदमानाचे हवापाणी हिंदी कैद्यांना मानवत नाही ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. विशेषतः राजबंद्यांच्या आरोग्याची तर या तुरुंगांत अगदी दुर्दशा होते. याबाबतीत कांही आंकडे सांगितल्यास हिंदुस्थानांतील जनतेला तेथील राजबंद्यांच्या आरोग्याची कांहीशी कल्पना येईल. १९३३ सालापासून आतापर्यंतच्या अल्पावधीत अंदमानांतील राजबंद्यांपैकी आठजणांना क्षयाचा असाध्य विकार जडला व त्या सर्वांना कमीअधिक मुदतीनंतर चिकित्सेसाठी हिंदुस्थानांत पाठवावे लागले. १९३६ च्या ऑक्टोबरमध्ये सर महमद यामिनखान व रायजादा हंसराज या उभयता असेंब्लीच्या सभासदांनी अंदमानाला भेट दिली असतां त्यांना असे आढळून आले की तेथील तीनशे राजबंद्यांपैकी पंचवीसजण तेव्हा जेल हॉस्पिटलमध्ये 'इनडोअर पेशंट' म्हणून औषधे घेत होते व आणखी ७५ राजबंदी अर्धवट बरे झालेले म्हणून औषधे घेत होते. म्हणजे एकदर राजबंद्यांपैकी एकतृतीयांश त्या वेळी रुग्णावस्थेत होते. या साऱ्या आंकड्यांवरून अंदमानांतील राजबंद्यांच्या आरोग्याची अवस्था अत्यंत शोचनीय आहे, हे कोणालाहि समजून येईल.

मनुष्याचे आरोग्य सामान्यतः हवापाणी, अन्न, व्यायाम व मनस्वास्थ्य या गोष्टींवर अवलंबून असते. अंदमानाच्या त्या दीर्घवियोगद्वीपांत नऊ महिने पावसाळा असल्यामुळे तेथील हवा पराकाष्ठेची वाईट आहे. तेथील पाण्यामुळे सामान्यतः मलावरोध व डिस्पेप्शिया हे रोग रहिवाशांना जडतात. या रोगांवर नैसर्गिक उपाय म्हणजे पालेभाज्या व फळफळावळ भरपूर खाणे हा होय; या दोन्ही वस्तु अंदमानांतील अधिकारीवर्गाला देखील चांगल्या स्थितीत मिळणे कठिणच आहे मग त्या राजबंद्यांना दुर्मिळ आहेत, हे सांगायला नकोच. या कैद्यांच्या मनःस्वास्थ्याविषयी तर कांही लिहायला नकोच. व्यायामाच्या सोईबद्दल मात्र थोडेसे लिहिले पाहिजे. या कैद्यांना तुरुंगाच्या आवारांतील एका लहानशा अंगणांत फुटबॉल खेळण्याची सवलत आहे. पण त्या बेटांत नऊ महिने पावसाळा असल्याने ते अंगण नेहमीच खराब असते व त्यामुळे फुटबॉल खेळणें जमत नाही. व्हॉली बॉल खेळण्याचीहि त्या कैद्यांना सवलत मिळाली आहे. पण व्हॉली बॉलचे चेंडू विकत घेण्यावर इतके निर्बंध घातले आहेत की त्या निर्बंधांच्या कचाट्यांतून सुटून एकहि व्हॉली बॉल राजबंद्यांना मिळालेला नाही ! तुरुंगाजवळच

अफाट समुद्र पसरला आहे. पण त्या समुद्रांत स्नान करण्याची परवानगी आजपर्यंत राजबंद्यांना मिळालेली नाही !

तेव्हा या हतभाग्यांना कॅरम आणि पिंगपाँग याखेरीज दुसरे खेळ खेळण्याला संधि मिळत नाही व या खेळांनी व्यायाम नीटसा होत नाही. या तुरुंगांत एक लायब्ररी आहे व त्या लायब्ररींत अगदी जुनीं पुराणीं रद्दी पुस्तकें बरींच आहेत. त्यांत नवीन पुस्तकांची भर मात्र फारच थोडी पडते. गेल्या चार वर्षांत सुमारें १८० नवीन पुस्तकांची त्या लायब्ररीत भर पडली आहे. म्हणजे गेल्या चार वर्षांत कैद्यामागे सुमारें अर्ध्या पुस्तकाची खरेदी झाली आहे. या कैद्यांना त्यांच्या मित्रांकडून किंवा आप्तांकडून पुस्तकें किंवा पैसे आल्यास ते घेतां येतात. पण त्यांच्याशीं पत्रव्यवहार करायला मात्र तत्त्वतः नसली तरी वस्तुतः मनाईच आहे. त्यांना 'स्टेट्स्मन', 'इलस्ट्रेटेड वीक्ली', 'संजीवनी' व 'वंगवासी' हीं साप्ताहिक पत्रे मिळतात. फक्त त्यांतला बराचसा राजकीय मजकूर आधीच कातरला जातो ! सरकारच्या या साऱ्या वर्तनावरून हें स्पष्ट दिसून येतें कीं, एका हाताने दिलेल्या सवलती दुसऱ्या हाताने काढून घेऊन त्या हतभाग्यांची फसवणूक करण्याचा हा एक प्रकारचा खेळच चालला असतो. अशा परिस्थितीत त्या प्रवंचित बंद्यांनी अन्नत्यागाच्या निर्वाणीच्या उपायाचा अवलंब केला नसता तरच नवल वाटले असते.

सध्याच्या अनशनाबद्दल अशीहि वदंता आहे कीं, अंदमानाच्या तुरुंगावरील अधिकाऱ्यांनी राजबंद्यांना टोमणे मारून व त्यांची टवाळी करून आरंभीं आटोक्यांत असलेल्या या प्रकरणाला इतके आणीबाणीचें स्वरूप आणून दिले आहे. श्री. मोहनलाल सक्सेना यांनी एका जाहीर पत्रकांत असें म्हटलें आहे. " अंदमानांतील बंद्यांना उपोषणापासून परावृत्त करण्याकरितां तेथील अधिकाऱ्यांनी कांहीहि प्रयत्न केले नाहीत; इतकेच नव्हे तर मला विश्वसनीयरीत्या असें कळतें कीं २४ तारखेला उपवास करणारांची संख्या जी अवघी चार होती ती अधिकाऱ्यांच्या उर्मटपणामुळे २८ तारखेला १८७ झाली ! "

असली आणीबाणीची परिस्थिति उद्‌भवली म्हणजे आत्मसमर्थनासाठी अधिकारीवर्ग वाटेल त्या थाता मारूं लागतो. बंगालचे गृहमंत्री सर नाजिमुद्दीन

यांनी आपल्या एका भाषणांत सांगितलें आहे कीं, खून, खुनाचा प्रयत्न, चितागांग शस्त्रागारावरील हल्ला व सशस्त्र दरवडे असल्याच आरोपाखालीं शिक्षा झालेल्या तरुणांना अंदमानाला पाठविण्यांत आलें आहे. पण ही गोष्ट खोटी आहे. अंदमानाला पाठविलेल्या तरुणांपैकीं सुमारें तीस तरुणांवर तरी एवढाच आरोप होता की, त्यांच्या घरीं पोलिसांना कांही तरी शस्त्रें सांपडली. असले शस्त्रे सांपडल्याचे खटले कितपत विश्वसनीय असतात, हें दहाबारा खटल्यांत तरी दुसऱ्यांच्या घरीं आपणच शस्त्रें ठेवून पोलिसांना वर्दी दिल्याबद्दल पोलिसांच्या हस्तकांना कोर्टानें शिक्षा दिल्यामुळे आता लोकांना चांगलें कळून आलें आहे.१९३३च्या प्रायोपवेशनांत बळी पडलेले श्री. मोहित मित्र यांनाहि केवळ घरी शस्त्रें बाळगण्याच्या आरोपावरून शिक्षा झाली होती. यांच्यापेक्षांहि अत्यंत क्षुद्र, म्हणजे तुरुंगाचे नियम मोडल्याच्या आरोपावरून शिक्षा झालेल्या कित्येक तरुणांना अंदमानाला पाठविलें आहे. उदाहरणार्थ, श्री. कालीमोहन बानर्जी यांना १९३३ सालीं शाळेत जातांना वाटेंत अटक झाली व त्यांना हिजली, बहरमपूर वगैरे ठिकाणीं डांबून ठेवण्यांत आले. पुढे या बंदीनिवासाचे नियम मोडल्याच्या आरोपावरून त्यांच्यावर खटला होऊन त्यांना तुरुंगवासाची शिक्षा झाली. पुढे तुरुंगाचे नियम मोडल्याबद्दल त्यांना आणखी शिक्षा झाल्या व १९३६ च्या ऑक्टोबर महिन्यांत त्यांना अंदमानाला पाठविण्यांत आले ! असली आणखीहि कित्येक उदाहरणें देता येतील.

असो, येथपर्यंत अंदमानांतील कैद्यांचाच विचार झाला. आता त्यांची मुख्य मागणी जी राजबंद्यांची मुक्तता, तिचा थोडा विचार करणें जरूर आहे. या प्रश्नावर बोलतांना खाजा सर नाजिमुद्दीन यांनी असे आश्वासन दिले आहे कीं, कोणाहि राजबंद्याला त्याच्यापासून शांततेला अपाय पोचणार नाही, अशी खात्री पटल्यावर एक दिवससुद्धा मी तुरुंगांत ठेवणार नाही. असलीं अर्थशून्य वचनें अधिकारावर असलेले लोक नेहमी देत असतात, म्हणून एरवींच्या वेळी या वाक्याकडे दुर्लक्षच केलें असतें. पण खाजासाहेबांच्या दुर्दैवाने, त्यांची ही बढाई किती फोल आहे, हें दर्शविणारा एक प्रसंग नुकताच घडून आला असल्यामुळे त्यांच्या या वाक्याकडे बंगाल्यांतील परिस्थिति माहीत असणारांचें लक्ष गेल्यावांचून राहात नाहीं. ता. २९ जूनच्या केसरींतील 'राजबंद्यांच्या सुटकेची मागणी' या लेखांत

श्री. निर्मलकांत सेन यांना निर्बंधभंगाबद्दल तीन महिन्यांची शिक्षा कशी झाली, ही हकीकत दिलीच आहे. त्यानंतर हाती आलेल्या माहितीवरून असें कळतें की या निर्मलकांतबाबूंच्या बंदिवासाची मुदत संपली, तरी बंगालच्या गृहमंत्र्यांच्या खात्यांतील अंदाधुंदीमुळे त्यांची प्रत्यक्ष सुटका १५ दिवस उशिराने झाली ! अशा परिस्थितीत सहस्रावधि राजबंद्यांना जरूरीपलीकडे एक दिवसहि अधिक तुरुंगांत न ठेवण्याची सर नाजिमुद्दीन यांची बढाई फोल आहे.

त्याचप्रमाणें साऱ्या संशयित कैद्यांची सुटका झाल्यास फिरून एकवार हे सारे क्रांतीच्या मार्गाला लागणार नाहीत व बंगाल्यांत पुनः अन्याचारांना सुरुवात होणार नाही, अशी हमी मिळाल्याशिवाय आपण सर्व संशयितांची सुटका करू शकत नाही, असेहि सर नाजिमुद्दीन सांगत आहेत. पण हे निवळ थोतांड आहे. ते मागत आहेत, अशासारखी हमी दे. भ. सुभाषबाबूंनी अगदी अलीकडे जाहीर रीतीने दिलीच आहे इतकेच नव्हे, तर अशासारखी हमी राजबंद्यांच्या वतीने एका नामांकित इंग्रजानेदेखील हिंदुस्थानसरकारला आज अडीच वर्षांपूर्वीच दिली होती, पण तिचा काडीमात्र उपयोग झाला नाही.

अशा तऱ्हेची हमी देऊनसुद्धा बंगाल्यांतील संशयित राजबंदी का सुटत नाहीत, या कोड्याचा उलगडा वरील हमी ज्यांनी दिली होती, त्याच ॲंड्रूजसाहेबांच्या शब्दांनी होण्याजोगा आहे. ते म्हणतात—

"The whole process of detention without trial is rotten to the core. The innocent suffer with the guilty. The police force has every inducement to bribery and corruption and the corruption of the Bengal police is notorious."

ॲंड्रूजसाहेबांचे वरील उद्‌गार कोणाला कडक वाटतील, तर त्यांनी ही गोष्ट लक्षांत घ्यावी कीं ज्या प्रांतामध्ये, त्या प्रांताच्या गव्हर्नरावर गोळ्या झाडणाऱ्या एका अतिश्रीमंत तरुणाला न्यायकोर्टाने सांगितलेल्या काळ्या पाण्याच्या शिक्षेची माफी मिळते व उलटपक्षी ज्यांच्यावर कसलेहि आरोप शाबीत झाले नाहीत किंवा ज्यांना कधीहि कोर्टापुढे आणलें नाही, असे हजारों तरुण तुरुंगांतून खितपत आहेत किंवा कुग्रामांतून स्थानबद्ध होऊन कुजत आहेत, ज्या

प्रांताचे अत्यंत नामांकित पुढारी तुरुंगवासामुळे जडलेल्या दुर्धर व्याधींमुळे निकामी होऊन इस्पितळांतून पडले आहेत आणि ज्या प्रांतांतील डझनावारी पोलीस अधिकाऱ्यांना लाचलुचपतीसाठी स्वतः त्या प्रांताच्या सरकारानेच नोकरींतून काढून टाकलें आहे, अशा प्रांतांतील कारभाराचें वर्णन ज्या शद्बांत दीनबंधु अँड्रूज यांनी केलें आहे त्याहून अन्य शब्दांत कसें करता येईल ! सांगण्याचा मतलब एवढाच कीं, असले दडपशाहीचे प्रकार जोंपर्यंत चालू आहेत तोंपर्यंत ज्यांची पोळी पिकते असे अधिकारी ही दडपशाही बंद करण्याला आणि राजबंद्यांना मुक्त करण्याला नाखूष असणारच. पण त्यांच्या क्षुल्लक सबबींकडे लक्ष न देतां लोकनियुक्त मंत्रिमंडळाने केवळ न्यायाकडे आणि दयार्द्रतेकडे दृष्टि देऊन किमानपक्ष बिनचौकशीने डांबून ठेवलेल्या सर्व राजबंद्यांची तत्काळ मुक्तता करावी आणि अंदमानाचा कैदखाना बंद करून तेथील बंदिवानांना त्यांच्या मातृभूमीत आणून ठेवावें.

— केसरी ता. १३ ऑगस्ट, १९३७.



# राजबंद्यांची करुण कहाणी

## ही जबाबदारी कोणावर ?

पाहतां पाहतां अंदमानांतील राजबंद्यांच्या उपोषणाला एक महिना होऊन गेला. त्या एकाच कुप्रसिद्ध तुरुंगांत आज २२३ राजबंदी मृत्युपंथाला लागले आहेत. त्याशिवाय दिवळी, अलीपूर, बहरमपूर इत्यादि इतर तुरुंगांतून कमींत कमी ६५० राजबंद्यांनी प्रायोपवेशन आरंभिलें आहे. या सर्व राजबंद्यांच्या हताश माता, पत्नी, भगिनी, कन्या, किंवा पिता, पुत्र, बंधू यांनीहि अंतर वैरी झाल्या-मुळे असहाय होऊन आपापल्या घरी अश्रुपर्व आरंभिलें आहे. पुढारी किंकर्तव्यमूढ होऊन गेले आहेत. असला आणीबाणीचा प्रसंग आयर्लंडच्या स्वातंत्र्ययुद्धांतहि पूर्वी उद्भवला होता. त्या वेळी आयरिश क्रांतिकारकांचे प्रमुख पुढारी प्रेसिडेंट डी व्हॅलेरा यांनी एक निर्वाणीचें आज्ञापत्रक काढून आपल्या अनुयायांचें प्रायोपवेशन थांबविलें व आयरिश देशभक्तांच्या अमूल्य प्राणांचें संरक्षण केलें. पण आज, अखिल हिंदुस्थानांत काळ्यापाण्याची शिक्षा भोगत असलेले क्रांतिकारक ज्याच्या शब्दाला मान देतील असा, एकहि पुढारी नाही. यामुळे केवळ आपल्या पक्षाची शिस्त सांभाळण्यासाठी तरी क्रांतिकारक तरुण अन्नस्वीकार करतील, असाहि संभव दिसत नाही. तेव्हा हिंदुस्थानाच्या आजच्या पुढाऱ्यांनी क्रांति-कारक तरुणांना अन्नत्याग थांबविण्याच्या सूचना करण्यापेक्षां, हिंदुस्थान सर-कारला त्यांची मागणी मान्य करावयाला लावण्यासाठी शक्य ते सर्व प्रयत्न करणें व उपाय योजणेंच योग्य होईल. या अन्नसत्याग्रहामुळे जी परिस्थिति निर्माण झाली आहे, तिची जबाबदारी कोणी घ्यावी, याविषयीं हिंदुस्थान सरकार व प्रांतिक सर-कार यांच्यांत वाद उपस्थित झाले आहेत. हिंदुस्थान सरकारने मागे एका पत्रकांत म्हटलें होतें की, राजबंद्यांना स्वदेशीं आणण्याचा हुकूम देण्याचा अधि-कार सर्वस्वीं हिंदुस्थान सरकारचा आहे; पण आता श्री. सक्सेना यांना लिहि-लेल्या पत्रांत व्हाइसरॉयसाहेब म्हणतात,

'In reply to this, I will not stress the fact that the Government of India is not the only Government concerned.'

या वाक्यावर अधिक भाष्य नकोच. असो, अंदमानांतील राजबंद्यांबद्दल व्हाइसरॉय लिहितात,

'Every one of these prisoners had been convicted by courts after the due process of trial.'

## काळेपाण्याची शिक्षा दिली होती काय ?

व्हाइसरॉय साहेबांनी कोर्टाचें नांव घेतलें आहे, म्हणून आम्हांला त्यांना असें विचारावेसे वाटतें कीं १९३३ पासून आतापर्यंत अंदमानाला पाठविलेल्या सुमारें ३२५ राजबंद्यांपैकी किती जणांना कोर्टाने काळेपाण्याची शिक्षा सांगितली होती ? आमच्या माहितीप्रमाणे, कोर्टाने ज्यांना काळेपाण्याची शिक्षा सांगितलेली नाही, असे १०० हून अधिक राजबंदी आज अंदमानांत आहेत व सरकार त्यांना निष्कारण काळेपाण्याची शिक्षा भोगायला लावीत आहे. याप्रमाणें धडधडीत अन्यायाने अंदमानांत ठेवलेल्या राजबंद्यांनी आपल्या गाऱ्हाण्यांकडे लक्ष वेधण्यासाठी उपवास सुरू केला तर त्यांना न्याय देणार का यतींद्रनाथ दास यांच्याप्रमाणें भुकेने तडफडून मरूं देणार ?

या राजबंद्यांना ज्या प्रकारें वागविण्यांत येते, त्याविषयीं कविवर्य रवींद्रनाथ यांनींहि एक प्रश्न विचारला आहे.

"No sensible person would deny that there must be provisions for the punishment of law-breakers in any civil society, but must such a punishment be entirely devoid of all sense of humanity and decency? There are law-breakers in England too, even political offenders, but are they ever subjected to a hundredth part of the humiliation and suffering which is the daily lot of our prisoners?"

या ठिकाणी अंदमानांतील सरकारी अधिकाऱ्यांच्या अमानुष निर्घृणपणाचा एक नमुना नुकताच उघडकीला आला आहे त्याचा उल्लेख करणे जरूर आहे.

गेल्या १३ तारखेला रायबहादुर सुरेंद्रनारायण सिंह यांनी बंगालच्या विधिमंडळांत विचारलेल्या एका प्रश्नावरून असें कळतें कीं १९३३ च्या अन्नसत्याग्रहाला बळी पडलेले श्री. महावीरसिंग, श्री. मोहितमोहन मित्र व श्री मोहनकिशोर नमःदास यांची प्रेतें धर्मविधीप्रमाणें अंतिम संस्कारहि न करतां अंदमानाच्या अधिकाऱ्यांनी बिनमुर्वतपणाने समुद्रांत फेकून दिली !

## अन्नसत्याग्रहाचे मागील दाखले

राजबंद्यांविषयी हिंदुस्थान सरकारने काढलेल्या पत्रकांत व व्हाइसरॉयसाहेबांनी सक्सेना यांना लिहिलेल्या पत्रांत अशी धमकी दिली आहे कीं राजबंद्यांनी अन्नसत्याग्रह थांबवीपर्यंत सरकार त्यांच्या कोणत्याहि मागणीचा विचारसुद्धा करावयास तयार नाही, कारण अन्नसत्याग्रहाला भिऊन जर सरकार कैद्यांच्या मागण्या मान्य करूं लागेल तर सरकाराला राज्य करणेंच अशक्य होईल. पण हें विधान सत्याला सोडून आहे. गांधीजींनी आतापर्यंत तुरुंगांत तीन वेळा उपास केले व यापैकीं प्रत्येक उपवासाच्या वेळीं सरकारला आपला हट्ट सोडून गांधीजींचें म्हणणे मान्य करावे लागले. पण तेवढ्याने सरकाराला राज्य करणे अशक्य झाले नाही किंवा तुरुंगांतील कोणाहि बदमाषाने गांधीजींचे अनुकरण करून आपली सुटका करून घेण्याचा प्रयत्न केल्याचेहि अजूनपर्यंत एखादें उदाहरण घडलेलें नाही. आपल्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घ्यावयाला अन्नसत्याग्रह हें एकच शस्त्र राजबंद्यांच्या हाती असते व प्रसंगविशेषी या शस्त्राचा उपयोग इंग्लंडांतील सरदार घराण्यांतील व्यक्तींनीदेखील केला आहे. उदाहरणार्थ, बंगालचे माजी गव्हर्नर लॉर्ड लिटन यांच्या भगिनी लेडी कॉन्स्टन्स लिटन यांना मताभिलाषी बायांच्या धिंगाण्यांत शिक्षा झाली असतां त्यांनी आपली तावडतोब सुटका व्हावी म्हणून अन्नसत्याग्रहाला सुरुवात केली. लेडी कॉन्स्टन्स लिटन यांनी तुरुंगात जातांना एका मोलकरणीचा वेष केला होता व आपलें नांवहि ' जेन वार्टन ' असें सांगितलें होतें. त्यामुळे तुरुंगांत त्यांचा परोपरीने छळ करण्यांत आला व जबरदस्तीने अन्न घालण्याच्या अत्याचारामुळे त्यांच्या हृदयालाहि इजा झाली. पुढे त्यांचें खरें नांव उघडकीला येतांच इंग्लंडच्या सरकाराने त्यांना तावडतोब बंधमुक्त केलें. पण तुरुंगांतील हालामुळे सुटकेनंतर लौकरच त्यांना

पक्षघाताचा विकार जडला व सरतेशेवटीं त्याच विकाराने त्यांचा अंत झाला. आपल्या भगिनीच्या अन्नसत्याग्रहाचा लॉर्ड लिटन यांच्या मनावर कायमचा परिणाम झाला असल्याने ते बंगालचे गव्हर्नर असतांना मंडाले येथील बंगाली राजबंद्यांनी अन्नसत्याग्रह केला, तेव्हा राजबंद्यांच्या मागण्या मान्य करून लॉर्ड लिटन यांनी तो सत्याग्रह शक्य तितक्या लवकर मिटवून टाकला.

## अत्याचारी राजबंदी

आता कोणी असा आक्षेप घेतील की, अंदमानांतील राजबंद्यांच्या अपराधाच्या मानाने लेडी कॉन्स्टन्स लिटन यांचा अपराध अगदी सौम्य होता. या आक्षेपाला असे उत्तर देता येईल की, लेडी कॉन्स्टन्स लिटन यांच्या सुटकेच्या मागणीच्या मानाने अंदमानांतील कैद्यांची स्वदेशी परत पाठविण्याची मागणीहि अगदी सौम्य आहे. तरी पण या आक्षेपकांच्या समाधानासाठी आणखी एखादें उदाहरण देणे जरूर आहे. हिंदुस्थानाचे माजी सर सेनापति लॉर्ड किचनेर यांची भाची पार्कर हिने डायनामाइटच्या साहाय्याने रॉबर्ट बर्न्सचे जन्मस्थान उडवून देण्याचा प्रयत्न याच मताभिलाषी बायांच्या चिंगाण्यांत केला. या अपराधाबद्दल तिला पकडलें असतां तिने लगेच सुटकेची मागणी करून अन्नसत्याग्रहाला सुरुवात केली. आणि सांगण्याचा मुद्दा हा की, हिची देखील ब्रिटिश सरकारने एका महिन्याच्या आंतच सुटका केली. याचप्रमाणे आगी लावण्याच्या आरोपावरून शिक्षा झालेल्या अनेक मताभिलाषिणींची उदाहरणें सांगतां येतील.

राजबंद्यांची मागणी मान्य करावयाची नसल्यास त्यांना उपासमारीने मरूं देणे किंवा जबरदस्तीने अन्न घालून वांचविणें या दोहोंपैकीं एक मार्ग सरकारला पत्करावा लागेल. मरणासाठी आतुर असणें हा क्रांतिकारकांच्या स्वभावांतील एक नेहमीचा दोष असल्याने ते मृत्यूच्या भीतीने उपवास थांबवितील, अशी आशा करायलाहि फारशी जागा नाही. त्यांच्यांपैकी कित्येकजण परलोकी गेलेल्या आपल्या सहकाऱ्यांना भेटण्यासाठीं आतुर झालेले आहेत, कित्येकजण आपल्या मृत्यूने प्रतिपक्षाच्या अब्रूची होईल तितकी हानि करावी या बुद्धीने प्रेरित झाले आहेत आणि कित्येकजण 'येईन नऊ महिन्यांनी' या कल्पनेवर विश्वास ठेवणारे असल्याने मातृभूमीच्या उद्धारासाठी एक जन्म खर्चून शक्य तितक्या लौकर पुन-

जन्म घेण्यासाठी उत्सुक झाले आहेत. या त्यांच्या मनोवृत्तीमुळे अजून देखील या जन्मांत आपण कांही कार्य करूं शकूं, असा आशेचा किरण त्यांना दिसल्याखेरिज ते आपण होऊन अन्न घ्यावयाला लागणार नाहीत.

## जबरीने अन्न घालण्यांत धोका

आता त्यांना जबरदस्तीने अन्न घालण्याचा प्रयत्न केल्यास त्याचा परिणाम काय होईल, याचा थोडासा विचार केला पाहिजे. डॉक्टर विन्स्लो या नामांकित विशेषज्ञाने जबरदस्तीने अन्न घालण्याचे परिणाम काय होतात हे सांगतांना म्हटले आहे,

'It involves the risk of injury to heart and lungs and of sudden death even in cases of mild heart disease.'

इ. स. १९३३ साली अंदमानांतील राजबंद्यांनी अन्नसत्याग्रह केला, त्या वेळी तुरुगावरील अधिकाऱ्यांनी पंजाबचे श्री. महावीरसिंग यांना जबरदस्तीने अन्न घातले. त्या वेळीं झालेल्या धडपडीत श्री. महावीरसिंग यांच्या हृदयाला दुखापत होऊन ते बारा तासांनीच परलोकवासी झाले! आज अंदमानांत असलेल्या राजबंद्यांमध्ये श्री. शंभूनाथ आजाद, श्री. गौरीशंकर डुबे, श्री. बटुकेश्वर दत्त, श्री. रामप्रताप सिंह, श्री. गणेश घोष, श्री. सुनीलरंजन चट्टोपाध्याय इत्यादि २२ राजबंद्यांना आधीच हृद्रोग जडलेला आहे. यांना जबरदस्तीने अन्न घालण्याचा प्रयत्न केल्यास त्याचा परिणाम सुप्रसिद्ध मजूर पुढारी केरहार्डी यांनी एका प्रसंगी म्हटल्याप्रमाणें, एखाद्याने आत्महत्या करूं नये, म्हणून त्याचा खून करण्यासारखाच आपल्या हेतूच्या अगदी विपरीत होणार आहे!

जबरदस्तीने घातलेले अन्न कित्येकदां घालणाऱ्यांच्या चुकीमुळे पोटांत न जातां फुफ्फुसांत जातें व त्यामुळे ताबडतोब न्युमोनिया होतो. १९३३ साली मोहितमोहन मित्र यांच्या बाबतींत हाच प्रकार घडून आला. श्री. मित्र यांना एकदाच जबरदस्तीने अन्न घातलें, पण तेवढ्याने न्युमोनिया होऊन ते एका आठवड्यांत मृत्युमुखीं पडले. चांगल्या प्रकृतीच्या माणसाला जबरदस्तीने अन्न घातलें असतां काय होते हें डॉ. विन्स्लो यांनी पुढील वाक्यांत सांगितलें आहे,

" If persisted in, the results of forcible feeding would be seriously to injure the contitution, to lacerate the parts surrounding the mouth, to break and ruin the teeth. In normal individuals the very fact of resorting to forcible feeding tends to injure the digestive organs, to aggravate any bronchial condition which may exist and to cause dangerous chronic symptoms."

या सर्व कारणांसाठी कैदी लोकांचे प्राण वांचविण्याच्या सदुद्देशाने मुद्धा तुरुंगांवरील अधिकाऱ्यांनी जबरदस्तीने अन्न घालण्याचे प्रयोग करूं नयेत असें आमचे स्पष्ट मत आहे.

## बिनचौकशीचे राजबंदी

अंदमानांतील राजबंद्यांनी उपोषण सुरू केल्यामुळे त्यांना सहानुभूति दर्शविण्यासाठी दिवळीच्या तुरुंगांतील राजबंद्यांनीहि अन्नत्याग केला आहे. चौकशीशिवाय अटकेत ठेवलेले हे राजबंदी क्रांतिकारक नाहीत. खाजा सर नाजिमुद्दीन यांच्या सांगण्याप्रमाणें १९२८ च्या प्रारंभी बंगालच्या तुरुंगांतून चौकशीशिवाय डांबून ठेवलेल्या तरुणांची संख्या एकंदर १७१ होती. पुढे १९२९ च्या आरंभापर्यंत बंगाल सरकारने या साऱ्या तरुणांना बंधमुक्त केले. या बंधमुक्त तरुणांपैकी सहा जणांना चितागांग शस्त्रागारावरील चढाईसाठी व आणखी सहा जणांना इतर कांही क्रांतिकारक अपराधासाठी शिक्षा झाल्या आहेत. उरलेल्या तरुणांपैकी ९८ असामीना चौकशीशिवाय डांबून ठेवले आहे व बाकीच्या ५९ जणांविरुद्ध मात्र कांहीहि इलाज योजलेले नाहीत. खाजासाहेबांच्या या आंकड्यावरून ही गोष्ट पूर्णपणें सिद्ध होते कीं १९२४ व १९२५ सालीं डांबून ठेवलेल्या तरुणांपैकी अवघे १२ जणच काय ते क्रांतिकारक होते, बाकीच्यापैकीं ९८ तरुण देशाच्या राजकारणांत भाग घेणारे होते पण ते क्रांतिकारक चळवळींत भाग घेत असल्याचा सरकारजवळ कांहीहि पुरावा नाही. बाकीचे ५९ जण तर अगदींच निर्लेप असल्याने क्रांतिकारक चळवळीच्या ऐन भरांतसुद्धा बंगाल सरकारला त्यांना अटक करण्याची आवश्यकता वाटली नाही.

## तुरुंगांत कसें वागविण्यांत येतें ?

सर नाजिमुद्दीन यांनी त्याच भाषणांत असेंहि एक विधान केलें आहे कीं बंगालच्या आजच्या सरकाराच्या मनांत क्रांतिकारकांचा सूड उगविण्याची बुद्धि नाही. बंगाल सरकारच्या वर्तनावरून तरी हे विधान खरें वाटत नाही. याविषयीं वाटेल तितक्या करुण कथा सांगता येतील. उदाहरणार्थ, कुमारी सुनीति चौधरी या अल्पवयी बालेला एका कलेक्टराला मारून टाकल्याबद्दल जन्मठेप काळे-पाण्याची शिक्षा झाली आहे. शिक्षा सांगतांना कोर्टाने तिला बी क्लास दिला असून सुद्धा सरकारने दोन महिन्यांनी तिला सी क्लासांत ढकलले. इतकेच नव्हे तर तिच्या वडिलांचें पेन्शन बंद केले व तिच्या दोघा भावांना चौकशीशिवाय डांबून ठेविलें. तुरुंगवासाच्या हालांमुळे सुनीतीला आज वेड लागण्याची लक्षणे दिसत आहेत. चितागांग येथील श्री. अनतसिंगांची भगिनी व त्यांचे वडिल यांच्याशी सरकार आज देखील कसे वागत आहे, हे सर्वांना माहीत आहेच. बंगालच्या तुरुंगांत सध्या सुमारे एक डझन राजबंदिनी आहेत. या साऱ्या तरुणींना निरनिराळ्या तुरुंगांतून ठेवलें असून त्यांना निर्ढावलेल्या गुन्हेगार स्त्रियांच्या संगतींत रहावें लागते. या साऱ्या तरुणींना एका तुरुंगांत ठेवण्याची साधी मागणीहि परवा ख्वाजासाहेबांनी नाकारिली आहे.

बंगाल कौन्सिलांतून झालेल्या प्रश्नोत्तरावरून असे कळते कीं, चौकशी-शिवाय अटकेंत ठेवलेल्या तरुणांपैकीं एकंदर बाराजणांना वेड लागलें, त्यांपैकीं चौघांचें वेड सध्या कमी झालें असून बाकीच्यांना वेड्यांच्या इस्पितळांत पाठवावें लागले, वंगीय व्यक्ति स्वाधीनता संघाने आपल्या ताज्या पत्रकांत आणखीहि तिघाजणांना वेड लागल्याचें प्रसिद्ध केलें आहे. त्याच संघाच्या ताज्या पत्रकावरून असेंहि कळतें कीं, श्री. व्रजेंद्र चौधरी नांवाच्या बहरमपूर बंदी-निवासांतील तरुणाने नुकतीच आत्महत्या केली. पण या बाबतींत सरकारी चौकशी अजून व्हावयाची आहे.

## मनोवृत्तींत पालट झाला नाही !

राजबंद्यांची मनोवृत्ति पालटली आहे कीं नाही, याविषयीं सध्या व्हाइस-रॉय आणि सक्सेना यांच्यामध्ये वाद चालू आहे. वर उल्लेखिलेल्या आपल्या पत्रांत व्हाइसरॉय साहेब म्हणतात—

'I can only say that, information available to me, has satisfied me that the prisoners have given no sign whatever of any change and that indeed so far from this being the case their attitude has on a number of occasions indicated the same defiant and violent spirit which led them to commit the crimes.'

व्हाइसरॉयसाहेबांचे मत अशाप्रकारे कलुषित होण्याला काय कारण झालें असावे याचा एक नमुना येथे सांगितला पाहिजे. कांही दिवसापूर्वी दिवळींच्या बंदीनिवासांत एके ठिकाणी बॉंब सांपडले. तेव्हां या प्रकरणाची पूर्ण चौकशी करण्याकरिता बंगालहून गुप्त पोलिसखात्याचे तीन इन्स्पेक्टर दिवळीला गेले. या इन्स्पेक्टरांच्या चौकशीत असे निष्पन्न झाले की, त्या बंदीनिवासांतील मोलकऱ्यांची कामे करावयासाठी ठेवलेल्या कांही बदमाष कैद्यांनी आपण स्वतःच बॉंब तयार करून राजबंद्यांवर किटाळ आणण्याकरिता त्यांच्या बराकीतून ते लपविले होते. असले एखादे प्रकरण उपस्थित झालें की, त्या प्रकरणाचा प्रारंभ तेवढा व्हाइसरॉयसाहेबांच्या कानावर जातो व तेवढ्यावरून त्यांचे पूर्वग्रह अधिक दृढ होत जातात.

## नवे करडे सुपरिंटेंडेंट

याचें अगदी खरे कारण सांगावयाचे म्हणजे इतक्या वर्षांच्या तुरुंगवासानंतर सुद्धा हे सारे राजबंदी अमर्षशून्य जंतु बनले नाहीत, हे शल्य अधिकारी वर्गाच्या हृदयांत सलत आहे. १९३३ साली अंदमानांतील राजबंद्यांनी आपल्या यातनांकडे हिंदुस्थानसरकाराचे व जनतेचेहि लक्ष्य वेधून घेतले, हे पाहून त्यांना वठणीवर आणण्यासाठीं अंदमानच्या कमिशनरांनी एका करड्या जेल सुपरिंटेंडेंटाची नेमणूक केली. त्याने आपल्या कठोर वर्तनाने व कटु वाणीने त्या स्वाभिमानी राजबंद्यांना अगदी सतावून सोडलें आहे. त्याच्या वर्तनाविरुद्ध अनेक तक्रारी राजबंद्यांनी त्याच्या वरिष्ठांकडे केल्या पण त्यांची कुठेंच दाद लागली नाही. अखेरीला हा सारा छळ असह्य होऊन सुधेदु दाम नांवाच्या एका तरुणाने निषेधप्रदर्शनासाठी त्या सुपरिंटेंडेंटाला एक वेताची छडी मारली! त्याबरोबर हॉस्पिटलमध्ये बिछान्याला खिळलेल्या त्या तरुणाला सुपरिंटेंडेंट, जेलर, डॉक्टर या सर्वांनी लाथा, बुक्या, काठ्या इत्यादींनी झोडपून अंथरुणावरून ओढून जमिनीवर टाकून दिलें. त्यानंतर त्याच्या-

वर खटला भरून त्याला ३० फटक्यांची शिक्षा दिली. ती शिक्षा बजावण्यापूर्वी त्याला क्षय झाला आहे कीं काय याची क्ष किरणांनी तपासणी केली, हा मोठाच उपकार म्हटला पाहिजे ! ही सारी हकीकत अंदमानांतून नुकतेच सुटून आलेले एक राजबंदी श्री. ध्रुवेश चट्टोपाध्याय यांनी सांगितली आहे व लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे सभासद श्री. अमरेंद्रनाथ चट्टोपाध्याय यांनी ती प्रसिद्ध केली आहे. ह्याच सुधेंदु दाम हल्ली अत्यवस्थ असल्याची तार त्याच्या वडिलांस अंदमानच्या कमिशनरकडून आली आहे.

### क्षयाची भावना कितींना जडली ?

अंदमानांतील राजबंद्यांच्या आरोग्याची कांही नवीन माहिती खाजा सर नाजिमुद्दिन यांनी नुकतीच बंगाल कौन्सिलांत सांगितली आहे. ते म्हणतात, गेल्या मार्चपासून जुलैपर्यंत पूर्णपणे प्रकृति बिघडून गेल्यामुळे १८ राजबंद्यांना अंदमानाहून परत आणावें लागलें, यांपैकीं दोघाजणांना वेड लागल्यामुळे त्यांना वेड्यांच्या इस्पितळांतून कोंडून ठेवले आहे. याप्रमाणें हिंदुस्थानांत परत आणलेल्या राजबंद्यांपैकी श्री. मोहितमोहन अधिकारी हे थोड्याच दिवसांत मृत्युमुखीं पडले, असें कौन्सिलचे सभासद म्हणतात. खाजासाहेबांनी सांगितलें कीं, आम्ही त्याला भागलपूरच्या तुरुंगांत पाठविले होतें, तो मेला आहे कीं जिवंत आहे ते आम्हांला माहीत नाही ! अंदमानबंदीसहाय्यक समितीचे सेक्रेटरी श्री. सौम्येंद्रनाथ टागोर यांनी असें प्रसिद्ध केलें आहे की, सध्या अंदमानांत असलेल्या अठरा राजबंद्यांना क्षय झाला आहे. उपोषणानिमित्त हिंदुस्थानांत आणलेले डॉ. बोस व श्री. दत्त यांनाहि तोच विकार जडला आहे.

या व अशाच प्रकारच्या हृदयद्रावक हकीकती बंगाली वृत्तपत्रांतून नित्य प्रसिद्ध होत आहेत. इतर प्रांतांतील पत्रांतून तितकी सविस्तर माहिती येऊं शकत नाही. त्यामुळे राजबंद्यांच्या परिस्थितीचा भयंकरपणा त्यांच्या लक्षांत येत नाही. परंतु बंगाल सरकारला ही सर्व इत्थंभूत माहिती असल्याने तेथील मंत्रिमंडळाने या प्रकरणाची अशी टोलवाटोलवी चालवावी आणि हिंदुस्थान सरकारावर जबाबदारी टाकून स्वस्थ बसावें हें अत्यंत गर्हणीय आहे.

— केसरी, ता. २० ऑगस्ट, १९३७.

# परस्थ हिंदी देशभक्तांची मागणी

ता. १५ सप्टेंबर रोजी सिमल्याच्या कौन्सिल ऑफ स्टेटच्या बैठकीत श्री. ब्रिजलाल ब्रियाणी यांनी, राजा महेंद्रप्रताप, लाला हरदयाळ, प्रो. खानखोजे व इतर परस्थ हिंदी देशभक्तांना हिंदुस्थान सरकाराने स्वदेशी परत येऊं द्यावें, अशा आशयाचा ठराव मांडला होता. या ठरावावर सरकारतर्फे भाषण करतांना मि. मॅक्सवेल यांनी अनेक बेजबाबदार विधाने केली आहेत. त्यांचा परामर्श प्रस्तुत लेखांत घ्यावयाचा आहे.

मि. मॅक्सवेल यांनी आपल्या भाषणाच्या प्रारंभीच म्हटलें आहे:—

The terms banishment and exile used in the course of the debate were entirely wrong and inapplicable. There was not a single Indian banished by the Indian Government till now.

पण मि. मॅक्सवेल यांचे हे विधान वास्तविक परिस्थितीचें निदर्शक नाही. ही गोष्ट खरी आहे की, हिंदुस्थानसरकाराने आजपर्यंत कोणाहि हिंदी इसमाला उघडपणें हद्दपारीची शिक्षा सांगितलेली नाही. पण सुभाषबाबूसारख्या पुढाऱ्यांना एखाद्या बेकायदेशीर कायद्याखालीं अटक करावयाची व मग परदेशीं जाण्याच्या अटीवर त्यांची मुक्तता करावयाची आणि परदेशी गेल्यावर त्यांना स्वदेशी परत यावयाचा पासपोर्ट नाकारावयाचा, हा सारा प्रकार हद्दपारीच्या शिक्षेचेंच सहोदर भावंड आहे ! अगदी अशाच रीतीने हिंदुस्थानसरकाराने पूर्वी मि. हॉर्निमन यांनाहि हद्दपार केले होतें. पुढे सुभाषबाबूंनी व हॉर्निमनसाहेबांनी सरकारी हुकूम धाब्यावर बसवून हिंदुस्थानांत प्रवेश केला व त्यांच्या आशावादीपणाचें चीज होऊन आज ते हिंदुस्थानांत स्वतंत्र नागरिक म्हणून वावरत आहेत, ही गोष्ट वेगळी; पण आपण कोणाला कधी हद्दपार केलेंच नाही, असें सांगणें म्हणजे वस्तुस्थितीचा विपर्यास करणें होय.

## हद्दपारीचा एक प्रकार

आपल्या पायांनी परदेशी गेलेल्या इसमांना स्वदेशी परत येण्याचा पासपोर्ट नाकारणे हाहि हद्दपारीचाच एक प्रकार म्हटला पाहिजे. हिंदुस्थान सरकाराच्या या धोरणाने आजपर्यंत अनेक देशभक्तांची परदेशांतून निष्कारण कुचंबणा झाली आहे. उदाहरणार्थ, एका काळीं ब्रिटिश पार्लमेंटचे सभासद असलेले श्री. शापूरजी सकलातवाला यांनी आपल्या अखेरच्या दिवसांत हिंदुस्थानांत परत येण्यासाठी कित्येकदा पासपोर्ट मागितला असतां तो नाकारण्यांत आला व सरतेशेवटी हृदय-क्रिया थांबून त्यांचा विलायतेतच अंत झाला. हीच गत मद्रासचे श्री. चंपकरमण पिल्ले व मुंबईचे पंडित श्यामजी कृष्णवर्मा या उभयतांचीहि झाली. पंडितजीचे मित्र व सहकारी श्री. राणा हेहि आता स्वदेशी परतण्याची आशा सोडून पर-देशांत मृत्यूची प्रतीक्षा करीत दिवस कंठीत आहेत!

मि. मॅक्सवेल यांनी आपल्या भाषणांत पुढे असे म्हटले आहे:—

"The persons discussed about today might be more accurately described as political absconders. It is open to any of them to return to India if they wish so and we shall be only too glad to put them before the Law Courts."

पण मि. मॅक्सवेलसाहेबांचे हेहि विधान खरे नाही असें पुढील उदाहरणा-वरून दिसून येईल. पंजाब आणि अमेरिकेतील संयुक्त संस्थानें या ठिकाणी काम करणाऱ्या गदरपक्षाचे नामांकित पुढारी लाला हरदयाळ हे आज कित्येक वर्षां-पासून लंडन येथेच राहात आहेत. पण अद्यापि त्यांना पकडून त्यांच्यावर खटला भरण्याचा खटाटोप सरकारने केलेला नाही. सामान्यतः इंग्रज सरकार विदेशांतून वावरणाऱ्या हिंदी देशभक्तांना आपल्या जाळ्यांत पकडण्याकरिता लक्षावधि रुपये खर्चावयाला तयार असतें, ही गोष्ट आजपर्यंत अनेक उदाहरणांवरून सिद्ध झाली आहे. असे असूनसुद्धा इंग्रज सरकाराने लाला हरदयाळ यांना अटक केली नाही. मि. मॅक्सवेल साहेब एका तोंडाने म्हणतात:—

"On one occasion Hardayal was wanted for several capital offences. The request on his behalf is for an amnesty

but in view of his past record it is impossble to grant it. He is welcome to face a trial in India for waging war against the Kiı g."

हेच मॅक्सवेल साहेब आपल्या भाषणाच्या अखेरीला दुसऱ्या तोंडाने सांगतात,

"If we are assured on good authority that Hardayal and Obeidullah had totally renounced their past creed and if they give an undertaking, not to participate in revolutionary and communist activities in future, Government will consider their cases sympathetically."

मि. मॅक्सवेल यांचे दुतोंडी भाषण वाचून सामान्य वाचकांना स्वाभाविकपणेच विस्मय वाटेल; पण लाला हरदयाळ यांच्या चरित्राचें रहस्य ज्यांना माहित आहे, त्यांना या भाषणाचे कांहीच नवल वाटणार नाही.

## आधुनिक हेर

कांही वर्षांपूर्वी 'Vigilant" हे छद्मनाम धारण करणाऱ्या ब्रिटिश इंटेलिजन्स सर्व्हिसमधील एका हेराने 'Secrets of Modern Spying' या नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें. त्या पुस्तकांत आधुनिक हेर कोणत्या मिषांनी वावरतात, हे सांगतांना हा लेखक म्हणतो—

"Another good pose for a spy was that of a member of a subjected and oppressed race. One of Britain's cleverest spies was a Hindu. This gentleman played the part of a champion of Home Rule for India so successfully that he obtained the permission to reside in Berlin during the War, where he was much made of. Coming into contact with many prominent personages who were anxious to learn his views on the situation in India and the possibilities of fomenting rebellion there, he contrived to transmit much useful information, but eventually fell under suspicion and made his way into a neutral country a few hours before a warrant for his arrest was issued."

याचा सारांश हा कीं, गेल्या महायुद्धामध्यें इंग्रजांचा एक अति धूर्त हिंदु हेर आपण स्वराज्यवादी असल्याचा बहाणा करून जर्मनीत शिरला व त्याच्या-मार्फत जर्मनांच्या पुष्कळ महत्त्वाच्या बातम्या इंग्रजांना समजल्या. सरतेशेवटीं जर्मन पोलिसांना त्याचा संशय आला, पण त्याच्यावर वॉरंट सुटण्यापूर्वीच तो एका तटस्थ राष्ट्राच्या हद्दींत पळून गेला. हा अति धूर्त हिंदु हेर कोण याचा उलगडा ता. २५-८-१९३१ च्या केसरींतील लेखांत पूर्वीच झाला आहे. पण ही सर्व हकीकत आज पुनः सांगण्याचे कारण हेंच कीं हद्दपार देशभक्तांना सहानु-भूति दाखवितांना आमच्या पुढाऱ्यांनी त्यांच्याविषयीं अद्ययावत् माहिती मिळवावी.

## रासबिहारी बोस

खरे हिंदी क्रांतिकारक जगाच्या पाठीवर कोठेहि फिरत असले तरी इंग्रज सरकार त्यांचा कसा पिच्छा पुरवीत असतें, याचीं कांही उदाहरणें येथे सांगितलीं पाहिजेत. १९१५ च्या फेब्रुवारीत लाहोर, पेशावर, कोहाट वगैरे शहरांतील सुमारें २० किंवा २५ मुसलमान विद्यार्थी हिंदुस्थानांत राज्यक्रांति घडवून आणण्याच्या उद्देशाने अफगाणिस्थानांत पळून गेले असता इंग्रज सरकारच्या चिथावणीमुळे अफगाणिस्थानच्या सरकारने त्यांना ताबडतोब अटक केली. पुढे तेव्हाच्या अमि-रांचे बंधु नासिरुल्लाखान यांच्या मध्यस्थीने त्यांची सुटका झाली हा भाग वेगळा. आज जपानमध्ये स्थायिक झालेले श्री. रासबिहारी बोस यांना आपल्या स्वाधीन करण्याद्दल इंग्रज सरकारने जपान सरकारजवळ इतका आग्रह धरला होता कीं, जपानसारख्या स्वाभिमानी राष्ट्रानेसुद्धा त्यांना इंग्रजांच्या स्वाधीन करावयाचें ठर-विलें होतें. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं जपानच्या 'ब्लॅक ड्रेगन' या नामां-कित संस्थेच्या चालकांनी रासबिहारीबाबूंना लपवून ठेवून जपानी राष्ट्राची अब्रू वांचविली आणि रासबिहारीबाबूंच्या प्राणांचे संरक्षण केले.

## इतरांचे कटू अनुभव

श्रीमती सरोजिनी नायडू यांचे ज्येष्ठ बंधु श्री. वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय यांना जिते किंवा मेलेले धरून आणण्याबद्दल एक लक्ष फ्रँकांचें बक्षीस देऊं करून इंग्रज सरकाराने एक हेर त्या कामावर नेमला होता. त्या हेरानें वीरेंद्रनाथांच्या इंग्लंड-मधील एका मित्राकडून विश्वासपत्र मिळवून त्यांना स्विट्झर्लंडांत आपल्या

भेटीला बोलाविले. तो हेर स्वित्झर्लंडामध्ये पोचला, त्या वेळीं वीरेंद्रनाथ कांही बर्लिनहून तेथे आले नव्हते; म्हणून त्या हेराने त्यांना तारांवर तारा करण्याला सुरुवात केली. या तारांच्या माऱ्यामुळे स्विस पोलिसांना त्यांचा संशय आला व वीरेंद्रनाथ स्वित्झर्लंडांत येताच त्यांनी उभयतांनाहि अटक केली. चौकशीअंती त्यांना त्या हेराचा दुष्ट हेतु कळून आला. त्या हेराने पुढे स्विस कोर्टांत आपला गुन्हा कबूलहि केला पण ब्रिटिश वकिलाच्या मध्यस्थीमुळे त्याला कांहींहि शिक्षा न करतां स्वित्झर्लंडांतून घालवून देण्यांत आलें! श्री. मानवेंद्रनाथ रॉय हे फ्रान्समध्ये असतांना फ्रेंच पोलिसांनी त्यांना अटक करून ब्रिटिश पोलिसांच्या स्वाधीन करावें, असा त्या दोन्ही पोलिसखात्यांचा एकदा संकेत ठरला होता. पण मानवेंद्रनाथांच्या सावधपणामुळे तो बेत फसला. राजा महेंद्रप्रताप यांच्या बाबतींतहि असले प्रकार घडले आहेत.

## लाहोर कटांतील आरोपी

इंग्रज सरकारच्या या खुनशीपणाचें अगदी ताजे उदाहरण पहिल्या लाहोर कटाच्या खटल्यांतील आरोपी सरदार गुरुमुखसिंग व सरदार पृथ्वीसिंग यांच्या बाबतीत घडून आलें आहे. हे उभयता हिंदुस्थानांतील तुरुंगांतून पळून अफगाणिस्थानांत जाऊन राहिले होते. तेथे इंग्रजांचे मिंधे नादिरशहा यांनी त्यांना अटक केली व त्यांना काबूल येथे आणलें. या दोघा सरदारांना काबूलच्या तुरुंगांत कोंबल्यावर पांच दिवसांनी एका अफगाण तरुणाने काबूल येथील ब्रिटिश वकिलातीवर गोळीबार केला. त्याबरोबर या प्रकरणांत वरील पंजाबी क्रांतिकारकांचें अंग असल्याच्या सबबीवर त्यांना आपल्या ताब्यांत देण्याची इंग्रज सरकाराने अफगाण सरकाराकडे मागणी केली. तेव्हा अफगाण सरकाराने आपणच त्यांना शिक्षा करण्याचें इंग्रज सरकाराला आश्वासन दिलें व हें आश्वासन मिळाल्यावर ब्रिटिश वकिलाने आपला आग्रह सोडला. पुढे 'रेड इंटर-नॅशनल'च्या मध्यस्थीने या उभयतांची सुटका झाली व ते रशियांत निघून गेले. त्यानंतर चालू वर्षाच्या आरंभी सरदार गुरुमुख सिंगांना हिंदुस्थानांत अटक झाली व सरकाराने त्यांना त्यांची जुनी शिक्षा भोगावयाला अंदमानाला पाठवून दिलें. अंदमानांतील परवाच्या अन्नसत्याग्रहांत या गुरुमुखसिंगांनीच पुढाकार घेतला होता. सरदार पृथ्वीसिंग हे सध्या शांघाय येथे आहेत.

## परराष्ट्रांचे नागरिक कां बनले ?

याप्रमाणे एका बलाढ्य सरकाराकडून होणारा आपला छळ चुकविण्यासाठी या देशोधडीला लागलेल्या असहाय क्रांतिकारकांना परराष्ट्रांचे नागरिक बनणे भाग पडले असले, तर त्यांत दोषास्पद असे कांहीच नाही. आपल्याला सुलतान अमानुल्लांचे सल्लागार या नात्याने अफगाणिस्थानांत राहतां यावे व तेथे राहून हिंदुस्थानाची शक्य तितकी जनसेवा करतां यावी, या बुद्धीनेच राजा महेंद्रप्रताप हे अफगाणिस्थानचे नागरिक बनले. पण अमानुल्ला पदच्युत झाल्यामुळे विदेशांत त्यांच्या कर्तृत्वाला मुळीच वाव न उरल्यामुळे ते आता हिंदुस्थानांत परत यावयाला उत्सुक झालेले आहेत. जर्मनी, तुर्कस्थान, अफगाणिस्थान, चीन व जपान या सर्व देशांतील राजकारणांची त्यांना अंतरंग माहिती भरपूर असल्यामुळे सध्याच्या आणीबाणीच्या दिवसांत हिंदुस्थानाला राजा महेंद्रप्रताप यांच्या अनुभवांचा अतिशय उपयोग होण्याजोगा आहे. डॉ. तारकनाथ दास यांनी तर परराष्ट्रीय राजकारणाचे तज्ज्ञ म्हणून त्रिखंड कीर्ति मिळवली आहे. तेव्हां हिंदुस्थानाला सध्या त्यांचा किती उपयोग होण्याजोगा आहे हें सांगावयाला नकोच. प्रो. खानखोजे यांच्या कृषिशास्त्रांतील प्राविण्याचा मेक्सिकन सरकाराने फायदा घ्यावा व शेतकऱ्यांचे हितचिंतक म्हणविणाऱ्या व्हाइसरॉयांच्या कारकीर्दीतदेखील त्यांना हिंदुस्थानांत परत येण्याला बंदी असावी, ही गोष्ट हिंदुस्थान सरकारला लांछनास्पद आहे. राजा महेंद्रप्रतापांचे सहकारी प्रो. बरकतुल्ला हे जपानमधील एका युनिव्हर्सिटीत प्रोफेसरचे काम करीत होते. ते आज हयात आहेत की नाहीत हे कळत नाही. ते हयात असल्यास त्यांनाहि परत येण्याची सवलत मिळवून देण्यासाठी देशांतील लोकांनी झटणें जरूर आहे.

हिंदुस्थानांत परत येणें अशक्य झाल्यामुळे ज्यांनी निरुपायाने परदेशांत आपली कशीबशी सोय लावून घेतली त्यांना हिंदुस्थानांत परत येण्याची इच्छाच नाही असें म्हणून हिणविणे हा उलट्या काळजाचा नमुना होय. हिंदुस्थानांत परत येण्याची मुभा असल्याचें जाहीर करा आणि मग ते परदेशांत जरुरीपेक्षा एक दिवस तरी अधिक राहतात कां पहा.

—केसरी, ता. २४ सप्टेंबर, १९३७.

# राजबंदिनींच्या मुक्ततेची मागणी

## गांधीजींचें आश्वासन

गेल्या सप्टेंबर महिन्यांत अंदमानांतील राजबंद्यांचें उपोषण चालूं असतांना गांधीजीनी त्यांना उपोषण थांबविण्याची विनंति केली. त्या वेळीं अंदमानांतील क्रांतिकारकांचे पुढारी डॉ. नारायणचंद्र राय व सरदार गुरुमुखसिंग यांनी गांधीजींना कळविलें :—

'We think after Government inaugurating provincial autonomy relief can only mean release of all political prisoners, detenus, state prisoners, internees, removal of ban on exiles and repeal of all repressive laws. If we get the assurance from you on these questions we can suspend hunger-strike.' या तारेला गांधीजीनी उत्तर दिलें, 'I personally accept your interpretation of relief and promise to work for full fruition with active co-operation of prisoner-friends.'

हें आश्वासन डॉ. नारायणचंद्र राय व सरदार गुरुमुखसिंग या उभयतांनाहि अपुरें वाटत होतें. पण त्यांच्याबरोबरीच्या इतर बहुतेक साऱ्या राजबंद्यांना तें पुरेसें वाटून त्यांनी आपला उपवास सोडला व त्यामुळे वरील दोघे पुढारी व व त्यांच्याबरोबरीचे इतर पांच राजबंदी यानीहि इतरांच्यामागून दोन आठवड्यांनी अन्नग्रहण केलें.

हा तारायंत्री करार झाल्याला आता जवळ जवळ पांच महिने लोटले आहेत. येवढ्या मुदतीत शिक्षा झालेल्या राजबंद्यांची सुटका झालेली नाही, हद्दपारांना स्वदेशीं येण्याला परवानगी मिळालेली नाही किंवा दडपशाहीचे कायदेहि रद्द झाले नाहीत. उलटपक्षीं गोविंदवल्लभपंतांनी मोठ्या मुष्किलीने सोडविलेले काकोरीचे राजबंदी मॅजिस्ट्रेटाचा हुकूम मोडल्याच्या आरोपावरून परत तुरुंगवास भोगीत आहेत. या साऱ्या अनुभवावरून गांधीजींनी दिलेलीं वचनें कृतींत

उतरणें अशक्य आहे हे ओळखून, सरदार गुरुमुखसिगांनी पुनः एकवार उपास करण्याला सुरुवात केली आहे. त्यांच्या उदाहरणाने सध्या मुलतान, लाहोर, हजारीबाग, डाक्का वगैरे तुरुंगांतील राजबंद्यांनी अन्नसत्याग्रह आरंभिला आहे व गेल्या १९ तारखेला डॉ. नारायणचंद्र रॉय यांनाहि अंदमानाहून बंगाल्यांत परत आणलें असल्याने लवकरच या प्रकरणाला अधिक उग्र स्वरूप येईल, अशी भीति वाटत आहे. यामुळे राजबंद्यांच्या प्रश्नाविषयी लोकमताला पुनः एकवार जागे करणें जरूर झाले आहे.

## अल्पवयीन राजबंदिनी

या सार्‍या राजबंद्यांमध्ये राजबंदिनींची स्थिति अत्यंत अनुकंपनीय झाली आहे. एक तर पुरुष कैद्यांच्या मानाने त्यांची संख्या अत्यल्प आहे. त्यामुळे संख्याबळाचा व संघटनेचा त्यांना कांहीहि फायदा मिळत नाही. दुसरी गोष्ट अशी कीं, राजबंदिनींचीं वयें अगदी लहान आहेत. पुरुष राजबंद्यांना सरकार सामान्य गुन्हेगारांच्या सहवासांत ठेवण्याला धजत नाही, कारण राजबंद्यांच्या अनुकरणाने इतर गुन्हेगारांच्या मनांतदेखील बंडखोर वृत्ति प्रबळ होते. पण राजबंदिनींची संख्या व वयें हीं लहान असल्यामुळे त्यांना गुन्हेगार स्त्रियांच्या सहवासांत ठेवण्यांत सरकाराला कांहीहि धोका दिसत नाही. उलट त्या भांडकुदळ गुन्हेगार बायकांच्या सहवासामुळे राजबंदिनींना आपला जीवसुद्धा नकोसा झाला आहे. पुनः वस्त्रप्रावरणांच्या बाबतींत पुरुषांच्यापेक्षा राजबंदिनींचे अधिक हाल होतात, हें उघड आहे. त्याचप्रमाणें प्रथमयौवनांत असलेल्या या राजबंदिनींना हिस्टीरियासारख्या मानसिक विकृति जडण्याचाहि फार संभव असतो.

## सरकारी सूड

कु. शांति घोष व कु. सुनीति चौधरी या बालिकांना शिक्षा सांगणाऱ्या मॅजिस्ट्रेटाने त्यांना दुसऱ्या वर्गांत ठेवावें अशी शिफारस केली होती; पण पुढे दोन महिन्यांनी सरकारची लहर बदलून सरकाराने एकट्या शांतीचाच दुसरा वर्ग कायम केला व तिच्याहून लहान असलेल्या सुनीतीला तिसऱ्या वर्गांत ढकललें. तिच्या वडिलांचें पेन्शन बंद केलें व तिच्या दोघा भावांनाहि बिनमुदत बंदींत ठेविलें. सुनीतीला गुन्हेगार स्त्रियांच्या

सगतीत ठेवले असून त्या तिच्याशी नेहमी भांडतात व प्रसंगविशेषी तिला मारपीटहि करतात. शिवाय तिच्याविषयी खोट्यानाट्या कागाळया अधिकारी-वर्गाकडे करीत असतात. बंगालच्या तुरुंगांत 'सरकार सलाम'ची एक लाजिरवाणी वहिवाट आहे. हा 'सरकार सलाम'चा विधि श्री. माधवरावजी अणे यांनी करण्याचें नाकारल्यामुळे त्यांना कसा उपद्रव झाला होता, हे महाराष्ट्रियांना माहीत आहेच. हाच विधि करण्याचे सुनीतीने नाकारल्याने तिला 'काळ्या टोपी'ची शिक्षा झाली होती. सुनीतीला कोणतीहि पुस्तकें किंवा वर्तमानपत्रेहि मिळत नाहीत. तुरुगांतील हालांमुळे सुनीतीला क्षय जडल्याची चिन्हें दिसत आहेत व मधून मधून हिस्टीरियाचाहि उपद्रव होतो. पण तिच्या औषधोपचाराची कांहीहि सोय झालेली नाही.

कु. शांति घोष हिला अटकेच्या वेळच्या झटापटींत ओटीपोटांत जबरदस्त लाथ लागली होती. त्यामुळे तिच्या पोटांत कायमची विकृति उत्पन्न झाली आहे. तिला हिजली येथील तुरुंगांत ठेवले होतें. पण तिच्या आजाराची तेथे कसलीहि चिकित्सा झाली नाही. बंगालच्या बहुतेक साऱ्या तुरुंगांतून औषधपाण्याची व्यवस्थाहि अत्यंत वाईट असते. कोयनेल आणि एरंडेल यांखेरीज इतर औषधें कैद्यांना मिळणे त्या प्रांतांत अवघडच आहे. असो, पुढे शांतीचा आजार फारच वाढल्यावर तिला कलकत्त्याच्या मेडिकल कॉलेजांत ठेवून तिची परीक्षा करण्यांत आली, तेव्हा असें दिसून आलें कीं योग्य वेळीं उपचार न झाल्यामुळे तिला कायमची व्याधि जडली आहे. १९३७ च्या एप्रिलमध्ये शांति व तिच्याबरोबरीच्या इतर राजबंदिनी यांनी सुनीतीला आपल्या संगतींत ठेवावे, किंवा तें अशक्य असलें तर निदान तिला दुसऱ्या वर्गांत तरी ठेवावे अशी मागणी करून उपास केला होता. या उपासाच्या वेळीं शांतीला रात्रंदिवस कोठडींत कोंडून ठेविलें होतें. पण सुनीतीच्या बाबतींत तुमच्या मागणीचा विचार करूं, असे आश्वासन मिळेपर्यंत तिने उपास सोडला नाही. अर्थात् या आश्वासनाचा काडीमात्र उपयोग झाला नाही, ही गोष्ट सांगावयाला नकोच. सध्या शांति घोष व चितागांग प्रकरणांत जन्मठेपेची शिक्षा मिळालेली कु. कल्पना दत्त या दोघींनाहि मिदनापूरच्या तुरुंगांत कुष्ठ रोग्यांच्या अगदी शेजारीं ठेविलेलें आहे. या कुष्ठ रोग्यांच्या स्नानाचें पाणी त्यांच्या वॉर्डांत येऊन पडत असल्यामुळे त्या दोघीं-

नाहि तो दुर्धर रोग जडण्याची भीति आहे. कु. कल्पना दत्त हिला अगोदरच हृदयाचा विकार जडलेला आहे.

## कु. अमिया मुजुमदार

सर स्टॅनले जॅक्सनचे मागून सर जॉन अँडरसन हे बंगालचे गव्हर्नर झाले. यांच्याइतकी कुप्रसिद्धि हिंदुस्थानांत दुसऱ्या कोणत्याहि गव्हर्नराने मिळविली नसेल. या गव्हर्नरांवर १९३४ च्या मे महिन्यांत बंगाली तरुणांनी पिस्तुलें घेऊन हल्ला केला. यावेळीहि बंगालचे गव्हर्नरसाहेब त्यांच्या सुदैवाने बचावले व त्यांच्यावर हल्ला करणाऱ्या व हल्ला करणाऱ्यांना मदत करणाऱ्या लोकांवर खटले होऊन त्यांना फांशीच्या व काळेपाण्याच्या शिक्षा झाल्या. या प्रकरणांत कु. अमिया मुजुमदार हिलाहि काळेपाण्याची शिक्षा झाली आहे. या तरुणीच्या विषयी कलकत्ता पोलिस अॅडमिनिस्ट्रेशन रिपोर्टात म्हटले आहेः—

'Before finishing this summary it is necessary to draw attention to the important part played by women in revolutionary crime during the year, the most outstanding example of which was the active participation of Miss Amia Mazumdar in the Lebong outrage and her subsequent conviction in open court. This is but one isolated manifestation of the female movement which is increasing year to year.'

कु. अमिया मुजुमदार हिला अटक झाली, तेव्हा तिचें वय अवघें सोळा वर्षांचें होते. सध्या तिला क्षय झाला आहे, पण राजशाही तुरुंगांत तिच्या औषधोपचाराची कांहीहि सोय होत नाही.

असो, या बालिकांच्या कहाणीवरून इतर राजबंदिनींच्या दुर्दशेची कल्पना येण्याजोगी असल्याने त्यांची हकीकत सांगण्याची आवश्यकता नाही. कित्येकांनी केवळ राजबंदिनींसाठी स्वतंत्र दिवस पाळण्याच्या कल्पनेवर आक्षेप घेतला आहे. त्यांच्या समाधानासाठी रे. अँड्र्यूज यांच्या ताज्या पत्रकांतील एक उतारा देऊन हा लेख संपवितों. रे. अँड्र्यूज बंगाली तरुणांची कैफियत मांडतांना म्हणतात—

"They point to the fact that there are still a considerable number of women political prisoners in jail whose lot as every one agrees has been much harder than that of the men. Even where they have been actually convicted of joining in violent conspiracy there have been circumstances in their case which have to be taken into account such as some sudden impulse of youth and their inexperience of the hard facts of the world. Therefore when they have once given their word of honour they ought not to be kept lingering on in jail."

—केसरी, ता. १ फेब्रुवारी, १९३८.



# राजबंदिनींचा छळ !

राजबंद्यांच्या अन्नसत्याग्रहाच्या प्रकरणाला लवकरच अधिक उग्र स्वरूप येईल, अशी भीति गेल्या अंकांत प्रदर्शित केली होती. ती अक्षरशः खरी ठरून गेल्या रविवारी डाक्का येथील तुरुंगांत श्री. हरींद्रनाथ मुनशी यांची या प्राणयज्ञात पहिली आहुति पडल्याची वार्ता आली आहे. या अघोर बलिदानामुळे अखिल बंगाल प्रांतांत अत्यंत प्रक्षोभ उत्पन्न झाला आहे. हरींद्रनाथाच्या शोचनीय मृत्यूपूर्वीच ता. २९ जानेवारी रोजी बहार प्रांताचे मुख्य प्रधान श्री. श्रीकृष्णसिंह हे मुजफरपूर येथील भाषणांत म्हणाले होते की 'राजबंद्यांच्या प्राणांचे संरक्षण करणे हे कॉंग्रेसच्या प्रधानमंडळाचे पवित्र कर्तव्य आहे व त्यांच्या सुटकेसाठी आम्ही शक्य ते सर्व प्रयत्न करीतच आहोत. या प्रश्नावर आम्ही राजीनामा देखील द्यावयाला तयार आहोंत. फक्त राजीनामा द्यावयाला कॉंग्रेसची परवानगी मिळाली म्हणजे झाले.' राजबंद्यांच्या सुटकेसाठी कॉंग्रेस मंत्रिमंडळांनी राजीनामे देऊन पुन्हा निवडणुकी लढविण्याची आपली सिद्धता असल्याचे गव्हर्नरांना पटवून देणें जरूर आहे असे श्री. मानवेंद्रनाथ रॉय प्रथमपासूनच प्रतिपादीत आहेत. आता सुभाषबाबू स्वतःच वर्ध्याला जाणार असल्याने तेथे या धोरणाचा विचार होईल अशी आशा वाटते.

## एक हृदयद्रावक प्रसंग

परवा बंगाल कौन्सिलांतील प्रश्नोत्तरांच्या वेळी बंगाल सरकारने सांगितलें 'कोणाहि रोग्याला दुर्धर व्याधि जडली असली तरी आम्ही त्याला सोडणार नाही.' या उत्तरामुळे कित्येकांना असा प्रश्नच पडेल कीं मरणोन्मुख राजबंद्यांना न सोडण्यांत बंगाल सरकारला काय फायदा दिसतो ? त्यांच्या माहितीसाठी ही गोष्ट सांगितली पाहिजे कीं, आजाराने व आसन्न मृत्यूच्या शंकेमुळे राजबंद्यांचीं मनें विकल झालीं असतांना तुरुंगांत त्यांच्याकडून त्यांच्या पक्षाची म्हणजे क्रांतिकारक पक्षाची शक्य तितकी अधिक माहिती काढण्याचा प्रयत्न केला जातो व या माहितीच्या

आशेने मरणोन्मुख कैद्यांची सुद्धा सुटका करावयाला बंगाल सरकार तयार नसतें. श्रीमती वनलता दासगुप्ता यांच्या बाबतीत हाच प्रकार घडून आला. त्यांना आंतड्याचा कांही दुर्धर विकार जडला होता व त्यासाठी त्यांच्यावर शक्य तितक्या लवकर शस्त्रक्रिया करणे आवश्यक होते. पण त्या मरणोन्मुख होऊन अंत्यशय्येवर पडल्या असतांना देखील त्यांच्या भोवताली पाषाणहृदयी गुप्त पोलिसांच्या अधिकाऱ्यांचा गराडा पडला होता व ते त्यांना आपल्या पक्षाची सर्व माहिती सांगून मुक्त होण्याचे प्रलोभन दाखवीत होते. असल्या अघोर परिस्थितीत त्या राजबंदिनींने व्याकुळ होऊन राजदूतांची प्रार्थना केली 'Let me die in peace', तरी देखील त्या राजदूतांनी तिचा अखेरपर्यंत पिच्छा पुरविला!

राजबंदिनीना कशा रीतीने वागविले जाते, याचा एक नमुना म्हणून श्रीमती कल्याणी दास यांची हकीकत सांगण्याजोगी आहे. त्यांना प्रेसिडेन्सी जेलमधील तळघरांत कित्येक दिवस कोंडून ठेवले होते. त्या तळघरांत अर्थात् सारा दिवस अंधारच असे. कल्याणीला दिवसा तर नाहीच पण रात्री देखील दिवा मिळत नसे; शिवाय तिच्या शेजारच्या खोल्यांतून वेड्यांना कोंडून ठेवले असल्याने त्यांच्या भयंकर आरोळ्यांनी तिचा साऱ्या रात्रीत क्षणभरदेखील डोळा लागत नसे. असल्या भयंकर परिस्थितीत कित्येक दिवस काढल्यामुळे तिचें शरीर व मन देखील विकल होऊन गेले आहे.

## राजबंदिनींना मारपीट

राजबंदिनीना मारपीट केल्याची एक कथा श्रीमती इंदुसुधा घोष यांनी प्रसिद्ध केली आहे. त्या म्हणतात '१९३६ च्या एप्रिल महिन्याच्या अखेरीला किंवा मे महिन्याच्या प्रारंभीं एके दिवशीं संध्याकाळी कलकत्त्यांतील एका हायस्कुलाची मुख्याध्यापिका व अनुशीलन समितीची एक प्रमुख नेत्री श्रीमती पारुळ मुखोपाध्याय हिला स्त्रियांच्या वार्डावरील मेट्रन व जमादारीण या दोघींनी मिळून गुरासारखें बडविलेलें आम्ही प्रत्यक्ष पाहिलें आहे! त्या दिवशीं श्रीमती पारुळ यांना 'लॉक अप्'ची नेहमींची वेळ होण्यापूर्वीच खोलींत जाण्याचा हुकूम मेट्रनने केला. त्यावरून तक्रार होऊन तिचें पर्यवसान त्या राजबंदिनीला बेदम मारण्यांत झालें. त्यावेळीं मी स्वतः, श्रीमती सुशीला दासगुप्ता व परलोक-

बासी वनलता दासगुप्ता अशा तिघीजणी हॉस्पिटलच्या व्हरांड्यांत होतों. पण आम्ही साऱ्या अतिशय आजारी असल्याने तिच्या मदतीला जाऊं शकलों नाही. पण हा सारा प्रकार पत्र लिहून आम्ही जेल-सुपरिंटेंडेंटांना कळविला. त्यांनी परत निरोप पाठविला कीं, राजबंद्यांनी स्वतःच्या पायापुरतें पहावें, इतरांच्या उठाठेवी करण्याचे कारण नाही !

श्रीमती पारुळ मुखोपाध्याय यांना २० जानेवारी १९३५ रोजी अनुशीलन समितीचे एक प्रमुख पुढारी श्री. पूर्णानंद दासगुप्त त्यांच्याबरोबर टिटाघर येथे अटक झाली. त्यापूर्वी सुमारे दोन वर्षें त्या फरारीच होत्या. श्री. पूर्णानंद दासगुप्त व त्यांचे इतर सहकारी यांचा बंगालच्या तुरुंगांत कसा अनन्वित छळ चालू आहे, याची हकिकत २६।१।१९३७ च्या केसरीत आलीच आहे. पूर्णानंदबाबू ज्या अनुशीलन समितीचे पुढारी आहेत, त्या समितीने गेल्या १८ वर्षांत राजकीय अत्याचारामध्ये भाग घेतलेला नाही आणि आता इतक्या वर्षांच्या अनुभवानंतर युगांतर समितीच्या पुढाऱ्यांच्या धोरणांतहि असेच परिवर्तन झाले आहे. तेव्हा सरकारनेहि आपला क्रांतिकारकांविषयीचा दृष्टिकोण बदलणे न्याय्य होईल.

—केसरी, ता. ४ फेब्रुवारी, १९३८.



# इंग्रज व मुसलमान*

आपल्या हितशत्रूंच्या मायावी शब्दांवर विश्वास ठेवणे व वस्तुस्थितीकडे जाणून बुजून दुर्लक्ष करणे हा दोष हिंदु लोकांच्या हाडींमाशी खिळला आहे. नाहीतर हिंदुस्थानांतील आपलें साम्राज्य चिरस्थायी व्हावें यासाठी मुसलमानांची खुशामत करणारे इंग्रज व स्वतःच्या बडेजावीसाठी इंग्रजावर अवलंबून असलेले मुसलमान या सिद्धसाधकांचे संबंध कसे आहेत हें पुराव्याने सिद्ध करण्याची कधी गरज पडली नसती. त्यांत पुन्हा मौजेची गोष्ट ही की, आपल्या कित्येक पुढाऱ्यांच्या न्यायबुद्धीला मुख्य आरोपींने राजीखुषीने व अक्कलहुषारीने दिलेला कबुलीजबाब सुद्धा पुरेसा पुरावा वाटत नाही. परवा ऑलीव्हियर साहेबांनी स्वतः जाहीर केले कीं, राजकारणाचे डाव साधण्यासाठी इंग्रज अधिकारी मुसलमानांचा पक्षपात करतात. तरीदेखील बंगालचे राष्ट्रीय पक्षाचे पुढारी बाबू चक्रवर्ती यांना म्हणावेसें वाटले की, ऑलीव्हियर साहेबांच्या या विधानाला स्वतंत्र साक्षीदाराच्या पुराव्याची जोड मिळणें जरूर आहे. सुदैवाने असा एक स्वतंत्र साक्षीदार अगदी अभावितपणें पुढे आला आहे.

पॅरिसमध्ये 'रेव्ह्यू-दे-द-मोद' नांवाचें एक सुप्रसिद्ध मासिक आज ९६ वर्षें चालत आहे. या रेव्ह्यूच्या चालकांनी १९२५ साली हिंदुस्थानांतील परिस्थिति समजून घेण्यासाठी मोरिस पेर्नो नांवाचा एक खास प्रतिनिधी पाठविला होता. त्याने व्हाइसरॉय, गव्हर्नर, लष्करी व मुलकी खात्यांचे मुख्य अधिकारी, सर्व मतांचे व वृत्तपत्रांचे प्रसिद्ध पुढारी यांच्या मुलाखती घेऊन आपली माहिती मिळविली आहे व या मुलाखती आता या रेव्ह्यूंतून प्रसिद्ध होत आहेत.

या मुलाखती मोठ्या मोकळ्या मनाने झाल्या असाव्यात असें दिसतें. उदाहरणार्थ मौ. महंमदअल्लींनी परकी अंमलासंबंधी आपल्या मनोवृत्तीचें आविष्करण करतांना स्वच्छ सांगितलें आहे, "We consent to any Govern-

* रेव्ह्यू-दे-द-मोंद या फ्रेंच मासिकावरून.

ment provided that Islam is respected and the rights of all Moslems are recognised"—म्हणजे कसलेहि सरकार असलें तरी आम्हांला चालेल मात्र त्यांने महंमदी धर्माला मान द्यावा व मुसलमानांच्या हक्कांचे संरक्षण करावे. पारतंत्र्याविषयी आपली वृत्ति काय आहे व प्रसंगविशेषी सरकारच्या विरुद्ध जातांना सुद्धा मुसलमानांची दृष्टि राष्ट्रीय नसून ज्ञातिनिष्ठ कशी असते हे स्वतः महंमदअल्लीच्या शब्दांत जाहीर झाले हे एकपरी बरे झाले. पुढे दोन दिवसांनी हा बातमीदार रेडिंगसाहेबांच्या भेटीला गेला असतां त्यांनी म्हटले " महंमदअल्लीची व माझी कधी गांठ पडली नाही, पण त्यांना माहीत आहे की, आम्ही इस्लामी धर्माला मान देतो व आम्ही हिंदुस्थानांतून बाहेर पडलो तर हिंदूंच्या पुढे इस्लामियांचा टिकाव लागणें कठिण आहे." मग दंग्या-संबंधी बोलतांना व्हाइसरॉयांनी म्हटले 'सर्व दंग्यामध्ये मुसलमानांचें पाऊल पुढे; पोलिसांना तर ते जुमानीतच नाहीत, शिवाय गोळीबाराचीहि त्यांना फारशी पर्वा वाटत नाही.' व्हाइसरॉय यांच्या एकंदर वागणूकीसंबंधाने लिहितांना हा लेखक म्हणतो—" He did not even attempt to conceal the partiality he felt for the Moslems"— म्हणजे मुसलमानांविषयीची आपली पक्षपातबुद्धि लपविण्याची सुद्धा व्हाइसरॉय खबरदारी घेत नाहीत !

रेडिंगच्या कारकीर्दीचे वर्णन या लेखकाने पुढील शब्दांत केलें आहेः— " Hindus and Moslems, skilfully worked upon, recommenced to suspect each other and the national unity was brought to an end." ( नोकरशाहीने ) त्याने आपल्या कारस्थानांनी हिंदुमुसलमानांमध्ये परस्परांविषयीं अविश्वास उत्पन्न केला व राष्ट्रांतील एकीचा लोप केला. याविषयीं स्वतः रेडिंगसाहेबांच्या तोंडचे उद्गार या लेखकाने दिले आहेत ते असेः—" Our bad days are over, the Hindu–Muslim unity is no more." " आमच्या काळजीचा काळ संपला, हिंदुमुसलमानांच्या ऐक्याचा भंग झाला." हिंदुमुसलमान भांडले म्हणजे आम्हांला आनंद होतो असें कोणी समजूं नये असें गंभीरमुद्रेने सांगणाऱ्या आमच्या नव्या व्हाइसरॉयसाहेबांना रेडिंगसाहेबांच्या तोंडचीं हीं मुक्ताफळें आम्ही अहेर करतों !

ता. १४ सप्टेंबर, १९२६.



# मुसलमानांचे परराष्ट्रसंबंध

अलाहाबाद येथील मुस्लीम लीगच्या अधिवेशनाचे अध्यक्ष सर मुहम्मद इकबाल यांनी आपल्या भाषणांत पंजाबी मुसलमानांच्या महत्त्वाकांक्षा स्पष्टपणे बोलून दाखविल्यामुळे मुसलमानी पुढाऱ्यांची तारांबळ उडाली आहे. मुंबईचे बॅ. चागला व मद्रासचे मौ. याकुब हसन यांच्यासारखे गोडबोले पुढारी मुसलमानांच्या साध्या मागण्यांतील मोठा आशय लाहोरच्या कवीने व्यक्त केल्यामुळे त्याच्यावर जळफळत आहेत. इकबालसाहेबांचे भाषण मुसलमानी मनोवृत्तीचे निदर्शक नाही असेहि आम्हां हिंदूना सांगण्यांत येत आहे ! पण यापुढे राजकारणी पुढाऱ्यांच्या भुलथापांपेक्षा भोळ्या कवीने उजेडांत आणलेल्या सत्यावरच हिंदू लोकांचा अधिक विश्वास बसला तर त्यांत कांही नवल नाही.

### कवि व कौन्सिलर

मौजेची गोष्ट ही की, आज ज्ञातिनिष्ठ मुसलमानांचे पुढारी म्हणून मिरविणारे सर मुहम्मद हे राष्ट्रीय कविता लिहूनच प्रथम प्रसिद्धीला आले. गेल्या शतकाच्या अखेरीला लाहोर येथील एका सभेच्या प्रसंगीं सर मुहम्मदांनी 'हिमालय' नांवाची आपली एक कविता समाजामध्ये प्रथम म्हणून दाखविली. या कवितेंतलि अभिनव कल्पना व देशभक्तीची भावना यांचा त्या समाजावर प्रभाव पडून त्यांचें नांव लाहोरमध्ये सर्वतोमुखीं झालें. 'मेरा वतन' व 'सारे जहांसे अच्छा हिंदुस्तां हमारा' ही इकबालसाहेबांचीं सुप्रसिद्ध राष्ट्रगीतें स्वदेशी चळवळीच्या धामधुमीच्या दिवसांतच लिहिलीं गेली. पण त्यानंतर पॅन इस्लामी आंदोलनाच्या प्रभावाने त्यांच्या वृत्तींत फरक पडला व काव्यलेखन सोडून आपण स्वतःला इस्लामाच्या सेवेला वाहून घ्यावें, असें त्यांना वाटूं लागलें. त्यावेळीं इकबाल-सारख्या प्रतिभासंपन्न कवीने आपल्या कविजीवनाची हाराकिरी करूं नये यासाठी त्यांना त्यांच्या इस्लामी व इंग्रज स्नेह्यांनी भीड घालून मोठ्या प्रयासाने त्यांचें मन वळविलें. परंतु तेव्हापासून हिंदी राष्ट्राविषयीं विरक्त झालेल्या सरसाहेबांनी ऊर्दू

भाषेचा अव्हेर करून फारशी भाषेत कविता करायला सुरुवात केली. सर मुहम्मद इकबाल हे पंजाब कायदेकौन्सिलाचे सभासद आहेत व दिवाणगिरीची वस्त्रें मिळविण्यासाठी त्यांनी अनेकवार प्रयत्नहि केले आहेत. असा मुस्लिमलीगच्या यंदाच्या अध्यक्षांचा पूर्वेतिहास आहे. या इकबालसाहेबांच्या चरित्रांतील त्यांची माजी देशभक्ति कां हल्लीची ज्ञातिभक्ति मुसलमानी मनोवृत्तीशीं अधिक जुळती आहे, हें मुसलमानांनीच सांगावें.

## बंडाची धमकी

' मजहब नही सिखाता आपसमे बैर रखना ' असे एके काळी शिकविणाऱ्या सर मुहम्मदांचा हिंदुद्वेष आता इतक्या थराला पोहोचला आहे की, अलाहाबादच्या भाषणांत त्यांनी मुसलमानांच्या भरमसाट मागण्या मान्य न झाल्यास हिंदू व त्यांचे साहाय्यक इंग्रज या उभयतांविरुद्ध बंड करण्याची प्रच्छन्न धमकी दिली आहे. ही केवळ पोकळ धमकी असेल आणि पंजाबांतील मुसलमानांच्या मनांतहि ही कल्पना नसेल अशी कित्येकांची समजूत असल्यास ती चूक आहे. परदेशी मुसलमानांच्या मदतीने हिंदुस्थानांत बंड घडवून आणण्याचा कट पंजाबी मुसलमानांनी १९१४ साली केला होता. या कटाची संक्षिप्त हकीकत मुख्यतः सर मायकेल ओड्वायर यांच्या पुस्तकावरून खाली देत आहे. ही माहिती सरकारी अधिकाऱ्याकडून पुढे आली असल्याने ती कांहीशी एकतर्फी असण्याचा संभव आहे एवढें मात्र वाचकांनी लक्षांत ठेवावें.

## सोळा वर्षांपूर्वी

१९१४ च्या डिसेंबरमध्ये रावळपिंडी येथे मुसलमानांची एक शिक्षण परिषद भरली होती. या सभेला मरहूम महंमद अली, मौलाना अबुल कलाम आजाद वगैरे जहाल पुढारीहि आले होते. परिषद संपल्यानंतर या पुढाऱ्यांपैकीं कांहीजण पेशावरला व कांहीजण लाहोरला गेले. या दोन्ही ठिकाणीं पुढाऱ्यांनी विद्यार्थ्यांच्या खाजगी सभा भरवून किंवा चहापार्ट्या करून त्यांना बराचसा उपदेश केला. पुढाऱ्यांच्या या कारवाईची वार्ता सर मायकेलला ते निघून गेल्यानंतरच समजली. त्यानंतर १९१५ च्या फेब्रुवारींत लाहोर येथील १५ विद्यार्थी व पेशावर, कोहाट वगैरे ठिकाणचे कांही विद्यार्थी आपापल्या घरून पळून गेले व अनेक युक्त्या योजून ते

अखेरीला काबूल येथे जाऊन पोंचले. यांतले बहुतेक विद्यार्थी कुलीन व राजनिष्ठ अशा मुसलमानी घराण्यांपैकी होते. काबूलला पोंचल्याबरोबर हबीबुल्लाने प्रथम त्या सर्वांना पकडून तुरुंगांत टाकले. पण कांही दिवसानंतर नासिरुल्लाखानाच्या मध्यस्थीने त्यांची सुटका झाली व त्या सर्वांना काबूल सरकाराकडून पोटगी मिळूं लागली. त्याचवेळी राजा महेंद्रप्रताप व प्रो. बरकतुल्ला हे क्रांतिकारकांचे पुढारी काबूलला आले व त्या सर्वांनी मिळून हिंदुस्थानासाठीं एक 'तात्पुरतें सरकार' प्रस्थापित केले. मग एक वर्षभर अविश्रांत श्रम करून हेजाझ, इराक, अफगाणिस्थान, मध्य आशिया व हिंदुस्थान या सार्‍या देशांतील बर्‍याच मुसलमानांची त्यांनी एकजूट घडवून आणली व हिंदुस्थानात बंड घडवून आणण्यासाठी या देशांत त्यांचे दूत येरझारा घालूं लागले. या आणीबाणीच्या प्रसंगीं काबूलला बसलेल्या 'तात्पुरत्या सरकाराची' पत्रे सर मायकेल यांच्या हाती पडलीं व हा कट उघडकीस आला.

## कटवाल्यांच्या आशा फोल कशा झाल्या ?

ही पत्रें एका पिवळ्या रेशमी कोटाच्या आंतल्या भागावर लिहिलीं होतीं व त्यांच्यावरून अस्तर लावले होतें. अशा या पत्रांमुळे त्या कटाला 'रेशमी पत्रांचा कट' असें नांव मिळाले आहे. ही पत्रे संयुक्त प्रांतांतील देवबंद येथील प्रसिद्ध मुसलमानी धर्मशिक्षणाच्या शाळेतील मौलवी अन्सारी व अबिदुल्ला यांनी लिहिली होतीं असें समजतं. युद्धाच्या आरंभीं या मौलवींनी हिंदुस्थानांत इंग्रजांविरुद्ध 'जिहाद' म्हणजे धर्मयुद्धाचा उपदेश केला होता व मग ते काबूलला निसटून गेले होते. या पत्रांवर ९ जुलै १९१६ अशी तारीख आहे. त्या वेळीं अन्सारी हा नुकताच अरबस्तानांत कटाचा प्रचार करून परत आला होता व ही पत्रेंहि मक्केला जाऊन आलेल्या महमूद हसन नांवाच्या एका सुप्रसिद्ध हिंदी मौलवीला लिहिलीं होती. मौलवी महमूद हसनने अरबस्तानांतील तुर्की सेनापति गालिबपाशा यांच्याकडून हिंदी मुसलमानांना इंग्रजांविरुद्ध धर्मयुद्ध पुकारण्याविषयीं आज्ञापत्रें पाठविलीं होतीं व त्या आज्ञापत्रांच्या प्रती हिंदुस्थानभर पसरविल्या होत्या. असलींच आज्ञापत्रें मक्केच्या शेरिफाकडून मिळविण्यासाठी महमूद हसन झटत होता. पण याच वेळीं मक्केच्या शेरिफाने तुर्कांविरुद्ध बंड पुकारलें व त्यामुळें कटवाल्यांच्या सर्व आशा फोल झाल्या.

## कटाचें केंद्रस्थान

वरील पत्रे ओड्वायरच्या मार्फत सर चार्लस क्लीव्हलंडच्या हातीं पडल्यावर हिंदुस्थानांत बरीच धरपकड झाली. पण अफगाणिस्थानांतील नाजूक परिस्थितीमुळे काबूल येथील कटवाल्यांना आपल्या स्वाधीन करण्याची मागणी अमिराकडे करण्याची इग्रजांना छाती झाली नाही. त्यामुळे काबूल येथील कटाच्या केंद्राला धक्का पोचला नाही. अमीर हबीबुल्लांच्या खुनांत या कटवाल्यांचें अंग असावें असा संशय घेण्याला जागा आहे व तिसऱ्या अफगाणयुद्धांत त्यांनी कायावाचामनेकरून भाग घेतला असेल हें सांगायला नकोच. गतवर्षीच्या आफ्रिडी बंडाची उठावणीहि त्यांच्याकडूनच झाली असावी असा कित्येकांस संशय आहे. अशी ही पूर्वीच्या कटाची परंपरा आहे.

## आजाद यांचें पूर्वचरित्र

हिंदुस्थानाबाहेरील इस्लामी राष्ट्रांशी अतिशय निकट संबंध असलेले मुसलमान पुढारी मौलाना अबुल कलाम आजाद हे होत. यांचा जन्म व शिक्षण माजी तुर्की साम्राज्यांतच झाले. यांना आरबी, फारशी, फ्रेंच, उर्दू वगैरे भाषा उत्तम येतात. बाल्कन युद्धाच्या दिवसांत यांची स्वारी प्रथम हिंदुस्थानांत आली. तेव्हांपासून अव्वल दर्जाच्या मुसलमानी पुढाऱ्यांत ते मोडतात. गेल्या महायुद्धांत अलीबंधू, हसरत मोहानी वगैरे पुढाऱ्यांबरोबर यांनाहि अटक झाली होती. युद्ध संपल्यावर खिलाफतीच्या व असहकारितेच्या चळवळींत हे पुढारी होतेच. पुढे लौसानच्या तहावर सह्या होऊन इंग्लंड व तुर्कस्थान यांचा समेट झाल्यावर मौलानांना हिंदुस्थानचा त्याग करून परत तुर्कस्थानाला जावेंसें वाटूं लागले. पण या वार्तेची लोकांत वाच्यता झाल्याबरोबर कलकत्त्याच्या मुसलमान नागरिकांनी त्यांना येथेच राहण्याविषयी आग्रह केला व लोकाग्रहाला मान देऊन मौलानासाहेबांनी आपले जाणें रहित केले. १९२५ सालीं फ्रेंच प्रवासी पेर्नो हा कलकत्त्याला आला असतां मौ. अबुल कलाम यांची व त्याची मुलाखत झाली. त्या मुलाखतींत मौलानांनी सहज बोलतांना सांगितले कीं, गाजी पाशा, इस्मत पाशा व तुर्कस्थानांतील इतर सर्व पुढारी यांच्याबरोबर आपला सारखा पत्रव्यवहार चालू असतो. त्याबरोबर त्या धूर्त प्रवाशाने विचारलें ‘ आणि इतर

इस्लामी राष्ट्रांतील पुढाऱ्यांशी !' तेव्हां बोलतांना आपण घसरलों असे वाटून मौलानांनी उत्तर दिले. 'आपल्याला सर्व माहीत आहेच; मग मी बोलून दाखवावयाची काय गरज आहे ?'

## वादाची मेख ही आहे

मुसलमानांच्या या साऱ्या कारस्थानांचें अंतिम काय, हेंहि त्यांनी छपवून ठेवलेलें नाहीं. सर मुहम्मदांनी सार्वजनिक रीतीने कबूल केलें आहेच कीं पंजाब, सिंध, बलुचिस्थान व सीमाप्रांत एकत्र करून एक मुसलमानी राष्ट्र आम्हांला निर्माण करावयाचें आहे. पण खासगी संभाषणांत पंजाबचे मुसलमान पुढारी याहिपेक्षा अधिक स्पष्ट भाषा वापरतात. १९२२ सालींच त्यांनी 'मॅंचेस्टर गार्डियन'च्या बातमीदाराजवळ बोलून दाखविले होते, 'Punjab should be looked upon as a part of the Central Asian rather than as a part of Indian problem.' या उद्गारांचा उघड अर्थ हा कीं, वर उल्लेखिलेल्या चारी प्रांतांतील मुसलमान अफगाणिस्थानाशी संलग्न होऊं पहात आहेत. अर्थातच त्यांची दृष्टि हिंदुस्थानापेक्षां हिंदुस्थानाबाहेरच्या इस्लामी राष्ट्रांकडेच अधिक खिळली आहे. पंजाबांतील मुसलमानांच्या या मनोवृत्तीवरून व पूर्वपरंपरेवरून सरहद्दप्रांत स्वायत्त करण्याविषयीं आणि संयुक्त मतदार संघ कबूल न करतां सवता सुभा कायम ठेवण्याविषयीं त्यांचा इतका आग्रह कां या गोष्टीवर थोडा तरी प्रकाश पडेल.

अशा रीतीने अफगाणांना आपल्या घरांत घेणें म्हणजे आत्महत्या करणेंच होय, हें सर मुहम्मदांना समजत नाही असें नाही. या विधानाला त्यांच्याच कवितेचा पुरावा देण्याजोगा आहे. एकदां या कविरायांनी निराशेच्या भरांत आपल्या प्रियेला आत्महत्या करून घेण्याची भीति घातली. तेव्हां प्रियेने उत्तर दिलें, 'तुझ्या मनांत धाडस नाही व हातांत खंजीर नाही, तूं कसचा आत्महत्या करून घेतोस.' तेव्हां इकबालसाहेबांनी प्रत्युत्तर केलें, 'कहा मैंने के मंगा लूंगा कोई अफगाण सरहदसे'—'मी सरहद्दीवरून एखादा अफगाण मागवून घेईन, मग तर तुझ्या हरकती दूर होतील ना !' इकबालप्रमाणें पंजाबी मुसलमानांनाहि आत्महत्या करून घेण्याची हौस आली असेल पण त्यांच्याबरोबर हिंदूंनींहि जीव दिला पाहिजे, हा कुठचा न्याय?

—केसरी, ता. २७ जानेवारी, १९३१.

# आगाखान व त्यांचे डाव

ना. आगाखान हे हल्ली संस्थानिक किंवा प्रांताधिकारी होऊं पाहात आहेत. अशा वेळीं त्यांचें पूर्वचरित्र सर्वश्रुत व्हावें म्हणून त्यांची माहिती देत आहे:—

'रेव्ह्यू-दे-द-मोंद' या फ्रेंच मासिकाच्या गतवर्षीच्या जानेवारीच्या अंकांत थोडा पूर्वेतिहास व त्यांची एक खास मुलाखत प्रसिद्ध झाली आहे. ही सारीच माहिती अतिशय महत्त्वाची असल्यामुळे तिचा हिंदुस्थानांत प्रसार होणे आवश्यक आहे.

आगाखान हे स्वतःला मुसलमानांचे चौथे खलिफा अली यांचे वंशज म्हणवितात. अलीच्या वंशजांची करबला येथील लढाईंत सरसकट कत्तल झाली. पण अलीचा एक नातू त्या कत्तलीतून निसटून गेला, व पुढे इस्माइल नांवाच्या त्याच्या एका वंशजाने मुसलमानी धर्मांत एक स्वतंत्र पंथ स्थापन केला. याच इस्माइलचे आगाखान हे वंशज असून त्यांच्या पंथाचे सध्यांचे ते धर्मगुरु आहेत. हा पंथ प्रथम साध्या धर्मपंथाप्रमाणेच होता. पण, पुढे इ. १०९० च्या सुमाराला उमरखय्यामचा गुरुबंधु मानलेला हसन बिन सबाह याने आलामूतचा किल्ला काबीज करून त्या ठिकाणी इस्माइली पंथाची सत्ता स्थापन केली. आपली ऐहिक सत्ता चिरस्थायी व्हावी व वृद्धिंगत होत जावी, यासाठी हसन बिन सबाहने आपल्या विश्वासू अनुयायांना हशीश नांवाचें एक मादक द्रव्य खावयाला घालून मग आपल्याला अनिष्ट असलेल्या लोकांचा खून करावयाला त्यांना धाडण्याचा उपक्रम सुरू केला. यामुळे या पंथाला पाश्चात्य देशांतून हशीश ( असॅसिन ) पंथ या नांवानेच ओळखतात.

### हा पंथ नाहीसा झाला काय ?

एके काळीं इराण, सीरिया वगैरे देशांतून या धर्मवेड्यांचें फारच बंड माजलें होतें. पुढे तेराव्या शतकाच्या अखेरीला झेंगिसखानाच्या नातवाने या पंथाचा निःपात करण्याचा प्रयत्न केला. त्याचा हा प्रयत्न यशस्वी झाला, अशा समजु-

तीने गिबनने आपल्या सुप्रसिद्ध इतिहासांत असे म्हटलें आहे—'Not a vestige is left of those enemies of mankind except the word 'assassin' in the languages of Europe.' पण जगाच्या व विशेषतः हिंदुस्थानाच्या दुर्दैवाने, गिबनने म्हटल्याप्रमाणे, या पंथाचा बीमोड झालेला नाही. इतकेच नव्हे, तर त्या पंथाच्या गुरूची गादी व तिचे अनुयायी सध्या हिंदुस्थानांत आहेत. या इस्माइली पंथाचा सविस्तर इतिहास ब्रह्मीभूत स्वामी श्रद्धानंदांनी १९२६ सालच्या जानेवारीत प्रसिद्ध केला, या इतिहासाच्या प्रस्तावनेंत त्यांनी असे उद्गार काढले आहेत—'It is beyond the scope of this dissertation to go into the history of modern movements based on the credulity of human nature and therefore an examination of the Aghakhani activities might well be left for some future time.' पण आगाखानी चळवळीचे समालोचन करण्याचा स्वामी श्रद्धानंदांचा विचार पुढे तसाच राहून गेला. कारण 'History of the Assassins' हा ग्रंथ प्रसिद्ध केल्यापासून एका वर्षाच्या आंतच ते स्वतःच एका खुनी मुसलमानाच्या पिस्तुलाला बळी पडले !

## हिज हायनेस हा किताब केव्हा मिळाला ?

असो, एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी इस्माइली पंथाचे तेव्हाचे धर्मगुरु व आगाखानांचे पणजे खलीलुल्ला शाह हे इराणांतील यझ्द नांवाच्या शहरी राहात होते. इ. स. १८१७ साली यझ्दच्या रहिवाशांनी इस्माइली लोकांविरुद्ध दंगा करून खलीलुल्लाला ठार मारले. या दंग्याचा सूड इस्माइली धर्मवेड्यांनी आपल्यावर उगवूं नये म्हणून इराणचा तेव्हाचा राजा फत्तेअलीशाह याने यझ्दच्या दंगेखोरांना जबरदस्त शिक्षा ठोठावल्या; व खलीलुल्लाच्या मुलाला म्हणजे आगाखानांच्या आजाला मोठी जहागीर करून दिली. पुढे फत्तेअलीशहाचा नातू महंमदशहा याच्या कारकीर्दीत इग्लंड व इराण यांचे वांकडे आले. तेव्हा इंग्रजांनी इराणचा तेव्हाचा सेनापति व आगाखानाचा आजा हुसेनअल्ली याला आपल्या देशाविरुद्ध व शहाविरुद्ध बंड करण्याला चिथावले. इराणच्या शहाने हुसेनअल्लीचें बंड मोडून प्रथम त्याला अटक केली व मागाहून त्याला क्षमा करून सोडून दिलें. सुटल्यानंतर लौकरच हुसेनअल्लीने फिरून बंड केले. तेव्हा शहाने पराभव करून त्याला

देशाबाहेर घालवून दिलें. या हुसेनअलीने अफगाणिस्थान व सिंध येथील अमिरां-विरुद्ध इंग्रजांनी केलेल्या मोहिमांमध्ये त्यांना फार मदत केली. या मदतीचा मोबदला म्हणून इंग्रजांनी त्याला वंशपरंपरेने हिज हायनेस हा किताब दिला.

## मुस्लिम लीग कां स्थापिली ?

हिंदुस्थानांत स्वराज्याची चळवळ सुरू झाल्याबरोबर तिचा प्रतिकार करण्या-करिता आगाखानांनी कंबर बांधावी, हें स्वाभाविकच होतें. कारण स्वतः आगा-खानांवर इंग्लंडच्या राजघराण्याची फारच कृपा आहे, म्हणे ! त्यांचा एक इंग्रज चरित्रकार म्हणतो, When Aghakhan first went to England, Queen Victoria granted him several private audiences and also invited him to dine and sleep in the Windsor Castle. असल्या उपकारांची परतफेड करणे हे आगाखानांचें कर्तव्यच होते. यासाठी त्यांनी मुस्लिम लीगची स्थापना करून, ज्ञातिनिष्ट चळवळीची ध्वजा उभारली. मुस्लिम लीग काढतांना आपला उद्देश काय होता, हें आगाखानांनी 'रेव्ह्यु-दे-द-मोद' मधील आपल्या मुलाखतीत स्पष्ट सांगितले आहे. ते म्हणतात, '१९०६ साली हिंदूंनी स्वराज्याची चळवळ सुरू केली, त्यावेळी मुसलमान राजकारणांत मुळींच लक्ष घालीत नसत. पण अशा रीतीने राजकारणाकडे दुर्लक्ष्य करणे मुसलमानांना किती हानिकारक आहे हे मला प्रथम समजून आले, कारण इंग्रज व हिंदु यांच्या झगड्यांत हिंदूंनी इंग्रजांना जिकले किंवा हिंदूंचा इंग्रजांशी समेट झाला, तरी त्यांत मुसलमानांचे नुकसान होते. म्हणून, ही भीषण आपत्ति टाळण्यासाठी मी मुसलमानी समाजाचा पुढाकार घेऊन मुस्लिम लीगची स्थापना घडवून आणली.' रेव्ह्यूच्या बातमीदाराला सांगितल्याप्रमाणें हिंदूंनी इंग्रजांना जिंकू नये किंवा हिंदूंचा इंग्रजांशी समेट होऊ नये, म्हणून आगाखान व त्यांचे सहकारी आज पंचवीस वर्षे तरी कायावाचा-मनेकरून प्रयत्न करीत आहेत आणि हे प्रयत्न सफल होऊन आपल्या छाती-वरील दडपण उतरल्याचा सुस्काराहि त्यांनी त्याच मुलाखतीत टाकला आहे.

## फ्रेंचांना मधाचें बोट

उपरिनिर्दिष्ट मुलाखतीत आगाखानांनी त्या फ्रेंच बातमीदाराजवळ असे उद्गार काढले आहेत की, तुमच्या फ्रेंच राष्ट्राला जगाच्या राजकारणांत इस्लामच्या

पुरस्कर्त्याची भूमिका घेतां येईल, आणि इंग्लंडच्या मनांत असून सुद्धा त्या राष्ट्राला ही भूमिका घेणें अशक्य आहे, कारण त्याच्यावर हिंदू व मुसलमान या उभयतांना समतेने वागविण्याची जबाबदारी आहे, तुमच्या मनांत आल्यास तुम्हांला मोरोक्कोपासून सीरियापर्यंतच्या जागृत सुशिक्षित मुसलमानांचे पुढारीपण घेतां येईल. येथे त्या बातमीदाराने आगाखानांना म्हटलें, "पण या भागांतील मुसलमानांची फ्रेंच अंमलाविरुद्ध बरीच गाऱ्हाणीं आहेत." याला आगाखानांनी उत्तर दिलें की, त्या गाऱ्हाण्यांत कांहीसुद्धा अर्थ नाही! पुढे तो बातमीदार म्हणाला, "शिवाय सीरियांतील अरबांना आपण इतर अरबांशीं एकजीव होऊन नवे अरब राष्ट्र अस्तित्वांत आणावेसे वाटतें." याला आगाखानांनी उत्तर दिले, "सीरियांतील अरब व इतर अरब यांच्यामध्ये फार भेद आहेत. It is necessary that the Muslims of Syria should look towards the mosque of Paris." अरबांचे एकराष्ट्र व्हावें, या कल्पनेला इतक्या निकराने विरोध करणारे आगाखान हिंदुस्थानाच्या एकराष्ट्रीयत्वाला विरोध करीत असल्यास त्यांत नवल ते काय?

## हिंदी राष्ट्रीयत्वाला आगाखानांचा विरोध

हिंदी राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेला व राष्ट्रीय पक्षाच्या आकांक्षांना आगाखानांनी आजपर्यंत अगदी कसून विरोध केला आहे. राष्ट्रीयपक्षाची दृष्टि फार संकुचित आहे, असा त्यांचा त्या पक्षावर आक्षेप आहे. ते म्हणतात, 'It is for the Indian patriot to recognise that Persia, Afghanistan and possibly Arabia must sooner or later come within the orbit of some continental power or must throw in their lot with that of the Indian Empire with which they have so much more genuine affinity." आज नाही तर उद्या इराण, अफगाणिस्थान वगैरे मुसलमानी राष्ट्रांना हिंदुस्थानाच्या फेडरेशनमध्ये सामील व्हावयाचे आहे, किंवा कदाचित् हिंदी मुसलमानांना इराण-अफगाणिस्थानाच्या संघामध्ये सामील व्हावयाचे आहे, ही गोष्ट सारखी डोळ्यांपुढे ठेवून आगाखानांनी आपली कारस्थाने चालविली आहेत. सर्व प्रांत स्वयंशासित व्हावेत व शेषाधिकार प्रांताकडेच असावेत हें कशाकरिता, तर हिंदुस्थानाच्या फेडरेशनमध्ये सामील होण्याने आपलें स्वातंत्र्य नष्ट होणार नाही, अशी इराण-अफगाणिस्थानांची खात्री पटावी यासाठी. आगाखानांनी स्पष्टच

सांगितले आहे, "The fact that Bengal and Bombay, Hyderabad and Kashmir were enjoying full autonomy, would be a guarantee to the Afagans of no risk of loss of independence in entering the federation." त्याचप्रमाणे इराण-अफगाणिस्तानच्या राजांना या फेडरेशनमध्ये येण्यांत कमीपणा वाटूं नये, यासाठी हैद्राबादच्या निजामाला His Majesty ही पदवी व वऱ्हाडचा प्रांत देऊन टाकण्याची सूचनाहि आगाखानांनी केली आहे !

## हिंदूंनी बोध घ्यावा !

मागे एकदा सर मुहम्मद इक्बाल यांनी सार्वजनिक रीतीने कबूल केलें आहेच की, पंजाब, सिंध, बलुचिस्थान व सीमाप्रांत एकत्र करून आम्हाला एक बलाढ्य मुसलमानी राष्ट्र निर्माण करावयाचे आहे. पण त्यापेक्षाहि फार अधिक महत्त्वाचीं कारस्थानें आगाखानांनी चालविली आहेत. त्याचप्रमाणे नवी राज्य-घटना अस्तित्वांत येतांच स्वतःला परराष्ट्रीय राजकारणाकडे वाहून घेण्याची भाषा शौकतअल्ली बोलत आहेत. तेव्हा इकबालसाहेबांच्या, आगाखानांच्या व शौकत-अल्लीच्या सर्व कारस्थानांची माहिती हिंदु पत्रकर्त्यांनी आपल्या वाचकांना करून द्यावी आणि या साऱ्या कारस्थानांचा हिंदुस्थानावर कोणता परिणाम होणार आहे, याचा पूर्ण विचार करून राष्ट्रीय पुढाऱ्यानी आपले धोरण ठरवावें.

—केसरी, ता. २७ जुलै, १९३४.



# दंगे कशा रीतीने घडून येतात ?

## श्री. अखिलचंद्र दत्त यांचें असेंब्लींतील भाषण

लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे उपाध्यक्ष श्री. अखिलचंद्र दत्त यानी क्रिमिनल-लॉ-अमेंडमेंट बिलावर केलेल्या भाषणांतील महत्त्वाचा भाग पुढे दिला आहे.

" देशांतल्या निरनिराळ्या ज्ञातीतील वैमनस्याची वाढ, हे एक प्रस्तुत बिल असेंब्लीपुढे आणण्याचे कारण म्हणून सांगण्यांत येत आहे. येथे एक गोष्ट उघड-पणे सांगितली पाहिजे. ती ही की, विरोधी पक्षाचे पुढारी श्री. भुलाभाई देसाई यांनी मला या प्रश्नावर न बोलण्याची सूचना केली आहे. कारण ते स्वतः आपल्या भाषणांत या मुद्याची चर्चा करणार आहेत आणि मला असे म्हणायलाहि हरकत वाटत नाही की ते हे कार्य माझ्यापेक्षा अधिक चांगल्या रीतीने पार पाडतील. त्यांच्याविषयीच्या आदरामुळे मी या प्रश्नावर बोलणारहि नाही; पण मला एकच मुद्दा सिद्ध करावयाचा ध्यास लागून राहिला आहे. तो हा की, निदान आमच्या बंगाल प्रांतांतील हिंदु-मुसलमानांतील वैमनस्य आणि कलहे हे सर्व तिसऱ्याच एका पक्षाच्या कारस्थानामुळे उद्भवले, वाढले आणि पेटले आहेत."

एक सन्मान्य सभासद—हा तिसरा पक्ष कोणता ?

श्री. अखिलचंद्र दत्त—हा तिसरा पक्ष कोणता, ते आपल्याला माहीत आहेच.

दुसरे एक सन्मान्य सभासद—हा तिसरा पक्ष आपल्यासमोरच आहे.

## चितागांगचा दंगा व कै. सेनगुप्तांचें आव्हान

श्री. अखिलचंद्र दत्त—" मागे चितागांग येथे एका पोलीस अधिकाऱ्या-च्या हत्येनंतर दंगा झाला तेव्हा ज्यांच्या अकाल मृत्यूबद्दल साऱ्या देशाला खेद वाटत आहे, असे श्रीयुत यतींद्रमोहन सेनगुप्त हे चितागांगला गेले व त्यांनी त्या दंग्याच्या कारणांची चौकशी केली. या चौकशीनंतर ते कलकत्त्याला आले आणि

कलकत्त्याच्या टाउनहॉलमधील एका सभेत त्यांनी अशा आशयाचे विधान केलें:—

'I say, I take the full responsibility of making this statement, the riot in Chittagong was engineered and brought about by the local authorities. Here am I, I make this statement openly. I am prepared to prove it, and if the Government like they can prosecute me and put me on trial.'

या आव्हानाला सरकारने कांही उत्तर दिले नाही. तेव्हा आम्हांला असे गृहीत धरून चालायला कांहीहि हरकत नाही की, चितागांग येथील दंगा हा तिसऱ्या पक्षाने घडवून आणला होता. १९३० सालच्या मे महिन्यांत डाक्याला असाच दंगा झाला. या दंग्याची चौकशी सरकारी आणि बिनसरकारी अशा दोन कमिट्यांनी एकाच वेळी केली. पैकी सरकारी कमिटीचे अध्यक्ष मि. साक्से हे होते. या कमिटीचा रिपोर्ट कधीच उजेडांत आला नाही हा रिपोर्ट अप्रकाशित राहण्याचे कारण उघड आणि सूचक आहे.

## दंग्यांचे खरे प्रेरक

दुसरी कमिटी ही कॉंग्रेसने नेमलेली कमिटी होती व तिचा अध्यक्ष मी स्वतःच होतो. आम्ही दोघे नेहमी एकमेकांना भेटत होतो. या दंग्याच्या बाबतीत आमच्यापुढे आलेला पुरावा हाच होता की, हा दंगा तिसऱ्या पक्षाने घडवून आणला आहे. दंग्याच्या आदल्या दिवशी रात्री एका मुसलमान गृहस्थाच्या घरी डाक्याच्या स्थानिक अधिकाऱ्यांची सभा भरली होती व या सभेत त्यांनी होऊं घातलेल्या दंग्याची चर्चा केली. या सभेला मि. ग्रिफिथ्स हे हजर होते. मला माहीत आहे की, इंडियन सिव्हिल सर्व्हिसमधील कोणी मि. ग्रिफिथ्स हे त्यावेळीं डाक्याच्या नबाबाचे दिवाण होते. ( शेम शेमच्या आरोळ्या ) मिदनापुराहून येथे आलेले सन्मान्य सभासद मि. ग्रिफिथ्स हेच ते होत कीं नाही, तें मला नक्की माहीत नाही; पण असें तरी कशाला बोला, हेच ते मि. ग्रिफिथ्स हे नक्की माहीत आहे. हे मि. ग्रिफिथ्स जेव्हा ज्ञातिकलहावर बोलूं लागले तेव्हा मला आशा वाटत होती की, तें तेथील वास्तविक परिस्थितीवर नवा प्रकाश पाडतील. प्रस्तुत सभेला ते हजर होते कीं नाही; किंवा त्यांनी तिथल्या मसलतींत कितपत भाग घेतला

ते मला प्रत्यक्ष माहीत नाही. पण, आमच्या कमिटीपुढे आलेल्या पुराव्यावरून मला असें म्हणतां येते कीं, मि. ग्रिफिथ्स हे त्या सभेस हजर होते. आणि हे ग्रिफिथ्स आता असेंब्लीत येऊन आपणांला ज्ञातिकलहावर प्रवचने झोडीत आहेत; असलीं प्रवचने यांच्या तोडीं शोभत नाहीत. ''

## दंग्यांची सरकारी अधिकाऱ्यांना कल्पना

एक सन्मान्य सभासद—किंवा त्यांच्या वरिष्ठांच्या तोंडी देखील.

श्री. अखिलचंद्र दत्त—''या डाक्याच्या दंग्याविषयीं मला विश्वसनीय माहितीवरून असे समजलें आहे कीं, दंगा सुरू होण्याच्या आधीं दोन-तीन दिवस सरकारी अधिकाऱ्यांना त्यांच्या वरिष्ठांकडून चार-पांच दिवसांची सामुग्री विकत घेऊन ठेवण्याच्या सूचना मिळाल्या होत्या. कारण त्यांना असें सांगण्यांत आले होतें कीं, दंगा कांही दिवस चालणार आहे. दंगा सुरू होण्यापूर्वीच हिंदू लोकांकडील बंदुका, रिव्हॉल्व्हर व इतर हत्यारें पोलिसांनी काढून घेतली होती. या दंग्याच्या चौकशीच्या वेळी तेव्हा ॲडिशनल डिस्ट्रिक्ट जज्जाच्या जागेवर असलेल्या एका अधिकाऱ्याची सरकारी कमिटीपुढे साक्ष झाली. या साक्षीत त्याने असे सांगितले की, माझ्या डोळ्यादेखत लूट चालली होती आणि स्वतः पोलिस-देखील त्या लुटीत भाग घेत होते; हा प्रकार मी टेलिफोनवरून डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट आणि पोलीस सुपरिटेंडेंट यांच्या कानांवर अनेकदां घातला, पण कोणीहि दाद घेतली नाही; तीन दिवस ही लूट चालली होती व तीन दिवस मी वारंवार टेलिफोन करीत होतो. पण एक देखील अधिकारी तिकडे फिरकला नाही. ही झाली डाक्याची कथा. असाच एक हिंदुमुसलमानांचा दंगा कोमिल्ला येथे झाला. तिथे देखील तसलाच प्रकार घडून आला. या दंग्याच्या बाबतींत मी प्रत्यक्ष पाहिलेली हकीकतच सांगणार आहे. ही लज्जास्पद गोष्ट मला कबूल केली पाहिजे कीं, कोमिल्ला येथे हिंदुमुसलमानांचा दंगा झाला, ही गोष्ट हिंदु आणि मुसलमान या दोन्ही समाजांला सारखीच लज्जास्पद आहे. पण माझा मुद्दा हा आहे की, त्यांनी कांही स्वतः होऊन दंगा केला नाही. हा मुद्दा सारखा लक्षांत ठेवला पाहिजे. कोमिल्ला येथे कांही लोकांवर हल्ला झाला व त्यांत वैकुंठ नांवाच्या एका इसमाचें डोकें फुटलें. मी व माझे कांही मित्र डोकें फुटलेल्या वैकुंठाला डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट-

कडे घेऊन गेलो. तेव्हा डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटने मला जें उत्तर दिलें ते ऐकून असेंब्लीच्या सन्मान्य सभासदांना धक्काच बसेल. तो म्हणाला, 'तुम्ही माझ्याकडे कशाला येतां ? बिपिनचंद्र पालकडे जा.' (शेम शेमच्या आरोळ्या) त्यानंतर त्या भागाचा डिव्हिजनल कमिशनर तेथे आला. आम्ही त्याला दंगा थांबविण्यांत आम्हांला मदत करण्याबद्दल पत्र लिहिले, पण या बाबतीत तो मुळींच लक्ष घालीना. त्यानंतर कांही दिवसांनी सरकारी व बिनसरकारी लोकांची एक जाहीर सभा झाली. त्या जाहीर सभेत दंगा थांबविण्याचा कांहीहि प्रयत्न न केल्याबद्दल आम्ही कमिशनरची हजेरी घेतली. भर सभेत आम्ही त्याला म्हटले की, तुम्ही अमुक दिवशी चितागांगहून येथे आला होता आणि त्या दिवशी आम्ही तुम्हांला दंग्याविषयी पत्र लिहिले होते; पण तुम्ही त्या बाबतीत कांही केले नाही. प्रथम कमिशनरने उत्तर दिले की, मी मुळी तेव्हा येथे नव्हतोच, मी कांही त्या दिवशीं येथे आलो नाही. तेव्हा आमच्या मित्रांपैकी एकाने संतापून सांगितले कीं, त्याच तारखेला तुम्ही येथे आला व त्या दिवशी तुम्ही येथे होता. हें ठणठणीत उत्तर मिळाल्यावर कमिशनर म्हणाला, 'तसेहि असेल कदाचित.'

## मैमनसिंगच्या दंग्याची तीच कहाणी

आता, मैमनसिंगच्या दंग्याविषयी मी फारसे बोलणार नाही. तेव्हा श्री. जी. एस्. दत्त हे मैमनसिंगचे कलेक्टर होते. त्यांनी आपल्या जिल्ह्यांत दंगे न व्हावेत म्हणून शक्य ते सर्व प्रयत्न केले. पण, त्या प्रयत्नांचा परिणाम काय झाला ! तर दत्तसाहेबांची लौकरच तेथून बदली झाली. (शेम, शेमच्या आरोळ्या) त्यानंतर तिथें दुसरा डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट आला. त्याने बारलायब्ररीत जाऊन मैमनसिंग येथे हिंदुमुसलमानांचा दंगा होणार नाही, असे सर्वांना आश्वासन दिले. हें आश्वासन दिल्यावर लौकरच मैमनसिंग जिल्ह्यांत अतिशय भयंकर स्वरूपाचा दंगा झाला. तेव्हा एका गरीब बिचाऱ्या सबडिव्हिजनल मॅजिस्ट्रेटने आपल्याच जबाबदारीवर तो दंगा शमविला. आणि त्याचा परिणाम काय झाला ? मि. जी. एस्. दत्त यांच्याप्रमाणेंच त्याचीहि ताबडतोब बदली करण्यांत आली. (कॉंग्रेसपाक्षियांच्या शेम, शेमच्या आरोळ्या) मग पुढे काय झालें ? एका मुसलमान गृहस्थाने, मला

वाटते मैमनसिंगच्या पब्लिक प्रॉसिक्यूटरनेच, एक कन्सिलिएशन बोर्ड नेमण्याची कल्पना काढली. आणि सध्यां असेंब्लीचे सभासद असलेले मि. सोम यांना त्या समितीचे सभासद होण्याची सूचना केली. तेव्हा मि. सोम यांनी उत्तर दिले, "बरे, पण मला अशी माहिती आणि पुरावा मिळाला आहे की, डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट आणि पोलिस सुपरिंटेंडेंट यांनी तुमच्या साहाय्याने आणि तुमच्या मार्फत हा दंगा घडवून आणला आहे. आणि आता, तुम्ही स्वतःच ज्या कमिटीचे प्रमुख आहांत, अशा कमिटीचा सभासद व्हायला मला सुचवितां ?" हे उत्तर त्यांनी बारलायब्ररीत सर्वांसमक्षच दिले. आणि मग दुसऱ्या दिवशी काय घडले ? दुसऱ्या दिवशी मि. सोम यांना अटक झाली. ( काँग्रेसपक्षियांच्या शेम, शेमच्या आरोळ्या ) मि. सोम यांच्यावर एका सभेत पिकेटिंगवर व्याख्यान दिल्याच्या आरोपावरून खटला भरला. हा खटला कांही दिवस चालला. त्या मुदतीत मि. सोम यांना लॉकअप्‌मध्ये ठेवले होते. आणि कोर्टांत नेतांना हातकड्या घालून आणि काढण्या बांधून चालवीत नेत असत" ( शेम–शेमच्या आरोळ्या ).

## हिंदुपुढाऱ्यांचा अपमान व छळ

एक सन्मान्य सभासद—निंद्य;

दुसरे एक सन्मान्य सभासद–त्यात कांही नवल नाही.

श्री. अखिलचद्र दत्त–"खुलना येथील वकिलांच्या पुढाऱ्यालाहि असेच हातकड्या घालून व काढण्या बांधून मिरवीत नेलें होते. कोमिल्ला येथील एका कुलीन तरुणालाहि असेच वागविण्यांत आले होते. त्याचे वडिल आता या असेंब्लीत आहेत. पण मी त्यांचे नांव सांगत नाही. या साऱ्या प्रकारावरून मला स्वामी विवेकानंदांच्या एका गोष्टीचें स्मरण होते. ते म्हणत, "कांही लोक स्वतःला नसती व्याधि लावून घेऊन मग ती बरी करण्याच्या प्रयत्न करीत असतात. शयनमंदिराच्या शेजारी शेतखाना बांधावयाचा व मग विषमाचा विकार बरा करण्यासाठी वैद्याला निमंत्रण करावयाचें; अशीच त्यांना संवय लागलेली असते." म्हणून मी म्हणतो की, या बिलांतील कलमांनी ज्ञातिकलहांचा नायनाट होणार नाही. उलटपक्षी, आमचे म्हणणे असें आहे कीं, वैद्य महाराज, आपण स्वतःचीच

चिकित्सा करा; तुमच्यामध्ये सुधारणा झाली, तुम्ही स्वतः ज्ञातिकलहांची जोपासना करण्याचें किंवा ते कलह पेटवून देण्याचें थांबविलें तर या देशांत दंग्याचें नांव देखील ऐकूं येणार नाही."

—महाराष्ट्र, ता. १५ डिसेंबर, १९३५.



# ब्रिटिश हेरांचे डावपेंच



ब्रिटिश हेरांच्या डावपेचांची कथा सांगताना, त्यांनी स्वतःच प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांतून कसा सत्यापलाप केला आहे, याच्या वर्णनापासूनच सुरुवात करणें बरें.

यंदांच मेजर थॉमस कूल्सन ओ. बी. ई. नांवाच्या इंग्रज हेराने जर्मन हेर-खात्यांतील "माताहारी" या नांवाने प्रसिद्ध असलेल्या एका नर्तकीचे चरित्र प्रसिद्ध केले आहे. गेल्या महायुद्धांत ही बाई फ्रान्समध्ये राहून जर्मनांना फ्रेंच लोकांच्या गुप्त बातम्या पुरविण्याचें काम करीत होती. माताहारी हेर आहे, हे फ्रेंच हेरांना माहीत होतें; पण लष्करी व परराष्ट्रीय खात्यांतील उच्चपदस्थ अधिकाऱ्यांची ती प्रियकरीण असल्यामुळे त्यांना तिला अटक करतां येईना. तेव्हा फ्रेंच हेरांच्या मुख्याने तिला एकदा भेटीला बोलावून तंबी दिली की, तूं जर्मनांच्या हेराचे काम करतेस हें कांही चांगले नव्हे, हा धंदा तूं सोडलास तर ठीक आहे, नाही तर एकाद्या दिवशी आम्ही तुला गोळी घालून मारून टाकूं. तेव्हा माताहारीने त्याला उत्तर दिलें की, मी कांही जर्मनांच्या नोकरींत नाही, मात्र हेराला आवश्यक असणारे गुण माझ्या अंगी आहेत हे खरे, तर तुम्हांला पटत असल्यास मी तुमच्या नोकरींत शिरायला कबूल आहे. माताहारीचे म्हणणे मान्य करून त्या अधिकाऱ्याने तिला बेल्जममध्ये काम करणाऱ्या सहा फ्रेंच हेरांची नांवे सांगितली, व हॉलंडमध्ये जाऊन त्यांच्या मार्फत कामाला सुरुवात करण्याचा सल्ला दिला. माताहारीने ताबडतोब तीं नांवें जर्मनांना कळविलीं व आपण स्वतः इंग्लंडच्या वाटेने हॉलंडला जायला निघाली. माताहारीला दिलेल्या यादीतील सहाहि हेर शत्रूंना फितूर असल्याचा फ्रेंचांना संशय आला होता. आता त्या सहांपैकी पांचजण खरोखरच जर्मनांचे हेर होते व उरलेला जर्मनी व फ्रान्स या दोघांचाहि पगार खात असून वास्तविक इंग्रजांच्या हेराचे काम करीत होता. माताहारीची यादी मिळतांच जर्मनांनी त्या सहाव्या हेराला गोळी घालून मारून टाकलें. त्याबरोबर इंटेलिजन्स सर्व्हिसच्या

अधिकाऱ्यांनी फ्रेंच हेरांच्या खात्याकडे तक्रार केली. अशी हकीकत माताहारी-च्या फ्रेंच चरित्रांत आहे. पण बाकीची हकीकत देऊनमुद्धा मारून टाकलेला हेर इंग्रजांच्या नोकरीत होता ही गोष्ट मेजर कूल्सनने गाळली आहे.

ही एका ब्रिटिश हेराच्या दुर्दैवाची कथा म्हणून कूल्सनने गाळली असेल असे म्हणावे तर दुसऱ्या एका ठिकाणी त्याने एका यशस्वी ब्रिटिश हेराची कीर्ति पण लपवून ठेविली आहे. एके ठिकाणी अदृश्य शाईविषयी कांही माहिती सांगतांना कूल्सनने असे म्हटले आहे की, मारी जोसे देइ पासी या जर्मनांच्या हेराजवळ अनेक तऱ्हांच्या अदृश्य शायाचा फार मोठा भरणा होता, असें असून सुद्धा त्याने एकदा साध्या शाईने व साध्या भाषेत आपल्या स्विट्झर्लंडांतील वरिष्ठांना पत्र लिहिलें आणि त्या पत्रामुळे तो पकडला गेला. देइ पासी कसा पकडला गेला याची हकीकत कूल्सनने सांगितली नाही; पण ती सांगण्याजोगी आहे. स्विट्झर्लंडमधील बर्न शहरी हान्स शिकलेर नांवाचा एक जर्मन राहत होता. त्याच्याविषयी कांही संशय येऊन इंग्रज हेरांनी पोस्टांतून त्याचे टपाल चोरून न्यावयाचे ठरविले. हे काम जॉन हेन्री नांवाच्या हेराकडे आले. तेव्हा तो एक अमेरिकन पासपोर्ट मिळवून बर्नला गेला व सुमारे पंधरा दिवस पोस्टांतलि कामगारांच्या हालचालीवर नजर ठेवून संधि सांपडतांच त्याने शिकूलेरचे टपाल लांबविले. या टपालांत इतर अनेक महत्त्वाच्या कागदांबरो-बरच क्लेबेर नांवाच्या चिलखती जहाजाच्या हालचालींची माहिती देणारें देइ पासींचें पत्र होतें. ते पत्र हाती पडतांच फ्रेंच लोकानी देइ पासीची तात्काळ चौकशी करून त्याला गोळी घालून मारून टाकले. देइ पासीला गोळी घालण्याच्या प्रसंगीं जॉन हेन्री मुद्दाम हजर राहिला होता.

जॉन हेन्रीचा हा धाडसी प्रयत्न यशस्वी होण्यापूर्वी स्विट्झर्लंडमध्ये पुराणवस्तुसंशोधकाच्या नात्याने व प्रो. एरहार्ट या नांवाने वावरणाऱ्या एका जर्मन हेराच्या घरचे कागदपत्र लांबविण्याचा प्रयत्न मिस फ्लोरा या इंग्रज बाईने केला होता. पण तो फसला. प्रो. एरहार्ट हा अतिशय सावध मनुष्य होता. आपल्या खोलीत तो कधी कोणा परक्याला येऊं देत नसे. तसेच आपल्या डोक्यांत कामवासना प्रबळ होऊं नये म्हणून, तासंपट्टी

करून घेण्याचीहि त्याला संवय होती. तरी देखील मिस फ्लोराने त्याला आपल्या प्रेमपाशांत अडकविलाच. एके दिवशी एरहार्टने फ्लोराला आपल्या इथें जेवायला बोलाविले व भोजनानंतर तो तिला आपल्या खोलीत घेऊन गेला. खोलीत गेल्यावर थोड्याच वेळाने फ्लोराने त्याला बाहेर राहिलेली आपली अत्तराची बाटली आणायला पाठविले. तो कामांध प्रोफेसर बाहेर गेल्याबरोबर फ्लोराने त्याच्या खोलीतील आपल्याला हव्या असलेल्या वस्तू हस्तगत केल्या व आता ती पळ काढणार इतक्यांत दुसऱ्याच एका इसमाने तिला पकडले. तिला पकडणारा इसम प्रो. एरहार्टचा सेक्रेटरी होता व आपल्या धन्याच्या कामुकपणामुळे फसगत होऊं नये म्हणून तो त्याच खोलीतील एका चोरकपाटांत लपून त्या उभयतांवर नजर ठेवीत होता. प्रो. एरहार्ट परत आल्यावर आपल्या प्रियकरणीचे चरित्र पाहून तो संतापाने बेहोष झाला; पण फ्लोराने त्याला इंटेलिजन्स सर्व्हिसची सर्व कारस्थानं सांगण्याचे कबूल करून त्या उभयतां जर्मनांच्या हातून आपली सुटका करून घेतली. फ्लोराने सांगितलेल्या माहितीला भुलून व तिच्या सांगण्यावर विश्वास ठेवून एरहार्टने तिला सोडून दिले; पण त्या मायाविनीच्या भुलथापावर विश्वास टाकल्याबद्दल त्याला मागाहून आपल्या वरिष्ठांच्या शिव्या खाव्या लागल्या.

या प्रसंगी मिस फ्लोराला हार खावी लागली खरी; पण पुढे लौकरच जर्मन आरमारांतील एका कमांडरच्या डोळ्यांत धूळ फेकून तिने या अपयशाचा डाग पुसून टाकला. १९१६ सालच्या आरंभी जर्मन आरमाराची रहस्ये समजून घेण्यासाठी मिस फ्लोरा ही हांबुर्ग बंदरी येऊन राहिली. तिथे आल्यावर तिने 'क्रोन प्रिंझेसिन सिसिली ' नांवाच्या एका चिलखती जहाजाच्या कमांडरचे प्रेम संपादन केले. एके दिवशी ही प्रणयी दुकूट सिसिली जहाजावर असतांना त्या कमांडरला एक जरुरीचा हुकूम आला. त्या हुकुमाचा अर्थ लावण्यासाठी कमांडरने फ्लोराच्या देखतच आपली ट्रंक उघडली व तिच्यांतील एक कोडबुक उघडून त्या हुकुमाचा अर्थ लावण्यांत तो गर्क झाला. तो आपल्या कामांत गुंतला असतां फ्लोराने दुसरे एक लाल कोडबुक उचलून आपल्या वस्त्रांत लपविले. आपले कोडबुक चोरीला गेल्याची वार्ता त्या भीतिग्रस्त कमांडरने वरिष्ठांना कळूं दिली नाही व जटलंडच्या आरमारी युद्धांत जर्मनांनी त्याच कोडाचा उपयोग केल्यामुळे त्यांच्या

ॲडमिरलचे सर्व हुकूम ब्रिटिश आरमाराच्या अधिकाऱ्यांना समजत गेले, ही गोष्ट स्वतः लॉर्ड बाल्फोरने कबूल केली आहे. हे कोड चोरल्याबद्दल फ्रोराला ८०० पौंडांचें जादा बक्षिस मिळाले.

३१ मे १९१६ च्या रात्री जटलंडच्या युद्धाची वार्ता लंडनला पोंचल्याबरोबर या माहितीचा फायदा कसा करून घ्यावा याचा विचार करण्यासाठी इंटेलिजन्स सर्व्हिसच्या मुख्य अधिकाऱ्यांची सभा भरली. या सभेत सर अर्नेस्ट कॅसल याच्या सूचनेवरून असे ठरले कीं, जटलंडच्या युद्धांत इंग्लंडचा पुरता पराजय झाला अशी अमेरिकेला तार पाठवावी. या ठरावाला ॲस्क्विथच्या प्रधानमंडळाने संमति दिली आणि दुसरे दिवशीं इंग्लंडच्या सपशेल पराजयाची वार्ता अमेरिकन पत्रांतून प्रसिद्ध झाली. त्याबरोबर न्यूयॉर्कमध्ये इंग्लंडच्या रोख्यांची किंमत मूळ किंमतीच्या एक तृतीयांशाइतकी उतरली. त्या दिवशीं इंटेलिजन्स सर्व्हिसच्या दूतांनी मिळाले तितके इंग्रजी रोखे खरेदी केले. मग जूनच्या दुसऱ्या तारखेला इंटेलिजन्स सर्व्हिसने अमेरिकेंत अशी बातमी पसरविली कीं, मागाहून कळलेल्या माहितीवरून असें दिसते की, जटलंडच्या युद्धांत जर्मन आरमाराचा पुरा फाडाव होऊन ते पळून गेले. मग आदले दिवशी इंग्रजी रोख्यांच्या किमती जशा उतरल्या होत्या तशाच त्या दुसरे दिवशीं भरमसाट चढल्या आणि इंग्रजांच्या दूतांनी आदले दिवशी खरेदी केलेले रोखे चढलेल्या किंमतीला विकून अतोनात फायदा मिळविला. या खरेदीविक्रींत इंग्रजांना एकाच दिवसांत सहा कोटि पौंडांचा फायदा झाला असा अदमास आहे. जटलंडच्या आरमारी युद्धाविषयी आणखी एक गोष्ट सांगण्याजोगी आहे. या युद्धाच्या दिवशी एका जर्मन हेराने इंग्रजांच्या आरमारीखात्यांत प्रवेश मिळवून तिथे अनेक घोटाळे माजविले. ॲडमिरल जेलिकोने या युद्धाची हकीकत सांगतांना असे म्हटले आहे की, त्या दिवशी आरमारीखात्याकडून आम्हांला वेळच्यावेळी बातम्या मिळाल्या नाहीत. बातमी खरी असली तर ती उशिराने पोंचत असे व खोटी असली तर ताबडतोब हाती पडत असे. त्याप्रमाणेच जर्मन आरमार पळून जाऊं लागल्यावर ते एका दिशेने जात असतां भलत्याच दिशेला त्याचा पाठलाग करण्याची जेलिकोला सूचना मिळाली. ही तार जेलिकोला कोणी पाठविली हें कोडे अजून उलगडलें नाही.

गेल्या महायुद्धांत इंटेलिजन्स सर्व्हिसच्या आरमारी माहिती मिळविण्याच्या खात्याचा मुख्य सर रेजिनाल्ड हॉल हा होता. तेव्हा इ. सन १९१४ च्या अखेरीला यिप्रेसची लढाई चालू असतां सर रेजिनाल्डला एक अचाट कल्पना सुचली. यिप्रेसच्या लढाईत सामील होण्यासाठी तयार होत असलेलें जर्मन सैन्य जर जर्मनीतच अडकून पडलें तरच त्या लढाईत इंग्रजांचा निभाव लागेल, हें ओळखून त्याने जर्मनींतील हॅनोव्हर प्रांत काबीज करण्यासाठी इंग्लंडचें सैन्य लौकरच जर्मनीच्या समुद्रकिनाऱ्यावर उतरणार आहे, अशी बातमी पसरविली. मेजर कूल्सनने अडाणीपणामुळे असें लिहिले आहे की, हॉलंडच्या समुद्रकिनाऱ्यावर उतरून इंग्रजी सैन्य जर्मनीवर हल्ला करणार आहे अशी बातमी सर रेजिनाल्डने पसरविली. बेल्जमच्या तटस्थवृत्तीचा भंग केल्याच्या मिषाने जर्मनीशी लढणारे इंग्लंड हॉलंडमध्ये तोच प्रकार करणार आहे असें प्रसिद्ध झाले असतें तर इंग्लंडची नाचक्की झाली असती, इतकेंच नव्हे तर उत्तर युरोपांतील सर्व तटस्थ राष्ट्रें इंग्लंडच्या विरुद्ध झाली असतीं. असो, नुसत्या वदंतेवर जर्मन लोकांचा विश्वास बसायचा नाही, हे ओळखून त्याने किचनेरच्या सहीचे निरनिराळ्या सेनापतींनी जर्मनीत उतरल्यावर कसें वागावें याबद्दलचे खोटे हुकूम तयार केले व ते जर्मन हेरांच्या हाती पडतील अशी व्यवस्था केली, आरमाराला उत्तरसमुद्राच्या दिशेला आपले सामर्थ्य एकत्रित करण्याचे हुकूम दिले व या काल्पनिक सैन्याला जर्मनीत उतरविण्यासाठी जहाजे जमा केली. ही सर्व माहिती जर्मनीत कळल्याबरोबर जर्मन सरकारने बेल्जममध्ये जायला निघालेले सैन्य उत्तर समुद्राच्या किनाऱ्यावर नेलें व एमडेन, कुक्सहाव्हेन, ब्रोर्कूम वगैरे बंदरांतून खंदक खणायला सुरुवात केली. जर्मन सैन्य उत्तर समुद्राच्या किनाऱ्यावर जमत असल्याची बातमी फ्रेंच हेरांनी मार्शल जोफ्रेला कळविली व त्याने किचनेरला ती हकीकत कळवून जर्मनांच्या स्वागताची तयारी करायला सांगितलें. आता किचनेरचें व इंटेलिजन्स सर्व्हिसचें फारसे सरळ नव्हतें हे प्रसिद्धच आहे, शिवाय किचनेरच्या सहीचे खोटे कागद आपण तयार केले आहेत असें त्याला सांगणें थोडे अवघडच होते, म्हणून सर रेजिनाल्डने जर्मनांना फसविण्यासाठी आपण कोणत्या युक्त्या योजल्या आहेत, याची खबर किचनेरला दिली नव्हती. यामुळे किचनेरने

इंग्लंडमधील बहुतेक सैन्य पूर्वकिनाऱ्यावर जमा केले व त्या किनाऱ्यावर खंदक खणायला सुरुवात केली. अशा रीतीने जर्मनीला फसविण्यासाठी योजिलेली युक्ति इंग्लंडची फसवणूक करण्यालाहि उपयोगी पडली.

युद्धाच्या अखेरच्या दिवसांत सर रेजिनाल्डने आणखी एक पराक्रम करून दाखविला. ती कथाहि इथेच सांगावी हे बरे. जर्मन लष्कराचा पराजय होऊन ते फ्रान्समधून परत फिरल्यावर कायसरने जर्मनांची कोंडी फोडण्यासाठी इंग्रजी आरमारावर शेवटचा निकराचा हल्ला करून पहावयाचे ठरविले. ही बातमी सर रेजिनाल्डला समजल्याबरोबर त्याने जर्मन आरमार कील कालव्याच्या बाहेर पडणारच नाही अशी व्यवस्था करण्यासाठी आपले दूत कील बंदरी पाठविले. त्या दूतांनी जर्मन आरमारांत बोल्शेव्हिझमचा प्रसार करण्याला सुरुवात केली. रशियन आरमाराने रशियांत राज्यक्रांति घडवून आणण्यात कसा पुढाकार घेतला होता, याची हकीकत सांगून त्यांनी जर्मन खलाशांना असे सुचविले की, इंग्लिश व जर्मन ही दोन आरमारे सध्या जगांत श्रेष्ठ व समबल आहेत, त्यांनी एकमेकांशी लढून आत्मघात करून घेण्यापेक्षा गरिबांच्या हितासाठी आपल्या देशातून राज्यक्रान्ति घडवून आणण्यात पुढाकार घ्यावा. त्या गांजलेल्या व हताश झालेल्या जर्मन खलाशांना या मानभावाचा सल्ला पसंत पडला आणि त्यांनी जर्मनीत राज्यक्रान्ति घडवून आणण्याचे कबूल केले. मात्र त्यांनी एकच अट घातली की, प्रथम इंग्रजी आरमाराने बंड करावे व मग आम्ही बंड पुकारूं. तेव्हा लगेच इंग्रजी दूतानी रोसिथ इथे इंग्रजी आरमाराने बंड केल्याची बातमी आणली व इंग्रजी खलाशांनी आपल्या जहाजांवर तांबडी निशाणे लावली आहेत, अधिकाऱ्यांना अटकेत ठेवून त्याचे सामान लुटले आहे व सर्व जहाजांवरील सत्ता खलाशांच्या सोव्हिएटकडे आणिली आहे वगैरे काल्पनिक गोष्टी जर्मन खलाशांत पसरविल्या. याशिवाय बदमाष देशद्रोह्यांना मनमुराद लांच चारून जर्मन आरमारांत बंड घडवून आणले. या बंडामुळेच कायसरला राज्य सोडून पळून जावे लागले.

पॅरिसच्या तहपरिषदेला लिथुआनियाशेजारी असलेल्या एका रशियन प्रांतातर्फे बॅरन ॲलेक्झिस ऑस्नोबिशिन नांवाचा एक प्रतिनिधि आला होता.

त्या रशियन प्रांतांतले लोक कम्युनिस्टांच्या विरुद्ध पक्षांतले होते. पण त्यांना शेजारच्या लिथुआनिया किंवा पोलंड या राष्ट्रांत सामील होण्याची इच्छा नव्हती. पॅरिसला आल्याबरोबर बॅरन ऑस्नोबिशिनने प्रे. विल्सनची भेट घेतली व त्याच्याकडून आपला प्रांत पोलंड किंवा लिथुआनिया यांच्यांत सामील होऊं नये, यासाठी आपण खटपट करूं, असे वचन घेतलें. पुढे कांही दिवसांनी प्रे. विल्सनने त्या प्रांताचा प्रश्न तहपरिषदेपुढे आणला व अमुक तारखेला त्या प्रांताच्या प्रतिनिधींना तहपरिषदेपुढे आपली बाजू मांडण्यासाठी पाचारण करावें, असें परिषदेच्या कर्णधारांनी ठरविले आता हा प्रांत स्वतंत्र राहू नये असें इंग्रजी मुत्सद्यांचे मत होते म्हणून किंवा केवळ प्रे. विल्सनची फजिती करण्याची एक संधि दवडूं नये म्हणून इंटेलिजन्स सर्व्हिसने वरील बातमी समजल्याबरोबर रात्रीच्या वेळी ऑस्नोब्रिशिनच्या बिऱ्हाडावर छापा घातला आणि त्या बिऱ्हाडाचें टेलिफोनचें कनेक्शन तोडून संथपणे त्याच्या कागदपत्रांची लूट केली. अशा रीतीने लांबविलेल्या कागदपत्रांच्या साहाय्याने इंग्रजी हेरांनी बॅरन ऑस्नोब्रिशिन हा जर्मनांचा हेर आहे, असें सिद्ध करणारे बनावट कागद करून रात्रीच्या रात्रीं फ्रेंच पोलिसांकडे पाठवून दिले. सकाळी बिचारा ऑस्नोबिशिन रात्रीच्या लुटीची फिर्याद गुदरण्यासाठी पोलिसकचेरींत गेला असतां फ्रेंच पोलिसांनी त्यालाच अटक करून तुरुंगांत पाठविलें. पुढे पुष्कळ दिवस तपास करूनसुद्धा कांहीहि पुरावा सांपडत नाही, असें दृष्टोत्पत्तीस आल्यावर फ्रेंच पोलिसांनी बॅरनची क्षमा मागून त्याला सोडून दिले; पण त्याच्या सुटकेपूर्वीच त्याच्या प्रांताचा प्रश्न इंग्रजांनी मनाप्रमाणें सोडवून घेतला होता.

कोणाहि मनुष्याला पळवून नेणे हा इंटेलिजन्स सर्व्हिसच्या हाताचा मळ आहे. निकोलस एव्हरिट नांवाच्या इंग्रज हेराने म्हटलें आहे, ' कोणाचीहि प्रथम ओळख करून घ्यावी, मग त्याला एखाद्या हॉटेलांत जेवायला किंवा फराळाला न्यावें. तेथे त्याच्या अन्नांत किंवा पेयांत गुंगीचें औषध मिसळावें. मग आपला मित्र एकाएकीं आजारी पडला असल्याचें किंवा त्याला दारू चढली असल्याचें सांगून घरीं पोंचविण्याच्या निमित्ताने त्याला एखाद्या बगींत किंवा मोटारींत घालावें व अशा रीतीने इष्ट स्थळीं त्याची रवानगी करावी, या उपायाने थोड्या खर्चांत व बिनबोभाट काम होतें.' असलीं बिनबोभाट कामें ज्या खात्यांत करावीं लागतात,

त्याच इंटेलिजन्स डिपार्टमेंटमध्ये लॉर्ड रॉबर्ट्स, लॉर्ड किचनेर, लॉर्ड बेडनपॉवेल यांच्यासारखा सेनापतींनी व अरेबियन् नाइट्सचा भाषांतरकर्ता सर रिचर्ड बर्टन, ब्रिटिश म्यूझियमचा एक अधिकारी डॉ. होगार्थ यांच्यासारख्या विद्वानांनी कित्येक वर्षे काम केलें आहे, ही गोष्ट हिंदुस्थानच्या लोकांना सांगूनसुद्धा खरी वाटणार नाही.

बेडनपॉवेलने आपल्या आठवणी सांगतांना म्हटले आहे की, आमच्या सीक्रेट सर्व्हिसमधील लोक नेहमी विशुद्ध वर्तनाच्या लोकांमधून निवडले जातात, ही गोष्ट निर्विवाद आहे. पण ही गोष्ट कांही सर्वस्वी खरी नाही. एकदा लंडनमधील एक सुप्रसिद्ध बदमाष इंटेलिजन्स सर्व्हिसमधील एका अधिकाऱ्याच्या ऑफिसच्या खोलीवर ठोठावूं लागला. त्या वेळी क. लॉरेन्स तिथे होता. तो बदमाषाला म्हणाला, 'इंटेलिजन्स डिपार्टमेंटमध्ये कांही येईल त्याला मुक्तद्वार मिळायचे नाही.' बदमाषाने उत्तर दिले, 'जॉन एडवर्ड्सला तो जाईल तिथे मुक्तद्वार मिळेल.' हें उत्तर ऐकून लॉरेन्सला वाटलें कीं, या मनुष्यांत कांही पाणी आहे व त्याने त्याला त्याची पूर्वकथा विचारली. लंडनमधील हलकट लोकांच्या करमणुकीसाठी बायकांची मुष्टियुद्धें करविल्याच्या अपराधाबद्दल जॉन एडवर्ड्सवर वारंट सुटलें होतें आणि म्हणून पोलिसांना चुकविण्यासाठी तो इंटेलिजन्स सर्व्हिसच्या दाराशीं आला होता. या पूर्वीहि त्याने अनेक गुन्हे केले होते. त्याची हकीकत ऐकून घेतल्यावर लॉरेन्सने त्याला विचारलें, 'मी सांगेन तें तूं करशील?' तो म्हणाला 'होय', 'बरें, मग माझ्यासमोर बायबलवर हात ठेवून शपथ घे.' शपथविधि झाल्यावर लॉरेन्सने त्याला हुकूम केला, 'तुर्की भाषा शीक' आणि लगेच डेव्हनशायरमध्ये इंग्रजी हेरांना शिकविण्याची स्वतंत्र शाळा आहे, तेथे जॉन एडवर्ड्सची रवानगी झाली व रोज सहा तास याप्रमाणें दोन वर्षेंपर्यंत तुर्की भाषेचें अध्ययन करण्यासाठी त्याला तिथे ठेवण्यांत आले. पुढे महायुद्धांत जॉन एडवर्ड्सने तुर्की फकिराच्या वेषाने गॅलिपोलीमध्ये वावरून ब्रिटिश आरमाराला फार महत्त्वाच्या बातम्या पुरविल्या.

मेजर कूल्सनने आपल्या पुस्तकांत म्हटलें आहे कीं, इंटेलिजन्स सर्व्हिसमध्ये बायकांना सहसा घेत नाहीत. पण ही गोष्ट खोटी आहे.

इंटेलिजन्स सर्व्हिसमध्ये बायकांना प्रवेश मिळतो आणि या बायका वाटेल तें धाडस करून आपल्या खात्याला हवी असलेली माहिती मिळवितात. उदाहरणार्थ, गेल्या महिन्यांतच एक फ्रेंच सुपरसबमरीन माल्टा बेटापासून कांही अंतरावर उभी असतां मिस् रुटर नांवाची इंग्रज बाई दोन मैल पोहून त्या बोटीजवळ गेली व बोटीच्या कप्तानाला विनंति करून तिने ती अति आधुनिक पाणबुडी पाहण्याची परवानगी मिळविली. ही मिस् रुटर ब्रिटिश हेरांपैकीं असावी, अशी शंका स्त्रीदाक्षिण्याने पछाडलेल्या व समुद्रांतून वर येणाऱ्या अप्सरेच्या सौंदर्याला भुललेल्या फ्रेंच कप्तानाखेरीज इतर कोणालाहि येईल.

अगदी नुकतीच घडलेली आणखी एक गोष्ट येथे सांगण्याजोगी आहे. सध्यां कर्नल लॉरेन्स इराणांत कोणत्या तरी कारस्थानासाठीं आला आहे, ही बातमी एका जर्मन वर्तमानपत्राच्या बातमीदाराने युरोपांत प्रसिद्ध केली. तेव्हा क. लॉरेन्सने तो बातमीदार स्वतःच कर्नल लॉरेन्स असल्याची बातमी आपल्या हस्तकांकरवीं इराणी अधिकाऱ्यांना कळविली व त्यांनी त्या बातमीदाराला अटक करून तेहरानला नेले. तेहरानला गेल्यावर तेथील जर्मन अधिकाऱ्यांच्या मध्यस्थीने त्याची सुटका झाली.

नवशिक्या हेरांना वेषांतर करण्याची फार आवड असते; पण अनुभवाने त्यांचे हें वेड कमी होते. कर्नल लॉरेन्सला स्त्रीवेष करून वावरण्याची फार संवय होती. या संवयीमुळे त्याच्यावर एकदां विलक्षण प्रसंग ओढवला. महायुद्धांत एकदां कर्नल लॉरेन्स व त्याचा एक स्नेही हे कांही स्त्रियांबरोबर स्त्रीवेषाने तुर्कांच्या एका ठाण्याची टेहळणी करायला गेले होते. तें काम पार पाडून परत येत असतां वाटेंतल्या वाळवंटांत त्यांना तुर्की शिपायांनी गांठले व आपला कामाग्नि शमविण्यासाठीं त्यांच्यावर हात टाकला. त्या तुर्कांच्या तावडीतून सुटून आपली छावणी गांठीपर्यंत लॉरेन्सला पळतां पळतां पुरेवाट झाली व तेव्हापासून त्याने फिरून स्त्रीवेष न करण्याचा निश्चय केला !

वेषांतरें करण्यांत सर्वांत पटाईत इंग्रज हेर कदाचित् सिडने रेली हाच असेल. एकदा जर्मन आरमारांतील एका तरुण अधिकाऱ्याकडे कायसरची भेट घेऊन आरमाराच्या हालचालींविषयींचें त्याचें मत आपल्या वरिष्ठांना कळविण्याची कामगिरी

आली होती. ही बातमी रेलीला समजतांच त्याने इतर इंग्रज हेरांच्या साहाय्याने त्या अधिकाऱ्याला पकडून आपल्या अटकेत ठेविले व त्याचा युनिफॉर्म आपण घालून तो स्वतः कायसरच्या भेटीला गेला. त्या भेटीत कायसर त्याच्यावर इतका खूष झाला की, त्याने रेलीला जेवायला ठेवून घेतले. अशी हकीकत मेजर कूलसनच्या पुस्तकांत आहे. हाच रेली पुढे रेलिन्स्की या नावाने रशियाच्या परराष्ट्रीय खात्यांत काम करीत होता, ही हकीकत मी यापूर्वीच एका लेखांत दिली आहे.

शत्रुराष्ट्राच्या अधिकाऱ्यांत आपले हेर घुसडून देण्याची कला इंटेलिजन्स डिपार्टमेंटला चांगली साधली आहे. एकदां रशिया व फ्रान्स यांच्यामध्ये नवीन तह होणार असल्याची बातमी जर्मन हेराना समजली. या तहाचा मसुदा घेऊन एक रशियन अधिकारी फ्रान्सला जात असतां वाटेत बर्लिन येथे एक दिवस तो राहिला. रात्रीच्या वेळी जर्मन हेर-खात्यातील एका वेश्येकडे तो गेला असतां त्याला भूल देऊन जर्मन हेरांनी त्याची कसून झडती घेतली; पण त्यांना कांही तो तहाचा मसुदा मिळाला नाही. त्या अधिकाऱ्याची झडती घेणाऱ्यांत एक इंग्रजांचा हस्तक होता. त्याला कांही कारणामुळे असा संशय आला होता की, त्या अधिकाऱ्याच्या फाउंटन पेनमध्ये तो मसुदा लपविलेला आहे आणि त्याने दिवसाच त्या अधिकाऱ्याकडून त्याचे फाउंटन पेन चार ओळी लिहिण्यासाठी मागून घेऊन परत देताना हातचलाखीने दुसरेच पेन त्याला दिले होते. झडती संपल्यावर त्या इंग्रज हेराने एकान्तांत जाऊन फाउंटन पेनमधील मसुदा काढून त्याचा फोटो घेतला व तो आपल्या सरकाराकडे पाठवून दिला. तो रशियन अधिकारी जर्मनींतून बाहेर पडल्यावर ते तहाचा मसुदा लपविलेले पेनहि त्या इंग्रजाने परत त्याच्या स्वाधीन केले.

शत्रुराष्ट्रांतून काम करणाऱ्या हेरांवर रोष झाला की, त्याचा विश्वासघात करून त्याला शत्रूच्या तावडीत सांपडवून देण्याची जर्मन हेरखात्याची वहिवाट आहे; पण अनिष्ट इसमाची वासलात लावण्याचा हा उपाय इंटेलिजन्स सर्व्हिसला पसंत नाही. आपल्या खात्यांतील हेर कामांत कसूर करतो किंवा शत्रूंना फितूर झाला आहे, असा संशय आल्याबरोबर इंटेलिजन्स डिपार्टमेंटमध्ये त्याची चौकशी होऊन त्याला गोळी घालून मारण्यांत येतें. यामुळे फितुरीचा धोका राहात नाही. जर्म-

नांनी शत्रूंच्या तावडीत दिलेले हेर पुष्कळदां शत्रूंना फितूर होतात. अशा फितूर झालेल्या अनेक जर्मन हेरांनी इंटेलिजन्स सर्व्हिसचीं महत्त्वाचीं कामें केलीं आहेत.

इंटेलिजन्स सर्व्हिसमधील लोकांनी कांही वर्षानंतर ती सर्व्हिस सोडून इतर क्षेत्रांत प्रवेश केला असतां त्याना फार लौकर पुढे येण्याची संधि लाभते, हा एक इंग्लंडच्या इंटेलिजन्स डिपार्टमेंटचा विशेष आहे. म्हणून इंग्लंडमधील पुष्कळशा अधिकारांच्या जागांवरून पूर्वी इंटेलिजन्स सर्व्हिसमध्ये नोकरी केलेले लोक आढळून येतात. यामुळे तिथे इंटेलिजन्स सर्व्हिसचेंच राज्य आहे की काय, असा परस्थांना संशय येतो. केवळ हिंदुस्थानापुरतेंच पाहिल्यास, हिंदुस्थानचे माजी स्टेटसेक्रेटरी लॉर्ड बर्कनहेड यांनी हिंदी सैन्यांत इंटेलिजन्स ऑफिसरचें काम केले आहे. अंडर सेक्रेटरी अर्ल विंटर्टननी अरबस्तानांत लॉरेन्सची शागिर्दी केली आहे. मुंबईचे माजी गव्हर्नर व सध्याचे लॉर्ड लॉइड हे इजिप्तमधील अरब ब्यूरोमध्ये काम करीत होते. अशी अनेक उदाहरणें सांगतां येतील.

अशा या सर्वव्यापी खात्याचा हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्याच्या प्रजाजनांना अल्प परिचय करून देण्यासाठी हा लहानसा लेख लिहिला आहे. ज्यांना या विषयाचा अधिक अभ्यास करावयाचा असेल, त्यांनी फ्रेंच लेखक रोबेर्त बूकार्दकृत 'इंग्रज हेरांची कारस्थानें,' बेडन पॉवेलकृत "हेरांच्या धंद्यांतील माझी साहसे" सर बेसिल थॉमसनच्या आठवणी, हॅमिल ग्रॅटकृत 'हेर आणि हेरखातें' इत्यादि पुस्तकें पहावीत.

—रत्नाकर, ऑक्टोबर, १९३०.



*

# इस्लामी राष्ट्रांतील इंग्रजांचे हेर

तुर्कस्थानांत पुनः एकवार कुर्द लोकांचे बंड उपस्थित झाले आहे. या बंडासंबंधीं जर्मन पत्रांनी प्रसिद्ध केलेल्या माहितीवरून असे समजते की, स्वतंत्र मुसलमानी राष्ट्रांचा शत्रू कर्नल लॉरेन्स हाच या बंडाच्या मुळाशीं आहे. 'गेर्मानिया' नांवाचें जर्मनींतील अधिकारारूढ पक्षाचें पत्र म्हणतें की, कुर्द बंडवाल्यांजवळ अगदी नवीन नमुन्याच्या इंग्रजी रायफली व मशीनगन्स सांपडत आहेत, एवढी एकच गोष्ट या बंडांत इंग्रजांचे अंग आहे, हें सिद्ध करण्याला पुरेशी आहे. पण इंग्लंडाच्या परराष्ट्रीय खात्याने या सर्व बातम्यांचा इनकार करून असे जाहीर केलें आहे की, क. लॉरेन्स असल्या कांहीं कारस्थानांत गुंतला असल्यास परराष्ट्रीय खात्याला तरी त्याविषयीं कांहींसुद्धा माहिती नाहीं. अशा रीतीने एकट्या क. लॉरेन्सच्या कारस्थानापुरते परराष्ट्रीय खात्याने आपल्या कानांवर हात ठेवले असले तरी तेवढ्याने लॉरेन्सचे जे इतर हस्तक पश्चिम आशियांत वावरत आहेत व ज्यांच्या साहसी कृत्यांच्या रम्य कथा इंग्रजी पत्रांतून देखील प्रसिद्ध होत आहेत, त्या सर्वांच्या उपद्व्यापांची वासलात लागत नाहीं.

उदाहरणार्थ, यंदाच 'संडे रेफरी' या इंग्रजी पत्रांत एल्डन रुट्टर नांवाच्या एका ब्रिटिश हेराचें चरित्र प्रसिद्ध झालें आहे. हा हेर गेल्या महायुद्धांत पॅलेस्टाईनमध्ये होता. युद्ध संपल्यावर पॅलेस्टाईन प्रांत इंग्रजांच्या हातीं आला, व तेथल्या हेरांची इतरत्र योजना झाली. त्यांत एल्डन रुट्टरच्या वांट्याला मक्का व मदिना या शहरांची पाहणी करण्याचें काम आलें. या दोन्ही इस्लामी पुण्यक्षेत्रांतून मुसलमानेतरांना पाय टाकण्याची सक्त मनाई आहे. ही मनाई पायाखालीं तुडविण्याचें धाडस स्वतः कर्नल लॉरेन्सने देखील केले नाहीं. असें असून देखील या धाडसी हेराने १९२५ व १९२६ या वर्षी मक्का-मदिनेमध्ये मिळून सुमारें एक वर्षभर निवास करून तेथील सर्व माहिती मिळविली. तेथून परत आल्यावर एल्डन रुट्टरने The Holy Cities of Arabia नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध करून

त्यांत आपल्या प्रवासाची हकीकत सांगितली आहे. यानंतर इब्न सौदच्या राज्याची पाहणी करण्याच्या कामावर एल्डन रुटरची नेमणूक झाली, आणि १९२९ च्या पावसाळ्यांत तो सीरियांतील अरबांचा वेष घेऊन दमास्कसच्या वाटेने वहाबी राजाच्या मुलखांत शिरला. उंटावरून प्रवास करीत करीत एल्डन रुटरने सुमारें ८०० मैलांची मजल मारली, व इब्न सौदने नवीनच जिंकलेल्या हैल नांवाच्या शहरीं तो येऊन दाखल झाला. तो हैल शहरीं आला, तेव्हा इब्न सौदच्या राज्यांत एक बंड उद्भवलें होतें. केवळ काकतालीयन्यायाने असल्या गोष्टी घडत असल्यामुळे वहाबी अधिकाऱ्यांनी या योगायोगाला फारसें महत्त्व द्यायला नको होतें. तरी देखील त्या प्रांताचा गव्हर्नर इब्न मसूद याच्या लोकांनी एल्डन रुटरच्या हालचालींवर पाळत ठेवून असा शोध काढला की, हा सीरियांतून आलेला अरब खरोखरीचा अरब नसून इंग्रज आहे व इराक सरकाराने त्याला आपल्या देशांत फंदफितूरी माजविण्यासाठी पाठविलें आहे! ही बातमी समजतांच इब्न सौदने त्याला ताबडतोब आपल्या राज्यांतून घालवून दिलें.

आता इब्न सौद हा इंग्रजांचा मिंधा असला तरी तो पुरता बंदा बनलेला नसल्याने त्याला या अनिष्ट पाहुण्याची ताबडतोब हकालपट्टी करता आली. पण महायुद्धानंतर स्वातंत्र्य मिळालेल्या इजिप्तच्या फौद राजाचे अधिकार इतके मर्यादित आहेत की, त्याला आपल्या राज्यांत घोटाळे माजविणाऱ्या परकी हेरांना घालवून देण्याचाहि अधिकार नाही मग त्यांची चौकशी करून त्यांना अटकेंत टाकण्याची कथा तर दूरच राहिली. या बाबतींत एक नमुनेदार गोष्ट सांगण्याजोगी आहे. गेल्या महायुद्धानंतर जर्मनांच्या कांही नामांकित हेरांनी बेकार झाल्यामुळे ब्रिटिश इंटेलिजन्स सर्व्हिसमध्ये नोकरी धरली. त्यांपैकी प्रिन्सेस अलेक्झिस या नांवाने प्रसिद्ध असलेल्या बाईला इंग्रजांनी इजिप्तमधील राष्ट्रीय चळवळीवर नजर ठेवण्यासाठी कैरोला ठेवली आहे. तिच्या मदतीला दोन ग्रीक सुंदरींची योजना झाली आहे. कैरोंतील 'शेपर्ड' हॉटेलांत राहून या तिघी अतिसुंदर वारांगना इजिप्तमधील राष्ट्रीय पक्षाच्या तरुणांना बिघडविण्याचें व त्या पक्षाच्या गुप्त कारस्थानांची बातमी इंटेलिजन्स सर्व्हिसला पुरविण्याचें आपलें काम अखंड चालवीत असतात. यांच्या नादाला लागून लोकपक्षांतील किती तरी

कुलीन तरुणांनी आपल्या आयुष्याचें मातेरें करून घेतले आहे. अनेकांनी आत्महत्या केल्या आहेत व क्वचित् प्रसंगी खूनहि पडले आहेत. कांही वर्षांपूर्वी या बायकांना काढून नेण्याबद्दल फौद राजाच्या प्रधानमंडळाने इजिप्तच्या हायकमिशनरची प्रार्थना केली होती. पण हायकमिशनरने तसे करण्याचें नाकारलें; आणि अजून देखील परक्या लोकांच्या सुदैवाने व इजिप्तच्या दुर्दैवाने या मायाविनींचा व्यवसाय कैरोमध्ये अव्याहतपणे सुरू आहे !

स्वतः झगलूल पाशावर देखील याच मोहिनी अस्त्राचा प्रयोग झाला होता. त्याने एक तरुण मुलगी आपली प्रायव्हेट सेक्रेटरी म्हणून ठेवली होती. झगलूल जेव्हा तहपरिषदेसाठी फ्रान्सला गेला, तेव्हा त्याला समजले की, ती तरुणी इंटेलिजन्स सर्व्हिसच्या नोकरीत आहे. त्याबरोबर त्याच्या मित्रांनी त्या तरुणीला सोडून देण्याबद्दल झगलूलपाशाला आग्रह केला. तेव्हा झगलूलने उत्तर दिले की, इंग्रजांचा पगार न खाणारी तरुणी माझ्या वांट्याला येणें अशक्यच आहे; मग हिला काढून दुसरी नेमण्यांत तरी अर्थ काय ! झगलूलपाशा अतिशय सावधगिरीने वागत असल्यामुळे त्याचा घात झाला नाही. पण त्याच सुमाराला कॉन्स्टॅटिनोपलमधील तुर्की जनरल येनिगून याने असल्याच एका मायावी तरुणीच्या मोहजालांत फसल्यामुळे आत्महत्या केली. हा सेनापति तेव्हाचा सुलतान महंमद याच्या विश्वासांतला होता. या सेनापतीच्या ताब्यांतील कांही महत्त्वाचे कागद चोरण्याच्या कामावर इंटेलिजन्स सर्व्हिसने एका १८ वर्षांच्या ग्रीक तरुणीची योजना केली. तिने येनिगूनला आपल्या नादी लावून ते कागद लांबविण्याचे काम तर मोठ्या सफाईने पार पाडले. पण ते कागद ब्रिटिश इंटेलिजन्स सर्व्हिसला मिळण्यापूर्वीच फ्रेंच हेरांनी चोरावर मोर होऊन त्या ग्रीक तरुणीला अटक करून ते कागद आपल्या ताब्यांत घेतले ! त्यामुळे अखेरीला ते कागद ब्रिटिश हेरांना मिळाले नाहीतच. इकडे येनिगूनने मात्र आपली प्रियतमा इंग्रजांच्या हेराचें काम करीत आहे हें कळल्याबरोबर लज्जेने व क्षोभाने सुलतानाच्या वाड्यांतील बागेमध्येच आत्महत्या करून घेतली.

तुर्की सेनापति हे कांता किंवा कांचन यांपैकी कोणत्या तरी मोहाला बळी पडतातच, असा त्यांचा जुना लौकिक आहे. गेल्या महायुद्धांत रशियन लोकांनी

अर्झरुमचा अभेद्य किल्ला तेथल्या तुर्की सेनापतीला लांच देऊन विकत घेतला, अशी सार्वत्रिक समजूत आहे. रशियन लोकांनी अर्झरुम घेतलें, तेव्हां ब्रिटिश सेनापति टाऊनशेंड हा दहा हजार सैन्यानिशीं कुतुल-अमारा या गांवीं तुर्कांच्या वेढ्यांत सापडला होता, व त्याला मदत पोंचविण्याचे सर्व प्रयत्न निष्फळ झाले होते. अशा वेळी ब्रिटिश सेनापतीच्या मनांत आले की, साधल्यास वेढा घालणाऱ्या तुर्की सेनापतीला लांच देऊन ज. टाऊनशेंडची सुटका करावी. या कामावर त्यांनी लॅरेन्सची योजना केली. लांचाची वाटाघाट करण्यासाठी लॅरेन्सने तुर्की सेनापतीची गांठ घेतली. पण तो विजयी सेनापति नुरुद्दिन, खुद्द अनवरपाशाचा पुतण्या असल्याने त्याने लॅरेन्सने देऊं केलेला लाच झिडकारला व टाऊनशेंडला सपशेल शरण यावयाला लावले.

असो, असल्या अद्भुतरम्य गोष्टी कधीच संपावयाच्या नाहीत. तेव्हां प्रस्तुत बंडांत कुर्द लोकांना शस्त्रांचा पुरवठा कोठून होत आहे, याची थोडीशी माहिती सांगून हा लेख संपवावा हें बरें. कुर्द लोकांना लॅरेन्सचे सहाय्य आहे, एवढ्यावरून असे अनुमान काढतां येईल की, लॅरेन्सला अतिशय आवडणाऱ्या लुईस किंवा हॉचकिस ऑटोमॅटिक रायफली व व्हिकर्स मशिनगन्स यांचाच कुर्द लोकांना पुरवठा होत असावा. व्हिकर्स आणि मॅक्झिम या नामांकित यांत्रिक तोफांच्या कारखान्याचा मुख्य चालक सर बेझिल झाहारॉफ हा तुर्कांचा कट्टा शत्रु आहे व त्याचा इंटेलिजन्स सर्व्हिसशी अतिशय निकटचा संबंध आहे, ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे वरील अनुमानाला दुजोरा मिळतो. सर बेझिल झाहारॉफ हा त्याच्या नांवावरून दिसतो तसा रशियन नाही. तो जातीने ग्रीक आहे व त्याचा जन्म तुर्कस्थानांत झाला आहे. कॉन्स्टँटिनोपलमध्ये लहानपणी तो नवख्या प्रवाशांना वाट दाखविण्याचें काम करीत असे. हे काम करीत असतांनाच ‘ व्हिकर्स आणि मॅक्झिम ’ कंपनीच्या एका डायरेक्टराची व त्याची ओळख झाली. आपल्या वाटाड्याच्या चलाखपणावर खूष होऊन तो डायरेक्टर बेझिलला आपल्याबरोबर घेऊन इंग्लंडाला गेला व त्या डायरेक्टराच्या सहवासांत काम शिकतां शिकतां बेझिल त्या कंपनीचा मुख्य चालक होऊन बसला. १९२१ सालीं तुर्क व ग्रीक या उभयतांत जें युद्ध झालें, त्या युद्धांतील ग्रीक लोकांचा सर्व खर्च एकट्या सर

बेझिलने सोसला आहे. ही गोष्ट त्याच्या स्वदेशावरील प्रेमाची व तशीच तुर्का-विषयींच्या द्वेषभावाचीहि निदर्शक आहे. त्या युद्धांत ग्रीसचा पुरा पाडाव झाला, ही गोष्ट सर्वांना माहीतच आहे. त्या वेळी ग्रीक लोकांच्या हातून जें कार्य घडून आलें नाही तें आता कुर्द लोकांकरवीं घडवून आणण्याचा विचार दिसतो.

—केसरी, ता. २ सप्टेंबर, १९३०.



# गेल्या महायुद्धांतील गुप्त हेरांचीं कारस्थानें

गेल्या महायुद्धांत जर्मन हेरखात्याने बजावलेल्या कामगिरीचा, जर्मन युद्ध-खात्याच्या दप्तरावरून लिहिलेला इतिहास नुकताच प्रसिद्ध झाला आहे. त्याचप्रमाणें इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, ऑस्ट्रिया वगैरे देशांतील अनेक नामांकित हेरांनी आपापल्या आठवणीची पुस्तके प्रसिद्ध केली आहेत. या पुस्तकांत प्रसिद्ध झालेल्या माहितीवरून गेल्या महायुद्धांतील अनेक रहस्यमय प्रसंगावर नवीन प्रकाश पडत असल्याने त्यांतील कांहीं गोष्टींचा सारांश या लेखांत देत आहे.

## विमानांतून खलिता कोणी पाठविला ?

महायुद्धाच्या प्रारंभीच ज. हिन्डेन्बुर्गने टानेनबुर्गच्या लढाईत रशियन जनरल सॅम्सोनॉफ याच्या हाताखालील सर्व सैन्याचा विध्वंस करून त्याला स्वतःला ठार मारिलें. जर्मनीला हा अपूर्व जय मिळण्याला स्वतः हिन्डेन्बुर्गचें युद्धकौशल्य तर कारणीभूत झालेंच, पण त्याशिवाय एका अज्ञात जर्मन हेराचें वेषांतर—कौशल्यहि या प्रसंगी जर्मनीच्या फार उपयोगी पडलें. जनरल सॅम्सोनॉफला रशियन सरकाराकडून पूर्व प्रशियावर चढाई करण्याचा हुकूम मिळाला होता व त्याप्रमाणे तो पूर्व प्रशियांत घुसलाहि होता. पण २७ ऑगस्टच्या सुमारास त्याची प्रगति कुंठित झाली व तेव्हाचा त्याच्या सैन्याचा तळ सुरक्षित नसल्याने तो आपल्या हाताखालील अधिकाऱ्यांबरोबर माघार घेण्याच्या गोष्टी बोलूं लागला. ही चर्चा चालू असतांनाच वार्सॉच्या बाजूने एक रशियन विमान अकस्मात् तेथे आलें. त्या विमानांतून एक तरुण अधिकारी उतरला. त्याने तडक ज. सॅम्सोनॉफच्या भेटीला जाऊन त्याला आपण स्वतः ग्रँड ड्यूक निकोलसच्या जनरल स्टाफमधील एक अधिकारी कॅप्टन बॅरन केल्लेर असल्याचें व आपण ग्रँड ड्यूक निकोलसचा एक तातडीचा खलिता आणला असल्याचें सांगितलें. आपला खलिता सॅम्सोनॉफच्या हातीं देऊन त्याने आपल्याला इतर कामांची फार निकड असल्याच्या सबबीवर लगेच निरोप घेतला व तो तत्काळ

आपल्या विमानांत बसून नाहीसा झाला असो, त्याने आणलेल्या खलित्यांत जनरल सॅम्सोनॉफला शत्रूवर निकराचा हल्ला करण्याचा मुख्य सेनापतीचा हुकूम होता. या हुकुमाचा परिणाम असा झाला की, चोवीस तासांच्या आंत सॅम्सोनॉफच्या सैन्याला जर्मन सैन्याचा वेढा बसून त्याला आपल्या शत्रूला शरण जावे लागलें. या पराभवाच्या लज्जेने ज. सॅम्सोनॉफने आत्महत्या करून घेतली. या पराजयानंतर झालेल्या चौकशींत असे निष्पन्न झाले की, ग्रँड ड्यूक निकोलसने सॅम्सोनॉफला विमानांतून कसलाहि खलिता पाठविला नव्हता. तेव्हा हा खलिता कोणी बनविला व कोणी पोचविला, हे सांगावयास नकोच.

## कायसरच्या हुकुमांत बदल

यासारखाच एक चमत्कार ब्रिटिश इंटेलिजन्स सर्व्हिसचा एक अत्यंत नामांकित अधिकारी सर रेजिनाल्ड हॉल याने करून दाखविला. महायुद्धाच्या सुरुवातीला जर्मन आरमाराचा एक काफिला पासिफिक महासागरांत वावरत होता. या काफिल्याने १ नोव्हेंबर १९१४ रोजी कांही ब्रिटिश लढाऊ जहाजांबरोबर टक्कर देऊन त्यांना समुद्राचा तळहि दाखविला होता. पण पुढे ८ डिसेंबर रोजी हा काफिला फॉकलंड बेटाकडे आला असतां ब्रिटिश आरमाराच्या एका जबरदस्त काफिल्याशी त्याची गांठ पडून जर्मन जहाजांचा विध्वंस झाला. विनाश पावलेल्या जर्मन जहाजांचा प्रमुख, अडमिरल फॉन स्पे याला स्वतः कायसरने फॉकलड बेटाकडे न जाण्याचा हुकूम दिला असल्याने कायसरला या लढाईचा मोठा चमत्कार वाटला. ही गोष्ट स्वतः कायसरने लिहून ठेवली आहे. पुढे १९१५ च्या जूनमध्ये कॅप्टन रिंटेलेन नांवाच्या जर्मन हेराबरोबर बोलतांना सर रेजिनाल्ड हॉलने त्याला सांगितले की, वर सांगितलेल्या कायसरच्या हुकुमांत इंटेलिजन्स सर्व्हिसला हवे असलेले फेरबदल झाल्यावर मगच तो ॲडमिरल स्पेला मिळाला होता. यासारख्याच इतर अनेक गोष्टी सर रेजिनाल्डने कॅप्टन रिंटेलेनला सांगितल्याचे त्याच्या आठवणीत रिंटेलेनने प्रसिद्ध केलें आहे.

## वेषांतराचें कौशल्य

दुसऱ्याचे कागदपत्र फोडून त्यांत फेरबदल करणें ही गोष्ट प्रतिपक्ष्यांपैकीं एखाद्याला फितूर करतां आलें तरच शक्य होते. त्यांत व्यक्तीचें साहस आणि

कौशल्य कांही कसाला लागत नाही. पण आपण वेषांतर करून प्रतिपक्ष्याच्या नोकरींत राहणें व त्यांची बिंग समजून घेऊन ती स्वपक्षाला पुरविणें हे अधिक धाडसाचे व कुशलतेचे काम आहे. १९१५ च्या नोव्हेंबर मध्ये 'क्वीन ऑफ आयर्लंड' ही मेलबोट इंग्लंडच्या किनाऱ्याला लागली. या बोटीवर कॅनेडियन रेजिमेंटचा, जर्मनांच्या कैदेंत सापडलेला व त्यांच्या इस्पितळांमधून पळून आलेला कॅप्टन व्हाइट नांवाचा एक अधिकारी होता. इंग्लंडला येतांच त्याने युद्धमंत्र्यांची मुलाखत घेऊन त्यांना आपण जखमी होऊन जर्मनांच्या तावडींत सांपडल्याची व नंतर त्याच्या इस्पितळांतून पळून आल्याची हकीकत सांगितली. आणि आपली जखम पुरती बरी होईपर्यंत देशांतल्या देशांत कांही तरी काम देण्याची विनंति केली. युद्धमंत्र्याने फ्रान्समध्ये सैन्य पाठविण्याच्या ऑफिसांत त्याला नेमलें. या ऑफिसांत तो निरलसपणे काम करी व सुट्टी झाली की क्रॉयडनला जाऊन विमानोड्डाणाचा अभ्यास करी. अशा रीतीने तीन आठवडे गेल्यावर एके दिवशी त्या ऑफिसचा प्रमुख कर्नल जॅक्सन पोस्टानं पकडलेले कॅप्टन व्हाइटचे एक पत्र घेऊन त्याच्याकडे आला.

### आंकडे रकमांचे कीं सैनिकांचे ?

हे पत्र कॅप्टन व्हाइटने ॲमस्टरडाममधील आपल्या एका दूरच्या बहिणीला लिहिले होते. त्यांत कॅ. व्हाइटने म्हटलें होते की, इंग्लंडला आल्यापासून मी तुझी सारी इस्टेट विकून तिचे पैसे वसूल करण्यांत गुंतलों आहे व गेल्या कांही दिवसांत निरनिराळ्या शहरांतून खालीलप्रमाणे रकमा वसूल केल्या आहेत. आता या यादींतील सारीं शहरें समुद्र किनाऱ्यावर होती व त्यांतून वसूल केलेल्या रकमांचा आंकडा त्या त्या बंदरांतून फ्रान्सला पाठविलेल्या सैनिकांच्या आंकड्यांशी फारच जुळता होता. हा पुरावा कर्नल जॅक्सनच्या हातांत पाहतांच त्या नकली कॅप्टन व्हाइटने आपण जर्मन ऑफिसर असून इस्पितळांत आपल्या शेजारी वारलेल्या कॅप्टन व्हाइटचे कागदपत्र घेऊन आपण कॅप्टन व्हाइट बनलो असल्याचे कबूल केलें. या कबुलीजबाबानंतर कर्नल जॅक्सनने त्याला लगेच कैद केले असते तर व्हाइटचा तेव्हाच निकाल लागला असता; पण आपल्या ऑफिसांत या प्रकरणाचा बोभाटा

होऊं नये म्हणून त्याने केवळ एका डिटेक्टिव्हाला त्याच्यावर नजर ठेवावयाला सांगितले व आपण कामाला निघून गेला. आता मौज अशी झाली कीं, त्याच दिवशीं जर्मन वैमानिकांनी लंडनवर हल्ला केला. त्या वेळच्या गोंधळांत त्या नकली कॅप्टन व्हाइटने आपल्या डिटेक्टिव्हाला सांगितले की, मी एअर फोर्स-मधील एक अधिकारी आहे व मला या जर्मन स्वारीच्या प्रसंगीं तावडतोब क्रॉयडनला हजर होणें जरूर आहे. तूं वाटलें तर माझ्याबरोबर क्रॉयडनला चल. तो डिटेक्टिव्ह कॅ. व्हाइटबरोबर जायला कबूल झाला. ते दोघे मोटारींतून जात असतां व्हाइटने त्या डिटेक्टिव्हाला वाटेंतच गुंगीच्या औषधाचा उपयोग करून बेशुद्ध पाडले व क्रॉयडनला जाऊन एका विमानांत बसून तो तत्काळ बेल्जमकडे उडून गेला.

## नोकर इंग्लंडचा; सेवक जर्मनीचा

यासारखीच दुसरी एक गोष्ट येथे सांगण्याजोगी आहे. युद्धाच्या सुरुवातीला सिल्बेर नांवाचा एक तरुण जर्मन अमेरिकेंत राहात होता. त्याला आपला जीव धोक्यांत घालून मातृभूमीची सेवा करण्याची स्फूर्ति होऊन तो पासपोर्टाशिवायच इंग्लंडला निघून आला. तेथे आल्यावर त्याने इंग्लंडांतून परदेशी जाणारीं पत्रे सेन्सॉर करण्याची नोकरी मिळविली. या अधिकाराचा दुरुपयोग करून, त्याला ज्या महत्त्वाच्या बातम्या समजून येत, त्या साऱ्या तो न्यूयॉर्कच्या मार्गाने जर्मनीला पाठवून देत असे. अशा रीतीने त्याने युद्धसमाप्तीपर्यंत सेन्सॉरच्या खात्यांत कॅम करून जर्मनीची उत्कृष्ट सेवा केली. अशा रीतीने शत्रूच्या नोकरीत राहणे फार अवघड असते. पण सिल्बेर हा अतिशय सावधागिरीने राहणारा इसम असल्याने तो केव्हाहि इंटेलिजन्स सर्व्हिसच्या तावडीत सांपडला नाही. सिल्बेरच्या सावधपणाचा नमुना म्हणून एक गोष्ट सांगतां येईल. युद्ध संपल्यावर त्याला जर्मनीला परत जाण्याची उत्कट इच्छा झाली, पण आपण जर्मनीचा पासपोर्ट मागितला तर इंटेलिजन्स सर्व्हिसला आपला संशय येईल, या भीतीने त्याने १९२५ सालापर्यंत परदेशीं जाण्याचा पासपोर्टसुद्धा मागितला नाही. १९२५ साली जर्मनींत परत आल्यावर सिल्बेरने आपल्या आठवणी प्रसिद्ध केल्या आहेत.

## मेस्मेरिझमचा प्रयोग

हेराच्या धंद्यांत मेस्मेरिझमचा उपयोग केल्याचे एक अद्भुत उदाहरण जर्मन हेरांच्या इतिहासांत सांपडते. युद्धाच्या दिवसांत जखमी सैनिकांची शुश्रूषा करतां यावी, यासाठी अनेक थोर घराण्यांतील स्त्रिया सेविका होत असत. अशीच एक फ्रेंच तरुणी पॅरिसमध्ये सेविकेचा अभ्यासक्रम पुरा करीत असता दाढदुखीच्या विकाराने आजारी पडली. तेव्हा तिला कोणी तरी त्या वेळीं पॅरिसमध्ये प्रॅक्टिस करीत असलेल्या एका अमेरिकन दंत-वैद्याकडे जावयाला सांगितले. त्याप्रमाणें तिने त्या दंतवैद्याकडून उपचार करून घेतले व त्याच्या चिकित्सेने तिला बरे वाटलें. पुढे ती जखमी शिपायाची शुश्रूषा करण्याकरिता आघाडीवर गेली. आघाडीवरून ती मधून मधून दांतावर उपचार करून घेण्यासाठी आपल्या दंतवैद्याकडे पॅरिसला येत असे. ही सेविका ज्या आर्गान प्रांतांतील आघाडीवर काम करीत होती, त्या आघाडीवरील सार्‍या फ्रेंच तोफांच्या बातेम्या जर्मनांच्या मार्‍याने वारंवार बंद पडूं लागल्या. तेव्हा फ्रेंचांना साहजिकच शंका आली कीं, कोणी तरी आपल्या बातेम्यांची सारी माहिती जर्मनांना पुरवीत असले पाहिजे.

ही शंका येतांच त्यांनी आघाडीवर अनेक ठिकाणी झडत्या घेतल्या, पण तेथे कांहीच पत्ता लागला नाही. त्यानंतर त्यांनी आघाडीवरून पॅरिसला येणाऱ्यांची पॅरिसच्या स्टेशनावर झडती घेण्याला सुरुवात केली. या झडतीत वर सांगितलेल्या सेविकेचें आपल्या दंतवैद्याला लिहिलेले एक पत्र सांपडले. त्या पत्रांत केवळ दांतांच्या औषधोपचारांचीच चर्चा केली होती. पण त्याच पत्रांत अदृश्य शाईने फ्रेंचांच्या बातेम्यांची सविस्तर माहिती दिलेली होती. अदृश्य शाई ओळखण्याचे नेहमीचे प्रयोग केल्यावर फ्रेंच हेरांना तो मजकूर वाचतां आला. हा मजकूर वाचतांच फ्रेंच हेरांनी त्या नामधारी अमेरिकन डॉक्टरला पकडण्याचा प्रयत्न केला, पण तो आधीच अदृश्य झाला होता. आर्गानला ती सेविका मात्र सांपडली व तिने आपल्या जबाबांत सांगितलें की त्या दंतवैद्याने आपल्यावर हिप्नॉटिझमचा प्रयोग करून देशद्रोह करायला लाविलें. सरते शेवटीं या खटल्यांतून सुटण्यासाठी त्या तरुणीने व्हेरोनाल खाऊन आत्महत्या केली.

## घड्याळाची आशा भोंवली !

हेराच्या धंद्याचा सामान्य नियम असा आहे की, आपली हरवलेली वस्तू परत मिळविण्याचा त्याने कधीहि प्रयत्न करूं नये. हा नियम मोडल्याने बेल्जमच्या एका हेर बाईला जर्मनीत अटक करतां आली. जर्मनीने बेल्जम जिंकल्यावर त्या देशांतील हजारों लोकांनी इंग्रज व फ्रेंच हेरांना जर्मनीची माहिती पुरविण्याचा व्यवसाय सुरू केला. मारिया कोकाएर्ट ही बेल्जियन तरुणी अशाच लोकांपैकी एक होती. १९१५ च्या एप्रिलमध्ये रूलेर्सच्या स्टेशनांत एक दारूगोळ्यांनी भरलेली गाडी आली असल्याची बातमी तिने इंटेलिजन्स सर्व्हिसला दिली. त्याबरोबर ब्रिटिश विमानांनी त्या गाडीवर बॉंब टाकून सर्व दारूगोळा उडवून दिला. पुढे १९१६ साली एक जर्मन डिव्हिजन प्रार्थनेला एकत्र जमणार असल्याची बातमी तिच्याकडून इंग्रजांना कळली व त्यांनी विमानांच्या एका काफिल्यानिशी त्या डिव्हिजनवर प्रार्थनेच्या वेळी हल्ला करून शेकडो सैनिक ठार मारले. त्यानतर ऑक्टोबर महिन्यात तिने रुलेर्स येथील जर्मनांच्या मिलिटरी स्टोअर्सना आग लावून त्यांचा संपूर्ण विध्वंस केला. आता मारियाच्या दुर्दैवाने ती आग लावून परत येत असतां तिचे रिस्टवॉच पडले व दुसरे दिवशी पोलिस ठाण्यावरील सांपडलेल्या पदार्थांच्या यादीत आपले घड्याळ आहे, असे पाहून ती घड्याळ मागायला ठाण्यांत गेली असतां जर्मनांनी तिला अटक केली. तिच्या घरच्या झडतींत जर्मनांना तिचा इंटेलिजन्स सर्व्हिसबरोबर झालेला पत्रव्यवहारहि सांपडला.

## ऑस्ट्रियांतील विलक्षण प्रकार

हेरखात्यांतील अधिकारी पुष्कळदां शत्रूंना फितूर होतात. अशा वेळी त्यांचा संशय येणेंसुद्धा दुष्कर असते. मग त्यांना अटक करणें तर दूरचीच कथा! याविषयींची एक गोष्ट ऑस्ट्रियाच्या हेरखात्याचा प्रमुख कर्नल सेलिगेर याने आपल्या 'Spione und verrater' या अत्युत्कृष्ट पुस्तकांत सांगितली आहे. एकदां ऑस्ट्रियाच्या युद्धखात्यांतील महत्त्वाचे कागदपत्र वारंवार चोरीस जाऊं लागले. या चोऱ्या थांबविण्यासाठी परकी हेरांवर नजर ठेवण्याच्या खात्याचा प्रमुख कर्नल रेड्ल याने अनेक सरकारी अधिकाऱ्यांना पकडून त्यांना लष्करी कोर्टाकडून जबरदस्त शिक्षा देवविल्या. तरीदेखील कागदपत्रांच्या चोऱ्या थांबेनात.

अशा वेळीं हताश होऊन कांहीं ऑस्ट्रियन अधिकाऱ्यांनी रशियाहून व्हिएन्नाच्या पोस्टांत येणाऱ्या पत्रांवर बारकाईने नजर ठेवण्यास सुरवात केली. अशा रीतीने कांहीं दिवस गेल्यावर रशियन सरहद्दीवरून व्हिएन्नाच्या पोस्टांत एक जाड पाकिट आलें. या पाकिटांत पत्ता मुळींच नसून ऑस्ट्रियन बँकेच्या बऱ्याच मोठ्या रकमेच्या नोटा होत्या. हें पाकिट पोस्टमास्तराकडून कोण घेऊन जातो, हे पाहण्यासाठी दोन हेर पोस्टावर सारखी पाळत ठेवूं लागले.

अशा रीतीने एक आठवडाभर पाळत ठेवल्यावर एके दिवशीं दुपारीं पोस्टांतून विजेची घंटा ऐकूं आली. ती घंटा ऐकतांच ते दोघेहि हेर बटवड्याच्या खोलीकडे धांवले. पण तोंपर्यंत कोणीतरी पोस्टमास्तराकडून तें पाकिट घेऊन मोटारींत बसून चाललेला त्यांना दिसला. त्या मोटारीचा नंबर पाहून तिचा त्यांनी पाठलाग केला. कांहीं वेळानंतर ती गाडी जेव्हा पुनः त्यांना दिसली तेव्हा त्यांनी त्या गाडीच्या ड्रायव्हरला अटक केली. त्या ड्रायव्हरने आपल्या भाडेकऱ्याला एका कॉफीगृहांत नेऊन सोडलें होतें; ते कॉफीगृह त्याने हेरांना दाखवून दिलें, पण तोंपर्यंत पाकिटवाला इसम कॉफीगृह सोडून दुसऱ्या एका मोटारींत बसून व्हिएन्नांतील एका प्रमुख हॉटेलाकडे निघून गेला होता. आता मौज अशी झाली कीं, पहिल्या मोटारींत त्या गृहस्थाने पाकिट फोडण्यासाठीं चाकूचा उपयोग केला होता; व तो चाकू त्या मोटारींतून हेरांनी उचलून आणला होता. तो गृहस्थ कोणत्या हॉटेलाकडे गेला आहे, याची खबर लागतांच ते हेरहि त्या हॉटेलाकडे गेले व त्यांनी तेथल्या दाराबरच्या भय्याला सांगितलं कीं तुमच्या हॉटेलपैकीं कोणाचा तरी हा चाकू हरवला आहे, तर येथून बाहेर पडणाऱ्या लोकांना तूं विचारून पहा. इतक्यांत जिन्यावरून एक गृहस्थ उतरून आला व भय्याने सहज त्याच्यापुढे चाकू केला. त्याबरोबर त्याने तो चाकू घेऊन आपल्या खिशांत टाकला. हें पाहतांच त्या हेरांनी त्याला ताबडतोब अटक करून आपल्या ऑफिसांत नेलें. त्या गृहस्थाला पाहतांच ऑफिसांतील सर्व लोक थक्क झाले. कारण परकी हेरांवर नजर ठेवण्याच्या खात्याचा प्रमुख कर्नल रेडूल हाच तो गृहस्थ होता. त्यानंतर हेरखात्याच्या मुख्याने कर्नल रेडूलच्या कबुलीजबाब घेतला आणि त्याला त्याच खोलींत कोंडून व त्याच्या शेजारीं एक भरलेला रिव्हॉल्व्हर ठेवून तो निघून गेला. त्याची पाठ फिरतांच त्याच्या अपेक्षेप्रमाणे कर्नल रेडूलने आत्महत्या करून घेतली.

—केसरी, ३१ जुलै, १९३४.

---

# कर्नेल लॉरेन्सची कामगिरी !

गेल्या महायुद्धापासून अतिशय प्रसिद्धीला आलेला इंग्रज हेर कर्नेल लॉरेन्स हा गेल्या १९ तारखेला अपघाताने मृत्युमुखी पडला; ही वार्ता ऐकून स्वतंत्र मुसलमानी राष्ट्रांना आपल्या उरावरील एक जबरदस्त दडपण दूर झालेसें वाटून त्यांनी समाधानाचा सुस्कारा टाकला असेल, यांत शंका नाही. कारण इजिप्त-पासून सर्व मुसलमानी राष्ट्रांना आजपर्यंत वेळोवेळीं लॉरेन्सच्या पाताळयंत्रीपणाचे दुष्परिणाम भोगावे लागले आहेत. लॉरेन्सच्या मृत्यूनें इंग्लंडचे मात्र अपरिमित नुकसान झालें आहे. त्याच्याप्रमाणें मुसलमानी लोकांत बेमालूम मिसळून जाणारा व कायमची छाप पाडणारा दुसरा हेर इंग्रजांसारख्या धूर्त लोकांत सुद्धा दुर्मिळच आहे.

## जात्याच हेर

या अद्वितीय कारस्थानी पुरुषाचा जन्म १५ ऑगस्ट १८८८ रोजी झाला. लहानपणापासूनच याला हेराच्या धंद्याचें शिक्षण दिलें असावें, असें त्याच्या बाळपणापासूनच्या वर्तनावरून दिसतें. हा स्वतःच्या घरांत सहसा कधी दाराने प्रवेश करीत नसे. भिंती चढून खिडक्यांतून घरांत शिरण्यांत त्याला मोठी मौज वाटे. १३ व्या वर्षापासून त्याने सायकलीवरून इंग्लंडची पहाणी करण्याला व नकाशे करण्याला सुरुवात केली. त्यानंतर लौकरच त्याच्या सायकलप्रवासाचा मोर्चा फ्रान्सकडे वळला. हायस्कुलांत असेपर्यंत त्याने आठ वेळां सायकलीवरून फ्रान्सचा प्रवास केला होता व सर्व महत्त्वाच्या ठिकाणांचे नकाशे काढले होते. पुढे ऑक्सफोर्ड विद्यापीठांत प्रवेश केल्यापासून लॉरेन्सने रात्रीं कोणत्याहि इमारतीच्या भिंतीवर चढून छपरांवर उड्या मारीत गल्लोगल्लीं भटकणें हा व्यवसाय केला, असें त्याचा इंग्रज चरित्रकारच सांगतो ! विशेषतः बेलियल कॉलेज-पासून केवल कॉलेजपर्यंतच्या इमारतींवरून भटकण्याची क्रुप्ति लॉरेन्सनेच शोधून काढली, असें म्हणतात. असो, ऑक्सफोर्ड येथेच लॉरेन्सने प्रथम अरबी भाषेच्या अभ्यासाला सुरुवात केली आणि याच वेळीं ब्रिटिश म्यूझि-

यमचे एक नामांकित अधिकारी व ब्रिटिश इंटेलिजन्स सर्व्हिसमधील एक यशस्वी हेर डॉ. होगार्थ यांच्याशीं त्याची ओळख झाली. या डॉ. होगार्थनी लॉरेन्सला मॅग्डालेन कॉलेजकडून पुराणवस्तुसंशोधनासाठीं प्रवास करण्याकरितां चार वर्षे मुदतीची एक छात्रवृत्ति मिळवून दिली आणि पुराणवस्तुसंशोधनाच्या निमित्ताने ब्रिटिश इंटेलिजन्स सर्व्हिसची कामगिरी बजावण्याकरिता तो १९१० सालीं अरबस्थानांत येऊन दाखल झाला.

## तुर्कांच्या मुलुखाची पाहणी

लॉरेन्स अरबस्थानांत गेला त्या वेळीं अरबस्थान, पॅलेस्टाइन, मेसापोटेमिया वगैरे सर्व मुलुख तुर्कांच्या ताब्यांत होता. ख्रिस्ताचा अवतार ज्या प्रदेशांत झाला, बायबलची रचना ज्या प्रदेशांत झाली व ज्या प्रदेशाच्या मुक्ततेसाठीं साऱ्या ख्रिस्ती राष्ट्रांनी जुळून तुर्कांशी धर्मयुद्ध केलीं, तो प्रदेश परकियांच्या हातून सोडविण्याची कल्पना लॉरेन्सच्या मनांत शैशवापासूनच घोळत होती. तिला मूर्तस्वरूप देण्यासाठीं तुर्कांचा द्वेष करणाऱ्या अरबांना एकत्र आणून त्याने अनेक ठिकाणीं अरबस्वातंत्र्यसंघ स्थापिले. पुढे महायुद्धांत या संघांचा इंग्रजांना अतिशय उपयोग झाला.

पुराणवस्तुसंशोधनाच्या निमित्ताने लॉरेन्सने तुर्कांच्या मुलुखाची कशी पाहणी केली व लष्करी दृष्ट्या महत्त्वाची माहिती मिळविली याची सविस्तर हकीकत या लेखांत देणें शक्य नाही. तरी देखील १९१३ मधील एका महत्त्वाच्या पाहणीचा येथे उल्लेख करणें जरूर आहे. १९१३ सालीं पुराणवस्तुसंशोधन खात्याने, मिसर देशापासून येरूसलेम शहरापर्यंत मोझेसने ज्यू लोकांना कोणत्या मार्गाने नेलें, त्या मार्गाचें संशोधन आरंभिलें व त्या संशोधनावर लॉरेन्सची नेमणूक झाली. या दिवसांत लॉरेन्सने केलेल्या संशोधनामुळेच महायुद्धाच्या दिवसांत इंग्रजांना मिसर देशांतून चढाई करून येरूसलेम शहर जिंकतां आलें. लॉरेन्सचा इंग्रज चरित्रकार स्वतःच सांगतो, 'The survey, it should be explained, was ordered by Kitchener for military purposes. But it was disguised as archaeology.'

## वचनें फोल ठरलीं !

पुढे १९१४ सालीं महायुद्ध सुरू झालें व त्यांत तुर्कांनी जर्मनीची बाजू घेतली. तेव्हा लॉरेन्सने तुर्की साम्राज्यांतील अरब लोकांना वाटेल त्या भरूथापा

देऊन त्यांना तुर्कांविरुद्ध बंड करण्याला प्रवृत्त केलें. या अरबी बंडामुळेच इंग्रजांना तुर्कांचा सपशेल पराभव करणें शक्य झालें. या अरबी बंडांत लॉरेन्सने जी कर्तबगारी दाखविली, तिच्यावर संतुष्ट होऊन बादशहांनी त्याला अनेक पदव्या व पदकें देऊं केलीं; पण त्या बंडांत अरब लोकांना खोटीं वचनें देऊन फसविल्याची लॉरेन्सला शरम वाटत असल्याने त्याने तीं सन्मानाचीं निदर्शने नाकारली. लॉरेन्सने बादशहांना सांगितले, 'He had by order fed the Arabs with false hopes and would now be obliged if he might be quietly relieved of the obligation to accept honours for succeeding in his fraud.'

मुसलमानांपैकी कोणालाहि फसवावयाचे असल्यास अथवा विकत घ्यावयाचें असल्यास त्या कामावर लॉरेन्सची योजना करावी, असा लंडनच्या युद्धखात्याचा संकेत ठरून गेला होता. यामुळे जनरल टौनसेंड जेव्हा कुतुलअमाराच्या वेढ्यांत अडकून पडला, तेव्हा तेथील तुर्की सेनापतीला लाच देऊन जनरल टौनसेंड व त्याचें सैन्य यांची सुटका घडवून आणण्याच्या कामगिरीवर लॉर्ड किचनेरने कर्नल लॉरेन्सची योजना केली. लाचाची वाटाघाट करण्याकरिता लॉरेन्सने तुर्की सेनापतीची भेट देखील घेतली. पण तो विजयी सेनापति नुरुद्दिन खुद्द अनवरपाशाचा पुतण्या असल्याने त्याने लॉरेन्सने देऊ केलेली लाच झिडकारली व जनरल टौनसेंडला सपशेल शरण यावयाला लाविलें.

## दूरदर्शी मुत्सद्दी

पण लॉरेन्स हा नुसताच दगलबाज हेर नसून दूरदर्शी मुत्सद्दीहि होता, हें महायुद्धानंतर मेसोपोटेमियाची सुव्यवस्था लावण्यांत त्याने दाखविलेल्या चातुर्यामुळे सिद्ध झालें आहे. युद्ध संपल्यानंतर मेसोपोटेमिया प्रांत प्रत्यक्ष रीतीने ब्रिटिश सत्तेखालीं ठेवावयाचा, असा कर्झनप्रभृति मुत्सद्दी लोकांचा आग्रह होता. उलटपक्षीं अरब लोकांचें स्वराज्य तिथे स्थापावें व त्या अरबांकडून आपल्याला हव्या त्या व्यापारी व लष्करी सवलती मिळवाव्या असें लॉरेन्सचें म्हणणें होतें. पण प्रथम विजयमदाने धुंद झालेल्या इंग्रजांना लॉरेन्सचें म्हणणें पटेना. शेवटीं अरब लोकांनी मेसोपोटेमियांत बंड पुकारलें व त्या

बंडाचा उपशम करण्याकरितां इंग्रजांना तेथें सुमारें एक लक्ष सैन्य न्यावें लागलें आणि या साऱ्या सैन्याच्या खर्चाचा बोजा इंग्लंडच्या तिजोरीवर पडूं लागला. तेव्हां त्यांना लॉरेन्सच्या म्हणण्याची सयुक्तिकता पटली व त्याच्या सांगण्याप्रमाणे मेसोपोटेमियाची व्यवस्था लावण्यांत आली. या वेळच्या वादांत कर्नल लॉरेन्सने लंडन टाइम्सला लिहिलेल्या एका पत्रांतील कांहीं वाक्यें उतरून घेण्याजोगी आहेत. त्या पत्रांत मेसोपोटेमियाची सरकारी भाषा अरबी करावी म्हणजे तेथल्या ब्रिटिश अधिकाऱ्यांची संख्या आपोआप कमी होईल, त्याचप्रमाणे तेथें स्थानिक सैन्य उभारून सर्व लष्करी सत्ताहि अरबांच्या हातीं देऊन टाकावी अशी सूचना करून लॉरेन्स पुढें म्हणतो, " We shall then hold of Mesopotamia exactly as much or as little as we hold of South Africa or Canada. I believe the Arabs in these conditions would be as loyal as any one in the Empire " विशेष मौजेची गोष्ट ही कीं, आज हिंदुस्थानाला कसलीहि सवलत देण्याला विरोध करणाऱ्या विन्स्टन चर्चिलनेच लॉरेन्सच्या या सूचना मेसोपोटेमियांत अमलांत आणल्या.

युद्धसमाप्तीनंतर जेव्हां लॉरेन्समार्फत अरबांना दिलेली सारी वचनें मोडण्याला ब्रिटिश मंत्रिमंडळाने सुरुवात केली, तेव्हां लॉरेन्सने अरबस्थानांतील बंडाचा इतिहास लिहावयाला घेतला. हा इतिहास दहा भागांत पूर्ण व्हावयाचा होता, पण त्यांपैकीं आठ भाग लिहून झाले असतां १९१९ च्या नाताळांत कोणी तरी त्या ग्रंथाचें हस्तलिखित चोरून नेलें ! लोक म्हणतात की, तें हस्तलिखित इंटेलिजन्स सर्व्हिसच्या दप्तरखान्यांत सुरक्षित आहे ! असो, त्यानंतर लॉरेन्सने पुन्हा एकवार खटपट करून व बहुधा मूळच्या मजकुरांत छाटाछाट करून तो इतिहास संपविला. या इतिहासाला त्याने Seven Pillars of Wisdom असें नांव दिलें आहे. या ग्रंथाच्या फारच थोड्या प्रती १९२५ सालीं छापून त्याने आपल्या निकटच्या मित्रांना व कांहीं बड्या वर्गणीदारांना वांटल्या. याच ग्रंथाचा एक सारांश त्याने Revolt in the desert या नांवाने सामान्य वाचकांसाठी १९२६ सालीं प्रसिद्ध केला.

## बोलाफुलाला गांठ पडली !

आतां महायुद्धानंतरच्या लॉरेन्सच्या कारस्थानाकडे थोडेसे लक्ष दिलें

पाहिजे. लॉरेन्सची मोठी महत्त्वाकांक्षा ही होती कीं, अरबी भाषा बोलणारा तुर्की साम्राज्याचा सर्व भाग अमीर फैजलच्या अमलाखालीं व ब्रिटिशांच्या अधिराज्याखालीं असावा. पण महायुद्धानंतर सीरिया प्रांत फ्रेंचांनी आपल्या कबजांत घेतल्यामुळे फैजल व इंग्रज या दोघांचीहि तेथून हकालपट्टी झाली. यामुळे लॉरेन्स फ्रेंचांवर अगदी चिडून गेला होता. लॉरेन्सच्या इंग्रज चरित्रकाराने त्याचा व मार्शल फोक यांचा एक संवाद आपल्या पुस्तकांत दिला आहे. मार्शल फोक एकवार लॉरेन्सला म्हणाले, ‘आता लौकरच सीरियामध्ये आमचे फ्रेंच व तुमचे अरब यांच्यांत लढाई जुंपावयाची आहे. तेव्हा, तुम्ही तुमच्या अरबांच्या मदतीला जाणार असालच.’ लॉरेन्सने उत्तर दिलें, ‘मार्शलसाहेब, आपण जर फ्रेंचांचें पुढारीपण घ्याल, तर मी अरबांचें नेतृत्व पत्करीन.’ पुढे १९२५ सालीं खरोखरीच सीरियांतील अरबांनी फ्रेंचांविरुद्ध बंड केलें. या बंडाची प्रेरणा अरबांना लॉरेन्सकडूनच प्राप्त झाली असल्याचा फ्रेंच पत्रांनी तेव्हा आरोपहि केला होता. फ्रेंच पत्रांतील माहितीवर विश्वास टाकला तर असे म्हणतां येईल कीं, कर्नल लॉरेन्स व कॅप्टन मॅकालम या दोन इंग्रज अधिकाऱ्यांनी सीरियांतील अरबांना हरतऱ्हेची मदत करून हे बंड उपस्थित करविलें व बंडवाल्यांना दमास्कस शहरांत प्रवेश मिळवून दिला. या प्रकरणाचा फार बोभाटा झाल्यावर कर्नल लॉरेन्सची १९२६ च्या प्रारंभीं हिंदुस्थानांत बदली झाली.

कर्नल लॉरेन्स हा एअरक्रॅफ्ट्समन शॉ बनून हिंदुस्थानांत आल्याची बातमीहि फ्रेंच पत्रांनी तेव्हाच फोडली होती. पण त्या वेळी त्या बातमीकडे कोणीच लक्ष दिलें नाही. पुढे सुमारे दीड वर्षांने जेव्हा अमानुल्लाला लॉरेन्सच्या कारस्थानाचा संशय आला, तेव्हा त्याने त्या बिलंदर हेराचा खून करविण्याचे अनेक प्रयत्न केले, पण ते सर्व प्रयत्न फसले. अमानुल्लाच्या ‘अमान इ अफगाण’ या पत्रांत जगांतील अट्टल हेर कर्नल लॉरेन्स याला पकडून देणाऱ्याला मोठें बक्षीस मिळेल, अशी जाहिरातहि आली होती! ही जाहिरात प्रसिद्ध झाली, त्या वेळीं लॉरेन्सनें इंग्लंडला परत जाण्यासाठी प्रस्थान ठेवलें होतें.

१९२९ च्या जानेवारींत कर्नल लॉरेन्स हिंदुस्थानांतून इंग्लंडला परत गेला. यानंतरच्या त्याच्या हालचालींवर एकवार जर्मन पत्रांनी प्रकाश पाडला;

होता. १९३० सालच्या उन्हाळ्यांत तुर्कस्थानांतील कुर्द लोकांनी कमालपाशाच्या विरुद्ध बंड पुकारलें. या बंडासंबंधीं जर्मन पत्रांनी प्रसिद्ध केलेल्या माहितीवरून असे दिसतें कीं, स्वतंत्र मुसलमानी राष्ट्रांचा शत्रु कर्नल लॉरेन्स हाच या बंडाच्या मुळाशीं होता. त्या वेळी 'गेर्मानिया' नांवाच्या जर्मन पत्राने म्हटलें होतें कीं, कुर्द बंडवाल्यांजवळ अगदी ताज्या नमुन्याच्या इंग्रजी रायफली व मशीनगन्स सांपडत आहेत, एवढी एकच गोष्ट या बंडांत इंग्रजांचे अंग आहे, हें सिद्ध करण्याला पुरेशी आहे. तेव्हां इंग्लंडच्या परराष्ट्रीय खात्याने या सर्व बातम्यांचा इनकार करून असें जाहीर केलें कीं, कर्नल लॉरेन्स असल्या कांहीं कारस्थानांत गुंतला असल्यास परराष्ट्रीय खात्याला तरी त्याविषयी कांही सुद्धा माहिती नाही. अशा रीतीने परराष्ट्रीय खात्याने जरी कानांवर हात ठेवले तरी कर्नल लॉरेन्स तेव्हा कुर्द लोकांच्या साहाय्याला गेला होता, ही गोष्ट सर्व लोकांना माहीत होती. ही बातमी त्या वेळी 'बेर्लिनेर टागेब्लाट' या नामांकित जर्मन दैनिकाच्या इराणांतील बातमीदाराने प्रसिद्ध केली. तेव्हा लॉरेन्सने तो बातमीदार स्वतःच कर्नल लॉरेन्स असल्याचे वर्तमान आपल्या हस्तकांकरवीं इराणी अधिकाऱ्यांना कळविलें व त्यांनी त्या बातमीदारालाच अटक करून तेहरानला नेलं! तेहरानला गेल्यावर तेथील जर्मन वकिलातीच्या मध्यस्थीने त्या बातमीदाराची सुटका झाली.

१९३१ सालापासून लॉरेन्सच्या कारस्थानांच्या बातम्या येणें अजीबात बंद झालें होते. यंदाच्या वर्षी मात्र लॉरेन्स वैमानिक खात्यांतून निवृत्त होणार अशा बातम्या येऊं लागल्या होत्या आणि त्यामुळे यापुढे या संक्रांतीची वक्रदृष्टि कोणाकडे वळणार आहे, याविषयीं अनेक तर्कवितर्क सुरू झाले होते. हे सर्व तर्कवितर्क त्याच्या मृत्यूमुळे थांबणार आहेत कीं शर्लाक होल्म्सप्रमाणें त्याचं पुनरुत्थान होणार आहे कोणास ठाऊक ! कारण असल्या अट्टल हेरांच्या मृत्यूच्या बातमीवर देखील जपूनच विश्वास ठेवावा लागतो.

—केसरी, ता. २८ मे, १९३५



# सांकेतिक भाषा कशी उकलतात?

गतवर्षी जर्मनीच्या लष्करी खात्याचे सांकेतिक भाषेत लिहिलेले कांही गुप्त कागदपत्र लंडन टाइम्सचे माजी संपादक मि. विकृहॅम स्टीड यांच्या हातीं पडले. तेव्हा त्यांनी आपल्या मित्रांच्या मदतीने त्या संकेतांचा अर्थ लावून ते कागद ' नाइंटीथ सेन्चरी अँड आफ्टर ' या नामांकित मासिकांतून प्रसिद्धहि केले. या कागदपत्रांमध्ये भावी महायुद्धाच्या दिवसांत इंग्लंड व फ्रान्स या देशांतून जंतूंच्या साहाय्याने रोगांच्या सांथी पसरविण्यासंबंधीं जर्मन लष्करी खात्याने केलेल्या प्रयोगांचा सविस्तर रिपोर्ट होता. हा सांकेतिक भाषेत लिहिलेला रिपोर्ट उकलण्याच्या कामांत मि. विकृहॅम स्टीड यांना ज्या मित्रांची मदत झाली, त्या सर्वांचा मार्गदर्शक इंग्लंडचा प्रख्यात संकेततज्ज्ञ सर आल्फ्रेड एविंग हा होय. या सर आल्फ्रेड एविंगला कांही महिन्यापूर्वी देवाज्ञा झाली असल्याने त्याच्या कार्याच्या वर्णनानेच प्रस्तुत विषयाचा उपन्यास करण्यांत येत आहे.

## जर्मनीचें गुप्त कोड

महायुद्धाच्या सुरुवातीला सर आल्फ्रेड एविंग हा डायरेक्टर ऑफ नेव्हल इन्स्ट्रक्शन या हुद्दयावर होता व आपला फुरसतीचा वेळ तो सांकेतिक भाषांच्या अभ्यासांत घालवीत असे. युद्धाला सुरवात झाली त्या दिवशी, डायरेक्टर ऑफ नेव्हल इंटेलिजन्स सर हेन्री ऑलिव्हर याने वाटेंत पकडलेले जर्मन आरमाराचे सांकेतिक भाषेतील कांही संदेश सर आल्फ्रेडकडे आणले व त्याला त्यांचा अर्थ लावायला सांगितलें. हें काम सर आल्फ्रेडने यशस्वी रीतीने पार पाडलें व तेव्हापासून बिनतारी यंत्रांनी ऐकलेल्या शत्रूंच्या सांकेतिक संदेशांचा अर्थ लावण्याच्या कामावरच त्याची नेमणूक झाली. या सांकेतिक संदेशांचा अर्थ लावण्याचें काम सर आल्फ्रेडला व त्याच्या सहकाऱ्यांना आरंभीं आरंभीं बरेंच अवघड गेलें. पण पुढे १९१४ ऑगस्टच्या २६ व्या तारखेला जर्मनांचें माग्डेबुर्ग नांवाचें एक क्रूझर बाल्टिक समुद्रांत सुरुंगाला लागून बुडालें. या

# स्पेनमधील राज्यक्रान्ति



स्पेनमधील राज्यक्रान्ति घडवून आणण्यांत मुख्यतः तेथील तरुण विद्यार्थी-वर्गाने पुढाकार घेतला होता. इतर अनेक देशांप्रमाणेंच स्पेनमधील तरुणांमध्ये-हि गेल्या महायुद्धाच्या समाप्तीपासून कम्यूनिझमचा प्रसार झाला आहे. या समाजसत्तावादी तरुणांनी १९२३ सालीच मजुरांचे संप व दंगे उपस्थित करून राजसत्ता उलथून पाडण्याचा पहिला प्रयत्न केला. पण त्या वेळी राजाला प्रिमो दे रिव्हेरासारख्या कर्तबगार सेनापतीचे साहाय्य मिळाल्याने तो प्रयत्न फसला. तरी देखील तेव्हापासून स्पेनमधील मुलकी सत्तेला अधिकारन्यास करून सर्व सूत्रें लष्करी सत्तेच्या स्वाधीन करावी लागली. याप्रमाणे मुलकी सत्तेच्या हातून लष्करी सत्तेच्या हाती मुख्याधिकार येणे, हा देखील वास्तविक पाहतां क्रांति-पक्षाचा मोठाच विजय होता! कारण लष्करी सत्तेवर मध्यम वर्गांतील जनता फार लवकर नाराज होते व त्यामुळे क्रांतिकारकांना बुद्धिमान व अनुभवी पुढाऱ्यांचा पुरवठा होऊन त्यांचे सामर्थ्य सारखे वृद्धिंगत होत जाते.

हा अनुभव तर स्पेनमध्ये आलाच. पण याशिवाय आणखीहि एका प्रकाराने प्रिमो दे रिव्हेराच्या कारकीर्दीत क्रांतिकारकांना उत्तेजन मिळाले. जन-तेचे राजकीय हक्क हिरावून घेतले म्हणजे तिला संतुष्ट ठेवण्यासाठी राज्यकर्त्यांना तिच्या आर्थिक उन्नतीकडे व व्यावहारिक सुखसोयीकडे लक्ष पुरवावें लागतें. यास्तव प्रिमो दे रिव्हेराने आपल्या देशांतील रेल्वे, रस्ते, विद्युच्छक्ति व कारखाने यांची त्वरित वाढ व्हावी म्हणून मोठमोठ्या रकमा खर्चल्या. यामुळे देशाची सुधारणा झालीच, पण त्याबरोबर देशांतील मजुरांची संख्याहि फार वाढली. या मजुरांमधील असंतोषाच्या अग्नींत आपल्या सत्तेची आहुति पडूं नये म्हणून स्पेनच्या डिक्टेटराने एका हाताने त्यांच्यांतील कम्यूनिस्ट पुढाऱ्यांना तुरुंगांत टाकलें व दुसऱ्या हाताने त्यांच्या हितसंबंधांचें संरक्षण करण्यासाठी प्रगतिपर कायदे केले. यामुळे स्पेनमधील मजुरांचें सामर्थ्य वाढले व असंतोषहि कायम

राहिला. मात्र पोट बांधून वर्षानुवर्ष युद्ध चालविणें मजूरवर्गाला अशक्य असल्याने त्यांनी तात्पुरती आपली चळवळ थांबविली. अशा असहाय परिस्थितीत देखील स्पेनमधील विद्यार्थीवर्गाने सुलतानी सत्तेविरुद्ध अव्याहत झगडा चालविला.

पुढे १९२९ सालीं स्पेनच्या पेसेता नाण्याचा भाव सारखा घसरत चालल्यामुळे देशांत दुष्काळी परिस्थिति उत्पन्न झाली व पूर्वीच्या राजकीय असंतोषांत आर्थिक अवनतीची भर पडली. तेव्हा १९३० च्या आरंभी प्रिमो दे रिव्हेराला आपली डिक्टेटरशिप टाकून फ्रान्समध्ये पळून जावे लागलें. त्याच्यामागून जनरल बेरेंगुएर याला राजाने डिक्टेटर नेमले व त्यांजकडे देशांत पुनः पार्लमेंटरी राज्यपद्धति सुरू करण्याचे काम सोंपविलें. या नव्या डिक्टेटराचे प्रधानमंडळ मजूर वर्गाला प्रतिकूल होतें आणि त्याने जमाखर्चाची तोंडामिळवणी होत नसल्याच्या सबबीवर प्रिमो दे रिव्हेराने सुरू केलेली कामें अर्धवट सोडून देण्याचे व मजुरांना पूर्वी मिळालेल्या सवलती काढून घेण्याचे धोरण अमलांत आणले. यामुळे मजूर वर्गाला बेरेंगुएरचे उच्चाटन करण्यासाठी कंबर बांधणें अपरिहार्य झाले.

भांडवलवाल्यांचा कैवार घेणारे सरकार स्वाभाविकपणेच गरीब शेतकऱ्यांचा काळ बनतें. कारण शेतीच्या धंद्यावर निर्वाह करणें शेतकऱ्यांना अशक्य झाल्याशिवाय कारखानदारांना स्वस्त मजुरांचा मनमुराद पुरवठा होत नाही. तसेंच स्वतंत्र शेतकऱ्यांना मजूर बनविल्याशिवाय शेतीच्या धंद्यांत भांडवल घालणेंहि भांडवलवाल्यांना परवडत नाहीं. सध्यां स्पेनमधील पिकाऊ जमिनीपैकीं ८० टक्के जमीन अवघ्या ६०० कुटुंबांच्या मालकीची आहे व हे जमीनदार आपल्या मालकीच्या जमिनीचा पुष्कळसा भाग पडीक राहूं देत असल्याने दर वर्षी लाखों शेतकऱ्यांना पोटासाठी परदेशीं जावे लागते. पण अलीकडे अमेरिका, अर्जेंटाइन रिपब्लिक वगैरे देशांतून स्पेनच्या शेतकऱ्यांना प्रवेश मिळेनासा झाला असल्याने त्यांना आता स्वदेशांतच अर्धपोटीं राहून काळ कंठावा लागतो अशा परिस्थितींत १९३० च्या नोव्हेंबरमध्ये स्पेनमधील कांही पिकें बुडाल्यामुळे दुष्काळ पडला व त्याबरोबर देशांत दंग्यांना सुरुवात झाली. हे शेतकऱ्यांचे दंगे मुख्यतः आंदालूसिया व आलिकांते या प्रांतांतून झाले. त्याच वेळीं कातालोनिया, कास्तिल वगैरे प्रांतांतून मजुरांचे संप व दंगे यांनाहि प्रारंभ झाला. या प्रांतांतील शहरांतून

लोकांनी रस्तोरस्तीं तात्पुरती तटबंदी उभी करून रहदारी बंद पाडली व कोर्टें, कचेऱ्या, शाळा वगैरेंचे सर्व व्यवहार बंद झाले. या दंग्यांतून शेकडों लोक प्राणास मुकले अथवा जखमी झाले.

या शेतकरी व कामकरी वर्गांच्या दंग्याचा प्रतिध्वनि स्पेनच्या लष्करांतहि उमटला. कारण स्पेनमध्ये सक्तीची लष्करी नोकरी प्रचलित असल्याने तेथील लष्करांत मुख्यतः शेतकरी व कामकरी वर्गांचाच भरणा असतो व यामुळे ते सैनिकहि नेहमीं आपल्या वर्गांचा पाठपुरावा करण्यास सज्ज असतात. या सैनिकांनी ता. १२ डिसेंबर रोजी पिरिनिज पर्वतांत जॅस्क येथे बंडाचे निशाण उभारलें. पण त्यांचा राजनिष्ठ सैन्याने दोन दिवसांत पराजय केला आणि आल्फोन्सो राजाने १४ डिसेंबर रोजी रविवारी दुपारीं बंडखोरांच्या पुढाऱ्यांना गोळ्या घालून मारविलें. या वेळीं पायदळाच्या बरोबरच वैमानिक खात्यांतील अधिकाऱ्यांनीहि बंड केलें होतें पण त्यांचाहि पराजय झाल्याने त्यांना विमानांतून पोर्तुगालमध्ये पळून जावें लागलें.

या बंडानंतर दहा हजारांहून अधिक लोकांना राजाने तुरुंगांत टाकलें. पण या दडपशाहीला न जुमानता स्पेनमधील हजारों देशभक्तांनी आपल्या सह्या घालून अशी घोषणा केली कीं, We have plotted to obtain through a military and civil uprising the justice and political dignity which today are possible only under a republic. (आम्ही लष्करी व बिनलष्करी लोकांचें बंड उभारून न्याय व राजकीय अधिकार प्राप्त करून घेण्याचा कट केला आहे. आमचे हे ध्येय लोकशाहीतच साध्य होऊं शकेल.)

स्पेनमधील लोकसत्तावादी व समाजसत्तावादी पक्षांत अनेक उपपक्ष आहेत. पण या सर्वांना मान्य होईल, असें तात्कालिक लक्ष्य ठरवून त्यांना क्रांतीच्या कार्याला जुंपण्यांत स्पेनच्या पुढाऱ्यांचा धोरणीपणाच दिसून आला. विशेषतः कम्यूनिझमचें नांव न घेता समाजपुनर्घटनेचा कम्यूनिस्टांचा कार्यक्रम लिबरल पक्षाच्या व रिपब्लिकन पक्षाच्या गळीं उतरविण्यांत त्यांनी वाखाणण्याजोगें कौशल्य प्रगट केलें आहे. या बंडवाल्यांचा एक पुढारी मेजर फ्रांको याने म्हटलें आहे 'कम्यूनिस्टांचीं मतें आम्हां बंडवाल्यांना मान्य नाहीत. आम्हांला फक्त सरदार,

धर्माधिकारी व भांडवलवाले यांच्या तावडीतून स्पॅनिश लोकांची सुटका करावयाची आहे.' कम्यूनिझमचे तत्त्व अमान्य व तपशील मान्य अशांतलाच हा प्रकार आहे.

बंड हे नेहमींच अचानक रीतीने घडवून आणावे लागत असल्याने बंडाच्या सुरुवातीला बंडवाल्यांना सामान्य जनतेचे साहाय्य सहसा मिळत नाही. यामुळे प्रारंभी बंडवाल्यांचा बहुधा पराजय होतो. पण बंडवाल्यांनी शस्त्रे खाली ठेवलीं तरी त्यांची संघटना मोडत नाही, देशांतील असंतोष कमी होत नाही किंवा सार्वत्रिक संपाची व देशांत अराजक माजण्याची भीति नाहीशी होत नाही, ही स्थिति राज्यकर्त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आली म्हणजे त्यांना आपल्या प्रतिपक्षियांशीं समेटाचे बोलणे सुरू करणे भाग पडते. स्पेनमध्ये आल्फोन्सो राजाला हाच अनुभव आल्याने १९३१ च्या फेब्रुवारीत त्याने अटकेत असलेले क्रांतिकारकांचे पुढारी आल्काला झामोरा व फेर्नांदो दे लोस रिओस यांजबरोबर तडजोडीची वाटाघाट करून पाहिली. सर्व सत्ता लोकपक्षाच्या हाती आल्याशिवाय सामान्य जनतेच्या हितसंबंधांचें संरक्षण होणे अशक्य आहे अशी त्यांची खात्री असल्याने त्यांनी उलट राजाला असा निर्वाणीचा खलिता पाठविला की आपण राजीखुषीने राज्य सोडून गेला नाही तर आमच्या पक्षाला पुनः बंड पुकारावें लागेल.

तुरुंगांमधील असली बोलणीं वर्तमानपत्रांच्या प्रतिनिधींमार्फत चालतात व त्यांच्यामार्फतच ती जनतेत पसरतात. वरील खलित्याची बातमी फ्रेंच बातमीदार आंद्रे निकोला याने आपल्या देशांत प्रसिद्ध केली. त्याच वेळी स्पेनमध्ये झामोराचा सरकारी तुरुंगांत खून करण्याचा प्रयत्न झाल्याची कंडी माद्रिद शहरीं पसरली! या कंडींत कितपत तथ्य होते, हें कळणें अशक्य आहे. पण त्यामुळे कॅप्टन गालान व कॅप्टन गार्सिया यांना गोळ्या घालून मारल्यामुळे आल्फोन्सोविरुद्ध आधींच खवळलेलें लोकमत अगदीच बिथरून गेले व त्याचा परिणाम एप्रिलमधील निवडणुकीवर फार झाला. वरील कंडीचा राजपक्षाच्या वर्तमानपत्रांनी इनकार केला. पण त्यावेळी वर्तमानपत्रांवर सेन्सॉरचें नियंत्रण असल्याने कायदेशीर वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होणाऱ्या बातम्या साऱ्या खोट्या व बेकायदेशीर वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होणाऱ्या बातम्या तेवढ्याच खऱ्या, असा स्पॅनिश जनतेचा ग्रह होऊन बसला होता! यामुळे त्या इनकाराचा काडीचाहि उपयोग झाला नाही.

स्पेनमधील राज्यक्रांति यशस्वी होण्याला तेथल्या सेन्सॉराशिपला प्रत्युत्तर देण्यासाठी निघालेल्या बेकायदेशीर पत्रांची अतिशय मदत झाली आहे.

झामोराच्या खुनाचा प्रयत्न झाल्याची कंडी जनतेत पसरल्यानंतर राजाला लोकपक्षाच्या या पुढाऱ्यांना चौकशीशिवाय अटकेंत ठेवणे धोक्याचें वाटूं लागले म्हणून त्याने लष्करी कोर्टापुढे त्यांचा खटला चालविण्याचा हुकूम सोडला. पण क्रांतिकारकांचा युद्धमंत्री सिनोर आझान्या याने लष्करी अधिकाऱ्यांची मनें आधीच वळवून ठेवली असल्याने त्यांनी आल्काला झामोरा व फेर्नांदो दे लोस रिओस यांची ओजस्वी भाषणें ऐकून झाल्यावर त्यांना जुजबी शिक्षा सांगून सोडून दिले !

याच वेळी क्रांतीची सिद्धता करण्यांत गर्क झालेल्या विद्यार्थ्यांना परत अभ्यासांत अडकवून टाकण्याच्या उद्देशाने प्रिमो दे रिव्हेराच्या कारकीर्दीपासून बंद पडलेल्या युनिव्हर्सिट्या पुन्हा उघडण्यांत आल्या. पण अशा आणीबाणीच्या प्रसंगी तेथील अभ्यासांत गढून जाण्याइतके स्पेनचे विद्यार्थी वेडे नसल्याने त्यांनी विद्यालयांत आल्यावर ताबडतोब संप पुकारला आणि लौकरच विद्यार्थी व पोलीस यांच्यामधील मारामाऱ्यांना सुरुवात झाली. या विद्यार्थ्यांच्या दंग्यामध्ये शेंकडो लोक मेले किंवा जखमी झाले व स्पेनमधील सर्व मोठमोठ्या शहरांतील लोकक्षोभ अगदी परमावधीला जाऊन पोंचला. अशा लोकक्षोभामध्ये झालेल्या निवडणुकी क्रांतिकारकांनी जिंकल्या यांत कांहीं नवल नाहीं.

एप्रिल ता. १२ च्या निवडणुकीत राजपक्षाचा पराजय झाल्याचें वर्तमान ऐकतांच आल्फोन्सो राजा फ्रान्सला पळून गेला व त्याच्या पाठोपाठच स्पेनमध्ये लोकसत्ता स्थापन झाल्याची द्वाही फिरली. स्पेनमध्ये राज्यक्रांति झाल्याचे वर्तमान ऐकून सारे साम्राज्यसत्तावादी आश्चर्यचकित होऊन गेले. नाइंटीन्थ सेंचरीमधील एका इंग्रज लेखकाने तर असे उद्गार काढले आहेत की There was no particular reason why there should be a revolution ! तसेंच महत्त्वाचें कारण असल्याशिवाय कोणी सुखासुखी राज्यक्रांति करीत नाहीं, हें देखील या इंग्रज लेखकांना कळत नाहींसे झालें आहे ! अथवा ‘ दैवेनोपहतस्य बुद्धिरथवा पूर्वं विपर्यस्यति ’ अशीच त्यांचीहि अवस्था झालेली असावी.

—केसरी, ता. ११ ऑगस्ट, १९३१.

# स्पेनमधील यादवीची पूर्वपीठिका

## लेखांक पहिला

स्पेनमधील यादवी युद्धाची पूर्वपीठिका समजून घ्यावयाची म्हणजे त्या देशांत लोकसत्ताक राज्यपद्धति प्रस्थापित झाली तेथून आख्यानाला प्रारंभ केला पाहिजे. १९३१ साली स्पेनमध्ये बंड होऊन तेथील राजा तेरावा आल्फोन्सो हा पळून गेला. त्यानंतर नवीन राज्यघटना तयार करण्यासाठी स्पेनच्या पार्लमेंटाच्या नवीन निवडणुकी झाल्या. त्या वेळी स्पेनचे लोकमत राजसत्तेला अत्यंत प्रतिकूल झालें असल्याने मतदारांनी राजसत्तेला सर्वस्वी विरोध करणाऱ्या पक्षांच्या उमेदवारांना त्यांच्या इतर मतांचा विचार न करतां निवडून दिलें. यामुळे स्पॅनिश पार्लमेंटांत त्या वेळी १८० सोशालिस्ट निवडून आले. या सोशालिस्टांनी रिपब्लिकन पक्षाचे पुढारी सि. आझान्या यांच्याबरोबर संगनमत करून पार्लमेंटांत आपल्या पक्षाचे वर्चस्व प्रस्थापित केले. या दोन्ही पक्षांच्या संगनमताने स्पेनची जी नवीन राज्यघटना तयार झाली, तिच्यांत असे म्हटले आहे की, देशांतील संपत्त्युत्पादनाच्या सर्व साधनांची मालकी सरकारची आहे, तूर्त जरी खासगी मालकीला परवानगी दिली असली तरी क्रमाक्रमाने ती सारी संपत्त्युत्पादनाची साधने सरकारच्या मालकीची करावयाची आहेत ! त्याचप्रमाणे या घटनेने स्पेनमधील कॅथोलिक धर्माचे अधिष्ठान मोडून टाकले, चर्चची आणि जेसूइट लोकांची सर्व मालमत्ता जप्त केली, धर्मोपदेशकांनी चालविलेल्या सहस्रावधि शाळा बंद केल्या, देशांतील सुमारे चाळीस हजार धर्माधिकाऱ्यांना सरकाराकडून जी वर्षासने मिळत असत ती बंद केली. शिवाय सि. आझान्या यांच्या मंत्रिमंडळाने बड्या जमीनदारांच्याकडून सुमारें १७ लक्ष एकर जमीन काढून घेऊन ती शेतकऱ्यांना वांटून दिली. या जमीनदारांपैकी कांही जणांना त्यांच्या जमिनी काढून घेतल्याबद्दल नुकसानभरपाई दिली, तर बाकीच्या जमीनदारांवर ते लोकसत्तेशी अराजनिष्ठ असल्याचा आरोप लादून त्यांच्या जमिनी बिन मोबदल्यानेच काढून घेतल्या.

## कॅथोलिकांचा छळ

सि. आझान्या यांच्या मंत्रिमंडळाच्या या धार्मिक आणि आर्थिक धोरणामुळे स्पेन देशामध्ये असंतोष वाढूं लागला. कारण स्पेनच्या लोकांनी राजाविरुद्ध बंड केले असले तरी ते अजून धर्मलंड बनले नव्हते व कम्यूनिस्टांच्या खंकशास्त्राचीहि अद्यापि त्यांना गोडी लागली नव्हती. विशेषतः धर्मोपदेशकांनी चालविलेल्या सहस्रावधि शाळा बंद पाडल्याने ज्या पांच लक्षांहून अधिक विद्यार्थ्यांवर घरी बसण्याची पाळी आली होती, त्यांच्या पालकांना तर आपण फिरून एकवार मूर लोकांच्या अंमलाखाली गेलो आहोत की काय असे वाटूं लागले होते. असे वाटण्याला दुसरेहि एक सबळ कारण होते ते हे की सि. आझान्या यांच्या मंत्रिमंडळांत सातजण फ्रीमेसन होते आणि या फ्रीमेसनपंथाचा कॅथोलिक पंथाविषयींचा विद्वेष सुप्रसिद्धच आहे. या फ्रीमेसनपंथाच्या अनुयायांनी तेव्हा सोशालिस्ट पक्षाशी ऐक्य करून कॅथोलिक लोकांच्या धर्मच्छळाला सुरुवात केली. या धर्मच्छळाविरुद्ध त्यांनी ब्र काढला की, सरकारपक्षाची पत्रे त्यांच्यावर प्रतिक्रांतीच्या पुरस्काराचा आरोप ठेवून त्यांचा समूळ उच्छेद करून टाकण्याच्या धमक्या देत असत. यामुळे स्पेनच्या लोकसत्ताक राज्यांत कोणाहि कॅथोलिकाला आपल्या जीविताची शाश्वती वाटेनाशी झाली.

स्पेनचे एक माजी मुख्य प्रधान काउंट रोमान्योनेस यांनी १९३४ डिसेंबर मध्ये प्रसिद्ध केलेल्या एका लेखांत म्हटलें आहे कीं मोरोक्कोमधील सबंध युद्धांत जितके स्पॅनिश लोक मारले गेले, त्याहून अधिक नागरिकांचे प्राण गेल्या साडेतीन वर्षांत खुनामुळे गेले आहेत. लोकसत्ताक सरकाराने फाशीची शिक्षा रद्द करून टाकली असल्याने त्या देशांतील खुनी लोकांना कसलेंच भय उरलें नव्हतें. खुद्द सरकार देखील असल्या खुनांच्या विरुद्ध नाही, अशी रिपब्लिकन लोकांचीहि त्या वेळीं समजूत झाली होती. स्पेनचे सर्वांत प्रसिद्ध तत्त्वज्ञानी मिगुएल उनामुनो यांनी या अत्याचारांविषयीं लिहितांना म्हटलें आहे 'Excesses that the Government allowed to happen if indeed it had not sanctioned them' सि. मिगुएल उनामुनो हे स्वतः क्रांतिकारक पक्षाचे आहेत, या गोष्टीचा येथे उल्लेख करणें जरूर आहे. या सान्या प्रकारांमुळे स्पॅनिश जनतेच्या

सि. आझान्या यांच्या सरकारावरील विश्वास नष्ट झाला. तरी त्या सरकाराने राजीनामा द्यावा, अशी विरोधीपक्षाने मागणी केली असतां सि. आझान्या सांगत की, आम्ही राजीनामा दिल्यास स्पेनमध्ये पुन्हा एकवार राज्यक्रांति होऊन बोल्शेव्हिकांचें साम्राज्य प्रस्थापित होईल. पण सरतेशेवटी या साऱ्या अत्याचारी वातावरणाचा असा परिणाम झाला की, १९३३ च्या उत्तरार्धात कासास्व्हिएजास् या ठिकाणी कांही कम्यूनिस्टांनी दंगा केला असतां मुख्य प्रधान सि. आझान्या व गृहमंत्री सि. किरोगा या उभयतांनी तेथील स्थानिक अधिकाऱ्याला वाटेल ते कडक उपाय योजून तो दंगा थांबविण्याचा हुकूम केला. तेव्हा त्याने वीसपंचवीस लोकांना त्यांच्या निवासस्थानाला आग लावून जाळून मारले ! पुढे या प्रकरणाचा अतिशय गवगवा होऊन सि. आझान्या यांना आपल्या मंत्रिमंडळाचा राजीनामा द्यावा लागला. सि. आझान्या यांनी राजीनामा दिल्यावर प्रेसिडेंट झामोरा यांनी तात्पुरते प्रधानमंडळ नेमून स्पॅनिश पार्लमेंट बरखास्त केले व १९ नोव्हेंबर रोजी नवीन निवडणुकी करण्याचा हुकूम सोडला.

१९३१ साली नवीन घटना अस्तित्वांत आली, तेव्हा सोशालिस्टांनीं निवडणुकीच्या कायद्यामध्ये आपल्याला फायदेशीर होतील, असे अनेक फेरफार करून घेतले होते. तरी देखील १९३१ च्या निवडणुकींत सुमारें १८० सोशालिस्ट निवडून आले होते, तर १९३३ च्या निवडणुकीत अवघे ५८ सोशालिस्ट निवडून आले. सि. आझान्या याच्या अनुयायांचीहि अशीच वाताहात झाली. यांच्या उलट कॅथोलिक पक्षाचे सुमारे १५० लोक निवडून आले व त्यांचा पक्ष पार्लमेंटांत सर्वांत प्रबळ झाला. या पराभवाने चिडून जाऊन सोशालिस्टांनी देशांत बंडाळी आरंभिली. ही बंडाळी ८ डिसेंबरपासून १५ डिसेंबरपर्यंत चालली होती. या मुदतीत हुएस्का, सारागोस्सा, बार्सेलोना, कोरुना, ग्रानादा, माद्रिद, ओव्हिएदो येथे लहानमोठ्या प्रमाणावर चकमकी झाल्या व सरतेशेवटीं सि. लेरू यांच्या प्रधानमंडळाने हें बंड मोडून टाकले. बंड मोडतांनाहि या वेळीं मंत्रिमंडळाने बंडवाल्या सोशालिस्टांवर एकंदरीने दयाच केली ही गोष्ट येथे नमूद केली पाहिजे.

## पिकें जाळून टाकलीं !

सोशालिस्टांचा पक्ष हा ‘ डायरेक्ट ॲक्शन ’चा पक्ष असल्याने निवड-

णुकींत पराजय होतांच त्याने बंडाळीला सुरुवात करणे स्वाभाविकच होते. सरकाराने हें बंड मोडून टाकल्यावर त्यांनी संप घडवून आणण्याकडे आपलें लक्ष्य वळविले. १९३४ सालीं स्पेनमध्ये पिकें फार सुरेख आली होती. पण सत्ताभ्रष्ट झालेल्या सोशालिस्टांना ती पिकें कांहीं बघवेनात. यासाठी त्यांनी शेतकामावरील मजुरांचा सार्वत्रिक संप पुकारला. पण त्यांच्या दुर्दैवाने शेतकामावरील मजूर कांही त्या संपांत सामील होईनात. तेव्हा संपाच्या पुढाऱ्यांनी शेतांतील पिकें जाळून टाकण्याचें आपल्या अनुयायांना फर्मान सोडलें. असल्या आगीमुळे देशांतील पिकांची बरीच हानि झाली. पण त्याबरोबरच सोशालिस्ट पक्षाची पूर्ण नाचक्की झाली. पण देशामध्ये जसजशी सोशालिस्टांची नाचक्की होत होती, तसतशी त्यांच्या मनांतील लाजहि मरत चालली होती. १९३४ च्या वसंतांतील संप फसल्यावर त्यांनी अनार्किस्ट आणि कम्यूनिस्ट या उभयतांशी संमनमत केलें व फिरून एकवार क्रांतियुद्धाची तयारी सुरू केली.

यापूर्वी सि. आझान्या यांच्या कारकीर्दीत स्पेनमधील शस्त्रास्त्रांचे कारखाने स्पॅनिश सरकाराने आपल्या हातीं घेतले होते व त्यावर क्रांतिकारक पक्षांचे अधिकारी नेमले होते. त्यांच्या मागाहून आलेल्या मंत्रिमंडळानीहि सि. आझान्या यांनी केलेल्या व्यवस्थेत ढवळाढवळ केली नव्हती. यामुळे सरकारी शस्त्रास्त्रांच्या कारखान्यांतील हत्यारें चोरून सोशालिस्टांना पुरविली जात पण चोरून आणलेलीं हत्यारें क्रांतीला पुरी पडणार नाहीत, यासाठी रिपब्लिकन पक्षाचे एक धनाढ्य व्यापारी सि. एचेव्हारिएता यांनी या शस्त्रास्त्रांच्या कारखान्यांना सर्व तऱ्हेच्या शस्त्रास्त्रांची भली मोठी ऑर्डर दिली. सि. एचेव्हारिएता यांचा माल बहुधा दक्षिण अमेरिकेकडे जावयाचा असेल अशा समजुतीने प्रथम त्यांच्या ऑर्डरकडे सि. लेरू याच्या मंत्रिमंडळाचे लक्ष्य गेलें नाही. वास्तविक पाहतां ही हत्यारें स्पेन व पोर्तुगाल या दोन देशांतील क्रांतिकारकांसाठी विकत घेतली जात होती आणि एचेव्हारिएता यांच्या हातीं पडतांच तीं दोनहि देशांत वांटली जात असत ! हा चोरटा व्यवहार चालू असतां एका कस्टमच्या अधिकाऱ्याला शंका येऊन त्याने कांही हत्यारें जप्त केलीं व फॅसिस्ट पक्षामार्फत लोकशाही उलथून पाडण्यासाठी देशांत सर्वत्र हत्यारें वांटली जात आहेत, असा त्याने सरकारांत आणि जनतेंत बोभाटा केला. या बोभाट्यामुळे

पोलिसांनी या प्रकरणाचा कसून तपास केला आणि लवकरच सि. एचेव्हारिएता व त्याचे अनेक सहकारी यांना अटक केली. यानंतर साऱ्या स्पेनदेशभर झडत्या सुरू झाल्या व सर्वत्र रिव्हॉल्व्हर, बॉंब, यांत्रिक तोफा, बंदुका, दारूगोळा वगैरे युद्धसामुग्री लपवून ठेवलेली सांपडूं लागली !

याखेरीज दुसऱ्याहि एका मार्गाने सोशालिस्टांनी बंडाची तयारी चालविली होती. तो मार्ग म्हणजे बँकांवर दरवडे घालणे हा होय. पांच-सात तरुणांनी कांही कामानिमित्त बॅंकेमध्ये जावे आणि प्रसंग अनुकूल असल्यास खिशांतील पिस्तुले बॅंकेच्या अधिकाऱ्यांवर रोखून मिळेल ती लूट लांबवावी. असले प्रकार १९३३ व १९३४ साली माद्रिद, बार्सेलोना, बिल्बाओ, सेव्हिल वगैरे शहरांतून अनेकवार घडून आले होते.

## बंडाची तयारी व जाहिरनामा !

या राज्यक्रांतीची योजनाहि सोशालिस्टांनी मोठ्या कुशलतेने तयार केली होती. १९३१ साली आल्फोन्सो राजाला घालवून देण्यापूर्वी १९३० च्या अखेरीला आल्फोन्सोविरुद्ध एक बंड झाले होतें. या बंडाचे पुढारी कॅप्टन गालान व कॅप्टन हेर्नांदेझ याना आल्फोन्सो राजाच्या आज्ञेने जाका या गांवी गोळ्या घालून ठार मारण्यांत आले होते. या हुतात्म्यांचे अवशेष मोठ्या समारंभाने माद्रिद येथे नेऊन तेथे पुरण्याची क्लृप्ति या वेळी सोशालिस्टांनी काढली. या समारंभासाठी लक्षावधि क्रांतिकारकांनी माद्रिद येथे जमावे व अकस्मात् माद्रिद शहर हस्तगत करून घ्यावें, म्हणजे इतर ठिकाणची बंडे फारसे सायास न पडतां सफळ होतील अशी सोशालिस्टांची कल्पना होती. पण स्पॅनिश सरकारला या कारस्थानाची बातमी आधीच लागल्यामुळे त्यांनी गालान व हेर्नांदेझ यांची प्रेते उकरावयालाच मनाई केली. स्पॅनिश सरकारच्या या सावधगिरीमुळे बंडवाल्यांचा बेत अजीबात फसला. तरी देखील इंदालेसियो प्रिएतो, लार्गो काबाल्लेरो, आझान्या वगैरेंनी बंड करण्याचा निश्चय कायम केला आणि या निश्चयाचे समर्थन करण्यासाठी असा जाहीरनामा काढला की, प्रेसिडेंट झामोरा हे जर मंत्रिमंडळांत कॅथोलिक पक्षाच्या पुढाऱ्यांचा समावेश होऊं देतील तर ते मंत्रिमंडळ उलथून पाडण्यासाठी आम्ही वाटेल ते उपाय योजण्याला मागेपुढे पाहणार नाही. या जाहीरनाम्यावर वर

उल्लेखिलेल्या जहाल पुढाऱ्यांखेरीज कांझर्व्हेटिव्ह रिपब्लिकन पक्षाचे पुढारी सि. माउरा यांचीहि सही होती. या सि. माउरा यांना सि. काबाल्लेरो यांनी नुकतेंच फांशी दिलें आहे !

दिवंगत क्रांतिकारकांच्या प्रेतांच्या साहाय्याने माद्रिद जिंकण्याची योजना फसल्यावर सोशालिस्टांनी बार्सेलोना शहर हे बंडाचे मुख्य केंद्र करण्याचा विचार केला. त्यांची नवी योजना अशी होती की एकाच दिवशी सर्व स्पेन देश-भर सार्वत्रिक संप पुकारावा व त्यावेळी बार्सेलोना शहरांतील तीन लाख मजुरांनी त्या शहरांतील तीन हजार सैनिकांवर हल्ला करून ते शहर व त्याबरोबर काताल्लोनिया प्रांतहि हस्तगत करावा. ही योजना सफळ झाल्यास अल्पावधीतच सारा स्पेन देश क्रांतिकारकांच्या हाती येणे अशक्य नव्हते. कारण सि. आझान्या यांनी आपल्या कारकीर्दीत स्पेनचे सैन्य अगदी दुर्बळ करून ठेविले होते. शिवाय स्पेनच्या लष्कराचा तीनचतुर्थांश भाग नेहमीच मोरोक्कोमध्ये असे. लष्कराची पूर्णपणे खच्ची करण्यासाठी सि. आझान्या यांचे एक मंत्री सि. प्रिएतो यांनी मोरोक्कोला स्वातंत्र्य देऊन टाकण्याची जाहीररीतीने आपल्या मुख्य प्रधानांना सूचनाहि केली होती. पण फ्रान्स आणि इंग्लंड यांनी या सूचनेला निक्षून विरोध केल्यामुळे ती अमलांत आणण्याचें साहस मि. आझान्या यांनी केले नव्हते. सरतेशेवटी ता. ४ आक्टोबर १९३४ रोजी प्रेसिडेंट झामोरा यांनी सि. लेरू यांना कॅथोलिक पक्षाच्या पुढाऱ्यांना मंत्रिमंडळांत घेण्याची परवानगी दिली व त्याबरोबर सोशियालिस्टांनी सर्व देशांत संप पुकारला आणि बार्सेलोना येथे ठरल्याप्रमाणें बंडाला सुरुवात झाली.

## बंडाला सुरुवात

बार्सेलोना येथे बंडवाल्यांनी स्थापिलेल्या तात्पुरत्या सरकारचे प्रमुख सि. आझान्या हे स्वतःच होते. पण त्यांच्या दुर्दैवाने तें सरकार कांही तास सुद्धा टिकले नाही. कारण बार्सेलोना येथील शिबंदीचे मुख्याधिकारी ज. बातेत् यांनी प्रशंसनीय धाडस करून बंडाची वार्ता कळताच मजुरांच्या बाजारबुणग्यांच्या बिरोधाचा धुव्वा उडवून त्या तात्कालिक सरकारला ताबडतोब अटक केली व तें बंड जागच्या जागींच दडपून टाकलें. या अल्पा-

वर्षीच्या लढाईंत सुद्धा सैनिकांपैकी शेकडों लोक ठार किंवा जायबंदी झाले. इतर स्पेन देशांतील सार्वत्रिक संप सुमारें एक आठवडा टिकला; पण बार्सेलोनाच्या उदाहरणामुळे बहुतेक मजुरांना बंड करण्याचा धीर होईना. त्यांच्या पुढाऱ्यांचीहि अनुयायांप्रमाणें गाळण उडाली. या आणीबाणीच्या प्रसंगी लार्गो काबालेरो यांनी आयत्या वेळी पगडी फिरवून बंडांत भाग घेण्याचें नाकारले ! सि. प्रिएतो हे तर फ्रान्स देशाला पळून गेले. एकटे रामोन् गोंझालेज पेन्या यांनी मात्र जिवाची आशा टाकून ओव्हिएदो प्रांतांतील बंडखोर मजुरांचे पुढारीपण स्वीकारलें व या प्रांतांतच मजूर आणि सरकार यांच्यामध्ये घनघोर लढाया झाल्या.

ओव्हिएदो प्रांत हा स्पेनमधील अतिशय सुसंस्कृत प्रांत आहे. या प्रांतांत स्वतः सरकारने चालविलेल्या शाळाच अडीच हजारांवर आहेत. त्याशिवाय त्या प्रांतांतील खाणीच्या मालकांनी चालविलेल्या किंवा इतर खासगी संस्थांनी चालविलेल्या शाळा वेगळ्याच. ओव्हिएदोची युनिव्हर्सिटीहि तिच्या प्रागतिकपणाबद्दल व सुशिक्षणाबद्दल सर्व स्पेन देशांत प्रसिद्ध आहे. पण या शिक्षणाच्या आगरांत तेथील नागरिकांच्या दुर्दैवाने तोफाबंदुकाचे दोन कारखाने होते व शिवाय हा खाणीचा प्रदेश असल्याने या भागांत सार्वत्रिक संप सुरू होतांच ओव्हिएदोमधील मजुरांनी वर उल्लेखिलेले शस्त्रास्त्राचे कारखाने व डायनामिटचा संग्रह हस्तगत करून एकदम बंडाला सुरुवात केली. असा अचानक हल्ला आला असताहि त्या प्रांतांतील पोलिस आणि सिव्हिल गार्ड यांनी बंडवाल्यांना मोठ्या शौर्याने तोंड दिले. अगदी अखेरचे काडतूस संपेपर्यंत किंवा तुकडीतील अखेरचा सैनिक मरेपर्यंत त्यांनी लढाई चालू ठेवण्याची पराकाष्ठा केली. या निकराच्या विरोधामुळे माद्रिद येथील सरकाराला मोरोक्कोमधून सैन्य आणवून हे बंड दडपून टाकण्यास सवड मिळाली.

## सरकारचा सौम्यपणाच भोवला

हे बंड सरासरी एक महिनाभर चाललें होतें. एवढ्या अवधीत सरकारपक्षाचे हजाराहून अधिक सैनिक ठार झाले व मजुरांचे सुमारें अडीचहजार बळी गेले. याशिवाय त्या रानटी बंडवाल्यांनी ओव्हिएदोची युनिव्हर्सिटी संपूर्ण जाळून टाकली व शेकडों शाळांचीहि तीच वाट लाविली. याशिवाय दहा हजारांहून अधिक लोक जखमी झाले व शेकडों कोटींची मालमत्ता नष्ट झाली ती वेगळीच.

असल्या बंडांचा उपशम करतांना लष्करी अधिकाऱ्यांच्या हातून कांही अत्याचार होणे स्वाभाविकच होते. पण एकदा मुलकी अधिकाऱ्यांची सत्ता प्रस्थापित झाल्यावर खतः स्पॅनिश सरकाराने बंडवाल्यांना अतिशय सौम्यपणाने वागविलें. या प्रसंगी देहांत शासनाची शिक्षा देण्याचा अधिकार सरकाराने फिरून आपल्याकडे घेतला, तरी देखील ही शिक्षा सांगितलेल्या २१ पुढाऱ्यांपैकी अवघ्या दोघांनाच प्रत्यक्ष फांशी दिले. सि. लेरू यांच्या या सौम्यपणाबद्दल कॅथोलिक पक्षाच्या पुढाऱ्यांनी त्यांना फार दोष दिला व आज जिवंत सोडलेले क्रांतिकारक उद्या तुमचा आमचा गळा कापायला माघार घेणार नाहीत, अशी त्यांना सूचनाहि दिली. पण सि. लेरू यांनी आपलें सौम्यपणाचे धोरण बदलले नाही. त्यांची समजूत अशी होती की, क्रांतिकारकांच्या काबाल्लेरो, प्रिएतो, आझान्या इत्यादि पुढाऱ्यांनी देशद्रोहीपणा, विश्वासघातकीपणा व भेकडपणा यांचें जें प्रदर्शन केलें, त्यामुळे त्यांची आतां स्वपरपक्षांत सारखीच बेअब्रू झाली आहे, तेव्हा या निर्विष भुजंगांपासून यापुढे आपल्याला कांहीहि उपद्रव होणार नाही. अशा समजुतीने त्यांनी सि. आझान्या यांच्यावरील आरोपांच्या चौकशीलाच विरोध केला. सि. काबाल्लेरो यांना केवळ कच्च्या कैदेंत अडकवून ठेवले व लढाऊ पुढारी सि. पेन्या यांची देहांत शासनाची शिक्षा रद्द केली !

राजकारणांत नेहमी असा अनुभव येतो की सामान्य जनतेची विस्मरणशक्ति मोठी असल्याने ज्यूरीच्या मनावर ज्याप्रमाणे अखेरच्या भाषणाचाच प्रभाव पडतो, त्याप्रमाणे प्रतिपक्षाची सर्वांत ताजी कुलंगडी जनतेपुढे मांडणाऱ्याची तिच्या मनावर छाप पडते. १९३५ सालीं सि. लेरू यांच्या आप्तेष्टमित्रांच्या विरुद्ध लाचलुचपत व सरकारी पैशाची अफरातफर या बाबतीत अनेक प्रकरणे उद्भवली व कांही शाबीतहि झालीं. यामुळे सि. लेरू यांना मंत्रिमंडळाचा राजीनामा द्यावा लागला. या प्रसंगाचा फायदा घेऊन सोशालिस्टांनी पुनः एकवार आपल्या हालचालींना सुरुवात केली व त्यांना असा अनुभव येऊं लागला की, इतक्यांतच लोक आपल्या पूर्वकृत्यांकडे दुर्लक्ष्य करायला लागले आहेत.

## झामोरा यांची धरसोड

याचवेळीं स्पेनचे तेव्हाचे प्रेसिडेंट सि. झामोरा यांनी आपल्या अधि-

काराचे अतिक्रमण करून स्पॅनिश पार्लमेंटला राज्यकारभार चालविणे अशक्य करून सोडले. १९३३ च्या निवडणुकींत कॅथोलिक पक्षाला सर्वांत अधिक मतें मिळालीं होती, हें वर सांगितलेंच आहे. अशा प्रसंगीं पार्लमेंटरी राज्यपद्धतीच्या शिरस्त्याप्रमाणें प्रेसिडेंट झामोरा यांनी कॅथोलिक पक्षाचे पुढारी सि. जिल् रोब्लेस् यांना मन्त्रिमंडळ बनवायला सांगणें जरूर होतें. पण कॅथोलिक पक्षाच्या पुढाऱ्यांना मंत्रिपद दिल्यास आम्ही अत्याचारी चळवळीला सुरुवात करूं अशी धमकी सोशालिस्टांनी दिल्याने प्रेसिडेंटांनी तेव्हा सि. लेरू यांना प्रधानमंत्र्याच्या जागेवर नेमले व त्यांच्या धोरणावर कॅथोलिक पक्षाचा विश्वास असल्याने त्या पक्षाने सि. लेरू यांना आपला पाठिंबा दिला होता. पण सि. लेरू हे पदच्युत झाल्यावर देखील प्रेसिडेंट झामोरा हे कॅथोलिक पक्षाच्या पुढाऱ्यांना प्रधानमंत्र्याची जागा देईनात. उलट त्यांचे कट्टे शत्रु जे फ्रीमेसन यांच्यापैकीच एका पुढाऱ्याला त्याचें पार्लमेंटांत कांहीहि वजन नसतांना, प्रेसिडेंट मजकुरांनी मुख्य प्रधान नेमले. सि. पोर्तेला व्हाल्लादारेस यांच्यासारख्या कट्टया फ्रीमेसनला या वेळी प्रधानपद देऊन पार्लमेंटरी पद्धतीने राज्यकारभार चालविणे अशक्य करण्यांतला हेतु असा होता की, कॅथोलिक पक्षाच्या पुढाऱ्यांना स्पेनची राज्यघटना बदलून घेणे अशक्य करून सोडावे. १९३१ सालीं जेव्हा स्पेनची घटना अंमलांत आली, तेव्हाच पार्लमेंटांत असें ठरले होत की, या घटनेत चार वर्षेपर्यंत कांहीहि फरक करूं नये, त्यानंतर मात्र पार्लमेंटाला दोन तृतीयांश बहुमतानेंहि राज्यघटनेत फेरफार करतां येतील. ही चार वर्षांची मुदत नुकतीच संपली होती व कॅथोलिक पक्षाचे पुढारी राज्यघटनेचे धर्मविरोधी धोरण बदलून टाकण्याला अतिशय उत्सुक झाले होते. अशा वेळीं प्रेसिडेंट झामोरा यांनी आपल्या तोंडचा घास काढून नेल्यामुळे सि. जिल् रोब्लेस् यांनी प्रेसिडेंटांच्या गैरसनदशीर वर्तनाचा तीव्र निषेध केला व यापुढे नवीन निवडणुकी होईपर्यंत प्रेसिडेंटांनी नेमलेल्या प्रत्येक प्रधानमंडळाला आपण विरोध करणार असे जाहीर केले. कॅथोलिक पक्षाच्या या विरोधाचा लौकरच परिणाम होऊन प्रेसिडेंट झामोरा यांनी पार्लमेंट बरखास्त केलें व ता. १६ फेब्रुवारी रोजी नवीन निवडणुकी करण्याचा हुकूम सोडला.

—केसरी, ता. २६ जानेवारी, १९३७.

---

## लेखांक दुसरा

१९३६ च्या फेब्रुवारीमधील निवडणुकींचा मुख्य उद्देश सि. जिल् रोब्लेस् यांच्या कॅथोलिक पक्षाचा पाडाव करणें हाच होता. हा हेतु साध्य करण्यासाठी स्वतः प्रेसिडेंट झामोरा, त्यांचे फ्रीमेसनपंथी मुख्य प्रधान सि. पोर्तेला व्हाल्लादारेस, रिपब्लिकन पक्षाचे पुढारी सि. आझान्या, सोशालिस्टांचे पुढारी सि. काबाल्लेरो, स्पेनमधील कम्युनिस्ट, ट्रोट्स्कीचे अनुयायी, इतकेच नव्हे तर निवडणुकीत भाग घेणे हे आपल्या तत्त्वाविरुद्ध आहे असे मानणारे व तोपर्यंत कधीहि निवडणुकींत भाग न घेणारे स्पेनमधील दहा लक्ष अनार्किस्ट हे सारे आपापल्या परीने खटपट करीत होते. निवडणुकीच्या मोहिमेला सुरुवात होताच प्रधानमंडळाने स्पेनमधील ५० प्रांतांपैकी ४२ प्रांतांच्या गव्हर्नरांना अधिकारावरून काढून टाकून त्यांच्या जागी आपल्या पक्षाचे नवे गव्हर्नर नेमले आणि आपल्याला अनुकूल नसलेल्या सहस्रावधि अधिकाऱ्यांच्या बदल्या केल्या. या बदलून गेलेल्या अधिकाऱ्यांना नवीन ठिकाणी मते देतां येत नसल्याने त्यांची सारी मते फुकट गेलीं. शेकडो म्युनिसिपालिट्या सस्पेंड करून त्यांचे अधिकार सरकारनियुक्त कमिशनरांच्याकडे दिले. हे सरकारचे हस्तक कशा रीतीने आपल्या अधिकारांचा उपयोग करीत होते, हे आलिकांते येथील मेयरच्या उदाहरणावरून दिसून येते हा मेयर जाहीर रीतीने प्रचार करीत असे की, क्रांतीचे जे शत्रु आहेत त्यांना मतदानाचा अधिकारच नाही. धर्मोपदेशक व भिक्षुणी यांना 'निवडणुकींच्या दिवशी बाहेर पडाल तर जिवाला मुकाल' अशा धमक्या नित्य दिल्या जात असत! रस्त्यांतील व सभांतील दंगयांना तर नुसता ऊत आला होता आणि हे दंगे थांबविण्याचा प्रयत्न कांही पोलिस अधिकाऱ्यांनी केल्यास त्यांच्या ताबडतोब बदल्या होत. या साऱ्या प्रकारांमुळे स्पेनचें वातावरण इतकें प्रक्षुब्ध होऊन गेले की, असल्या वातावरणांत निवडणुकी घडवून आणणे म्हणजे क्रांतीलाच आव्हान देणें आहे असें दूरदर्शी लोकांना वाटूं लागले. सि. लेरू यांनी प्रेसिडेंट झामोरा यांना सूचनाहि दिली कीं, Party passions are so high that it is the height of madness to hold elections in an atmosphere unprecedented in Spain.

स्थितीत निवडणुकी करणे ही वेडेपणाची कमाल ठरेल ! ) पण असल्या सूचना देण्याची वेळ मापूर्वी कधीच निघून गेली होती.

## सामान्य गुन्हेगारांनाहि शिक्षामाफी !

सि. लेरू यांच्या भाषणानंतर चार दिवसांनी म्हणजे ता. १६ जानेवारी रोजी सोशालिस्ट, कम्यूनिस्ट, अनार्किस्ट व रिपब्लिकन या पक्षांच्या पुढाऱ्यांच्या सहीने ' पॉप्युलर फ्रंट ' पक्षाचा जाहीरनामा बाहेर पडला. या जाहीरनाम्यांतील दोन महत्त्वाच्या कलमांचा येथे उल्लेख करणे जरूर आहे. ' There was also an engagement to promulgate an amnesty to include not only prisoners sentenced for politico-social offences but many classed as common criminals. Political reprisals in administrative affairs were also promised. ( राजकीय कैद्यानाच नव्हे तर सामान्य गुन्हेगारांनाहि माफी देण्याचे वचन देण्यांत आले आहे आणि मतभेदाचें उट्टे काढण्याकडे राजसत्तेचा उपयोग केला जाईल ! )

अशा रीतीने बदमाष लोकांना व सुडाच्या भावनांना उत्तेजन देण्याचे परिणाम काय झाले असतील, याची वाचकांनीच कल्पना करावी. ज्यांना प्रत्यक्ष पुरावा पाहिजे असेल त्यांचे, खुद्द निवडणुकीच्या दिवशी एकटया माद्रिद शहरांत बंदोबस्तासाठी सत्रा हजार पोलीस आणावे लागले एवढी गोष्ट सांगितली असतां समाधान होईल, असे वाटते. पण असा बंदोबस्त कांही साऱ्या देशांत करणे शक्य नसल्याने इतर लहानमोठ्या शहरी धाकदपटशाचें साम्राज्य झाले होते. उदाहरणार्थ बादाजोझ प्रांतांत क्रांतिकारकांच्या भीतीने हजारों मतदार मते देण्यासाठी घराबाहेर पडावयालासुद्धा धजले नाहीत. याच्या उलट ग्रानादा प्रांतांत कॅथोलिक पक्षाच्या लोकांनी विरुद्ध पक्षाच्या लोकांना मते द्यावयाला येणें अशक्य करून सोडले.

## क्रान्तिकारकांचें बहुमत !

अशा प्रक्षुब्ध वातावरणांत झालेल्या निवडणुकीत स्पेनमधील एक कोटि पस्तीस लक्ष मतदारांपैकी चौऱ्याण्णव लक्ष मतदारांनी मतें दिलीं. त्यांपैकीं साडे-पन्नास लक्ष मते कॅथोलिक पक्ष व त्यांचे सहाय्यक पक्ष यांना मिळाली व पॉप्युलर

फ्रंटच्या क्रांतिकारकांच्या वांट्याला अवघीं साडेत्रेचाळीस लक्ष मतें आलीं. पण या वेळी १९३१ साली निवडणुकीच्या कायद्यांतून करून घेतलेल्या फेरफारांचा क्रांतिकारकांना फायदा मिळून कॅथोलिक पक्षापेक्षा त्यांचे सुमारे सदतीस प्रतिनिधि अधिक आले. वर दिलेल्या मतांच्या सरकारी आंकड्यांवरून या निवडणुकीत वास्तविक जय कोणाचा झाला होता, हे कोणालाहि कळून येईल. पण पार्लमेंटामध्ये कॅथोलिक पक्षाचे प्रतिनिधि सुमारें १२० व त्यांचे सहकारी ८० इतकेच निवडून आले व क्रांतिकारकांच्या पक्षाचे एकंदर २३७ प्रतिनिधि यशस्वी झाले.

हे पहिल्या दिवसाचे आंकडे प्रसिद्ध होतांच सोशालिस्टांनी आनंद-प्रदर्शनानिमित्त प्रचंड मिरवणुकी काढून प्रतिपक्षियांना उपद्रव देण्याला सुरुवात केली. याबद्दल अधिकाऱ्यांनी पोलिसांना त्यांच्यावर हल्ला करण्याचा हुकूम केला असतां माद्रिदमधील पोलिसांची एक तुकडी अधिकाऱ्यांचा हुकूम अमान्य करून मिरवणुकीच्या लोकांतच सामील झाली ! पोलिसांची आपल्याविरुद्ध जाण्याची छाती नाही, हे दिसून येताच सोशलिस्टांनी आपला मोर्चा तुरुंगांकडे वळविला व तुरुंगांतील कैद्यांची ताबडतोब सुटका व्हावी, अशी मागणी केली. माद्रिद शहरी परराष्ट्रीय बातमीदारांचे वास्तव्य असल्याने तेथे दंगे न होऊ देण्याच्या बाबतीत सरकार व सोशालिस्ट्स या दोघांचेहि एकमत होते. यामुळे माद्रिद येथे १७ फेब्रुवारीला फारसे अनिष्ट प्रकार घडले नाहीत. पण सारागोस्सा, व्हालेन्सिया व आलिकांते या तीन शहरी मार्शल लॉ पुकारण्याची पाळी आली. बार्सेलोना शहरी तुरुंगासमोर दंगा करणाऱ्या लोकां-वर गोळीबार करावा लागला व त्यांत एक इसम ठार झाला व सात जखमी झाले. पण सर्वच ठिकाणच्या अधिकाऱ्यांची कांही मार्शल लॉ पुकारून किंवा गोळीबार करून शांतता प्रस्थापित करण्याची ताकद नव्हती. त्यांनी तुरुंगासमोर दंगे सुरू होतांच तुरुंगांचीं दारें खुलीं केली व पॉप्युलर फ्रंटच्या सरकारने त्यांचे समर्थन केलें. अशा रीतीने जबरदस्तीने तुरुंगाचीं दारे खुली करून राजकीय व अराज-कीय कैद्यांची सुटका करण्याचा देशांत धूमधडाका चालला असता ता. २६ फेब्रुवारी रोजी नवे मुख्य प्रधान सि. आझान्या यांनी ब्रिटिश बातमीदारांना मुला-खत देतांना सांगितलें, ‘Law and order exists in the country. The Government will persecute no one. Fascism in Spain

is of no importance.' ( सर्वत्र कायदा व सुव्यवस्था अमलांत आहे. सरकार कोणत्याहि पक्षाचा छळ करणार नाही. फॅसिझमला तर स्पेनमध्ये महत्त्वच नाही. )

## कॅथोलिकांच्या छळाला सुरुवात

या साऱ्या गोष्टी बोलणाऱ्या प्रधानांनी पुढे पांच दिवसांनीच 'जिल् रोब्लेसूचा शिरच्छेद करा' अशी वाक्ये लिहिलेली निशाणे घेऊन मिरवत आलेल्या सोशालिस्टांच्या प्रचंड जमावाचे प्रधानांच्या ऑफिसांतील गॅलरीतून स्वागत केले ! या दिवसापासून कॅथोलिक पक्षाच्या कचेऱ्या, त्यांची वर्तमानपत्रें, चर्चें, धर्मोपदेशक व पुढारी या सर्वांवर सोशलिस्टांनी निःशंकपणे हल्ले करून खून व जाळपोळ करावयाला सुरुवात केली. फेब्रुवारीच्या सोळा तारखेपासून जून महिन्याच्या सोळा तारखेपर्यंत एकंदर २६९ राजकीय खून झाले, ३५३ लोकांच्या खुनाचे प्रयत्न झाले, दंग्याधोप्यांतून १२८७ लोक जखमी झाले, १७० चर्चें जाळली गेली व २५१ इतर आगी लागल्या. जून सोळापासून जुलै अठरापर्यंतचे आंकडे कोठे पहावयाला मिळाले नाहीत आणि त्यानंतर प्रत्यक्षच यादवी युद्धाला सुरुवात झाली. याप्रमाणें निमसरकारी रीतीने क्रांतिविरोधी लोकांवर सूड उगविला जात असता सरकाराने असा एक कायदा केला की १९३४ च्या बंडांत भाग घेतल्यामुळे शिक्षा झालेल्या साऱ्या मजुरांची व अधिकाऱ्यांची त्यांच्या मालकांनी, म्युनिसिपालिट्यांनी किंवा सरकारी खात्यांनी ताबडतोब पूर्वीच्या कामांवर नेमणूक करावी व त्यांना सहा महिन्यांचा पगार बंडांत भाग घेतल्याबद्दल बक्षीस म्हणून द्यावा ! या कायद्यामुळे सरकारच्या पोचटपणाची यथार्थ कल्पना येऊन शेतकऱ्यांनी जमीनदारांना हुसकावून देऊन त्यांच्या जमिनी बळकावण्याचा धडाका सुरू केला. याच वेळीं सरकारी कारखान्यांतील हत्यारेंहि मजुरांमध्ये वांटण्याला सुरुवात झाली व रशियाहून यादवी युद्धाचे विशेषज्ञ स्पेनकडे येऊं लागले. स्पेनमध्ये यादवीयुद्धाचे विशेषज्ञ पाठविण्याचें काम इंटरनॅशनल लेबर डिफेन्स कमिटीकडे होतें व तिने पाठविलेल्या पहिल्या १२० लोकांच्या तुकडीचें माद्रिद येथे जाहीर स्वागतहि झालें.

## क्रान्तिकारकांचा वर्चष्मा

हा सारा प्रकार पाहून स्पेनचे केरेन्स्की सि. आझान्या यांना काळजी वाटू

लागली. पण ते मुख्य प्रधान असले तरी त्यांच्या हातीं खरोखरीची सत्ता कांहींच नव्हती. तेव्हां केरेन्स्कीच्याप्रमाणेंच सि. आझान्या यांनी ३ एप्रिल रोजी स्पॅनिश पार्लमेंटांत एक अत्यंत कळकळीचे भाषण करून मजुरांना अत्याचार न करण्याचा उपदेश केला. यानंतर ता. १६ एप्रिल रोजी सि. आझान्या यांनी आपल्या सरकाराचा भावी कार्यक्रम जाहीर केला असता विरुद्ध पक्षाचे पुढारी सि. काल्व्हो सोतेलो व जिल् रोब्लेस् या दोघांनीहि देशांत शांतता राखण्याच्या अटीवर त्यांना आपल्या पक्षाचा पाठिंबा दिला. तेव्हां सि. आझान्या व त्यांचा पक्ष हा कॅथोलिक पक्षाशी संगनमत करून आपल्याला दडपून टाकील, या भीतीने सोशालिस्टांनी माद्रिद शहरी चोवीस तासांचा सार्वत्रिक संप पुकारला व आझान्या यांच्या सरकारला बठणीवर आणले. सोशालिस्टांच्या धमकीमुळे सि. आझान्या यांनी स्पेनमध्ये फॅसिस्ट चळवळ बेकायदेशीर ठरविण्याचे व सरकारविरोधी चळवळींतून भाग घेणाऱ्या माजी लष्करी अधिकाऱ्यांचें पेन्शन बंद करण्याचें अशी दोन बिलें पार्लमेंटाकडून पास करवून घेतली आणि फॅसिस्ट चळवळ दडपून टाकण्याच्या निमित्ताने एका माद्रिद शहरीच हजाराहून अधिक लोकांना अटक केली. या वेळेपासून सि. आझान्या हे सोशालिस्टांच्या वर्तनाला आळा घालूं शकतील ही आशा नष्ट झाली आणि स्वतः सि. आझान्या यांनाहि आपल्या पोकळ मंत्रिपदाचा वीट आला. हा सारा प्रकार घडण्याच्या अगोदर स्पॅनिश पार्लमेंटाने प्रेसिडेंट झामोरा यांना त्यांच्या गैरसनदशीर वर्तनाबद्दल पदच्युत केले होते. त्या जागी सि. आझान्या यांनी आपली निवडणूक करून घेतली व या स्पॅनिश केरेन्स्कीने स्पेनच्या लेनिनचा मार्ग मोकळा करून दिला.

पण या वेळी स्पेनचे लेनिन काबालेरो यांना त्यांच्या पक्षांतच कोणी विचारीनासें झालें होतें. स्पेनच्या सोशालिस्ट पक्षांत या वेळी लोकसत्तेचा पुरस्कार करणारे सोशालिस्ट व मजुरांच्या डिक्टेटरशिपचा पुरस्कार करणारे सोशालिस्ट या उभयतांमध्ये भांडणे लागलीं होती. पहिल्या पक्षाचे पुढारी सि. प्रिएतो व सि. पेन्या हे होते, तर सि. काबालेरो हे विरुद्ध पक्षाचे पुढारी होते. प्रत्यक्ष सोशालिस्ट पक्षांत पेन्या व प्रिएतो यांचेंच बहुमत होतें व त्यांना उलथून पाडण्यासाठी काबालेरो हे मजूर वर्गाला व तरुण सोशालिस्टांच्या संघाला संप आणि अत्याचार करण्याच्या चिथावण्या देत होते. पण जून महिन्यापर्यंत तरी सि. काबालेरो यांना मवाळ

पुढाऱ्यांचे आसन डळमळीत करतां आले नव्हते. त्या महिन्यांत झालेल्या सोशालिस्ट पक्षाच्या कार्यकारी मंडळाच्या निवडणुकीत सि. पेन्या यांनी काबालेरो यांचा सपशेल पराभव करून प्रेसिडेंटची जागा मिळविली. त्यावेळीं कित्येकांना असें वाटूं लागलें की पॉप्युलर फ्रंट पक्ष लवकरच मोडून जाईल व काबालेरो यांचीहि सोशालिस्ट पक्षांतून हकालपट्टी होईल.

## यादवीचा प्रारंभ

जुलैच्या आरंभी या साऱ्या कल्पना खोट्या ठरल्या. कारण त्या महिन्याच्या आरंभापासून क्रांतीचे मित्र आणि शत्रु यांनी भर माद्रिद शहरांत परस्परांचे खून करण्याला सुरुवात केली. या खुनाखुनीमध्ये ता. १२ जुलैला कांहीं फॅसिस्ट तरुणांनी त्यांचे पुढारी मार्क्विस ऑफ एस्तेल्लो यांच्या चुलत भावाला ठार मारल्याबद्दल माद्रिद पोलिसांचा एक अधिकारी लेफ्टेनेंट कास्तिल्लो याचा वध केला. या अत्याचारामुळे चिडून जाऊन पोलीस अधिकाऱ्यांनी दुसऱ्या दिवशी राजपक्षाचे प्रमुख पुढारी सि. काल्व्हो सोतेलो यांना त्यांच्या घरून पकडून नेऊन बिगरचौकशीने गोळ्या घालून ठार मारलें ! देशांतील एक प्रमुख मुत्सद्दी अशा प्रकारे सरकारी अधिकाऱ्यांनी सरकारी सत्तेचा दुरुपयोग करून ठार मारल्यानंतर कॅथोलिक पक्षाला, ज्यांनी हा खून केला किंवा त्यास उत्तेजन दिले किंवा त्याचें समर्थन केलें, त्यांच्याविरुद्ध शस्त्र उचलण्याखेरीज गत्यंतरच उरले नाही. सि. सोतेलो यांच्या वधानंतर पांचच दिवसांनी कॅथोलिक पक्षाच्या वतीने जनरल फ्रांको यांनी लढाईला सुरुवात केली.

## बंडवालेहि लोकसत्तावादीच आहेत

मोरोक्कोच्या सैन्याने क्रांतिकारकांच्या सरकारावर शस्त्र उचलले, तेव्हा क्रांतिकारकांची अशी समजूत होती की, सि. आझान्या यांनी आपल्या पहिल्या कारकीर्दीत निर्बल व निःसत्व करून सोडलेल्या या लष्कराचा आपण लगेच पाडाव करूं. पण ही गोष्ट ते विसरून गेले होते की सि. जिल् रोब्लेस् यांनी १९३४ च्या ऑक्टोबरमध्ये युद्धमंत्र्याची जागा स्वीकारल्यापासून सर्व सैन्याची पुनर्घटना करून त्यांत नवजीवन ओतले होतें. जनरल फ्रांको यांना मागाहून जर्मनी व इटाली यांची भरपूर मदत झाली हे खरें; पण १९३५ सालीं स्पॅनिश

लष्कराची पुनर्घटना झाली नसती, तर त्या मदतीचाहि व्हावा तसा उपयोग झाला नसता. जनरल फ्रांको व त्यांचे प्रमुख सहकारी हे सारे कट्टे लोकसत्तावादी आहेत. जनरल फ्रांकोचे बंधु रामोन् फ्रांको व जनरल लानो हे १९३० सालीं आल्फोन्सोविरुद्ध झालेल्या बंडांत सामील झाले होते. जनरल काबानेल्लास यांना स्वतः रिपब्लिकन सरकाराने स्पेनच्या सिव्हिल गार्डांचे प्रमुख अधिकारी नेमले होते. जनरल फ्रांको व जनरल गोदेद यांच्यावरहि रिपब्लिकन पक्षाचा पूर्ण विश्वास होता व त्या सरकाराची सारी महत्त्वाची व विश्वासाची कामे त्यांच्याकडे सोपवली जात. स्पेनमध्ये रिपब्लिकची स्थापना झाल्या दिवसापासून हे सारे सेनापति इमाने-इतबारे रिपब्लिकची सेवा करीत होते. यांच्या पैकी कोणालाहि आज सत्ता बळकावून बसलेल्या क्रांतिकार-कांच्या पुढाऱ्याप्रमाणे रिपब्लिकविरुद्ध बंड केल्याबद्दल शिक्षा झालेली नाही. तेव्हा ते राजपक्षीय आहेत असा त्यांजवर केला जाणारा आरोप अगदी लटका आहे. मात्र या साऱ्या लोकसत्तावादी सेनापतींना कम्यूनिस्टांच्या डिक्टेटरशिपपासून व उच्छृंखळ अत्याचारापासून देशाचा बचाव करण्यासाठीच आज शस्त्र उचलणें भाग पडले आहे. राजसत्ता प्रस्थापित करणे किंवा फॅसिझमचा पुरस्कार करणे हे त्यांचे ध्येय नाही.

—केसरी, ता. २९ जानेवारी, १९३७.



# रशियाचीं फ्रान्समधील कारस्थानें

गेल्या जून महिन्याच्या प्रारंभी फ्रान्समध्ये राज्यक्रांति घडवून आणण्याचा एक अर्धवट प्रयत्न झाला. हा प्रयत्न घडवून आणण्यामध्ये व तो थांबविण्यामध्येहि रशियानेच पुढाकार घेतला असल्यामुळे रशियाच्या फ्रान्समधील कारस्थानांकडे लक्ष देणें अवश्य झालें आहे.

## स्टालिनचा कानावर हात !

आपण परराष्ट्रांतून राज्यक्रांति घडवून आणण्यासाठी झटत असतो, ही गोष्ट रशियाचे डिक्टेटर परक्या लोकांजवळ बोलून दाखवीत नाहीत. उदाहरणार्थ यंदाच मार्च महिन्याच्या पहिल्या तारखेला स्टालिनने अमेरिकेंतील ' स्क्रिप्स-हॉवर्ड न्यूजपेपर्स ' या वर्तमानपत्राच्या संघाचा अध्यक्ष मि. रॉय हॉवर्ड याच्यापाशी एका मुलाखतीत असे उद्‍गार काढले आहेत की क्रांति हा कांही निर्यात करण्याचा माल नव्हे; ज्या ज्या देशांना क्रांति हवी असेल, त्यांनी त्यांनी ती स्वदेशांत स्वतःच निर्माण करणें जरूर आहे; जर एखाद्या देशाला क्रांति नको असेल तर तेथे ती घडून येणार नाही; ते कांहीहि असले तरी इतर देशांतून क्रांतीची आग चेतविण्याचे काम रशिया करणार नाही. ' Russia has never wished to provoke revolution in other countries. ' असे अक्षरशः स्टालिनचे शब्द आहेत. आतां स्टालिनने ही मुलाखत दिली, त्याच वेळी त्याने सुप्रसिद्ध रशियन क्रांतिकारक बुखारिन याला पारिस शहरी क्रांतीची आग चेतविण्यासाठी पाठविले होते, ही एकच गोष्ट सांगितली असतां मुत्सद्दी लोकांचीं विधानें कशीं उलटीं वाचावयाची असतात, हें वाचकांना कळून येईल.

रशियांतील बोल्शेव्हिकांचें खरें ध्येय काय आहे, हें १९३५ साली कम्यूनिस्टांच्या कॉंग्रेसमध्ये कॉमरेड डिमिट्रॉफने स्पष्टच सांगितले आहे, ' We wish to organise the working class in a revolutionary army, which guided by the Third International and possessing the great

and sage helmsman, who is our chief, the comrade Staline, will be able to fulfil its historical mission to sweep from the face of the earth the fascism and with it the capitalism.' याप्रमाणे कम्यूनिस्ट पक्षाने फॅसिस्ट पक्षाचा नायनाट करणें, हे जरी आपलें ध्येय म्हणून जाहीर केले आहे तरी इटालीत फॅसिस्ट पक्षाचा जन्म झाला तेंव्हापासून आतांपर्यंत या दोन पक्षांचे जिथे जिथे सामने झाले तिथे तिथे कम्यूनिस्ट पक्षानेच मार खाल्ला आहे. या सान्या पराभवांची नामुष्की लपविण्यासाठी सध्या कम्यूनिस्ट लोकांनी फ्रान्समधील फॅसिस्टपक्ष या वंध्यापुत्राला मारण्याचा पराक्रम आरंभिला आहे. फ्रान्समध्ये फॅसिस्ट पक्ष जवळ जवळ अस्तित्वांतच नाही, ही माहिती मजूर पक्षाचे एक सुप्रसिद्ध लेखक मि. एच्. एन्. ब्रेलसफर्ड यांच्या लेखांतूनच मिळते.

## रशियाच्या इज्जतीचा प्रश्न

सध्या जगांतील सान्या कम्यूनिस्ट पक्षाला मास्कोहून सुटतील त्या हुकुमां-प्रमाणे चालावे लागते. या बाबतीत कोमिंटेर्नचा स्पष्ट नियमच असा आहे— 'The decisions of the executive committee of the communist international are obligatory to all sections, and must be obeyed immediately.' यामुळे जगांत कुठेहि कम्यूनिस्टांचा उत्कर्षापकर्ष झाल्यास ताबडतोब रशियाची इज्जत वाढते किंवा कमी होते. आता तीन वर्षांपूर्वी हिटलेरने जर्मनीतील कम्यूनिस्ट पक्षाचा विध्वंस केल्यापासून कम्यूनिस्ट पक्षाचे व पर्यायाने रशियाचें जगाच्या राजकारणातील महत्त्व बरेच कमी झाले आहे. हे महत्त्व पुन्हा प्राप्त करून घेण्यासाठी रशियाने गतवर्षी मोठ्या कुशलतेने फ्रान्स-बरोबर दोस्तीचा तह घडवून आणला व तो तह चिरस्थायी व्हावा म्हणून यंदा फ्रेंच पार्लमेंटांत राष्ट्रीय पक्षाचा पाडाव करून सोशालिस्ट, कम्यूनिस्ट व त्यांचे हस्तक यांचे बहुमत घडवून आणले आहे. असे केलें नसते तर फ्रान्स, जर्मनीच्या पक्षाला मिळाला असतां अशी भीति स्वतः बुखारिननेच आपल्या एका ताज्या लेखांत प्रगट झाली आहे.

## पारिस हें कम्यूनिस्टांचें केंद्र

हें बहुमत रशियाने कसें घडवून आणले, हें पाहणे मोठें बोधप्रद आहे. हिटलेरने जर्मनीतील कम्यूनिस्ट पक्षाचा विध्वंस करण्यापूर्वी युरोपांत कम्यूनिझमचा

प्रसार करण्यासाठी नेमलेल्या रशियाच्या हस्तकांचे मुख्य केंद्र बर्लिन नगरीत होते. पुढे हिटलर जर्मनीचा चॅन्सेलर झाल्यानंतर हे सारे यादवीयुद्धाचे अग्रदूत पारिसला पळून आले व तेव्हापासून ते शहर पश्चिम आणि मध्ययुरोपांतील कम्यूनिस्टांचे केंद्र बनले आहे. या रशियाच्या हस्तकांपैकी कांही जण नांवे बदलून व खोट्या पासपोर्टचा उपयोग करून फ्रान्समध्ये घुसतात; पण त्याखेरीज पुष्कळसे हस्तक फ्रेंच जनतेच्या स्वातंत्र्यप्रियतेचा फायदा घेऊन उघड उघड स्वतः-च्याच नांवाने वावरत असतात. या सर्वांना त्यांच्या कार्यसिद्धीसाठी रशियांतून लक्षावधि रुपये पाठविले जातात. यांत अतिशयोक्ति यत्किंचित् देखील नाही. Correspondence International Communiste या कम्यूनिस्ट पत्रा-वरून असें कळते की, फ्रान्समध्ये पळून आलेल्या स्पॅनिश कम्युनिस्टांच्या मदतीसाठी १९३६ च्या आरंभी रशियाने दहा लक्ष फ्रँक पाठविले. त्याचप्रमाणे 'देफान्स' या कम्यूनिस्ट साप्ताहिकाने ३१–१–१९३६ च्या अंकांत म्हटलें आहे, की, थोड्याच दिवसांपूर्वी स्पेनमधील कम्यूनिस्टांच्या मदतीसाठी रशियाने वीस लक्ष फ्रँक पाठविले. या साऱ्या पश्चिम आणि मध्य युरोपांतील कम्यूनिस्टांना पैसे पुरविण्याच्या कामावर एबेरलाइन या कोमिंटर्नच्या सभासदाची नेमणूक झालेली आहे. यदा एबेरलाइनला फ्रान्समध्ये मो. सारो मुख्य प्रधान झाल्यावर लौकरच फ्रेंच पोलिसांनी स्ट्रासबुर्ग शहरी अटक केली. तेव्हा त्याच्या जवळच्या कागदपत्रांवरून असे सिद्ध झाले की, फ्रेंच निवडणुकीमध्ये रशियाच्या पक्षाला जय मिळावा यासाठी त्याने लक्षावधि रुपयांची खैरात केली होती; पण मो. सारोच्या पोचटपणामुळे एबेरलाइनची हीं सारी कृत्ये कोर्टांत उघडकीस आली नाहीत. त्याने रशियाच्या मध्यस्थीमुळे त्याच्यावर केवळ खोटा पासपोर्ट घेऊन फ्रान्समध्ये शिरण्याबद्दल खटला करून त्याला जुजबी शिक्षा सांगून सोडून दिलें. या वेळी एबेरलाइन हा आपण नील्सेन नांवाचा डॅनिश सरदार असल्याचें ढोंग करून फ्रान्समध्ये शिरला होता!

## आर्थिक मदतीचा विनियोग

अशा रीतीने रशियाहून आलेल्या मदतीचा बराचसा भाग कम्यूनिझमच्या प्रचारासाठी चालविलेल्या नियतकालिकांच्या वांट्याला जातो. पारिस शहरीं 132 Rue du Faubourg Saint Denis या ठिकाणीं कम्यूनिस्टांची L' Huma-

aite ही प्रसिद्ध प्रकाशनसंस्था आहे. या संस्थेमार्फत दैनिकें, साप्ताहिकें व इतर नियतकालिकें मिळून पन्नासाहून अधिक नियतकालिकें निघत असतात. याशिवाय प्रत्येक कारखान्याचें व संघाचे स्वतःचें वेगळे पत्र असतेच. फ्रान्समधील इतर शहरांतूनहि याच प्रमाणावर कम्यूनिस्टांचा प्रचार चालू असतो.

याशिवाय देशांतील निरनिराळ्या संस्थांना, त्यांनी कम्यूनिस्टांच्या तंत्रानें चागावे यासाठी, मदत करण्यांत येते. अशा संस्थामध्ये निरनिराळ्या विद्यार्थ्यांच्या संस्था, किसान–संघ, गोदी–कामगारांचा संघ, फोटोग्राफर लोकांचा संघ, बिनतारी यंत्रावर काम करणाऱ्यांचा संघ, युद्धविरोधी डॉक्टर आणि केमिस्ट यांचा संघ इत्यादि संस्थांची नांवे लक्षांत घेतली म्हणजे कोणत्या दृष्टीने या साऱ्या संघांची मदतीसाठी निवड करण्यांत आली असावी हें कळून येते. याखेरीज कांही संस्था अशा आहेत की, ज्या प्रत्यक्ष कम्यूनिस्टांकडूनच चालविल्या जातात. अशा संस्थापैकी युद्धविरोधी लोकांचा संघ, रशियन संस्कृतीच्या पुरस्कर्त्यांचा संघ, मानवी हक्क संरक्षणाचा संघ इत्यादींचा उल्लेख करणें जरूर आहे. याव्यतिरिक्त साऱ्या जगांतील गांजलेल्या मजुरांना मदत करण्यासाठी म्हणून काढलेला एक स्वतंत्रच संघ आहे. या संघामार्फत मजुरांना क्रांतियुद्धाच्या वेळीं रस्त्यारस्त्यांतून कसें लढावे व पोलीस आणि लष्करी बराकींतून आपल्या पक्षाचा प्रचार कसा करावा, याचे शिक्षण देण्यांत येते.

## मदत घेणाऱ्या फ्रेंच संस्था

वर उल्लेखिलेल्या बहुतेक संस्थांचीं कार्यें जाहीरपणे होत असल्यामुळे प्रत्यक्ष क्रांतीच्या दिवसांत त्यांचा फारसा उपयोग होऊं शकत नाही. यासाठी कम्यूनिस्ट पक्षाने मर्यादित सभासदांची मंडळे चालविण्याची क्लृप्ति काढली आहे. ही मंडळें फ्रान्समध्ये किती जलद वाढत आहेत हे कम्यूनिस्ट काँग्रेसला फ्रेंच कम्यूनिस्टांनी सादर केलेल्या रिपोर्टावरून कळते. उदाहरणार्थ, १९३४ च्या ऑक्टोबरमध्ये फ्रान्स देशांत कम्यूनिस्ट क्रांतीच्या अंगप्रत्यंगांचा अभ्यास करणारी २७२५ मंडळे होती; तर पुढच्या जूनमध्ये त्यांची संख्या ३६४७झाली. १९३५ च्या ऑक्टोबरमध्ये तर त्यांची संख्या ४२२१ पर्यंत वाढली. सर्व सरकारी खात्यांतून, शस्त्रास्त्रांच्या कारखान्यांतून व खुद्द लष्करांतून हीं मंडळें सुरू

असून यांनीच गेल्या जूनमध्ये रेनोल्त, सित्रोएन, ब्लोक, लिओरे वगैरे शस्त्रास्त्रें, मोटारी, विमानें, इत्यादीचे कारखाने बंद पाडले होते. एका अवांतर गोष्टीचा येथे उल्लेख करणें जरूर आहे. ती ही की, ' रेव्हयू दे द मोदच्या ' च्या ज्या ता. १५ जूनच्या अंकावरून वरील सारी माहिती घेतली आहे, तो अंकदेखील या संपांच्या उपद्रवामुळे एक महिना उशिराने प्रसिद्ध झाला !

यंदाच्या फ्रेंच निवडणुकीत फ्रान्सचा पूर्वीचा मुख्य प्रधान मो. लाव्हाल याच्या पक्षाचा जय होऊं नये, यासाठी रशियाप्रमाणेंच इंग्लंडचीहि खटपट चालली होती. कारण फ्रँको-रशियन तहाला विरोध केल्यामुळे रशियाचा जसा लाव्हालवर रोष झाला होता, तसाच इटालीच्या मैत्रीला चिकटून राहिल्याबद्दल इंग्लंडचाहि त्याच्यावर रोष झाला होता. यामुळे निवडणुकीच्या धामधुमींत रशियाच्या हस्तकांना इंग्लंडच्या हस्तकांची बहुमोल मदत मिळू शकली. या उभयतांच्या संगनमताचा अपेक्षेप्रमाणे परिणाम होऊन फ्रेंच चेंबरमध्ये सोशालिस्ट-कम्यूनिस्ट व त्यांचे हस्तक याच्या पक्षांचे बहुमत झाले.

## जनतेचें मंत्रिपद !

निवडणुकीत यश मिळाल्यानंतर सोशालिस्ट पक्षाचे नेते मो. ब्लम यांनी कम्यूनिस्टांना आपल्या मंत्रिमंडळात येण्याची विनंति केली. तेव्हा कम्यूनिस्टांनी त्यांना उत्तर दिले—' We reserve for ourselves the ministry of the masses!' अशा रीतीने कम्यूनिस्टांनी सोशालिस्टांच्याबरोबर मंत्रिमंडळांत सहकार्य करण्याचें नाकारलें तरी बहुमताच्या अनुयायांना प्रथम त्यांचा कांहीहि संशय आला नाही. पण पुढे जेव्हा मे महिन्याच्या अखेरीला कम्यूनिस्टांनी सर्व देशभर संप चेतविण्यास सुरुवात केली, तेव्हा त्यांना कम्यूनिस्टांच्या 'जनतेच्या मंत्रिपदा'चा अर्थ कळून आला. कम्यूनिस्टांच्या वर्तनाचे नेहमीचे एक तत्त्व हे आहे की, ज्या गोष्टी जबरदस्तीने साध्य होण्याजोग्या असतील, त्यांचें श्रेय कायदे-मंडळाला घेऊं द्यावयाचे नाही. या तत्त्वाप्रमाणें मजुरांच्या हितसंबंधांचे कायदे मंजूर करून घेण्याचें श्रेय ब्लमच्या सोशालिस्ट प्रधानमंडळाला मिळूं नये, म्हणून त्यांनी ते प्रधानमंडळ अधिकारारूढ होण्यापूर्वीच संपांना सुरुवात केली.

या संपांचा प्रारंभ पारिसशेजारच्या एका दारूगोळ्याच्या कारखान्यांत

झाला व तेथून ते सर्व देशभर पसरले. या संपांचा हेतु मुख्यतः राजकीय होता, ही गोष्ट 'न्यू रिपब्लिक'सारख्या मजूरपक्षाच्या पत्रांनीहि कबूल केली आहे. 'न्यू रिपब्लिक'नें म्हटलें आहे—'The similarity of the tactics employed in various localities, the perfect discipline and especially the timing of the strike stressed its political character.' हे संप केवळ मजुरांचीं गाऱ्हाणी दूर करण्याकरिता केलेले नसून त्यांच्या बुडाशीं राजकीय उद्देश आहे, ही गोष्ट सर्वांनाच कबूल होती. फक्त ते कोणी घडवून आणले आहेत, याविषयी निरनिराळ्या पक्षांत एकवाक्यता नव्हती. कोणी म्हणत की, हे संप मजुरांनी स्वयंस्फूर्तीनेच केले आहेत. कित्येकांचा अंदाज असा होता की फ्रान्समधील सिंडिकॅलिस्ट पक्षाने हे संप घडवून आणले असावेत. लंडनच्या एकॉनॉमिस्ट पत्राने लिहिले—"These syndicalist strikes will turn out to be gestures elicited by real grievances and the gestures will cease once the grievances are promised effective redress." स्वतः ब्लमचीदेखील प्रथम अशीच समजूत झाली. यामुळे त्याने संपवाल्यांना प्रथमच असे आश्वासन दिले की, कारखाने कबजांत घेऊन बसलेल्या मजुराना बाहेर काढण्यासाठी मी लष्कराचा उपयोग करणार नाही आणि मग कारखानदारांना बोलावून त्याना मजुरांच्या सर्व अटी कबूल करण्याचा सल्ला त्याने दिला! ब्लमचा सल्ला ऐकण्याखेरीज गत्यंतर नाही, हे ओळखून कारखानदारांनीहि ताबडतोब मजुरांच्या पुढाऱ्यांबरोबर तह करून टाकला. पण कारखानदार व ट्रेडयुनियनचे पुढारी यांची तडजोड होऊनसुद्धा संप कांही मिटेनात. तेव्हा ब्लमला ही गोष्ट जाहीरपणें सांगावी लागली की, या संपांच्या बुडाशी सिंडिकॅलिस्ट पक्ष नसून तिसराच एक पक्ष आहे.

## लष्करी खात्याला पडलेली चिंता

ता. ७ जून रोजी तडजोड होऊनसुद्धा संप मिटेनात व संपवाल्यांचे पारिसमध्ये प्रत्यक्ष दंगे सुरू झाले, तेव्हा लष्करी खात्याला अतिशय चिंता वाटूं लागली. कारण आधीच शस्त्रास्त्रांचे कारखाने बंद पडल्याने ऱ्हाईन नदीपलीकडील फ्रान्सच्या शत्रूला हर्षवायु झाला होता, त्यामुळे देशांत प्रत्यक्ष यादवी सुरू झाल्यास तो शत्रु कोणतें साहस करील व त्याने कांही साहस केल्यास त्याचा

प्रतिकार तरी कसा करावयाचा, याचा त्या खात्याला अंदाज होईना. तेव्हां देशांत अंदाधुंदी माजण्यापूर्वीच मजुरांना ताळ्यावर आणण्यासाठी लष्कराचा उपयोग करावा असा आग्रह युद्धमंत्र्याने धरला. या आग्रहामुळे ब्लमला मोठाच पेच पडला. एकीकडे त्याला मजुरांना दुखवतां येईना, कारण त्याच्या प्रधानमंडळाचें अस्तित्वच त्यांच्या सहानुभूतीवर अवलंबून होतें व दुसरीकडे त्याला लष्करी खात्याच्या मागणीलाहि नकार देतां येईना. कारण त्यांच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केल्यास देशावर अरिष्ट कोसळेल, याची त्याला स्वतःलाहि जाणीव होती. या पेचांतून सुटण्यासाठी त्याने एकीकडे मॉस्कोच्या भूतनाथाजवळ आपल्या सर्व गणांचें अकांडतांडव थांबविण्याची प्रार्थना केली व दुसरीकडे मजुरांनी कबजांत घेतलेले पारिसचे रस्ते एका रात्रींत पोलिस व लष्कर यांच्याकडून व्यापून टाकण्याची व्यवस्था केली! या सोशालिस्ट प्रधानाला केवळ आपले पोलीस व लष्कर यांवर अवलंबून राहावें लागलें असते तर काय झालें असते कोण जाणे. पण त्याची पारिसच्या संरक्षणाची योजना अमलांत आणली जाण्यापूर्वीच मॉस्कोहून कम्यूनिस्ट पक्षाला संप थांबविण्याचे निकडीचे हुकूम सुटले व त्यावेळी मंत्रि-मंडळालाहि अशी सूचना आली की, यापुढे जे संप चालवितील ते ट्रॉट्स्कीचे अनुयायी आहेत असे समजून तुम्ही त्यांना खुशाल दडपून टाका.

## पुनः चळवळ केव्हा होईल ?

आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या सध्याच्या परिस्थितीत फ्रान्समध्ये बंडाळी माजणे हें आपल्याला हितावह होणार नाहीं यासाठी जून महिन्यांतील संप थांबविण्याला रशियाने ब्लमच्या सरकारला मदत केली. पण रशियाचें फ्रेंच सरकारविषयींचें मत त्यानंतर बरेंच पालटलें आहे. विशेषतः लोकार्नो परिषदेंत जर्मनीला घ्यावयाला फ्रान्सने संमति दिल्यापासून रशियन सरकार बरेंच साशंक झालें आहे. त्यामुळे लोकार्नो परिषदेंत जर फ्रान्स व जर्मनी या उभयतांमध्ये कांही तडजोड इंग्लंडने घडवून आणली तर फ्रेंच पार्लमेंटाच्या बजेट सेशनची संधि साधून येत्या ऑक्टोबर महिन्यांत पारिस शहरीं कम्यूनिस्टांची क्रांतिकारक चळवळ रशिया सुरू करील असा आजचा अंदाज आहे.

—केसरी, ता. १४ ऑगस्ट, १९३६.

---

# नवें महायुद्ध इतक्या लवकर होईल काय ?

पुनः एकवार महायुद्धाचा वणवा पेटणार असल्याच्या कंड्या वर्तमानपत्र-कार नेहमीच पिकवीत असतात. पण एकंदर परिस्थितीचा विचार करून महा-युद्ध कधी उद्भवण्याचा संभव आहे याचा अंदाज करण्याच्या भानगडीत ते कधीच पडत नाहीत. मग या भावी महायुद्धाचा आपल्या राष्ट्राच्या उन्नतीसाठी कसा उपयोग करून घ्यावा, या प्रश्नाचा विचार दूरच राहिला. या उपेक्षित विषयाच्या चर्चेला चालना मिळावी म्हणून हा लेख लिहीत आहे.

भावी महायुद्धाला नक्की कोणत्या वर्षी सुरुवात होईल, हे आज निश्चितपणे सांगता येत नसले तरी आज असे निश्चित सांगता येते की येत्या सहा वर्षांच्या आंत महायुद्ध उद्भवणे अगदी असंभवनीय आहे. याचे कारण असे आहे की, गेल्या महायुद्धांत युरोपातील बहुतेक सारे प्रजोत्पादनक्षम असे तरुण पांच वर्षे-पर्यंत खंदकांत राहून शत्रूंशी लढण्यांत गुंतले असल्याने १९१५ च्या आरंभा-पासून १९१९ च्या अखेरीपर्यंत युरोपांतील प्रजोत्पादनाचे प्रमाण अतिशय कमी झाले होते. याचा परिणाम असा झाला आहे की सध्या युरोपियन राष्ट्रांनी जर एखादे महायुद्ध उपस्थित केले, तर युद्धाच्या सुरुवातीपासूनच त्यांना आपल्या कामास आलेल्या सैनिकांची जागा ताज्या दमाच्या तरुणांच्या ऐवजी थकलेल्या वृद्धांनी भरून काढण्याची पाळी येईल. कारण १९३५ च्या आरंभापासून १९३९ च्या अखेरीपर्यंत वीस वर्षे पुरीं होऊन लष्करी नोकरीला लायक होणाऱ्या तरुणांचा युरोपांत दुष्काळ पडणार आहे, आणि या तरुणांच्या दुष्काळामुळे १९४० सालापर्यंत युरोपीय राष्ट्रांना युद्ध उपस्थित करणें अशक्य होणार आहे.

ही या महायुद्धाच्या प्रश्नाची लष्करी बाजू झाली. आता याच प्रश्नाचा आरमारी दृष्टीने विचार केला पाहिजे. १९२१ साली जगांतील सर्व आरमारी राष्ट्रांनी वॉशिंग्टनच्या परिषदेमध्ये आपापल्या आरमारांतील ड्रेडनॉट जहाजांची

संख्या नियंत्रित केली आहे. या नियंत्रणाची मर्यादा १९३६ च्या अखेरीपर्यंतच आहे. १९३६ नंतर या तहाची मुदत पुन्हा वाढेल, असेहि वाटत नाही. तरी देखील १९३६ नंतर लगेच आरमारी युद्धाला सुरुवात होईल असे भय बाळगायला नको. कारण ही ड्रेडनॉट जहाजे बांधल्यापासून वीस वर्षांच्या आंतच युद्धाला नालायक बनतात. यामुळे इग्लंड, अमेरिका व जपान या तीन्ही राष्ट्रांची कितीतरी ड्रेडनॉट जहाजे आजच लढाईला निरुपयोगी झाली आहेत. आणि १९३६ सालानंतर तर या तीन्ही राष्ट्रांची आरमारे शत्रूवर चालून जाण्याला नालायक बनतील. तेव्हा १९३६ नंतर कमीत कमी सहा वर्षे तरी निकामी जहाजांच्या ऐवजी नवीन जहाजे बांधण्यांतच घालवावी लागतील; मग एकदाची या राष्ट्रांची आरमारे युद्धाला सज्ज होतील.

तेव्हा सामरिक सिद्धतेच्या दृष्टीने पाहतां १९४० सालाच्या आधी युद्ध उपस्थित होणे अशक्य दिसते. त्यानंतर मात्र चार वर्षांच्या आंतच नवीन महायुद्धाचे रणशिंग फुंकले जाईल याविषयी शंका नाही.

आता हे युद्ध कोणत्या राष्ट्रामध्ये जुंपेल, याचा विचार केला पाहिजे. जगांतील कोणत्याहि महायुद्धात इग्लंडला भाग घ्यावा लागणारच, तेव्हा इंग्लंड कोणत्या राष्ट्राशी लढू शकेल याचा विचार केला असता भावी महायुद्ध कोणामध्ये होईल ते समजून येईल. विमाने व विषारी धुराचे बॉंब यांमधील अलीकडील शास्त्रीय शोधांनी इग्लंडला आपल्या शेजाऱ्याबरोबर युद्ध करणे गैरफायदेशीर झाले आहे. त्याचप्रमाणे कानडासारख्या वसाहतीचा अमेरिकेकडे ओढा असल्याने इंग्लंडला अमेरिकेशीं लढणेहि अशक्य आहे. आतां इंग्लंडशी लढण्याजोगी जपान आणि रशिया ही दोनच राष्ट्रे उरली. यापैकी जपानबरोबर टक्कर देणे एकट्या इंग्लंडला कांही शक्य नाही. अमेरिका आणि रशिया या उभयतांची मदत मिळाली, तरच इंग्लंड जपानबरोबर लढेल. सर्व पाश्चात्य राष्ट्रांना जपानविषयी वाटणारा मत्सर लक्षांत घेतला म्हणजे त्यांचे जपानविरुद्ध संगनमत होणें अगदी शक्य वाटते, पण या तीन्ही राष्ट्रांचें संगनमत होण्यापूर्वीच हिंदुस्थान आणि इराण यांच्या लोभामुळे इंग्लंड आणि रशिया या उभयतांचें युद्ध जुंपण्याचा फार संभव आहे. कारण १९३७ पासून आरमार बांधण्याच्या शर्यतीला सुरुवात झाली की

उत्तर इराणांतील पेट्रोलच्या खाणी आपल्या हाती आणण्यासाठी इंग्लंडचे प्रयत्न सुरू होतील आणि त्यामुळे रशियाशी वैमनस्य येण्याचा संभव आहे. दुसरी गोष्ट अशी की, हिंदुस्थानाचे भावी फेडरेशन लष्करी खात्याला बिलकुल पसंत नाही आणि हे नामधारी फेडरेशनसुद्धा हिंदुस्थानाला लाभूं नये, याकरिता लष्करी खातें एखादे युद्ध उपस्थित करण्यालाहि माघार नाही. परराष्ट्रांशी युद्ध सुरू झाले की अन्तर्गत सुधारणांचा प्रश्न आपोआपच लाबणीवर पडेल, अशी त्या खात्याची अपेक्षा आहे. त्याचप्रमाणे लष्करी खर्चाला सध्या लागलेली घसरण थांबविण्यासाठीहि परराष्ट्रांशी कुरापत काढणे लष्करी अधिकाऱ्यांना अवश्य झाले आहे. या सर्व कारणांसाठी १९४० पासून १९४२ पर्यंत इंग्लंडचे प्रथम इराण किंवा अफगाणिस्थानाशी युद्ध जुंपेल व या भांडणांत रशियाने आपले नाक घातले की त्या क्षुद्र युद्धाला महायुद्धाचे स्वरूप येईल असा आजचा अदाज आहे.

असो, इंग्लंडचे रशिया किंवा जपान यापैकी कोणाशीहि युद्ध जुंपले तरी इंग्रजांना मदतीसाठी हिंदुस्थानची मनधरणी करणे जरूर आहे. तेव्हा या अर्ध तपानंतर उद्भवणाऱ्या भावी महायुद्धांत भाग घेण्याची आपण आतापासून तयारी केली पाहिजे. गेल्या महायुद्धाच्यावेळी हिंदुस्थानाच्या वतीने टिळकांनी दोस्त राष्ट्रांना पन्नास लाख लोकांची मदत देऊ केली होती. पण तेव्हा त्यांच्या साहाय्याचा सरकारने अव्हेर केला. तरी देखील आपण जर १९४० सालापर्यंत कवाईत करायला व बंदुक चालवायला शिकलेल्या पन्नास लाख स्वयंसेवकांची सेना उभी केली तर कोणालाहि भावी महायुद्धाच्या वेळी हिंदुस्थानच्या साहाय्याकडे दुर्लक्ष करणें अशक्य होईल. या संख्येपैकीं अवघा पांच लाख स्वयंसेवकांचा आंकडा महाराष्ट्राच्या वांट्याला येतो व इतके सैनिक महाराष्ट्राने उभे केल्यास त्याला राजकारणांतील आपले पूर्वीचे पद प्राप्त करून घेणें मुळींच अशक्य नाही.

— साप्ताहिक सकाळ, ता. १३ मार्च, १९३४.



# युद्धांत आकाशदलाची कामगिरी

युद्धशास्त्रविषयीचें एक नवीन प्रमेय कांहीं वर्षांपूर्वी इटालीच्या एका सेनापतीनें मांडलें व आतापर्यंत बहुतेक राष्ट्रांच्या युद्धशास्त्रज्ञांना तें मान्यहि झालें आहे. या नवीन प्रमेयामुळें सर्व राष्ट्रांना लष्करी सामर्थ्याविषयीच्या आपल्या जुन्या कल्पना सोडून देणें भाग पडणार आहे व त्यामुळें सर्व राष्ट्रांच्या परराष्ट्रीय राजकारणांत महत्त्वाचे फरक होण्याचा संभव आहे. यासाठीं या नूतन प्रमेयाचा आपल्याला निदान परिचय तरी करून घेणें आवश्यक आहे.

१९२१ सालीं इटालियन सेनापति दूए यानें 'इल् दोमिनिओ देल् आरिआ' म्हणजे आकाशाचें आधिपत्य या नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें. या पुस्तकाचा मुख्य सिद्धान्त असा होता कीं, लष्कर आणि आरमार याच्या साहाय्यासाठीं विमानांचे सहाय्यक काफिले असतात, ते सर्व मोडून टाकून एकच वैमानिक दल अस्तित्वांत आणावें आणि या वैमानिक दलाचे जोरावर युद्धाच्या सुरुवातीलाच आपण आकाशाचें आधिपत्य हस्तगत करावें म्हणजे शत्रूचें सैन्य व आरमार अगदीं असहाय होतील व त्याला वैमानिक हल्ल्यापासून देशाचें संरक्षण करणें अशक्य होऊन तह करणें भाग पडेल.

## आकाशांत चढाईचें धोरण

"Resistere sulla superficie, per far massa nell'aria" म्हणजे 'जमिनीवर व समुद्रावर बचावाचें धोरण स्वीकारणें आणि आकाशांत चढाईचें धोरण स्वीकारणें' हें जनरल दूएचें मुख्य सूत्र आहे. त्याचें म्हणणें असें आहे कीं, खंदक व मशीनगन्स यांच्या साहाय्यानें जमिनीवर अल्पसंख्याक सैन्याला बहुसंख्याक सैन्यापासून आपला बचाव करून घेणें सुलभ झालें आहे. त्याचप्रमाणें समुद्रकिनाऱ्यावरील लांब पल्ल्याच्या तोफा, पाणसुरुंग, पाणबुड्या बोटी, विनाशिका इत्यादि साधनांचा योग्य उपयोग केला असतां लहान आरमारालासुद्धा आपल्या समुद्रकिनाऱ्याचें संरक्षण करणें शक्य आहे. पण या-

प्रमाणे जमिनीवरील व समुद्रावरील सरहद्दीचे संरक्षण करणे सुलभ झाले असले तरी अद्यापि आकाशांतील सरहद्दीचे संरक्षण कसें करावे हा प्रश्न युद्धशास्त्रज्ञांना सोडवावयाचा आहे. वैमानिक हल्ल्यापासून देशाचे संरक्षण करण्यासाठी आतापर्यंत शोधून काढलेली सर्व साधनें अल्पोपयोगी किंवा निरुपयोगीच ठरली आहेत. यामुळे आकाशांत चढाईचे धोरण स्वीकारणे अजून शक्य आणि फायदेशीर आहे.

त्याचप्रमाणे कोणत्याहि राष्ट्राला जल, स्थल आणि अंतरिक्ष या तीनहि क्षेत्रांत बलिष्ठ असणे अशक्य असल्याने ज्या क्षेत्रावरील सत्तेचा आपल्याला खरा उपयोग होण्याजोगा आहे, त्याच क्षेत्रांत आपण बलिष्ठ असणे हें खरें शहाणपणाचे लक्षण आहे. शिवाय वैमानिक दलाचा उपयोग केवळ शत्रूच्या वैमानिक दलाविरुद्धच होतो, असे नाही; तर शत्रूचे सैन्य, आरमार, हत्यारांचे व विमानांचे कारखाने, रेल्वेचे कारखाने व जंक्शनें, औद्योगिक केंद्र किंवा अधिकाराची केंद्रे या सर्वांवर विमानांच्या साहाय्याने हल्ले करता येतात. याखेरीज सरहद्दीपासून दूर असलेल्या प्रदेशांवर हल्ला करण्याचे विमान हे एकच साधन आहे. या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे भावी महायुद्धांत अंतरिक्ष हेच सर्वांत महत्त्वाचे रणक्षेत्र होणार असल्याची खात्री पटेल व यासाठी आपले वैमानिक दल केवळ शत्रूवर हल्ला करण्याच्या दृष्टीने सदैव सज्ज ठेवण्याची जरूरी दिसून येईल.

## विमानखात्याची हुकमत

या सर्व गोष्टींचा विचार केला असतां कोणत्याहि बलाढ्य राष्ट्राच्या युद्धखात्याच्या खर्चात वैमानिक दलाला अग्रपूजेचा मान मिळाला पाहिजे, ही गोष्ट सर्वांना मान्य होईल. जमिनीवरील व समुद्रकिनाऱ्यावरील सरहद्दीच्या संरक्षणाला अवश्य इतकी रक्कम लष्करी व आरमारी खात्यांच्या स्वाधीन करून उरलेली सर्व रक्कम वैमानिक खात्याला देणें शहाणपणाचे होईल. त्याचप्रमाणे युद्धशास्त्रांतील 'एकॉनॉमी ऑफ फोर्स'च्या म्हणजे सामर्थ्याच्या सदुपयोगाच्या तत्त्वाप्रमाणें, सहाय्यक विमानांचे काफिले उत्पन्न करून ते लष्करी व आरमारी खात्यांच्या स्वाधीन करणे अजीबात बंद करावे आणि सर्व विमानांवर केवळ वैमानिक खात्याचीच हुकमत चालावी, या विमानखात्याच्या मागणीची सयुक्तिकता कळून येईल.

वैमानिक युद्धाचा एक विशेष हा आहे की, बलिष्ठ वैमानिक दलालासुद्धा शत्रूच्या वैमानिक दलाला आपल्याशी टक्कर द्यावयाला भाग पाडता येत नाही. कारण विमानावर हल्ला आला असता ती तीस–पस्तीस हजार फुटांपर्यंत वाटेल त्या उंचीवरून आणि वाटेल त्या दिशेने निसटून जाऊं शकतात. शत्रूच्या लष्करी, आरमारी, औद्योगिक किंवा राजकीय केंद्रावर हल्ला केला तर मात्र त्याच्या विमानांना स्वपक्षाच्या बचावासाठी युद्ध करणे भाग पडेल. आपल्या वैमानिक हल्ल्यामुळे शत्रुपक्षाचा संपूर्ण विध्वंस होण्याचा संभव असला तरच तो बचावासाठी लढण्याचा संभव आहे. नाहीतर तो उलट आपल्या देशांवर प्रतिहल्ले करील ही गोष्ट लक्षांत घेऊन केवळ चढाईच्या लढाईच्या दृष्टीनेच वैमानिक खात्याची पुनर्रचना करणे जरूर आहे.

## डूएचीं सहा सूत्रें

वैमानिक खात्याच्या पुनर्रचनेसंबंधी जनरल डूएने पुढील सहा सूत्रें सांगितली आहेतः—

१ जमिनीवर व समुद्रावर बचावाचे धोरण पत्करणे आणि आकाशांत चढाईच्या धोरणाचा स्वीकार करणे.

२ वैमानिक खात्यावर होणारा सर्व खर्च केवळ चढाईच्या लढाईत वैमानिक दलाचा अधिकांत अधिक उपयोग कसा होईल याच दृष्टीने करावा. या नियमाला कोणताहि अपवाद मानूं नये.

३ याकरिता सहाय्यक विमानें व शत्रूच्या विमानांचा पाठलाग करणारी सर्व विमाने रद्द करावीत.

४ शत्रूंच्या वैमानिक हल्ल्यापासून आपल्या लष्करी, आरमारी, राजकीय आणि आर्थिक केंद्राचे संरक्षण करण्यासाठी या केंद्रांच्या ठिकाणी विमानांवर मारा करू शकणाऱ्या तोफांच्या बातेऱ्या आगाऊ बांधून ठेवून वैमानिक हल्ल्यापासून बचावाची तरतूद करून ठेवावी.

५ वैमानिक हल्ल्यापासून लोकांचा बचाव करण्यासाठी तळघर, टयूबरेल्वे, विषारी धुरांपासून बचाव करणारे मुखवटे वगैरे साधनांचा उपयोग करावा.

६ विमानांचें प्रवासाचे व वजन वाहून नेण्याचे सामर्थ्य वाढावण्यासाठी शोध आणि प्रयोग चालू ठेवावेत.

जनरल दूएचा हा षट्सूत्रात्मक कार्यक्रम ‘रिव्हिस्ता आएरोनाउतिका’ नांवाच्या इटालियन मासिकाच्या १९२९ जुलैच्या अकांत प्रथम प्रसिद्ध झाला. तेव्हापासून या कार्यक्रमावर अनेकांनी अनेक आक्षेप घेतले व त्या सर्व आक्षेपाना जनरल दूएने अतिशय समर्पक उत्तरे दिली. या वादविवादांतील मुख्य मुख्य मुद्द्यांचा तरी आपल्याला परिचय करून घेणे जरूर आहे.

## आक्षेपांना उत्तरें

जनरल दूएच्या भावी युद्धाच्या शास्त्रावर पहिला महत्त्वाचा आक्षेप असा घेण्यांत येतो की सध्याच्या काळांत लष्कर व आरमार यांचे टेहळणीच्या विमानांचे काफिले रद्द करणे ही चूक आहे. कारण हल्लीच्या लढायांतून एकाच पक्षाला जर आपल्या प्रतिपक्षाच्या मर्मस्थानाची विमानांतून टेहळणी करतां आली, तर त्याला प्रतिपक्षाच्या लष्कराचा आणि आरमाराचा सहज पाडाव करतां येईल. या आक्षेपावर जनरल दूएचे उत्तर मोठे मासलेवाईक आहे. तो म्हणतो, “शत्रूची टेहळणीची विमानें झाली तरी ती आकाशांतच उडणारना ? मग आपल्या पक्षाच्या लष्कराला किंवा आरमाराला त्यांची मुळींच भीति बाळगावयाला नको; कारण आकाशाचे आधिपत्य तर आपल्या वैमानिक दलाने युद्धारंभीच हस्तगत करून घेतले असते व त्यामुळे शत्रूच्या सहाय्यक विमानांनी आपल्या सैन्याची व आरमाराची टेहळणी करण्याचा प्रयत्न केला तर त्यांना आपल्या वैमानिक दलाशी टक्कर द्यावी लागून स्वतःचा विध्वंस करून घ्यावा लागेल. वास्तविक पाहतां आकाशाचे आधिपत्य शत्रूच्या हाती गेल्यास लष्कर व आरमार यांनी शत्रूला कसें तोंड द्यावें या प्रश्नाचा विचार लष्करी व आरमारी अधिकाऱ्यांनी करावयाला पाहिजे. ते सोडून देऊन आपल्याच वैमानिक दलाचें सामर्थ्य कमी करणाऱ्या सहाय्यक विमानांच्या काफिल्यांचा त्यांनी पुरस्कार करावा, ही गोष्ट त्यांना लांछनास्पद आहे. इतक्या उप्पर जर सहाय्यक विमानें हवीतच असा त्यांचा आग्रह असला तर त्यांनी आपल्या खात्यांच्या बजेटांतून आपल्याला हवीं तितकीं विमानें बांधावींत. असें करण्याची पाळी आली म्हणजे सहाय्यक विमानें रद्द करण्याची उपयुक्तता त्यांना आपोआपच पटेल.”

जनरल दूएच्या विरोधकांचा दुसरा आक्षेप असा आहे की शत्रूच्या मुलखांतील आकाशाचे आधिपत्य जिकून घेणे अशक्य आहे. या आक्षेपावर जनरल दूएचे उत्तर असे आहे की, माझ्या आक्षेपकांनी प्रथम कोणत्याहि देशाचे वैमानिक हल्ल्यापासून संरक्षण करूं शकेल, असे चिलखत शोधून काढावे आणि मग हा आक्षेप घ्यावा. वास्तविक पाहता वैमानिक युद्धात बचावाचे धोरण स्वीकारले तर शत्रूंच्या वैमानिक दलाच्या अनेकपट विमाने आपल्याला बांधावी लागतील. शिवाय इतके करूनहि अजीबात हल्ला येणार नाही अशी खात्री नाहीच. आकाशात उडत असलेल्या विमानांची गति खुटविण्यासाठी कांही साधने शास्त्रज्ञांनी शोधून काढली आहेत. पण ती अति खर्चाची असल्याने सर्व देशभर कांही असली विमाने पकडण्याची जाळी लावून ठेवणे शक्य नाही. तेव्हा वैमानिक हल्ल्यापासून आपला देश सुरक्षित करण्याच्या बाता मारून लोकांची फसवणूक करण्यापेक्षा लोकांना वैमानिक हल्ल्यांना तोंड देण्यासाठी सिद्ध करणे अधिक शहाणपणाचे होईल.

विरोधकांचा आणखी एक आक्षेप असा आहे की, जनरल दूएची वैमानिक युद्धाची कल्पना चुकीची आहे. वैमानिक दलाने प्रथम शत्रूच्या विमानांचा पाठलाग करून त्यांचा विध्वंस केला पाहिजे. जनरल दूएच्या मते हाहि आक्षेप चुकीचा आहे. पृथ्वीवर शत्रूच्या लष्कराचा व आरमाराचा पाठलाग करून त्यांना लढावयाला भाग पाडतां येते. पण आकाशांत पळून जाण्याला इतक्या वाटा असतात की प्रतिपक्षाच्या विमानांचा पाठलाग करून त्यांना लढावयाला भाग पाडणे अशक्य आहे. तेव्हा असल्या पाठलागाच्या नादी लागल्यास व्यर्थ दीर्घ प्रवास घडून आपल्या विमानांचे लढण्याचे व हल्ला करण्याचें सामर्थ्य मात्र कमी होतें. याकरिता वैमानिक दलाने केंव्हाहि शत्रूंच्या विमानांचा पाठलाग करण्याच्या भरीला पडू नये. शत्रूंचा हल्ला आलाच तर त्यांच्याशी लढण्याची आपली तयारी असतेच. वैमानिक युद्धांत दुर्बळांचा मात्र सर्वनाश होतो व बलिष्ठ पक्षाचें फारच थोडें नुकसान होतें. यामुळे केवळ विमानांबरोबर लढू शकणाऱ्या वैमानिक दलाचा भावी महायुद्धांत फारसा उपयोग व्हावयाचा नाही. आपलें वैमानिक दल शत्रूच्या मर्मस्थानांवर हल्ला करू शकेल, तरच त्याचें महत्त्व.

## जर्मनी व फ्रान्स यांचें काल्पनिक युद्ध

या व असल्या इतर आक्षेपाना जनरल डूएने प्रथम मासिकांतून उत्तरें दिली. त्यानंतर या तात्त्विक चर्चेला निश्चित स्वरूप देण्यासाठी त्याने ' १९— सालचे भावी फ्रॅंको-जर्मन युद्ध ' या नांवाचे एक स्वतंत्र पुस्तक प्रसिद्ध केले. या पुस्तकांत त्याने अशी कल्पना केली आहे की जर्मन लोकांनी आपल्या सिद्धांताप्रमाणे सर्व सहाय्यक विमाने रद्द करून वैमानिक खात्याच्या आधिपत्याखाली एकच बलाढ्य वैमानिक दल सज्ज केले आहे आणि केवळ देशसंरक्षणाच्या जरूरीपुरतेच लष्कर आणि आरमार बाळगले आहे. जर्मन वैमानिकदलांत फक्त १५०० विमाने आहेत पण ती सारी दोन हजारांपासून सहा हजारापर्यंत अश्वशक्तीची, बचावासाठी चिलखताने मढविलेली, एका दमांत एक हजार मैलांचा प्रवास करू शकणारी, बॉंब गोळ्यांचा वर्षाव करणारी विमाने आहेत. हीं १५०० विमानें एका वेळेला सुमारें ४००० टन बॉंब वाहून नेऊ शकतात. याच्या उलट फ्रेंच लोकांनी एक वैमानिक दल सज्ज केले असले तरी त्याचा मुख्य भर सहाय्यक विमानांच्या काफिल्यावर आहे. त्यामुळे फ्रेंचांची एकंदर विमाने सहा हजार असली तरी त्यांच्या वैमानिक दलांत अवघी ८०० च विमाने असून त्या ८०० पैकीही फक्त ४३० च बॉंब टाकणारी विमाने आहेत. त्याशिवाय फ्रेंच लष्करांत दुसरी ३०० बॉंब टाकणारी विमाने आहेत. पुन्हा फ्रेंचांची एकंदर विमाने सहा हजार असली तरी ती चौदा निरनिराळ्या जातीची विमानें असल्याने बलिष्ठ जर्मन विमानाशी टक्कर देण्याला असमर्थ आहेत.

## जर्मनीचा फ्रान्सवर हल्ला

युद्धाला सुरुवात होताच सर्व जर्मन विमानांनी एकजुटीने फ्रान्सवर हल्ले चढविण्याला सुरुवात केला. तेव्हा जर्मन विमानांच्या तुकड्यांवर फ्रेंचांच्या पाठलाग करण्याच्या विमानांनी प्रतिहल्ले केले. फ्रेंच विमानांचे हल्ले झाले तरी जर्मन विमानांनी आपला जाण्याचा मार्ग, उडण्याची उंची व एकंदर तुकडीची शिस्त कायम ठेवून प्रतिपक्षाला तोंड दिले. तरी देखील आघाडीच्या जर्मन विमानांच्या तुकड्यांचे एकंदरीने फार नुकसान झाले. उलटपक्षी फ्रेंच विमानांचें जर्मन विमानांप्रमाणें नुकसान तर झालेंच, त्याशिवाय पाठलाग करणाऱ्या विमानांच्या पद्धतीप्रमाणें

त्यांनी व्यक्तिशः जर्मन विमानांशी टक्करी घेतल्याने त्यांची सर्व विमाने विखरून गेली. त्यामुळे त्यांना मागून येणाऱ्या जर्मन विमानांच्या तुकड्यांचा कांहीच प्रतिकार करतां आला नाही. तेव्हा जर्मन विमानांनी आपल्या ठरलेल्या वेळापत्रकाप्रमाणे फ्रेंचांच्या निरनिराळ्या केंद्रांवर बॉंब गोळ्यांचा वर्षाव सुरू केला.

फ्रेंचाच्या मुख्य मुख्य छावण्यावर हल्ला करणे, सरहद्दीकडे येणाऱ्या एका प्रमुख रेल्वेचा विध्वंस करून त्यांच्या लष्कराच्या एकीकरणाला अडथळा आणणें आणि फ्रान्समधील सर्वांत मोठ्या अशा चार शहरांचा विध्वंस करून फ्रेंच जनतेचा प्रचंड संहार करणे हा जर्मन वैमानिक खात्याचा युद्धाच्या पहिल्या आठवड्याचा कार्यक्रम असतो आणि हा कार्यक्रम इतका यशस्वी होतो की दोन दिवसांतच फ्रेंच लोक हत्यारे टाकून जर्मनाना शरण येतात.

या दोन दिवसाच्या लढाईत जर्मन लोकांची सर्व १५०० विमाने भाग घेतात व फ्रेंच लोकांच्या सहा हजार विमानांपैकी फक्त २९०० विमानेंच लढाईंत भाग घेऊ शकतात. या २९०० विमानांपैकी २१७० ही पाठलागाची विमाने असून अवघी ७३० बॉंब टाकणारी विमाने आहेत. या विमानांच्या अश्वशक्तीची तुलना केली असतां असे दिसून येते की, फ्रेंचांच्या २९०० विमानांची शक्ति पंधरा लक्ष घोड्याच्या शक्तीबरोबर आहे. पण उलटपक्षी जर्मनांच्या १५०० विमानांची शक्ति चाळीस लाख घोड्यांच्या शक्तीबरोबर आहे. जनरल दूएच्या या पुस्तकांतील फ्रेंचांच्या बाजूचे आंकडे काल्पनिक नाहीत, ही गोष्ट येथे सांगणे जरूर आहे.

## इटालीच्या विमानांची हालचाल

जनरल दूएचे हे पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर त्यांतील सिद्धांताची परीक्षा पाहण्यासाठी १९३१ च्या आगस्ट महिन्यांत इटालियन सरकाराने विमानांच्या 'मॅनूव्हर्स' घडवून आणल्या. या मॅनूव्हर्समध्ये एकंदर ९०० विमानांनी भाग घेतला. त्यांपैकी ३५० विमाने बॉंब टाकणारी असून बाकीची इतर जातींची होती. मॅनूव्हर्समध्ये हल्ला करणाऱ्या पक्षाकडे मुख्यतः बॉंब टाकणाऱ्या विमानांचा भरणा होता व बचाव करणाऱ्या पक्षाकडे मुख्यतः पाठलाग करणाऱ्या विमानांचा भरणा होता. या मॅनूव्हर्सचें सविस्तर वर्णन येथे देणें शक्य नाही. एवढी गोष्ट

सांगितलें म्हणजे पुरे की, या खोट्या लढाईच्या चवथ्या दिवशी बचाव करणाऱ्या पक्षाचा पुरा पाडाव झाला व त्या पक्षाच्या राजधानीवर एकदर १५० टन वजनाचे बॉब पडून त्याला शरण जावें लागलें. अशा रीतीनें जनरल दूएच्या सिद्धांतांची सत्यता प्रस्थापित झाली. तेव्हापासून इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स आणि जर्मनी या सर्व राष्ट्रांच्या युद्धखात्यांवर जनरल दूएच्या सिद्धांतांची छाप पडली आहे. तेव्हापासून ही सर्व राष्ट्रं एकीकडे आपल्या बॉब टाकणाऱ्या विमानांची संख्या सारखी वाढवीत आहेत व दुसरीकडे वैमानिक हल्ल्यापासून देशाचें संरक्षण कसें करावें, या प्रश्नाची चर्चा करीत आहेत.

—केसरी ता. २८ मे, १९३४.



# वैमानिक युद्धाची रूपरेखा

भावी महायुद्धाची सुरुवात ही नेहमीप्रमाणे परस्परविरोधी लष्कराच्या सरहद्दीवरील चकमकीपासून होणार नसून एखाद्या वैमानिक दलाच्या आकस्मिक हल्ल्याने होणार आहे. तेव्हा भावी महायुद्धाचा अंदाज करतांना वैमानिक चढाईचे स्वरूप, सामर्थ्य आणि परिणाम यांचा विचार करणे जरूर आहे.

## विमानांचें वाढतें सामर्थ्य

विमानांचा शोध लागल्यापासून त्यांचे सामर्थ्य एकसारखे वाढत चालले आहे. लष्करी विमानांच्या कारखान्यांतून आता ताशी तीनशे मैल जाऊ शकणारी व दोन हजार मैल दूर जाऊन शत्रूंवर हजारो पौंड वजनाच्या बॉम्बगोळ्यांचा वर्षाव करून परत येऊ शकणारी विमाने बाहेर पडू लागली आहेत. विमानांचा वेग, त्याची आकाशांत उंच जाण्याची मर्यादा, जमिनीवरून उड्डाण करून आकाशांत उंच जाण्याची गति, त्यांच्या प्रवासक्षेत्राची मर्यादा व त्यांचे वजन वाहून नेण्याचे सामर्थ्य या सर्वांची एकसारखी वाढ होत आहे. दिवसा किंवा रात्री प्रवास करणे, कसल्याहि वादळी हवेतून व धुक्यांतून इष्ट स्थळी जाणे, प्रसंगविशेषी पाणबुड्या बोटीप्रमाणे ढगांत अदृश्य होणें, इंजिनांचा आवाज न करतां प्रवास करणें, इतर विमानांबरोबर बिनतारी यंत्राने दळणवळण ठेवणे, या साऱ्या गोष्टी आता विमानांना शक्य झाल्या आहेत. चिलखती जहाजांप्रमाणेच आतां चिलखती विमानेहि निघाली असून ती आकाशांतून तोफांचा भडिमार करूं शकतात.

शस्त्रास्त्रांची प्रगति ही नेहमीच चढाईला अनुकूल असते आणि विमानांची गति फार जलद असल्याने व त्यांच्या हालचालीचें क्षेत्र फार विस्तृत असल्याने हा नियम विमानांना विशेषेंकरून लागू पडतो. त्यांत देखील वैमानिक दलाचें चढाईचें सामर्थ्य हें युद्धारंभी सर्वांत अधिक असतें. अचानक हल्ला करणाऱ्या विमानांना लष्कराप्रमाणे एकत्र जमून मगच चढाईला निघण्याची आवश्य-

कता नसते. निरनिराळ्या वैमानिक–तळांवरून निघालेली विमाने निरनिराळ्या मार्गांनी एकाच वेळी आपल्या हल्ल्याच्या ठिकाणी पोचतील, अशी योजना करणे अगदी सोपे असल्याने हल्ला होत असलेल्या राष्ट्राला कोणत्या ठिकाणी हल्ला होणार आहे, हे अखेरपर्यंत कळत नाही व त्याला आपल्या साऱ्या मर्मस्थानांच्या संरक्षणाची शक्य ती तयारी करून शत्रूची वाट पहात बसण्याखेरीज उपाय नसतो. शिवाय संरक्षक विमानांना वातावरणाच्या वीसपंचवीस हजार फुटांपर्यंतची टेहळणी करावी लागत असल्याने ती सारी वातावरणात विभागली जाऊन हल्ला-करणाऱ्या वैमानिक दलाला सकृद्दर्शनी तोंड देण्याला असमर्थ होतात.

## बचाव करणेंच अवघड

कित्येकजण असे म्हणतात की विमानांचा वेग वाढल्याचा फायदा बचाव करणाऱ्या राष्ट्रालाच मिळेल; कारण हल्ल्याची सूचना मिळताच संरक्षक विमानें ताबडतोब सज्ज होऊन, देशामध्ये फार दूर घुसण्यापूर्वीच शत्रूंच्या विमानांना गांठतील. पण ही समजूत चुकीची आहे. परक्या विमानांची चाहूल लागल्यावर प्रथम स्वदेशांतील सर्व वैमानिक–तळांना, विमाननाशक तोफांच्या बातेऱ्यांना व देशसंरक्षणाच्या कामावरील इतर सर्व अधिकाऱ्याना स्वारीची बातमी पोचविणे जरूर असते. त्यानंतर शत्रु कोणत्या दिशेने येत आहे व त्याचा रोख कोणत्या ठाण्यावर आहे, याचा अंदाज करून वैमानिक–दलाच्या जनरल स्टाफला कळविले पाहिजे. जनरल स्टाफचे हुकूम सुटेपर्यंत वैमानिक तळावरील सर्व विमाने उडण्याला सिद्ध होऊ शकतात. शत्रूचा प्रतिकार कसा करावयाचा, या विषयींचे हुकूम मिळाल्यावर हल्ला झालेल्या देशांतील विमाने शत्रूच्या रोखाने उडून जातील. इतक्या साऱ्या गोष्टी होऊन संरक्षक विमानांची व हल्ला करणाऱ्या विमानांची गांठ पडेपर्यंत पाऊण तासापासून एका तासापर्यंत वेळ जाऊं शकतो. एवढ्या अवधींत हल्ला करणारीं विमाने ही आपल्या उद्दिष्ट स्थळी पोचून त्या स्थळाचा विध्वंस करूं शकतात. कारण स्वारी करणाऱ्या विमानांची गति जरी ताशी अडीचशे मैल धरली, तरी अर्ध्या तासाच्या अवधीत ती शत्रूच्या हद्दीमध्ये शे-सवाशें मैलांपर्यंत घुसतील व उरलेल्या अर्ध्या तासांत या मर्यादेंतील मर्मस्थानांवर हल्ला करून त्यांचा विध्वंस करूं शकतील. या अवधीत संरक्षक विमानांनी त्यांना गाठल्यास संरक्षक विमा-

नांच्या एकेकट्या तुकड्यांचा निःपात करण्याची संधि स्वारी करणाऱ्या विमानांना मिळून त्यांचाच फायदा होईल.

## सर्चलाइटचा मर्यादित उपयोग

जमिनीवरील लढाईत डोंगराळ प्रदेश, दलदलीचे प्रदेश, वाळवंटे, नद्या इत्यादि भौगोलिक परिस्थितीचा योग्य उपयोग केल्यास दुर्बळ पक्षाला आपला बचाव करून घेतां येतो. पण आकाशात बचावाला उपयोगी पडणारें नैसर्गिक साधन कांहीहि नाही. एका काळी उंच पर्वतांच्या रांगा ओलांडणे हे विमानांना अवघड होते. पण आता हिमालयासारखे दोनतीन अत्युच्च पर्वत वगळल्यास बाकी साऱ्या पर्वतश्रेणी सामान्य विमानांनादेखील उल्लंघिता येतात. रात्रीच्या काळोखाने विमानांना अडथळा तर होत नाहीच, उलट अचानक हल्ला करणें सोपे जाते. ढगांमुळे किंवा धुक्यामुळे दूरचे दिसत नाहीसे झाल्यास विमानांच्या लहान लहान तुकड्यांना अगदी जमिनीजवळ येऊन शत्रूंवर हल्ला करणे व शत्रूंनी प्रतिकार केल्यास पुनः ढगांत अदृश्य होऊन निसटून जाणे सुकर होते. चढाईच्या वेळी विमानांच्या हालचालींचे क्षेत्र जितके विस्तृत असते, तितकेच ते बचावाच्या वेळी आकुंचित होते. हा नियम विशेषेकरून रात्रियुद्धाला लागू पडतो. कारण रात्रीच्या वेळी सर्चलाइटने, हल्ला करणाऱ्या विमानांवर प्रकाश पाडल्यावर मगच पाठलाग करणाऱ्या विमानांना शत्रूंवर फेरहल्ला करतां येतो. यामुळे सर्चलाइटच्या प्रकाशाइतकीच पाठलाग करणाऱ्या विमानांच्या उपयुक्ततेची मर्यादा संकुचित होते.

या सर्व कारणांमुळे एखाद्या महत्त्वाच्या स्थळाचे संरक्षण व्हावे असे वाटत असल्यास त्या स्थळाच्या संरक्षणाची स्वतंत्र तजवीज करणे जरूर असते. पण इंग्लंडसारख्या बलाढ्य राष्ट्राला देखील लंडनसारख्या अति महत्त्वाच्या दहा पांच स्थळांखेरीज इतरांच्या संरक्षणाची स्वतंत्र तरतूद करणे शक्य नाही. कारण सर्व महत्त्वाच्या स्थळांच्या संरक्षणाची स्वतंत्र व्यवस्था करणे म्हणजे आपले बचावाचें सामर्थ्य देशभर विभागणे होय. गेल्या महायुद्धांत असा अनुभव आला आहे कीं, सर्चलाइटचा प्रकाश हल्ला करणाऱ्या विमानांवर सोडून त्यांच्यावर विमानविनाशक तोफांच्या बातेऱ्यांचा मारा केला असता हल्ला करणाऱ्या विमानांना परत जाणें भाग पडतें. पण हें उद्दिष्ट साधण्यासाठी सर्चलाइट व तोफांच्या बातेऱ्या यांचा इतका मोठा

संच जमवावा लागतो की असा संच पंचवीस ठिकाणीं सुद्धा जमविणे कोणालाहि शक्य नाही आणि दुसरी गोष्ट ही की गेल्या युद्धांत शेकडो विमानांनी एकाच वेळीं लंडनवर हल्ला केलेला नाही, त्यामुळे असल्या निकराच्या हल्ल्याच्या वेळी विमानविनाशक तोफा किती वेळांत बंद पडून निरुपयोगी होतात, याचाहि अद्यापि अनुभव नाही. एकंदरीने पाहतां आर्थिक आणि लष्करीदृष्ट्या विशेष महत्त्वाची अशी स्थळे इंग्लंडमध्ये पन्नासांहून अधिक आहेत आणि त्यापैकी दहापांच स्थळांहून अधिक स्थळांच्या बचावाची व्यवस्था करणे इंग्लंडला शक्य नाही असा विशेषज्ञाचा अंदाज आहे.

## किती टन बॉंब गोळे टाकावे ?

एखाद्या विशिष्ट स्थळाचा विध्वंस करण्यासाठी किती टन बॉंब गोळ्यांचा वर्षाव करावा लागतो याचे प्रयोग निरनिराळ्या राष्ट्रांनी करून पाहिले आहेत. त्यावरून असा अंदाज निघतो की एखादे महत्त्वाचे स्टेशन नष्ट करावयाचे असल्यास सुमारें पन्नास टन वजनाचे बॉंब फेकावे लागतात, अतिशय महत्त्वाच्या जक्शनाचा पूर्ण विध्वंस करावयाचा असल्यास अडीचशे टन बॉंबची वृष्टि करावी लागते. एखाद्या दुय्यम दर्जाच्या आरमारी तळाचा विध्वंस करण्यालाहि अडीचशे टनाचे बॉंब पुरतात पण सिंगापूर सारख्या अव्वल दर्जाच्या आरमारी तळाचा विध्वंस करावयाला कमीत कमी दोन हजार टनांच्या बॉंबगोळ्यांची वृष्टि करावी लागेल. हा हेतु साध्य होण्यासाठी किती विमानांचा उपयोग करावा लागेल, हे सांगणे थोडे अवघड आहे; कारण सध्या एका टनापासून तेरा टनांपर्यंत वजन वाहून नेऊ शकणारी प्रचंड विमाने तयार होऊ लागली आहेत. तेव्हा असल्या स्वारीला विमानें किती लागतील, हे विमानांच्या वजन वाहण्याच्या सामर्थ्यावर अवलंबून राहील.

युद्धाच्या आरंभी चढाई करणाऱ्या वैमानिक दलाला आणखी एक महत्त्वाची गोष्ट अनुकूल असते. ती ही की युद्धारंभीं, पाठलाग करणाऱ्या वैमानिकांना शत्रूंचीं विमानें पाडण्याची अद्यापि संवय झालेली नसते. गेल्या महायुद्धांत. रिश्टोफेन, राइनहार्ट, गोएरिंग वगैरे जर्मनांचे वैमानिक प्रतिपक्षियांचा पाठलाग करण्यांत इतके तरबेज झाले होते कीं त्यांचा पहारा असलेल्या भागांत

दिवसाच्या वेळी शत्रूंची विमाने फिरकणे अगदी अशक्य होऊन गेलें होतें, पण भावी महायुद्धाच्या आरंभी पाठलाग करणाऱ्या वैमानिकांना शत्रूंचीं विमानें पाडण्याचा अनुभव नसल्याने दिवसादेखील परक्यांच्या हद्दींत घुसणे सोपे जाईल. याशिवाय गेल्या महायुद्धांत बॉंब टाकणारीं विमानें व पाठलाग करणारी विमाने या उभयतांच्या ताशी गतींमध्ये साठसत्तर मैलांचें अंतर असे. तसे अंतर यापुढें राहणे अशक्य आहे. कारण सध्या विमानांच्या इंजिनांचे सामर्थ्य सारखे वाढत चालले असल्याने पाठलाग करणाऱ्या विमानाच्याइतक्या जलद गतीची, अनेक माणसांना बसतां येण्याजोगीं, बॉंब टाकण्याची चिलखती विमाने तयार करणे सुलभ झालें आहे. यामुळे, आरमारांत ज्याप्रमाणें ड्रेडनॉट जहाजे ही गतीने, चिलखताने व शस्त्रास्त्राने इतर सर्व जहाजांना मागे टाकतात त्याप्रमाणें विमानांतहि बॉंब टाकणारी व तोफखाना बाळगणारी विमानें ही गतीने, चिलखताने व शस्त्रास्त्राने इतर सर्व विमानांना मागें टाकतील.

## युद्धारंभीं विमानांचें कार्य

असो, आता युद्धाच्या आरंभी वैमानिक दलाचा कोणकोणत्या प्रकारे उपयोग होऊ शकेल, याचा विचार केला पाहिजे. एखाद्या पक्षाने युद्धाला सुरुवात केली तर विरुद्ध पक्षाच्या वैमानिक दलाला त्याच्या तळावर गाठून त्याचा विध्वंस करणें हें अचानक हल्ला करणाऱ्यांचें पहिले ध्येय होऊं शकेल. पण कोणत्याहि चारचक्षू राष्ट्रावर असा अचानक हल्ला होणे फार अवघड असल्याने ही कल्पना विचारांतून वगळली तरी चालेल. युद्धाची सूचना मिळाल्यापासून एका तासामध्ये वैमानिक दल युद्धाला सिद्ध होऊ शकतें. आरमाराला सिद्ध होण्याला एक दिवस पुरतो. पण लष्कराला सिद्ध होण्याला मात्र दोन आठवड्यांहून अधिक काळ लागतो. यामुळे प्रतिपक्षाच्या लष्कराची जमवाजमव अशक्य करून सोडणे हें वैमानिक दलाचें पहिलें महत्त्वाचे कर्तव्य आहे असे म्हणता येईल. लष्कराची जमवाजमव ही मुख्यतः सरहद्दीच्या जवळ व्हावयाची असते. यासाठी सरहद्दीपलीकडच्या शहरांतून लष्करास लागणारें, अन्न, कपडेलत्ते, शस्त्रास्त्रें, दारूगोळा, घोडे व इतर जनावरें, त्यांची दाणावैरण, लष्करी मोटारी व त्यांचें पेट्रोल, लष्कराच्या बराकी, सरहद्दींचें संरक्षण करणारें संरक्षक सैन्य व लष्करांत भरती होण्यासाठी येणारे नागरिक या सर्वांची

एकच गर्दी होऊन जाते. अशा स्थळांवर विमानांचे निकराचे हल्ले एकामागून एकसारखे होऊं लागले तर सैनिक आणि युद्धसामुग्री या सर्वांचा विध्वंस होऊन हल्ला करून येणाऱ्या शत्रूंचा प्रतिकार करणे अशक्य होईल. १९२५ साली एके दिवशी अबदुल करीमच्या सैन्याची जमवाजमव चालली असतां बारा फ्रेंच विमानांनी रिफ लोकांवर हल्ला करून एका मिनिटांतच आठशे सैनिकांना ठार किंवा जायबंदी केले होते. सरहद्दीवरील बराकीच्या शहरांप्रमाणेंच देशांतील इतर बराकीच्या शहरांवर आणि सरहद्दीच्या वाटेवरील आगगाड्यांच्या जंक्शनांवर हल्ले करणें हेहि वैमानिक दलाचें युद्धाच्या पहिल्या दिवसाचे कार्य होय.

युद्धाच्या पहिल्या दिवशी कोणत्याहि देशांतील आगगाड्या, पूल, बोगदे वगैरेच्या संरक्षणाची पुरी तरतूद झालेली नसते. अशा वेळी स्फोटक द्रव्यांचा भरपूर पुरवठा बरोबर देऊन दहावीस किंवा विशेष महत्त्वाच्या ठिकाणी शदोनशें लोकांच्या तुकड्या विमानांतून शत्रूंच्या दळणवळणाच्या मर्मस्थानीं उतरवून त्या, त्या ठिकाणच्या पुलांचा, बोगद्यांचा किंवा स्टेशनांचाच विध्वंस केला तर शत्रूंना अनेक आठवडेपर्यंत त्या मार्गांचा उपयोग करणे अशक्य होईल. गेल्या महायुद्धांत एकट्या कर्नल लॉरेन्सने अशा प्रकारें दमास्कस-मदिना रेल्वेचा ठिकठिकाणीं विध्वंस करून तुर्कांची किती त्रेधा उडवून दिली होती, हें सर्वांना ठाऊकच आहे. तोच प्रयोग एकाएकी विमानांतून धाड घालणाऱ्या हजारो लोकांनी अनेक ठिकाणीं केला, तर त्याचा भावी महायुद्धावर फार महत्त्वाचा परिणाम झाल्यावाचून राहणार नाही.

## वैमानिक दलाचा तिहेरी कार्यक्रम

सरहद्दीशेजारच्या शत्रूंच्या साऱ्या छावण्यांवर हल्ला करणे, सरहद्दीकडे येणाऱ्या प्रमुख रेल्वेचा विध्वंस करणे आणि शत्रुराष्ट्रांतील सर्वांत मोठ्या अशा चार-पांच शहरांचा विध्वंस करणें, असा हल्ला करणाऱ्या वैमानिक-दलाचा तिहेरी कार्यक्रम असूं शकतो. यांपैकीं पहिल्या दोन अंगांचा विचार झाला. आता प्रमुख शहरांवरील वैमानिक हल्ल्यांचा विचार केला पाहिजे. शांततावादी लोकांना असले शहरांवरील हल्ले म्हणजे केवळ बिनलष्करी लोकांवरील हल्ले आहेत, असें वाटतें, पण ती त्यांची चूक आहे. कारण असल्या प्रमुख शहराभोंवतालींच

लष्कराच्या मोठमोठ्या छावण्या, शस्त्रास्त्रांचे कारखाने, रेल्वेची महत्त्वाची जंक्शनें, रेडियोची स्टेशने, विमानांचे तळ वगैरेंचा समुच्चय झालेला असतो. यामुळे प्रत्येक राष्ट्राच्या आर्थिक सामर्थ्याप्रमाणे त्याचे सामरिक सामर्थ्यहि महत्त्वाच्या शहरां-भोवताली केंद्रीभूत झालेले असते.

खुद्द आपल्या पुणे शहराचे लष्करी दृष्ट्या महत्त्व किती आहे याचा विचार केला असता अशा महत्त्वाच्या शहरांवर युद्धारंभी वैमानिक दलाचे हल्ले होणे अगदी स्वाभाविक आहे, हे कोणालाहि कळून येईल. या साऱ्या शहरांची रचना झाली, तेव्हा वैमानिक स्वारीची कल्पनाहि कोणाच्या डोक्यांत नव्हती. यामुळे कारखाने, वखारी, दारूगोळ्याची कोठारे, स्टेशने, बराकी, महत्त्वाच्या कचेऱ्या वगैरे बांधताना वैमानिक हल्ला आला असता ती सुरक्षित राहतील की नाही, याचा कोणीच विचार केलेला नाही. अजून देखील या महत्त्वाच्या प्रश्नाकडे सामान्य जनतेचे फारसे लक्ष गेलेले नाही. विमानांचा हल्ला म्हणजे विषारी धुराच्या बॉबगोळ्यांचा वर्षाव इतकीच कल्पना सामान्य जनतेच्या मनांत येते. मुखोट्यांच्या साहाय्याने किंवा तळघरांच्या आश्रयाने या विषारी धुरापासून लोकांचे संरक्षण होणे शक्य आहे. पण शास्त्रज्ञांनी शोधून काढलेल्या आगलाव्या बॉबगोळ्यांपासून शहरांचा बचाव होणे बहुतेक अशक्यच आहे. मोठ्या शहरांवरील वैमानिक हल्ल्यांचा दुसरा एक विशेष हा असतो की, त्यांच्यावर बॉबगोळ्यांचा वर्षाव केला असतां बॉबगोळे फुकट जाण्याचा संभव थोडाच असतो, त्यामुळे पंधरावीस हजार फूट उंचीवरून जरी वृष्टि केली, तरी चालण्याजोगे असते. शहरांवरील हल्ल्यांत केवळ लष्करी विमानांनीच भाग घेण्याचे कारण नसून देशांतील टपालाची, प्रवाशांना नेणारीं किंवा खासगी विमानेहि या हल्ल्यांत लष्करी विमानांच्या बरोबरीने भाग घेऊ शकतात

वैमानिक युद्धाच्या आरंभीचे दोन-चार दिवस अतिशय आणीबाणीचे असतात. या दिवसांत होणारी हानि भरून काढण्याला दोन महिनेहि कदाचित् पुरावयाचे नाहीत; शिवाय या दिवसांत होणाऱ्या लष्करी नुकसानीपेक्षाहि देशांतील लोकमतावर या हल्ल्यांचा परिणाम काय होईल, याला अधिक जपावें लागतें. वैमानिकयुद्धाच्या पहिल्या फेरींतच लोकमताने कच खाल्ली व एकदम युद्धाविरुद्ध गिल्ला सुरू केला, तर

तावडतोब शत्रूंना शरण जाण्याखेरीज राष्ट्रसूत्रधारांस गत्यंतर उरणार नाही. एकदा युद्धाला सुरुवात होऊन चार दिवस लोटले म्हणजे मग देशाच्या संरक्षणाची सुव्यवस्था लावतां येते आणि त्यानंतर वैमानिक हल्ल्याचा पूर्वीइतका भयंकर परिणाम होत नाही. पण शत्रूने अचानक युद्धाला सुरुवात केल्यास पहिल्या दोन-चार दिवसांत होणारी हानि टाळणें हे कोणत्याहि सरकाराला शक्य नाही.

—केसरी, ता. १५ जानेवारी, १९३७.



# भावी रूसो-जपानी युद्धाचा लष्करीदृष्ट्या विचार

गतवर्षी जर्मनी व जपान या उभयतांनी रशियाविरुद्ध परस्परसहायाचा तह केल्यापासून जपान व रशिया या उभयतांमधील वितुष्टाला अधिक गंभीर स्वरूप येऊ लागले आहे. त्यातून जपानच्या अतर्गत राजकारणांत लष्कराचे वर्चस्व अधिकाधिक वाढत चालले असल्याने या दोन्ही राष्ट्रांचे भांडण केव्हा हातघाईवर येईल, याचा नेम उरलेला नाही. कांही दिवसांपूर्वी रशियाचे परराष्ट्र-मंत्री कॉ. लिट्व्हिनॉफ यांनी जपानला उद्देशून असे उद्‌गार काढले होते—

'The Japanese-Manchurian militarists have been encouraged by the Japanese-German agreement to increase the number of incidents on the Soviet-Manchurian border recently, but we hope that in spite of Berlin agreement the Japanese militarists in Manchuria will not forget the earnest request of the Far-Eastern Red Army to choose for their strolls, nooks somewhat farther away.'

अशा परिस्थितीत रशियाला जपानशी लढणे कितपत शक्य आहे, या प्रश्नाची चिकित्सा रशियांतील लष्करी मासिकांतून सुरू होणें स्वाभाविक आहे. अगदी अलीकडे 'व्होइना ई रेव्होल्यूत्सिया' म्हणजे 'युद्ध व क्रांति' या नांवाच्या एका रशियन मासिकांत या विषयावर एक विशेष मननीय लेख आला आहे. त्या व इतर कांही लेखांतील माहितीवरून हा लेख लिहीत आहे.

## दोन्ही सैन्यांची तुलना

सकृद्दर्शनीं पांहतां रशियाच्या सरहद्दीवर जपानचें सैन्य फारसें नाही. जपानच्या खड्या सैन्यापैकीं अवघ्या दोन डिव्हिजन्स कोरियांत आहेत व तीनच मांचूरियांत आहेत. जपान व रशिया यांचें युद्ध जुंपल्यास युद्धारंभीं मांचूरियाच्या एक लाख सैन्याचा जपानला पाठिंबा मिळू शकेल. पण मांचूरियन सैन्यांत जपानी

अधिकारी भरपूर असले तरी ते सैन्य अव्वल दर्जाच्या युरोपियन सैन्याशीं लढ-ण्याच्या लायकीचे नाही. उत्तर चीन व मोंगोलिया या प्रांतांतील जपानपक्षियांची सैन्ये मांचूरियन सैन्यापेक्षाहि अधिक निकृष्ट दर्जाची आहेत. जपानच्या वैमानिक दळांत आज दोन हजार विमानें आहेत व १९३७ च्या अखेरीला त्यांची संख्या आणखी सहाशेनी वाढेल. या विमानांपैकी, सुमारे चारशेच विमाने कोरिया व मांचूरिया या देशांत असतात. पण जपान देश हा भावी युद्धक्षेत्रांच्या अगदी सन्निध असल्याने आणि जपान व सायबेरिया यांमधील समुद्रावर जपानी आरमा-राचे पूर्ण आधिपत्य असल्याने युद्धारंभानंतर थोड्याच दिवसांत, रशियाच्या सैन्याला चिरडून टाकण्याइतकें सैन्य सायबेरियांत पाठविणे जपानला शक्य आहे.

याच्या उलट युरोपियन रशियाच्या पूर्वसरहद्दीपासून पूर्व-सायबेरिया प्रांताची राजधानी खाबारोव्हस्कपर्यंतचे अंतर सुमारे चार हजार मैल आहे. रशियाची राजधानी मॉस्को व खाबारोव्हस्क यांच्यामध्ये तर पांच हजारांहून अधिक मैल अंतर आहे. सायबेरियाची हवा अत्यंत थंड असल्याने त्या प्रांतांत लोकवस्ती फार थोडी आहे. या प्रांतांतील पिकाऊ जमीन मुख्यतः बैकल सरोवर व अमूर नदी यांच्याशेजारच्या प्रदेशांत असल्याने रशियन लोकांची वसाहत याच भागात झाली आहे. पण या भागांत खनिज संपत्ति बिलकुल नाही. सायबेरियाच्या ज्या भागांत खनिज संपत्ति आहे तो प्रदेश अत्यंत थंड असल्याने त्या भागात वसाहत होऊ शकत नाही व त्या खनिज संपत्तीचाहि रशियाला फारसा उपयोग होऊ शकत नाही. असला हा वाईट हवेचा, विरळ वस्तीचा व स्वदेशापासून पांच हजार मैल अंतरावर असलेला प्रांत जपानसारख्या बुभुक्षित शत्रूपासून संभाळणे किती अवघड आहे याची रशियालाहि चांगली जाणीव आहे.

## रशियाची तयारी

१९३५ सालीं पूर्व-सायबेरिया प्रांतांत रशियाच्या एकंदर अकरा डिव्हिजन्स होत्या. आता सध्या पायदळाच्या बारा व घोडदळाच्या दोन डिव्हिजन्स व एक ब्रिगेड मिळून २८०००० सैन्य या प्रांतांत एकत्र झाले आहे. या सैन्यांत सुमारें ८०० टँक्स व ६०० विमाने आहेत. विमानांचे तळ एकंदर अठरा असून तेथून मांचूरियाच्या प्रमुख शहरांवर हल्ला करणें अगदी सुलभ आहे. हल्लाहि

व्होस्तोक (पूर्वदिग्विजय) बंदरांतील विमाने तर प्रत्यक्ष टोकियोवर बाँब टाकून परत येऊ शकतात. रशियाचे लष्कर आणि वैमानिक दल हें मांचूरियांतील जपानी लष्कराला व वैमानिक दलाला पुरून उरण्यासारखे असलें, तरी रशियाची आरमारी बाजू अगदी लंगडी आहे. पॅसिफिक महासागरांत कांही टॉर्पेडो बोटी व कांही विनाशिका इतकेच रशियाचे आरमार आहे. जर्मन पत्रे म्हणतात की, व्हूला-दिव्होस्तोक बंदरांत रशियाच्या निदान पन्नास पाणबुड्या आहेत. पण ही बहुधा अतिशयोक्ति असावी, असे इतर राष्ट्रांच्या विशेषज्ञांचे मत आहे. त्यांच्या मते पॅसिफिक महासागरांतील रशियाच्या पाणबुड्या पंधराहून अधिक नसाव्यात. या साऱ्या रशियन सैन्यांत रशियन मोंगोलियांतील सैन्याची भर टाकली पाहिजे. रशियन मोंगोलियाच्या सैन्यांत पायदळाच्या तीन डिव्हिजन्स व घोडदळाच्या बारा ब्रिग्रेड्स आहेत. मोंगोलियाची विमाने दोनशेहून अधिक आहेत. त्यांच्या टँक्सचा आंकडा नक्की माहित नसला, तरी तो बराच मोठा आहे असे कळते. लंडन-मधील रशियाचे वकील माइस्की यानी नुकतेच असे उद्गार काढले होते की सायबेरिया व मांचूरिया याच्या सरहद्दीवर अभेद्य तटबंदी केली आहे. पण ही नुसती माइस्कीची बढाई आहे. सायबेरिया व माचूरिया यांच्यामधील सरहद्दीवर खिगान पर्वताच्या रागा असून त्यामधील नाक्यांच्या ठिकाणी रशियाने साधारण तटबंदी केली असून सुंगारी व अमूर या नद्याच्या संगमाजवळ मात्र बरीच महत्त्वाची तटबंदी केली आहे.

## लष्करी सामानाचा पुरवठा व रेल्वेची सोय

या पूर्व-सायबेरिया प्रांतात त्या प्राताला पुरेल इतके धान्य पिकत नाही. दगडी कोळसे, कापूस व कापड, पेट्रोल, लोखंड, रेल्वेचे सामान व बहुतेक सारा पक्का माल तर परप्रांतांतूनच आणावा लागतो. लढाईच्या वेळी या साऱ्या पदार्थांचा व्यय अतिशय वाढून लष्कराची व इतर जनतेची गैरसोय होऊ नये, म्हणून पूर्व-सायबेरियांत या साऱ्या जिनसांची मोठमोठीं कोठारे करून ठेविली आहे. दारूगोळ्याचीं कोठारें तर आहेतच, शिवाय लहान प्रमाणावर दारूगोळा करण्याचे कारखानेहि काढले आहेत. इतकी सारी तयारी केली असली तरी दीर्घकालीन युद्धाला ती पुरेशी होत नाही. तेव्हा खुद्द रशियाहूनच आघाडीवरील सैन्याला सर्व सामानाचा पुरवठा करावा लागेल.

आघाडीवर सोळा डिव्हिजन्स सैन्य आहे असे गृहीत धरले, तर त्याला पाठीमागून किती सामानाचा पुरवठा करावा लागेल, याची चिकित्सा करून ' व्होइना ई रेव्होल्यूत्सिया ' या रशियाच्या लष्करी मासिकाने असा अंदाज केला आहे कीं रेल्वेवरील मालगाड्यांतून ४५० टनांपासून ४८० टनापर्यंत माल जात असल्यास आघाडीवरील सैन्याला शस्त्रास्त्रे व दारूगोळा यांच्या रोज पांच गाड्या, पांच ते आठ गाड्या अन्नसामुग्री, तीन गाड्या पेट्रोल, चार गाड्या रेल्वेचे सामान, दोन ते तीन गाड्या जखमी लोकांची जागा भरून काढण्यासाठी पाठविलेले सैनिक, दोन ते तीन गाड्या घोडे, दोन गाड्या दवाखान्याचे सामान व इतर किरकोळ सामानाच्या पांच गाड्या आघाडीवर पाठवाव्या लागतील. निकराच्या लढाईच्या वेळी दारूगोळा व शस्त्रास्त्रे यांच्या गाड्या पांचाच्याऐवजी अठरा पाठवाव्या लागतील.

शांततेच्या काळांत पूर्व—सायबेरिया प्रांताला सुमारे २५ लक्ष टन माल इतर प्रांतांतून आणावा लागतो व हा माल आणण्यासाठी नित्य पंधरा मालगाड्या त्या प्रांतांत याव्या लागतात. भावी रूसो-जपानी युद्धाच्या वेळी जर्मनी तटस्थ असला तर हा मालगाड्यांचा आंकडा फार तर तिसापर्यंत जाऊ शकेल व त्यांतून-च लष्करी व बिनलष्करी अशा दोनहि वर्गांच्या गरजा भागवाव्या लागतील. पण निकराच्या लढायांच्या वेळीं एकट्या लष्करालाच पंचेचाळीस गाड्यांची गरज पडणार असल्याने अशा प्रसंगी युद्धसामुग्रीच्या अभावी रशियाला हार खावी लागणार हे उघड आहे.

## रेल्वेवर जपानचा हल्ला

या साऱ्या चिकित्सेत रशियाला आपल्या रेल्वेचे संरक्षण करतां येईल, ही गोष्ट गृहीत धरली आहे. पण वस्तुस्थिति तशी नाही. मांचूरियाच्या सरहद्दीवर ऐगुन आणि मांचूली या दोन शहरांपासून जपानने सायबेरियावर चढाई केली तर ट्रान्ससायबेरियन रेल्वेचे दोन महत्त्वाचे भाग तावडतोब जपानच्या हातीं पडण्या-सारखे आहेत; शिवाय जपानी वैमानिकांना या रेल्वेवरील महत्त्वाचे पूल उडवून देतां आले तरीदेखील पूर्व-सायबेरियांतील रशियन सैन्याचें रशियाशीं असलेलें दळणवळण लगेच थांबेल. हें खरें कीं पूल उडवून दळणवळण थांबविलें

तर ते दोन चार महिन्यांत परत सुरू होण्याचा संभव असतो. पण मांचूली शहरापासून बैकल सरोवराच्या दिशेने चढाई करून जपानने चिता शहर काबीज केले, तर पूर्वसायबेरियांतील रशियन सैन्याला अन्नसामुग्री किंवा युद्धसामुग्री यांपैकी कोणत्या तरी अभावामुळे शत्रूला शरण जावे लागेल: अर्थात् या साऱ्या परिस्थितीची रशियालाहि जाणीव आहे व हे संकट टाळण्यासाठी बैकल सरोवराच्या उत्तरेकडून अमूर नदीच्या मुखापर्यंत सुमारे तेराशें मैल लांबीची नवीन रेल्वे बांधण्याचे कामहि रशियाने सुरू केले आहे. 'करंट हिस्ट्री'च्या फेब्रुवारीच्या अंकांत म्हटले आहे— "However this weakness has been corrected with the construction of a branch line Baikal-Amur-Magister, running north of lake Baikal to the maritime province behind a screen of concrete fortifications and at a sufficient distance from Japanese military bases in Manchuria to insure uninterrupted communication under all conditions except sporadic aerial bombardment."

पण कॉमरेड माइस्कीच्या अभेद्य तटबंदीसारखीच हीहि एक बात आहे झाले. जनरल नीस्सेल या फ्रेंच लष्करी विशेषज्ञाने अशी नक्की माहिती सागितली आहे की ही नवी रेल्वे पुरी होऊन ती ट्रान्ससायबेरियन् रेल्वेशी जोडली जाई-पर्यंत अजून कित्येक वर्षे लोटतील व तोपर्यंत जर्मनी तटस्थ राहिला तरीदेखील रशियाला जपानपासून पूर्व-सायबेरियाचें संरक्षण करणे अशक्य होईल.

## चढाई का नुसता बचाव ?

अशा परिस्थितीत रशिया आपण होऊन जपानशी युद्ध करणार नाही, ही गोष्ट निश्चित आहे. मात्र युद्ध उपस्थित झाल्यास रशिया चढाईचें धोरण स्वीकारील की बचावाचें धोरण स्वीकारील, याविषयीं बराच मतभेद आहे. १९३४ सालीं एका अमेरिकन युद्धशास्त्रज्ञाने 'फॉरेन ॲफेयर्स' या नामांकित त्रैमासिकांत लिहिलें होतें कीं रूसो-जपानी युद्धाच्या आरंभी चढाईचें धोरण स्वीकारणें रशियाला घातुक होईल. पण लष्करी दृष्टया व राजकीय दृष्टयाहि बचावाचें धोरण सपशेल चुकीचें ठरेल. कारण व्हलादिव्होस्तोक बंदराच्या संरक्षणासाठी त्या भागांत रशियाला निदान दोन लक्ष सैन्य गुंतवून ठेवावें लागेल व एवढ्या मोठ्या सैन्याला

युद्धारंभापासून दोन महिनेपर्यंत शत्रूच्या चढाईची वाट पहात बसावें असे सांगणे हास्यास्पद होईल. भावी रूसो-जपानी युद्धाच्या सुरुवातीला कोरिया-मांचूरियांत हल्ली-इतकेंच जपानी सैन्य असल्यास जपानला दोन महिन्यांच्या आंत व्ह्लादिव्होस्तोकवर चढाई करणे अशक्य होईल. तेव्हा या अवधीत रशियन सैन्याने माशा मारीत बसण्यापेक्षा हार्बिन व चांगचून या शहरांच्या रोखाने चढाई करणेच श्रेयस्कर ठरेल. असल्या चढाईत रशियाला तात्कालिक जय मिळाला तरी तेवढ्याने मांचूरिया, मांगोलिया व चीन या सर्व प्रदेशांतील जपानच्या शत्रूंना उठावणी करण्याला उत्तेजन मिळून जपानचे कार्य तितके अधिक अवघड होईल व बोल्शेव्हिकांच्या प्रचारकांना आपली करामत दाखवावयालाहि संधि सांपडेल. पूर्वसायबेरियातील रशियन सैन्याचे अधिपति मार्शल ब्लूशेर यांच्या पूर्वचरित्रावरूनहि ते चढाईच्या धोरणाला अनुकूल असावेत, असे अनुमान काढण्याला जागा आहे.

## मार्शल ब्लूशेर यांची पूर्वीची कामगिरी

मार्शल ब्लूशेर यांनी सध्या जरी एका नामांकित जर्मन सेनापतीचे नांव धारण केले असले, तरी त्यांचे मूळचें नांव व्हासिली कोन्स्तांतिनोव्हिच गूरोफ असे आहे. यांनी रशियांतील यादवीयुद्धांत ॲड्मिरल कोल्चाक व जनरल रांगेल यांच्याविरुद्ध महत्त्वाची कामगिरी बजावली आहे. १९२४ साली ते चीनच्या राष्ट्रीय सरकाराचे प्रमुख लष्करी सल्लागार झाले. श्री. मानवेंद्रनाथ रॉय चीनच्या इतिहासावरील आपल्या जर्मन ग्रंथांत म्हणतात की चीनचे सध्यांचे अधिपति चियांग कैशेक यांनी हांकौपासून पेकिंगपर्यंत जी यशस्वी चढाई केली, तिचे बहुतेक श्रेय मार्शल ब्लूशेर यांनाच दिले पाहिजे. पुढे चियांग कैशेक व बोल्शेव्हिक यांचे वितुष्ट आल्यावर ते रशियाला परत आले व त्यानंतर कांही दिवसांनी पूर्वेकडील राजकारणाचा त्यांचा अनुभव लक्षांत घेऊन त्यांना सायबेरियांतील रशियन सैन्याचे प्रमुख नेमण्यांत आले. हे मार्शलसाहेब चीनमध्ये होते, तेव्हा ते जनरल गाॅलेन या नांवाने प्रसिद्ध होते व ब्लूशेर हें नांव त्यांनी अलीकडे धारण केले आहे, ही गोष्ट येथे सांगणें जरूर आहे.

सध्याच्या परिस्थितीत युद्धारंभीं चढाईचे धोरण स्वीकारणें रशियाला फायदेशीर होईल, असें जपानी सेनापतींचे देखील मत आहे. गेल्या डिसेंबरमध्ये

जपानी युद्धखात्याने प्रसिद्ध केलेल्या एका पत्रकांत असे म्हटलें आहे—

"The Soviet are in the so-called strategical divergence formation along the Soviet-Manchukuo border but the Japanese, with their small strength, are scattered all over this vast region in helpless positions. Defeat or victory in the initial battle near the border would have a serious effect on the whole fate of such a war." यासाठी जपानला आपले मांचूरियातील सैन्य निदान तीन लाखापर्यंत तरी वाढविणे जरूर आहे. जपानने मांचूरियांतील सैन्य वाढविल्यास रशियाहि सायबेरियांतील सैन्य वाढवील असे कित्येकांना वाटते. पण ते काही फारसे शक्य नाही. "The geographical position, traffic facilities and natural resources of the Far-East however, impose limits on the strength which the Soviets can put into the field in this part of the world and which they can replenish. The Japanese garrison on the other hand, is supported by, 30,000,000 Manchurians and their vast and fertile territory. In the event of an arms race with the Soviets there will be nothing to fear, therefore, if the Japanese maintain their strength and spirit at a certain level without regard for difficulties."

युद्धखात्याच्या या पत्रकाप्रमाणे कोरिया-मांचूरियांतील जपानी सैन्याची वाढ झाली, तर मात्र युद्धारंभी चढाईचे धोरण स्वीकारणे रशियाला अशक्य होईल.

## व्ह्लादिव्होस्तोक बंदरावर हल्ला

भावी रूसो-जपानी युद्धांतील निरनिराळ्या युद्धक्षेत्रांत व्ह्लादिव्होस्तोक बंदराचे महत्त्व सर्वांत अधिक आहे. हे बदर पाणबुड्याचा तळ म्हणून वापरण्याला फार उपयुक्त आहे. या बंदराला अनेक वाटा असल्याने येथील पाणबुड्यांना बंदराचा कोंडमारा करणाऱ्या शत्रूंच्या पाहऱ्याला चुकवून निसटून जाणे व येणे फार सोपे आहे; त्याचप्रमाणे जपानवर विमानांचा हल्ला करण्यालाहि हें बंदर व त्याच्याभोवतालचा प्रांत यांचा अतिशय उपयोग होण्याजोगा आहे. जपानची शहरें असुरक्षित व सहज जाळतां येण्याजोगीं असल्याने जपानला व्ह्लादिव्हो-

स्तोकच्या पाणबुड्यांपेक्षाहि तेथील विमानांची अधिक भीति वाटते. शिवाय पोर्ट आर्थरच्या नामांकित जलदुर्गापेक्षाहि अधिक अभेद्य अशी तटबंदी येथे केली असल्याने व सुमार एक लक्ष सैनिकांची शिबंदी येथे कायमची रहात असल्याने हे बंदर लष्करी दृष्ट्याहि फार महत्त्वाचे झाले आहे. त्यामुळे रूसो-जपानी युद्धाच्या सुरुवातीबरोबर जपानी आरमाराचा व वैमानिक दलाचा व्ह्लादिव्होस्तोकवर हल्ला होणार ही गोष्ट निश्चित आहे.

जपानचा हल्ला होतांच सुरक्षिततेसाठी युद्धक्षेत्रापासून दूर असलेल्या प्रदेशांत ठेवलेली रशियाची विमाने व्ह्लादिव्होस्तोक प्रांताकडे उडून येतील व त्यांचे जपानी शहरावरील हल्ले सुरू होतील. या विमानांच्या छाप्यांनी जपानचे बरेच नुकसान होईल. पण विमाने ही लष्कर किंवा आरमार यांच्याप्रमाणे चोवीस तास लढाईला सज्ज राहू शकत नाहीत. एखादा छापा घालून झाला की लगेच त्याना आपल्या तळावर येऊन पडावे लागते. अशा वेळी त्यांच्यावर शत्रूच्या विमानांचा परत हल्ला झाल्यास त्यांचा जागच्या जागीं विध्वंस होण्याचा बराच संभव असतो. दुसरी गोष्ट अशी की विमानांचे तळ हे रेल्वेने पेट्रोलचा पुरवठा होऊ शकेल अशाच ठिकाणी करावे लागतात. आता साऱ्या व्ह्लादिव्होस्तोक प्रांतात उस्सूरी ही एकच रेल्वे आहे व त्या रेल्वेवर पेट्रोलच्या पुरवठ्याचे मुख्य केंद्र खाबारोव्हस्क हे एकच आहे. तेव्हा या मर्यादित प्रदेशांतील रशियाचे वैमानिक तळ शोधून त्यांचा व रशियाच्या बऱ्याचशा विमानांचाहि विध्वंस करणे जपानला शक्य आहे. याबरोबरच खाबारोव्हस्क येथील पेट्रोल शुद्ध करण्याचे कारखाने व पेट्रोल साठविण्याची तळी यांना आगी लावून देण्याचे काम जपानी विमानांना करावे लागेल. या साऱ्या गोष्टी युद्धाच्या पहिल्या महिन्यांत घडून येतील व त्यानंतर रशियाच्या विमानांचें भय बरेचसे कमी होईल.

## युद्धाचा मुख्य भर

युद्धाचा पहिला महिना लोटल्यानंतर व्ह्लादिव्होस्तोक प्रांतावरील जपानच्या चढाईला सुरुवात होईल. या चढाईच्या वेळीं जपानी सैन्याच्या हालचाली मुख्यतः ऐगून, खाबारोव्हस्क आणि व्ह्लादिव्होस्तोक या तीन शहरांना जोड-

णाऱ्या त्रिकोणांत होतील. या त्रिकोणाच्या आतल्या भागांत जपानी सैन्याच्या हालचाली होत असल्याने युद्धशास्त्रदृष्टया हेच लढाईचे क्षेत्र जपानला सर्वतोपरी अनुकूल आहे. या त्रिकोणातील मध्यबिंदु जे खाबारोव्हस्क शहर ते हस्तगत करण्याचा प्रयत्न जपान प्रथम करील असे वाटते. कारण खाबारोव्हस्क शहर ही पूर्वसायबेरियाची राजधानी आहे. ट्रान्ससायबेरियन रेल्वे व उस्सूरी रेल्वे या दोन्ही रेल्वेना जोडणारे ते महत्त्वाचे जंक्शनहि आहे. तेथील पेट्रोलच्या सांठ्याचा व कारखान्याचा उल्लेख वर आलाच आहे. हे शहर जपानच्या हाती पडू नये म्हणून रशियाने त्या भागात भक्कम तटबंदी केली आहे खरी. पण ती कांही व्हलादिव्होस्तोकच्या तटबंदीच्या तोडीची नाही; शिवाय त्या बंदराच्या इतक्या निकराने हे शहर लढविले जाण्याचा संभव नाही. तेव्हा युद्धाच्या पहिल्या तिमाहीत पूर्व-सायबेरियाची राजधानी जपानच्या हाती पडेल असे वाटते.

## युद्धाची परिसमाप्ति कशी होईल ?

खाबारोव्हस्कवरील स्वारीला सुरुवात होताच कोरिया व मांचूरिया या दोन प्रांतांतून दोन जपानी सैन्ये उत्तर आणि पूर्व या दिशांनी व्हलादिव्होस्तोकवर चालून जातील. अशा रीतीने दोन दिशांकडून सुमारे अडीच लक्ष सैन्याचा हल्ला झाला म्हणजे व्हलादिव्होस्तोकमधील सारे रशियन सैन्य प्रत्यक्ष त्या बंदराच्या व त्याच्या दळणवळणाच्या मार्गाच्या संरक्षणासाठी गुंतून पडेल. यामुळे व्हलादिव्होस्तोकमधील प्रचंड रशियन सैन्याचा खाबारोव्हस्कच्या बचावाला फारसा उपयोग होणार नाही. या पॅसिफिक महासागराच्या तीरावरील रशियन सैन्याला निसटून न जाऊ देता जागच्या जागी गारद किंवा कैद करण्यांत जपानी सेनापतींचे खरे कौशल्य प्रकट होण्याजोगे आहे. हा डाव जर जपानी सेनापतींना साधला तर रूसो-जपानी युद्धाची व्हलादिव्होस्तोकच्या वेढ्याबरोबरच समाप्ति होण्याचा संभव आहे. कारण पूर्वसायबेरियांतील तीन लक्ष सैन्य जर ठार किंवा कैद झाले, तर सायबेरियांत नवीन चार लक्ष सैन्य पाठवून जपानबरोबर बरोबरीच्या नात्याने युद्ध चालविणें रशियाला अशक्य आहे. रूसो-जपानी युद्धाची अशाच प्रकारे परिसमाप्ति होईल, असा अंदाज करण्याला दोन कारणे आहेत. एक तर विशिष्ट प्रदेशाच्या संरक्षणासाठी गुंतून पडलेलें सैन्य शत्रुसैन्यापेक्षा प्रबल नसलें तर तें

शत्रूंकडून ठार किंवा कैद होण्याचा संभव फार असतो. त्यांतदेखील तें संरक्षक सैन्य तटबंदीच्या आश्रयाने लढत असले, तर त्याचा विनाश ठरलेलाच असतो. दुसरे कारण हे की, या युद्धाचे क्षेत्र जपानी सेनापतींना निरनिराळे डावपेच लढविण्याला अतिशय अनुकूल आहे आणि त्यामुळे सैन्याच्या संचारक्षमतेचा जपानी सेनापतींना पूर्ण फायदा मिळण्याचा संभव आहे. या दोन्ही कारणांमुळे पॅसिफिक समुद्रतीरावरील प्रांतांत व एका वर्षाच्या आंतच भावी रूसो-जपानी युद्धाचा निकाल लागेल असे वाटते.

## बैकलपर्यंत पाठलाग अशक्य

उलटपक्षी जपानी सेनापतींचा डाव न साधता खाबारोव्हस्क प्रांतांतील एकंदर तीन लक्ष रशियन सैन्यापैकी निदान दोन लक्ष सैन्य जपानच्या तावडीतून निसटून बैकल सरोवराशेजारच्या प्रांतांत सुरक्षितपणे येऊन पोचलें, तर युद्धाला कोणता रंग चढेल, याचाहि थोडासा विचार केला पाहिजे. रशियन सैन्य जर सुरक्षितपणे बैकल सरोवराशेजारच्या डोंगराळ प्रदेशांत येऊन पोचले तर जपानने विजयश्री गमावल्यासारखेच होईल. कारण बैकल सरोवरापर्यंत रशियाचा पाठलाग करून त्या दुर्गम प्रदेशांत त्याचा पराजय करणे ही फार अवघड गोष्ट आहे. रशियन सैन्याचा पाठलाग करून जय मिळविण्याची योजना नेपोलियनच्या कटु अनुभवानंतर कोणताहि शहाणा सेनापति करणार नाही. पुनः बैकल सरोवर हे डेरेन बंदरापासून दीड हजार मैलांवर असल्याने युद्धारंभी जपानच्या अनुभवाला न आलेल्या दळणवळणाच्या अडचणी जपानी सैन्याला जाणवू लागतील व तितक्या प्रमाणांत रशियाला बैकल सरोवर जवळ असल्याने त्याला सैन्य व युद्धसामुग्री यांचा पुरवठा करणें सुकर होईल. या प्रदेशांतील रशियन सैन्यावर दोन बाजूंनी हल्ला करून किंवा त्याच्या दळणवळणाच्या मार्गावर हल्ला करून त्याला कचाटयांत पकडणे शक्य नसल्याने या युद्धक्षेत्रांत शत्रूंवर सामान्यतः आघाडीचेच हल्ले करणें जरूर आहे आणि सर्व हल्लयांत आघाडीचे हल्ले हे चढाई करणाऱ्या सैन्याला अतिशय महाग पडतात; त्याचप्रमाणे रशियासारख्या अतिविस्तृत देशावर चढाई करू इच्छिणाऱ्या राष्ट्राजवळ जितकीं विमाने, टँक्स व यंत्रचालित सैन्याच्या डिव्हिजन्स असणें जरूर आहे, त्या मानाने जपानची युद्धसामुग्री अगदी कोती

पडत असल्याने जपानला वाटेल तितक्या अंतरापर्यंत रशियांत घुसणे शक्य नाही. आर्थिक परिस्थितीच्या दृष्टीनेहि जपानला बिनमुदत युद्ध चालविणे शक्य नाही. या साऱ्या कारणांसाठी रशियाने जर बैकल सरोवरापर्यंत यशस्वी पिछेहाट करून घेतली तर जपानने शक्य तितक्या लवकर रशियाशी तह करणेंच इष्ट होईल. जपानच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने पॅसिफिक समुद्रकिनाऱ्यालगतचा पूर्वसायबेरियाचा प्रांत व साघालिन बेट इतका रशियाचा मुलूख त्याला मिळाला तरी पुरे आहे. बैकल सरोवरापर्यंतचा मुलूख व्यापून युद्धशास्त्रदृष्ट्या अगदी सुरक्षित अशी सरहद्द प्राप्त करून घेण्याचा कार्यक्रम थोडा लांबणीवर पडला तरी चालेल.

—केसरी, ता. ९ एप्रिल, १९३७.



# स्पॅनिश युद्धापासून आलेला लष्करी अनुभव

स्पेनमधील यादवीमध्ये इटाली, जर्मनी व रशिया या तीन देशांच्या सरकारांनी अगदी आरंभापासून भाग घेतला आहे आणि त्या त्या देशांच्या लष्करी अधिकाऱ्यांनी आपापल्या सरकाराला स्पॅनिश युद्धापासून आलेल्या अनुभवाविषयी सविस्तर रिपोर्टहि पाठविले आहेत. या रिपोर्टांतील माहितीच्या आधारावर जर्मनीचे 'मिलिटेर व्होखेनब्लाट' व 'डायट्शे व्हेर', रशियाचे 'क्रास्नाय झ्वेझ्दा' आणि 'व्होइना ई रेव्होल्युत्सिया' इटालीचे 'रिव्हिस्ता आएरोनाउतिका', व 'जिओर्नाले दितालिया' इत्यादि वर्तमानपत्रांतून व मासिकांतून महत्त्वाचे लेखहि आले आहेत. आधुनिक युद्धशास्त्राचा अभ्यास करू इच्छिणाऱ्यांना ही सारी पत्रे अतिशय उपयुक्त आहेत. आणि जागतिक युद्धाचा काळ जवळ येत चालल्याने आतां दिवसेदिवस युद्धशास्त्राचे महत्त्व वाढतच जावयाचे आहे. त्याचप्रमाणे हिंदुस्थानाच्या संरक्षणाची जबाबदारीहि लौकरच हिंदुस्थानांतील तरुणांच्या शिरावर यावयाची आहे. अशा परिस्थितींत हिंदुस्थानांतील तरुणांनी जगांतील लष्करी घडामोडींचा पद्धतशीर अभ्यास करणे आवश्यक आहे.

## अनुभाविक अधिकाऱ्यांचा अभाव

स्पॅनिश युद्धापासून आलेल्या अनुभवाचा विचार करताना प्रथम एका प्रचलित गैरसमजुतीचे निराकरण केले पाहिजे. सामान्य लोकप्रवाद असा आहे कीं, ज. फ्रांकोने बडाचें निशाण उभारल्याबरोबर स्पेनमधील बहुतेक सेनापति आपापल्या सैन्यासह त्याला सामील झाले व स्पेनमधील खड्या सैन्याच्या जोरावरच ज. फ्रांकोला इतके यश मिळाले आहे. मेजर जनरल टेंपर्ले, कॅप्टन लिडेल हार्ट इत्यादि नामांकित युद्धशास्त्रज्ञांनीहि ही गोष्ट गृहीत धरली आहे. पण वास्तविक स्थिति याच्या अगदी उलट आहे. लष्करांत बंड घडवून आणावयाचें असल्यास कटवाल्यांनी वरिष्ठ लष्करी अधिकाऱ्यांवर कधीहि विश्वास टाकूं नये, हा क्रांतियुद्धांतला पहिला नियम आहे. पण ज. फ्रांको हा स्वतःच सेनापति असल्याने

व चार-पांच सेनापतिच त्याचे प्रमुख कार्यकर्ते असल्याने त्या सर्वांचें या पहिल्या नियमाकडे दुर्लक्ष झाले व त्याचा परिणाम असा झाला की बुर्गोस, व्हाल्लादोलिद, सांतांदेर, व्हालेन्सिया, सेत बास्तिआं, मोरोक्को, इत्यादि ठिकाणच्या सेनापतींनी फ्रांकोचा विश्वासघात केला. यांपैकीं बुर्गोस, व्हाल्लादोलिद व मोरोक्को येथील सेनापतींना फ्रांकोच्या अनुयायांनी पकडून मारून टाकलें. पण इतरत्र सेनापतींच्या विश्वासघातामुळे सोशालिस्टांच्या हाती सत्ता गेली. बंडाला सुरुवात होऊन पंधरा दिवस लोटल्यावर ज. फ्रांकोला असें दिसून आले की, अर्ध्याहून अधिक सैन्य, बहुतेक साऱ्या तोफा, दारूगोळा आणि चिलखती गाड्या सोशालिस्टांच्या बाजूला मिळाल्या असून स्पेनमधील तीनचतुर्थांश मुलूख सोशालिस्टांच्याच हाती राहिला आहे. अशा वेळी सोशालिस्टांनी जर आपल्या पक्षाला चिकटून राहिलेल्या सैन्यांवर विश्वास टाकला असता, तर त्यांना अल्पावधीतच राष्ट्रीय पक्षाचें बंड चिरडून टाकतां आले असते. पण बंडाच्या पूर्वीपासूनच लष्करी अधिकाऱ्यांचा संशय सोशालिस्टाच्या मनांत भिनला होता व बंडाच्या धक्क्यामुळे त्यांचा विवेक सुटून त्यांनी आपल्या पक्षाला चिकटून राहिलेल्या अधिकाऱ्यांचे खून पाडण्याला सुरुवात केली! त्याचा परिणाम असा झाला की, सोशालिस्टांच्या सैन्यांत अवघे दोनचारशेच अनुभविक अधिकारी शिल्लक राहिले, बाकीचे पळून जाऊन राष्ट्रीय पक्षाला सामील झाले, किंवा सोशालिस्टांच्या गोळ्यांना बळी पडले! ज. फ्रांकोच्या पक्षाला इतके यश लाभण्याचे एक प्रमुख कारण म्हणजे अनुभविक दुय्यम अधिकाऱ्यांचा पाठिंबा होय. चांगल्या दुय्यम अधिकाऱ्यांच्या अभावी किंवा त्यांच्यावरील विश्वासाच्या अभावी संख्येने बलिष्ठ असलेल्या सैन्याची कशी दुर्दशा होते, याचें उत्कृष्ट निदर्शन माद्रिद सरकारचे सैन्य होय.

## विमानांतून आरमारावर हल्ला

बंडाच्या सुरुवातीलाच सोशालिस्टांनी आपल्या आरमाराकडून मोरोक्कोच्या किनाऱ्याची नाकेबंदी करून ज. फ्रांकोला त्याच्या सैन्यासकट मोरोक्कोंत कोंडून टाकलें. ही नाकेबंदी जर तशीच चालू राहिली असती तर सोशालिस्टांना राष्ट्रीय पक्षाच्या स्पेनमधील सैन्याचा विध्वंस करणें अगदी सुलभ झालें असतें. हे संकट टाळण्यासाठी ज. फ्रांकोच्या विमानांनी कोंडमारा करणाऱ्या

आरमारावर सतत हल्ले करून त्याला इतकी दहशत बसविली की माद्रिदच्या सरकाराला मोरोक्कोच्या किनाऱ्यावरील आपले आरमार काढून घ्यावे लागले. आरमार आणि विमाने यांच्या युद्धात आरमार नामोहरम होण्याचा हा पहिलाच प्रसंग असल्याने या युद्धाने भूमध्य समुद्रावर आधिपत्य गाजविणाऱ्या आरमारांना काळजी उत्पन्न झाली असल्यास नवल नाही.

मोरोक्कोच्या किनाऱ्यावरील आरमार हाकून देण्यापूर्वीच ज. फ्रांकोने विमानांतून स्पेनला सैन्य पाठवून माद्रिदसरकारला कसे चकित करून सोडले हे सामान्यतः सर्वांनाच माहीत आहे. पण फ्रांकोच्या विमानांनी माजोर्का बेटांत माद्रिद सरकारच्या आठ हजार सैन्याचा कसा पराजय केला ही हकीकत तितकी प्रसिद्ध नाही. १९३६ च्या ऑगस्ट महिन्यांत बार्सेलोना येथील सोशालिस्ट सेनापतींनी फ्रांकोच्या ताब्यांत गेलेले माजोर्का बेट परत घ्यावयाचे ठरवून त्या बेटावर आठ हजार सैन्याची एक तुकडी पाठविली. ही तुकडी निर्विघ्नपणें बेटावर उतरली व त्यानंतर झालेल्या चकमकीत फ्रांकोच्या सैन्याचा पराभवहि झाला. आता बार्सेलोनाहून आलेले सैन्य माजोर्का बेटाचा कबजा घेणार इतक्यांत फ्रांकोच्या विमानांनी त्या विजयोन्मत्त सैन्यावर हल्ला करून त्याचा इतका विध्वंस केला की, थोड्याच वेळाने शिलकी सैन्य माजोर्का बेट सोडून बार्सेलोनाला पळून आलें. युद्धशास्त्राच्या दृष्टीने फ्रँकोच्या विमानांचा हा जय फार महत्त्वाचा आहे.

याच्या इतकीच महत्त्वाची कामगिरी गुआदालायाराच्या लढाईत माद्रिद सरकाराच्या विमानांनी बजाविली आहे. या लढाईत सोशालिस्टांच्या विमानांनी आपल्या सैन्यावर हल्ला करून येत असलेल्या ज. फ्रांकोच्या चिलखती गाड्यांवर आकाशांतून बॉंब टाकून त्यांचा विध्वंस केला व नंतर राष्ट्रीय पक्षाच्या सैन्यावर प्रतिहल्ला करून त्याचा सपशेल पराभव केला. या विधानाची थोडी अधिक चर्चा करणें आवश्यक आहे. कारण मेजर जनरल टेंपर्ले यांनी मेजर जनरल फुल्लर यांच्या लंडन टाइम्समधील एका पत्राच्या आधारे असे विधान केलें आहे की स्पेनमधील कोणत्याच लढाईत दोन्ही पक्षांनी हल्ला करण्याच्या प्रसंगीं १५ हून अधिक चिलखती गाड्या एका वेळी उपयोगांत आणल्या नव्हत्या. पण हें विधान फ्रान्स व रशिया या देशांतील युद्धशास्त्रज्ञांच्या माहितीवरून चुकीचें

दिसते. कारण या लढाईत जर्मन आणि इटालियन चिलखती गाड्यांच्या तुकड्यांनी सोशालिस्टांच्या सैन्यावर हल्ला केला असता तो हल्ला रशियन विमानांनी मोडून काढला व त्यानंतर रशियाच्या चिलखती गाड्या व विमाने यांनी एकजुटीने फ्रांकोच्या वतीने लढणाऱ्या इटालियन सैनिकावर हल्ला करून त्यांचा पूर्ण पराभव केला, अशी माहिती फ्रेंच आणि रशियन लष्करी अधिकाऱ्यांनी प्रसिद्ध केली आहे. या माहितीला जनरल फ्रांकोच्या अधिकाऱ्यांनी दुजोरा दिला आहे. ते म्हणतात "आम्हांला रशियाच्या चिलखती गाड्यांचे मात्र अतिशय भय वाटते. असल्या दोनशे गाड्यांनी जर आमच्या सैन्यावर संघटित हल्ला केला तर आमच्या सैन्याचा तेव्हाच चक्काचूर उडून जाईल." स्पेनच्या युद्धांत चिलखती गाड्या अयशस्वी ठरल्या आहेत, असे समजणाऱ्यांचा भ्रम फ्रांकोच्या अधिकाऱ्यांच्या या उद्गारांमुळे दूर होईल.

## चिलखती गाड्या व त्यांचा बचाव

ही गोष्ट खरी आहे की, गेल्या महायुद्धांत चिलखती गाड्यांचा प्रतिकार करण्याला कोणतेच साधन नव्हते, तशी असहाय अवस्था मात्र आता उरलेली नाही. यामुळे गेल्या युद्धांतल्या पद्धतीनेच चिलखती गाड्यांचा उपयोग करणें आता शक्य नाही. एकतर या चिलखती गाड्यांवर प्रतिपक्षियांची विमाने बॉब टाकून त्यांचा विध्वंस करणार नाहीत, अशी काळजी घेतली पाहिजे. याला एक उपाय म्हणजे रात्रीच्या अंधेरांत किंवा पहाटेच्या दाट धुक्यांतच चिलखती गाड्यांचा हल्ला करणे व दुसरा उपाय म्हणजे आपल्या वैमानिकांनी शत्रूंच्या बॉंब फेकणाऱ्या विमानांना पिटाळून लावणे हा होय. दुसरी गोष्ट म्हणजे चिलखती गाड्या फोडणाऱ्या ज्या तोफा अलीकडे निघाल्या आहेत त्या तोफांवर मारा करून त्या बंद पाडणें. ही गोष्ट फारशी अवघड नाही, असे विशेषज्ञांचे मत आहे. शेवटची महत्त्वाची गोष्ट म्हणजे शत्रूंच्या मोर्चांत शिरल्यावर शत्रूंच्या पायदळाने चिलखती गाड्यांना आगी लावूं नयेत, अशी व्यवस्था करणे होय. याला दोन उपाय आहेत. एकतर चिलखती गाड्या मोठ्या प्रमाणावर वापरणें व अशा रीतीने त्यांना आगी लावणें अवघड करणे आणि दुसरा उपाय म्हणजे चिलखती गाड्यांच्या पाठोपाठच त्यांच्या संरक्षणासाठी पायदळाची

तरतूद करणे. या साऱ्या उपायांचा अवलंब केल्याशिवाय आणि स्वतः चिलखती गाड्यांचे चिलखत अधिक बलिष्ठ केल्याशिवाय मात्र त्यांच्यापासून पुरेसा लाभ होणें अशक्य आहे, असा सध्याच्या स्पॅनिश युद्धांतील अनुभव आहे. अमेरिकेचे एक प्रमुख सेनापति ज. क्रेग यानींहि असाच अभिप्राय नुकताच दिला आहे.

## विमानांचा उपयोग

मेजर जनरल टेपर्ले यांच्या फॉरेन अॅफेयर्समधील लेखांत त्यांनी डेली टेलिग्राफच्या बातमीदाराचा एक उतारा घेतला आहे. त्यांत तो बातमीदार म्हणतो,

'Not once have I seen an air-raid combined with an infantry attack The planes pass, drop their loads on the enemy's trenches and vanish. An air-raid can only last a few minutes, an artillery bombardment can go on for days.'

हा लेखक म्हणतो त्याप्रमाणे, स्थिर लक्ष्यावर स्फोटक द्रव्यांचा वर्षाव करण्याच्या बाबतीत विमाने तोफांची बरोबरी करूं शकत नाहीत, ही गोष्ट खरी आहे. पण त्याबरोबर हेहि लक्षांत घेतले पाहिजे की विमानांचे कार्यक्षेत्र अगदी भिन्न आहे. खदक किंवा तटबंदी यांच्या आश्रयाने लढणाऱ्या शत्रूला तोफा व चिलखती गाड्या यांच्या साहाय्याने पायदळाने त्यांच्या आश्रयस्थानामधून हुसकून दिल्यानंतर शत्रूचा पाठलाग करून त्याचा पुरता विध्वंस करण्याचे घोडदळाचे पूर्वीचे कार्य आता वैमानिक दलाकडे आले आहे. हे कार्य विमाने किती उत्कृष्ट रीतीने बजावू शकतात, याचा अनुभव पूर्वी पॅलेस्टाइनच्या लढाईत आलाच होता व तोच अनुभव आता बिल्बाओच्या लढाईने अधिक दृढ झाला आहे. यापुढे रणांगणावर एकवार फळी फुटलेल्या सैन्याला यशस्वी पिछेहाट करून घेऊन व आपल्या सैन्याची पुनर्रचना करून शत्रूला फिरून तोंड देणें अत्यंत दुष्कर होणार आहे. विमानांचा केवळ पाठलागाच्या वेळीच उपयोग होतो असे नाही. समोरासमोरील लढाई चालू असता मुख्यतः प्रतिहल्ला करतांना वैमानिक दळाचा पायदळाला आतिशय उपयोग होतो. गुआदालायाराच्या लढाईत अशा प्रकारें सोशालिस्ट सैन्याने विमानांचा उपयोग केल्याचा उल्लेख वर आलाच आहे. तरी देखील वैमानिक दळाने जमिनीवरील

लढाईत भाग घेण्याच्या तत्त्वावर फ्रेंच आणि रशियन सेनापतींचा विश्वास अद्यापि बसलेला नाही. इटालियन आणि विशेषतः जर्मन सेनापतींची या तत्त्वावर विशेष श्रद्धा आहे व त्या दृष्टीने जर्मन वैमानिकदलाची कवाईत चालू आहे. शेकडो विमानांनी एकाच वेळी एका ठराविक लक्ष्यावर बॉम्बचा वर्षाव करून ठरलेल्या ठिकाणी परत येणे व दिवसातून अनेक वेळा याप्रमाणे हल्ले करणे या गोष्टी आता जर्मन वैमानिकदलाच्या अंगवळणी पडल्या आहेत. फ्रांकोच्या सैन्यांतील एक अधिकारी म्हणतो 'जर्मनी आणि इटाली यांची पहिली विमाने रशियन विमानांपेक्षा खालच्या दर्जाची असून सुद्धा त्याच्या विशिष्ट कवायतीमुळे रशियन विमानांचें त्यांच्यापुढे कांहीहि चालले नाही. रशियन वैमानिकांचे व्यक्तिशः शिक्षण जर्मन वैमानिकांपेक्षा अधिक झाले आहे. पण सांघिक हालचाली करण्यांत ते कुच-कामाचे आहेत.'

## यंत्रचालित सैन्य व यांत्रिक सैन्य

अलीकडे सर्व राष्ट्रांनी घोडदळे कमी करून आपापल्या सैन्यांतून Motorized divisions आणि Mechanized Divisions अस्तित्वांत आणल्या आहेत. यांपैकी पहिल्या प्रकारच्या सैन्याला यंत्रचालित सैन्य व दुसऱ्या प्रकारच्या सैन्याला यांत्रिक सैन्य म्हणतां येईल. यंत्रचालित सैन्याच्या हालचाली लष्करी मोटारीतून होतात, पण प्रत्यक्ष लढाईच्या वेळी त्याला इतर पायदळाप्रमाणेच पायी लढावे लागते. यांत्रिक सैन्याच्या हालचाली चिलखती गाड्यांतून होतात व त्या सैन्याच्या लढायाहि त्याच गाड्यांतून होतात. यंत्रचालित सैन्याच्या हालचालीसाठी पक्के मोटारचे रस्ते आवश्यक असतात. यासाठीच सध्या-च्या रेल्वेयुगांत देखील लष्करी मोटारींच्या रहदारीसाठी पक्के रस्ते बांधण्याचे काम सर्व राष्ट्रांतून जारीने सुरू आहे. लष्करी हालचालीच्या सोयीसाठी बांधलेल्या या नव्या रस्त्यांमध्ये जर्मनीचे रस्ते सर्वांत श्रेष्ठ आहेत, ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. या नव्या रस्त्यांमुळे आपल्या युद्धसामर्थ्यांत मोठीच भर पडेल, या आशेने जर्मनीने त्यांच्यावर अब्जावधि मार्क खर्चले आहेत. पण स्पेनमधील युद्धाच्या प्रारंभी असें दिसून आलें की, या रस्त्यांवर विमानांतून बॉंबचा वर्षाव करणे फार सोपें असल्याने ते रस्ते यंत्रचालित सैन्यांच्या हालचालीला लवकरच निरुपयोगी होतात. या

अनुभवामुळे जर्मनीची लष्करी तयारी पूर्ण होण्याला एक नवेच विघ्न उपस्थित झाले आहे. कित्येक युद्धशास्त्रज्ञांचे तर आता असेच मत झालेले आहे की भावी युद्धांत केवळ यांत्रिक सैन्याचाच तेवढाच उपयोग होईल, यंत्रचालित सैन्याचा कांहीहि उपयोग होणार नाही.

## इंग्रज सेनापतींचा भ्रम

फॉरेन अफेर्यसमधील लेखांत मेजर जनरल टेपर्ले यांनी एक असमंजसपणाचे विधान केले आहे. त्या बाबतीत त्याच्या लेखाचा उतारा प्रथम देऊन मगच त्याची चिकित्सा केली पाहिजे,

"Another striking feature of the Civil War has been the importance of towns and villages as centres of resistance. The reason for the prominence of towns and villages as fortresses in the defence is perhaps due to the lack of large masses of artillery on both sides. But super-heavy artillery cannot be used to any extent so long as armies manoevre. Probably European General staffs will reflect upon this development concluding that towns and villages can be reconstructed into fortresses, as a result they will figure largely in schemes of defence like the Maginot line, saving the expenditure of vast sums of money."

वेढ्याच्या कामी लागणाऱ्या अवाढव्य तोफा जलद हालचाली करणाऱ्या सैन्याला आपल्या बरोबर नेता येणार नाहीत, हा इंग्रजी सेनापतीचा एक पुरातन भ्रम आहे. गेल्या महायुद्धाच्या वेळी देखील वेढ्याच्या तोफा जर्मन सैन्याला बरोबर बाळगता येणार नाहीत व युद्धाच्या प्रारंभीच लीज, नामूर, ॲंटवर्पसारखे किल्ले जर्मनांच्या हाती पडणार नाहीत असें इंग्रज सेनापतींना वाटत होतें. पण त्यांचे सारे अंदाज जर्मन सेनापतींनी चुकीचे ठरविले आणि आता तर अवजड तोफांना विमानांची मदत मिळण्याजोगी असल्याने विमानांतून आगलावे बॉंब आणि विषारी बॉंब यांचा वर्षाव करून टेपर्ले साहेबांच्या नव्या दुर्गांतील संरक्षक सैन्याचा निःपात करणें, पूर्वीपेक्षा अधिकच सुलभ होईल. चालू स्पॅनिश युद्धांत अवजड तोफा,

आगलावे बॉंब, विषारी बॉंब इत्यादि अति आधुनिक अस्त्रांचा अद्यापि उपयोग झाला नसल्यामुळे इंग्रज सेनापतींचा हा जुना भ्रम पुन्हा एकवार डोकें वर काढू पहात आहे, इतकेंच.

## चार महत्त्वाचे प्रश्न

असो, या प्रचलित युद्धापासून असले चुकीचे निष्कर्ष काढण्याऐवजी मुख्यत: पुढील प्रश्नांचा विचार करणे अधिक उपयुक्त होईल. एखाद्या राष्ट्राने आकस्मिक रीतीने युद्धास सुरुवात केली तर त्याला अल्पावधीतच प्रतिपक्षाचा विध्वंस करतां येईल काय ? सरहद्दीवरील आपल्या सैन्याची पिछेहाट झाल्यावरसुद्धा शंभर सव्वाशें मैलांची माघार खाऊन मग शत्रूला यशस्वी रीतीने तोंड देता येईल काय ? हाल-चालीच्या धावत्या लढाया सपून बैठ्या युद्धाला सुरुवात झाली म्हणजे शत्रूवर समोरून हल्ला करून त्याची फळी फोडणे शक्य आहे की नाही ? रणभूमीवर बैठें युद्ध सुरू झाल्यावर वैमानिक दलाने पिछाडीच्या शहरावर व प्रांतांवर हल्ला केला असता त्याचे परिणाम काय होतील ?

या साऱ्या प्रश्नांचा संक्षेपानेच विचार करणे येथे शक्य आहे. यांपैकीं पहिल्या प्रश्नाचे उत्तर होय, असेच आहे. युद्धाच्या प्रारंभी कुरापत काढणाऱ्या राष्ट्राला जर प्रतिपक्षाची एक किंवा अनेक सैन्यें वेढून त्यांचा विध्वंस करता आला तर संपूर्ण जय मिळून अल्पावधीतच युद्धाची समाप्ति होईल. स्पेनमधील ताज्या युद्धावरून देखील हेंच अनुमान निघते. या युद्धाच्या पहिल्या चार महिन्यांतच फ्रांकोने इतका मुलूख जिंकला की, गेल्या नोव्हेंबर महिन्यांत माद्रिद सरकार अगदी हातटेकीस आलें होतें. पण त्या सरकाराच्या सुदैवाने आयत्या वेळी त्याला परदेशाहून सैन्य आणि युद्धसामुग्री यांचा भरपूर पुरवठा झाला व खुद्द माद्रिद शहराचा बचाव करतां आला. माद्रिदचा बचाव होण्याचे दुसरें महत्त्वाचें कारण म्हणजे जनरल फ्रांकोनें प्रतिपक्षाचा मुलूख जिंकण्याकडे जितकें लक्ष पुरविलें तितकें त्याच्या सैन्याला वेढून त्याचा विध्वंस करण्याकडे पुरविलें नाहीं. यामुळे माद्रिद राजधानीच्या आश्रयाने आपल्या पराजित सैन्यांची पुनर्रचना करण्याला सरकारला अवकाश मिळाला. तेव्हापासून आतापर्यंत सोशालिस्टांनी यशस्वी रीतीने माद्रिदच्या आघाडीचें संरक्षण केलें आहे, पण हा केवळ योगायोग आहे.

या साऱ्या विवेचनावरून आपल्या दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर नकारार्थीच देणे अवश्य आहे, असाच निष्कर्ष निघतो.

हालचालींच्या धावत्या लढाया संपून बैठ्या युद्धाला सुरुवात झाली म्हणजे शत्रूंवर समोरून हल्ला करून त्याची फळी फोडणे शक्य आहे की नाही, या प्रश्नाचा विचार केला असता स्पॅनिश युद्धाच्या अनुभवावरून असे दिसून येते कीं, आधुनिक पद्धतीने मोर्चेबंदी केली असता व आघाडीवरील सैन्याला मागाहून अवश्य ती मदत मिळत असता बचाव करणाऱ्या सैन्याची फळी फोडणे अतिशय दुष्कर आहे. पण विमानांच्या टोळधाडीने जर आघाडीवर मदत पोचणे अशक्य झाले व सैनिकांच्या घरादाराची जर पाठीमागे राखरांगोळी होऊ लागली तर ते चिकाटीने आपली आघाडी सांभाळू शकत नाही.

## युद्धसामुग्री कोठून आली ?

आता स्पेनमधील युद्धांत वापरलेल्या युद्धसामुग्रीचा थोडासा विचार केला पाहिजे. या युद्धांतील बहुतेक सारी शस्त्रसामुग्री, इटाली, जर्मनी, रशिया, फ्रान्स व झेकोस्लोव्हाकिया या देशांनी स्पेनमधील युध्यमान पक्षांना पुरविली आहे. परदेशातून स्पेनला किती मोठ्या प्रमाणावर युद्धसामुग्री येत आहे, याची आपल्या देशांत कोणालाहि कल्पना नाही. यासाठी जिओर्नाले दितालिया, या पत्राने कांही आठवड्यांपूर्वी प्रसिद्ध केलेले रशियन मदतीचे आंकडे देत आहे. गेल्या मार्चेपासून मे महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यापर्यंत रशियाहून युद्धसामुग्रीने भरलेली २७८ जहाजें स्पेनला जाऊन पोचली. या जहाजांनी १६२ चिलखती गाड्या, १३० तोफा, ८६ एरोप्लेन, ३९५ मोटार लॉऱ्या, १२ विमानविनाशक तोफा व ३१४२० टन दारूगोळा व इतर युद्धसामुग्री माद्रिद सरकाराला पुरविली. त्यापूर्वी फेब्रुवारींत १०१ रशियन विमानें व ५० अवजड तोफा आल्याच होत्या. त्यानंतर अगदी अलीकडे १०० मोठ्या चिलखती गाड्या, ५७० मध्यमदर्जाच्या चिलखती गाड्या, २००० हलक्या दर्जाच्या चिलखती गाड्या, ४००० अव्वल दर्जाच्या यांत्रिक तोफा व ६००० दुय्यम दर्जाच्या यांत्रिक तोफा व ३०० एरोप्लेन विमानें इतकी सामुग्री एकट्या रशियानेच स्पेनला पुरविली आहे. याच प्रमाणावर इतर राष्ट्रांनीहि आपापली सामुग्री स्पेन-

मधील एका नाही तर दुसऱ्या पक्षाला पुरवून तिची परीक्षा करून पाहिली आहे.

## कोणाचीं हत्यारें सरस ठरलीं ?

या साऱ्या युद्धसामुग्रीत रशियाची कातिउस्का ही बॉंब टाकणारी विमाने व मोठ्या चिलखती गाड्या सर्वोत्कृष्ट आहेत असे सर्वांचे मत झाले आहे. जर्मनीचीं युंकेर व इटालीची काप्रोनी आणि साव्होइया ही बॉंब फेकणारी विमाने अगदी रद्दी ठरली आहेत. जर्मनीच्या २२ मिलिमीटरच्या विमानविनाशक तोफेची सर्वजण स्तुति करतात, मात्र या तोफेचा शोध जपानने प्रथम लावला असून मग जर्मनीशीं सख्य झाल्यामुळे या तोफेचे पेटंट जर्मनीला दिले, ही गोष्ट ते विसरतात. चिलखती गाड्यांवर मारा करण्याच्या जर्मन तोफाहि उत्कृष्ट आहेत. पण अवजड तोफांच्या बाबतीत जर्मनी आता इतर राष्ट्रांच्यापुढे नाही, हीहि गोष्ट स्पॅनिश युद्धावरून उघड झाली आहे. या युद्धांतील अनुभवावरून जर्मनीने बांधलेली नवी डोर्नीएर विमानें मात्र रशियन विमानांच्या तोडीचीं आहेत. या युद्धांत मध्यंतरीं चांचेगिरी करून इटालीने आपल्या पाणबुड्या बोटीचीहि परीक्षा करून घेतली व त्या बोटीहि अतिशय कार्यक्षम आहेत असा अनुभव आला आहे. जर्मनी व इटाली यांच्या चिलखती गाड्या निरुपयोगीच ठरल्या आहेत. जर्मनीच्या दारूगोळ्यापैकीं सुमारे अर्धे गोळे उडत नाहीत, असे आढळून आल्याने जर्मनीच्या युद्धखात्यांत बरीच तारांबळ झाली आहे !

## दोन परस्परविरोधी मतें

स्पॅनिश युद्धापासून आलेला अनुभव सांगतांना कॅ. लिडेल हार्ट हे म्हणतात,

"The development of the war in Spain is symptomatic of the general trend of modern warfare. This serves to blow away sentimental vapourings about the heroic virtues of war utilized by militaristic nations in generating a warlike spirit among their people. The most virile and most united peeple would not be able to withstand another nation or even a mere party inferior to it in all natural qualities, if the latter had some decisively superior technical appliance."

या निराशावादी लेखकांच्या रडगाण्यांत नावीन्य कांही सुद्धा नाही. मनुष्याने जांबुवंती कुस्ती करण्याचे सोडून हातांत शस्त्र घेतल्या दिवसापासून आतापर्यंत लढाईने शौर्यवीर्यादि गुणांची खरी कसोटी होत नाही असे प्रतिपादणारे सहस्रावधि झाले आहेत. कोणत्याहि नवीन शस्त्राचा शोध लागला की यांना आपले रडगाणे गाण्याला पुन्हा उत्तेजन येते. या निराशावाद्यांना उत्तर देताना मेजर जनरल सर फ्रेड्रिक मॉरिस यांनी एकदा म्हटले आहे,

" No weapon from David's sling to mother tank has yet revolutionized war though the claim has been made for scores of inventions during my life."

## शौर्य–धैर्यादि सद्गुणांचा उपयोग आहेच

नव्या शस्त्रांच्या शोधाचा परिणाम इतकाच होतो की, जी राष्ट्रे त्यांचा तत्परतेने स्वीकार करीत नाहीत, त्यांचा विनाश होतो. नवीनाचे स्वागत करण्याइतका जिवतपणा ज्यांच्या बुद्धीत उरला नसेल, त्यांनी विलयाला जाणे हे सृष्टिक्रमाला धरूनच आहे, त्याबद्दल निष्कारण हाहाःकार करीत बसण्यांत कांहीहि अर्थ नाही. आजच्या या अति भयंकर शस्त्रांमुळेसुद्धा मनुष्याच्या अंगच्या शौर्य, धैर्य, निग्रह, तत्त्वनिष्ठा इत्यादि गुणांचा लोप झालेला नाही; याचें प्रत्यंतर कोणाला पहावयाचे असेल, तर त्यांनी या युद्धांतील आल्काझारच्या वेढ्याचीं वर्णनें वाचावींत. या वेढ्यामध्ये सोशालिस्टाच्या विमानांतून नेहमी बॉम्बचा वर्षाव होत असता, पायाखाली सुरुंग खोदले जात असता, चारी बाजूंनी तोफांचा भडिमार होत असता, ठाण्यांतील अन्न सरलें असता, फार काय खालून सुरुंग उडवून देऊन व चारी बाजूंनी पेट्रोलच्या साहाय्याने आगी लावून सर्वांना होरपळून मारण्याचा प्रतिपक्षाने प्रयत्न केला असताहि आल्काझारमधील फ्रांकोच्या लढाऊ सैनिकांनीच नव्हे तर त्यांच्या बायकामुलांनी सुद्धा जें अलौकिक धैर्य व शौर्य प्रकट केलें त्याला जगाच्या इतिहासांत क्वचितच तोड मिळेल.

—केसरी, ता १४ डिसेंबर, १९३७.



# युद्धोपयोगी पदार्थांचा पुरवठा व हिंदुस्थान

गेल्या महायुद्धांत जर्मनीला युद्धसामुग्री तयार करण्याला आवश्यक असलेल्या अनेक धातूंचा व इतर द्रव्यांचा फार तुटवडा पडला होता. अशा तऱ्हेचा तुटवडा पुनः पडूं नये, याकरिता जर्मनीने निकराचे प्रयत्न चालविले आहेत. तरीदेखील भावी महायुद्धातहि जर्मनीला तसाच तुटवडा पडेल, असा अंदाज 'फॉरेन ॲफेयर्स' या नामांकित अमेरिकन त्रैमासिकांत प्रो. सी. के. लाइट या भूगर्भशास्त्रज्ञांनी प्रसिद्ध केला आहे. हा अंदाज कितपत खरा आहे, याची थोडीशी चिकित्सा या लेखांत करावयाची आहे.

युद्धोपयोगी खनिज पदार्थांमध्ये खनिज तेले, लोखंड, तांबे, ॲल्युमिनियम, ॲंटिमनी, क्रोमाइट, शिसे, मॅग्नेसाइट, मॅंगेनीज, अभ्रक, निकेल, फॉस्फेट, पारा, गंधक, टिन आणि टुंग्स्टेन हे पदार्थ प्रमुख आहेत. यांपैकी पहिल्या तीन पदार्थांचा युद्धामध्ये फार मोठ्या प्रमाणावर व्यय होतो. यामुळे दोनतीन वर्षे युद्ध चालविण्याइतका या पदार्थांचा शांततेच्या दिवसांत संग्रह करून ठेवणे अशक्य आहे. इतर पदार्थांचा पुरवठा जर स्वदेशांतून होण्याजोगा नसला, तर बलाढ्य राष्ट्रांना त्यांचा पुरेसा संग्रह करून ठेवणे शक्य आहे.

### लोखंडाचे बाबतींत पारतंत्र्य ?

जर्मनीच्या लोखंडाच्या पुरवठ्याविषयी प्रो. लाइट म्हणतात 'युद्धापूर्वी फ्रान्सचा लोरेन प्रांत जर्मनीच्या ताब्यांत होता व त्या वेळी जर्मनीला लागणाऱ्या लोखंडापैकी सुमारे ९२ टक्के लोखंड आपल्या ताब्यांतील मुलखांतून मिळत असे. पण महायुद्धांतील पराजयामुळे लोरेन प्रांत जर्मनीच्या हातांतून गेला. यामुळे जर्मनीला लागणाऱ्या लोखंडाचा फक्त तिसरा हिस्साच आता स्वदेशांतील खाणींतून किंवा जुने-पुराणें लोखंड वापरून मिळतो. हे प्रमाण ४० टक्क्यांपर्यंत वाढविता येईल असा अंदाज आहे, पण त्यामुळे लोखंडाच्या पैदाशीचा खर्च भलताच वाढेल. सध्याच कमी दर्जाच्या लोखंडाच्या खाणींतून लोखंडाची पैदास करावी

लागत असल्यामुळे जर्मनीला लोखंड गाळण्याचा खर्च दुप्पट येतो व हे प्रमाण अधिकच वाढण्याचा संभव आहे.' यासाठी या प्रोफेसरांनी आपला सिद्धांत सांगितला आहे—

'In short, Germany has slightly lessened her need of foreign ores but this has been done at excessive cost and there is no prospect that she can free herself of dependence on foreign sources, principally Sweden for about·60% of her supply.'

## वाढती पैदास

प्रो. लाइट यांची ही माहिती खरी असती, तर जर्मनीला युरोपांत अग्रपूजेचा मान मिळविण्याची महत्त्वाकांक्षा सोडूनच द्यावी लागली असती. पण वास्तविक प्रकार असा आहे की, १९३५ सालीं जर्मनीला स्वदेशांतून सुमारे साठ लक्ष टन लोखंडाचा पुरवठा झाला व परदेशाहून सुमारे १८५ लक्ष टन लोखंड आणावे लागले. १९३६ सालांतील जर्मनीची लोखंडाची पैदास ७५ लक्ष टन आहे व १९३७ साली तर हा आंकडा ९६ लक्ष टनांवर गेला आहे. १९३२ साली जर्मनीची लोखंडाची पैदास अवघी १३ लक्ष टन होती, ही गोष्ट लक्षांत घेतल्यास जर्मनीचा लोखंडाचा धंदा किती झपाट्याने वाढत आहे, याची किंचित् कल्पना येईल. हेर हिटलेर यांनी तर आपल्या ता. २० फेब्रुवारीच्या भाषणांत सांगितले आहे.

'By 1940 through the measures which have already been put into force, it will reach 20 million tons and to this must be added the Four Year plan which is being carried out by Goering and which will alone reach a total of 21 million tons. Therefore, in 1940 the production of iron as compared to 13 lac tons in 1932, will reach a total of between 41 and 45 million tons.'

## दुष्काळ नव्हे, अजीर्ण

हा आंकडा जर्मनीच्या आजच्या गरजेच्या दीड पटीहून अधिक आहे. याशिवाय स्वीडनहून जर्मनीला कसल्याहि परिस्थितींत एक कोटि टन लोखंड

मिळणे अगदी सुलभ आहे. पुनः हीहि गोष्ट येथे लक्षांत घेणे जरूर आहे कीं, हेर हिटलेर यांनी सांगितलेले वरील आंकडे जर्मनीने ऑस्ट्रिया देश खाण्यापूर्वीचे आहेत. ऑस्ट्रियांतील लोखडाच्या खाणींविषयी एक माहितगार इंग्रज लेखक म्हणतो,

" The iron–ore deposits worked by the Alpin–Montan Company are estimated at well over 200 million tons with an iron–content of about 30 per cent. The Company's production in 1937 was 1,800,000 and owing to the character of the deposits which are easily workable this production can without much difficulty be doubled and even trebled. "

या साऱ्या माहितीवरून जर्मनीत लोखंडाचा दुष्काळ पडण्याऐवजी त्या राष्ट्राला लोखंडाचे अजीर्ण होण्याचा संभव अधिक दिसत आहे. लोखंडाच्या पैदाशीवरच पोलादाची पैदास अवलंबून असल्यामुळे जर्मनीतलि पोलादाच्या पैदाशीचे आंकडेहि येथेच सांगून टाकणे सोयीचे होईल. १९३३ साली जर्मनीत सुमारे ९६ लक्ष टन पोलाद तयार झाले, तर १९३७ साली हा आंकडा १९२ लक्ष टनांवर गेला आहे व हेर हिटलेर यांनी जाहीर केले आहे की, १९३८ साली जर्मनीतील पोलादाची पैदास २१० लक्ष टनांवर जाईल. जर्मनीचे नेते म्हणतात–

" Germany is second only to the U. S. A. as the greatest steel country in the World. "

## तांब्याचें बाबतींत परावलंबन

तांब्याच्या बाबतीत मात्र जर्मनी अधिक परावलंबी आहे. १९३६ साली जर्मनीत अशुद्ध तांबें सुमारे पांच लक्ष टन व ताब्याचे पत्रे दोन लक्ष टनांचे आले. स्वतः जर्मनीतील खाणीतून अवघ्या २८ हजार टन तांब्याची पैदास झाली. प्रो. लाइट यांनी असें विधान केले आहे की जर्मनीला लागणाऱ्या तांब्यापैकी १४ टक्के तांबें आजच जर्मनीच्या खाणीतून निघते व हें प्रमाण २५ टक्के करण्याची जर्मनीची उमेद आहे. हे विधान जर्मनीतील तांब्याच्या आयातीचे व पैदाशीचे वर जे आंकडे दिले आहेत, त्यांच्याशी विसंगत आहे. शिवाय हेर हिटलेर यांच्या

भाषणांत तांब्याच्या पैदाशीच्या वाढीचा उल्लेखहि नाही, यामुळे ते संशयास्पद वाटते. जर्मनीच्या शेजारी युगोस्लाव्हिया देशांत तांब्याच्या खाणी आहेत. पण त्या खाणीची पैदास फार थोडी आहे व त्या खाणीहि फ्रेंच कंपन्यांच्या मालकीच्या आहेत. यामुळे युद्धाच्या वेळी जर्मनीला त्या खाणीचा उपयोग होण्याची आशा नाही. सध्या स्पेनमधील तांब्याच्या खाणीकडे जर्मनीची लुब्धदृष्टि वळली आहे. स्पेनचे तांबेहि प्रत्यक्ष युद्धाच्या वेळी जर्मनीला मिळू शकेल की नाही, याची वानवाच आहे. एकदरीने विचार करून पाहता तांब्याच्या बाबतीत जर्मनीला मुख्यतः आपल्या संग्रहावर व अंशतः हॉलंडकडून होणाऱ्या पुरवठ्यावर अवलंबून रहावे लागेल असे दिसते.

## भूगर्भाची पहाणी

खनिज तेलाच्या बाबतीत जर्मनी लवकरच स्वावलंबी होईल असे वाटते. १९३६ साली जर्मनीच्या खाणीतून १६ लक्ष टन खनिज तेल निघाले व ३५ लक्ष टन खनिज तेल परदेशांहून आणावे लागले. १९३७ साली जर्मनीच्या खाणीतून ४॥ लक्ष टन पेट्रोलियम निघाले. पेट्रोल वगैरे शुद्ध केलेली हलकी तेले सुमारे १५ लक्ष टन उत्पन्न झाली. याशिवाय दिव्याचे तेल ३। लक्ष टन, उष्णता उत्पन्न करण्याचे तेल ३। लक्ष टन, यंत्रांना लागणारे तेल १॥ लक्ष टन इत्यादि अनेक प्रकारची तेले तयार झाली. तरीदेखील खनिज तेलांची गरज अधिकाधिक वाढत असल्याने जर्मनीला अजून सुमारे ३० लक्ष टन पेट्रोलियम परदेशाहून आणावे लागते. पण चतुर्वार्षिक योजना पूर्ण झाली म्हणजे जर्मनी आपल्या नेहमीच्या गरजेपुरता स्वावलंबी होईल, असा अंदाज आहे. खनिज पदार्थांच्या बाबतींत जर्मनी शक्य तितका स्वावलंबी व्हावा, या हेतूने जर्मनीच्या नेत्यांनी आपल्या देशाच्या भूगर्भाची पद्धतशीर पाहणी आरंभिली आहे. ही पाहणी करणाऱ्या शास्त्रज्ञांनी आतापर्यंत सुमारे १५०० भिन्न भिन्न ठिकाणीं दोन ते तीन हजार फुटांपर्यंत खोल खणून जर्मनीच्या भूगर्भात अजून कोणकोणतीं द्रव्ये दडून राहिली आहेत, याचा शोध चालविला आहे. नीनहागेन या ठिकाणी तर दहा हजार फुटांपर्यंतच्या भूगर्भाची छाननी झाली आहे. या अति विस्तृत पाहणीमुळे आजपर्यंत अज्ञात असलेल्या अनेक खनिज तेलाच्या खाणी तर उजेडांत येत

आहेतच. त्याशिवाय जगाच्या भूगर्भाच्या ज्ञानांत अपूर्व भर पडत आहे. असो, जर्मनीला नित्य गरजेइतके पेट्रोलियम या पाहणीमुळे मिळण्याचा संभव दिसत असला, तरी युद्धकालीन गरजेइतके खनिज तेल मिळण्याचा तूर्त तरी संभव दिसत नाही. युद्धकालीन गरज भागविण्यासाठी जर्मनीला देशांतील तेलाच्या सांठ्यावर आणि रूमानिया, हंगेरी व पोलंड या देशांतील खाणीवरच अवलंबून रहावे लागेल.

## धातूंची पैदास

वर उल्लेखलेल्या पाहणीमुळे जर्मनीची फक्त खनिज तेलाचीच पैदास वाढली आहे असे नसून इतर अनेक धातूंच्या उत्पादनांतदेखील त्या पाहणीमुळे जमीन-अस्मानाचा फरक पडला आहे. उदाहरणार्थ, जर्मनीत निकेल मुळीच नाही, अशी आजपर्यंत सर्वांची समजूत होती. जर्मनीला निकेलचा पुरवठा आतापर्यंत कानडा, ग्रीस आणि हिंदुस्थान या देशांतून होत असे. १९३६ साली जर्मनीत १८ हजार टन अशुद्ध निकेलची आयात झाली व १९३७ साली जर्मनीच्या खाणीतून ८७ हजार टन अशुद्ध निकेल निघाले. या आंकड्यांवरून निकेलच्या बाबतीत जर्मनी बहुतेक स्वावलंबी झाल्याचे दिसून येते. १९३६ साली शिसे आणि जस्त या दोन्ही धातूंची मिळून सुमारे तीन लक्ष टनाची जर्मनीत आयात झाली, तर १९३७ साली जर्मनीच्या खाणीतून या दोन्ही धातु मिळून २४ लक्ष टनांची पैदास झाली. १९३६ साली ॲल्युमिनियम ज्या पदार्थापासून तयार करतात, ते बॉक्साइट सुमारे दहा लक्ष टन जर्मनीत आणले व त्या वर्षाची जर्मनीतील त्या पदार्थाची पैदास अवघी ४१ हजार टनांची होती. १९३७ साली जर्मनीची बॉक्साइटची पैदास सुमारे ७३ हजार टनांची होती बॉक्साइटच्या बाबतीत जर्मनी मुख्यतः हंगेरी, इटाली युगोस्लाव्हिया व हॉलंड या शेजारच्या राष्ट्रांवरच अवलंबून असल्याने या द्रव्याचा अभाव जर्मनीला फारसा जाणवणार नाही. १९३७ साली जर्मनीत ४ लक्ष टन गंधक सांपडले व सुमारें दहा लक्ष टन परदेशांहून आले. यांपैकी ४५ टक्के गंधक स्पेनहून आले व ३३ टक्के गंधक नॉर्वेहून आलें. यांपैकीं नॉर्वेचे गंधक तरी युद्धकाळांतदेखील जर्मनीला मिळेलच. शिवाय नाझी पक्ष अधिकारारूढ झाल्यावेळेपासून जर्मनीची गंध-

काची पैदास अडीच पटीने वाढलीच आहे व ती अशीच वाढत जाईल, असा सर्वांना विश्वास वाटत आहे.

## इतर पदार्थांचा पुरवठा

नाझीपक्षाच्या उदयापूर्वी जर्मनीत मॅग्नेसाइटची पैदास शून्य होती, ती आता २१ हजार टनांवर आली आहे. आता उरलेल्या पदार्थांपैकी मॅगेनीजची जर्मनीची पैदास दोन लक्ष टन आहे व आयात २। लक्ष टन आहे. जर्मनीत मँगेनीजच्या स्वतंत्र खाणीच नाहीत. पण कित्येक लोखंडाच्या खाणीतून लोहमिश्रित मॅगेनीज सापडते. तेच मँगेनीज लोखंडापासून वेगळे करून जर्मनी आपला मॅगेनीजचा धंदा वाढवीत आहे. जर्मनीत ॲटिमनी मुळीच नाही. पण या धातूची वार्षिक आयात अवघी दोनतीन हजार टन असल्याने तिचा भरपूर पुरवठा करून ठेवणे शक्य आहे. टिनची आयात सुमारे नऊ हजार टन व पैदास सहा हजार टन आहे. जर्मनीला टिनचा पुरवठा मुख्यतः हॉलंड आणि हॉलंडच्या वसाहती यांच्याकडून होत असल्याने, युद्धाच्या वेळीहि या पुरवठ्याला बाधा येणार नाही. जर्मनीत क्रोमाइट मुळीच सांपडत नाही व या पदार्थाची वार्षिक आयात सुमारे दीड लक्ष टनांची आहे. यापैकी अर्ध्याहून अधिक क्रोमाईट तुर्कस्थानांतील जर्मनीच्या मालकीच्या खाणीतूनच येत, याशिवाय युगोस्लाव्हियांतहि जर्मनीच्या मालकीच्या क्रोमाइटच्या खाणी आहेत. युद्धाच्या दिवसांत या खाणींचा उपयोग जर्मनीला होईल की नाही हे सांगणे अवघड आहे. जर्मनीला सुमारे १० लक्ष टन फॉस्फेट लागते. ते जर्मनीत मिळत नाही. त्या बाबतीत जर्मनीला मुख्यतः अमेरिका व फ्रान्सच्या वसाहती या देशांवरच अवलंबून रहावे लागते. जर्मनीत जस्ताच्या नवीन खाणी सांपडल्या आहेत व पोलंडमधील जस्ताच्या खाणीहि जर्मनीच्या मालकीच्या आहेत. पाऱ्याच्या खाणीहि जर्मनीत नुकत्याच सुरू केल्या आहेत व त्या देशाची आर्सेनिकची पैदासहि २८०० टनांवरून २६४०० टनांवर आली आहे. टुंग्स्टेन जर्मनीत मिळत नाही. त्याच्याऐवजीं मोलिब्डेनुम वापरण्याची क्लृप्ति जर्मन शास्त्रज्ञांनी काढली आहे व त्याचा पुरवठा नॉर्वेकडून भरपूर होऊ शकतो. टुंग्स्टेनच्या खाणी

ब्रह्मदेशांत आहेत. त्याची युद्धांत फार गरज असते. कृत्रिम रबर उत्पन्न करण्याचा जर्मनीचा प्रयत्न पूर्णपणें यशस्वी झाला आहे व त्याची आता परदेशी निर्यातदेखील सुरू झाली आहे. अभ्रकाच्या बाबतींत जर्मनी अजून पूर्वीप्रमाणेंच परावलंबी आहे. १९३७ साली जर्मनीची मॅग्नेसाइटची आयात पावणेदोन लक्ष टनांची होती. पण या बाबतीतील जर्मनीचा परावलंबीपणा ऑस्ट्रिया देश खालसा केल्याने आता पूर्णपणें नाहीसा झाला आहे. ऑस्ट्रियांतील मॅग्नेसाइटची पैदास जर्मनीच्या आयातीइतकीच असल्याने जर्मनीच्या विमानांच्या . धंद्याला अतिशय उत्तेजन मिळालें आहे. कारण मॅग्नेसाईटपासून केलेल्या मॅग्नेशियमची विमानांच्या बांधणीत अतिशय गरज असते.

वरील आंकड्यांवरून हे स्पष्ट दिसून येते की फॉस्फेट व तांबे या दोनच फार लागणाऱ्या खानिज पदार्थांच्या बाबतीत जर्मनी बहुतांशी परराष्ट्रांवर अवलंबून आहे. त्यांचा भरपूर संग्रह करून ठेवल्याशिवाय किंवा त्यांचा दुसरीकडून पुरवठा होण्याची व्यवस्था झाल्याशिवाय जर्मनीने युद्ध पुकारणे साहसाचे होईल. किरकोळ खनिज पदार्थांमध्ये ॲंटिमनी, क्रोमाइट, टुंग्स्टेन व अभ्रक हे पदार्थ जर्मनीमध्ये अजून सांपडले नाहीत. पण त्या पदार्थांचा दोनतीन वर्षांच्या लढाईला पुरेल इतका संग्रह करून ठेवणें जर्मनीला अशक्य नाही. टिन, अल्यूमिनियम, गंधक आणि पारा या पदार्थांच्या बाबतीत जर्मनी अंशतः परराष्ट्रांवर अवलंबून आहे. हें परावलंबन दिवसेंदिवस कमी होत चालले असल्याने या बाबतींत वास्तविक परिस्थिति काय आहे, ते चतुर्वार्षिक योजना पूर्ण झाल्यावरच कळून येईल.

## हिंदुस्थानची शोचनीय स्थिति

स्वावलंबी होण्यासाठी जर्मनीने चालविलेल्या आश्चर्यजनक प्रयत्नांची माहिती मिळवीत असतां स्वदेशाची आठवण होऊन मनाला विषाद वाटल्यावांचून रहात नाही. हिंदुस्थानाच्या भूगर्भात सर्व तऱ्हेची खानिज द्रव्ये भरपूर आहेत. ब्रह्मदेश वेगळा होण्यापूर्वीच्या हिंदुस्थानाचा विचार केल्यास असे दिसून येतें कीं आपल्या देशांत लोखंड, कोळसा व खनिज तेले यांचा भरपूर पुरवठा आहे. तांब्याच्या खाणी आपल्या देशांत फारशा नाहीत, पण भांड्यांच्या रूपाने देशांत

तांब्याचा विपुल संग्रह झालेला आहे. त्याचा युद्धकालीन परिस्थितीमध्ये देशसंरक्षणाला चांगला उपयोग होईल. ॲल्यूमिनियम, अभ्रक, क्रोमियम, टुंग्स्टेन, टिन, झिंक, शिसें, मँगेनीज या सर्वांच्या खाणी आपल्या देशांत हव्या तितक्या आहेत. केवळ पारा, गंधक व ॲंटिमनी हे खनिज पदार्थच काय ते या भरतभूमींत अलभ्य आहेत. असे असून एका स्वातंत्र्याच्या अभावी या साऱ्या खनिज द्रव्यांचा देशाच्या संरक्षणाकरिता व सामर्थ्य वाढविण्याकरिता कांहीहि उपयोग केला जात नाही. उलट या देशाच्या शृंखला अधिक दृढ करण्याकडेच त्यांचा उपयोग होत आहे.

— केसरी, ता. १७ जून, १९३८.



# इंग्लंडपुढे येऊन पडलेला आत्मसंरक्षणाचा प्रश्न

### हिंदुस्थानाला या प्रश्नाचें महत्त्व

सुमारें दीड हजार वर्षांपूर्वी ग्रेट ब्रिटनच्या रहिवाशांच्या संरक्षणाचा सर्व भार रोमन लोकांवर होता. पण रोमवर जेव्हा परक्यांची टोळधाड येऊन पडली, तेव्हा रोमन लोकांनी ब्रिटनमधील आपले सैन्य परत बोलाविले व ब्रिटनच्या रहिवाशांना असहाय अवस्थेत टाकून दिले. रोमन लोक ब्रिटनमधून निघून गेल्या-नंतर जर्मनीतील रानटी लोकांनी ब्रिटनवर स्वारी करून तेथील राजकीय सत्ता बळकावली आणि त्या देशांत आपली कायमची वस्ती करून त्याला आताचे इंग्लंड हें नांव दिलें. हिंदुस्थानाच्या संरक्षणासाठी सध्या सारे हिंदवासी सर्वस्वी इंग्लंडवर अवलंबून आहेत व इंग्लंडला फिरून एकवार आपल्यावर जर्मनीचा प्राणघातक हल्ला होईल की काय अशी काळजी पडली आहे. या काळजीमुळे हिंदुस्थानांतील ब्रिटिश सैन्य अजीबात काढून नेण्याच्या नसल्या तरी ते सैन्य पुष्कळसे कमी करण्याच्या वाटाघाटी सध्या इंग्लंडांत सुरू आहेत. या वाटाघाटीचे पर्यवसान काय होणार आहे इकडे हिंदुस्थानाला आपले नांव देऊं इच्छिणाऱ्या रानटी लोकांचे लक्ष्य लागून राहिले आहे. यामुळे इग्लंडपुढे पडलेला आत्मसंर-क्षणाचा प्रश्न हा आम्हा हिंदवासियांना जिव्हाळ्याचा होऊन बसला आहे.

अगदी परवापर्यंत अशी परिस्थिति होती की, केवळ आपल्या आरमाराच्या बळावर इंग्लंडला स्वतःचे व आपल्या वसाहतीचेहि सरक्षण करतां येत होते. पण १९३५ साली जर्मनीचे नवे वैमानिक दल अस्तित्वांत आल्यापासून ती परिस्थिति पार पालटून गेली आहे. आतापर्यंत इंग्लंडला आत्मसंरक्षणाची विवंचना विशेष कधीच जाणवली नव्हती. यामुळे साम्राज्याचे संरक्षण व संवर्धन या बाबी-कडे इंग्लंडच्या पुढाऱ्यांना निर्वेध लक्ष्य पुरवितां येत असे व साम्राज्याच्या घटकांनाहि असा विश्वास वाटत असे की, स्वतःचे सर्व सामर्थ्य खर्चून इंग्लंड आपलें संरक्षण करील. पण असा विश्वास आता उरला नाही. गेल्या मार्च महि-न्यांत मि. चेंबरलेन यांनी एका भाषणांत असे उद्गार काढले—

## आधी मायभूमि, मग वसाहती

'The first concern of the British Government will be to protect the Mother country, then to maintain her supplies from abroad and thirdly to defend her over-sea possessions.'

हें भाषण प्रसिद्ध झाल्याबरोबर ऑस्ट्रेलियाच्या मुख्य प्रधानांनी चेंबरलेन-साहेबांना प्रश्न केला 'Does this mean that the dominions will have to rely on their own resources in time of war?'

या प्रश्नाला चेंबरलेनसाहेबांनी उत्तर दिले 'Although appearing third on the list, the protection of over-sea possessions is definitely regarded as of first-rate importance!'

पण हे उत्तर तर्कशास्त्राच्या विरुद्ध असल्याने त्याने कोणाचेंहि समाधान झाले नाहीं व ऑस्ट्रेलियाने स्वदेशाच्या सरक्षणाचा खर्च फिरून एकवार वाढविला. ऑस्ट्रेलियाच्या या उदाहरणावरून हिंदुस्थानाच्या पुढाऱ्यानींहि बोध घेण्यासारखा आहे. असो.

इंग्लंडच्या शेजारच्या राष्ट्रांनी आपापली वैमानिक दले वाढविल्यावेळेपासून इंग्लंडला आत्मसंरक्षणाची काळजी लागली आहे. बाल्डविनसाहेब इग्लडचे मुख्य प्रधान असतांना त्यांनी जाहीर केले होते.

'The present policy of the British Government is to increase our total air-strength to the size of the greatest air force within striking distance of this island.'

## जर्मनीची व इंग्लंडची तुलना

पण हे धोरण अमलांत आणण्याला इंग्लंड आज किती असमर्थ आहे, हें New Stateman and Nation या पत्रांतील पुढील उताऱ्यावरून कळून येतें "Lord Lothian declared in the Upper House that Germany would have next year 8000 first-line aeroplanes with anything from 4000 to 7000 machines in reserve. Equally despondent Sir Hugh Seely told the Commons that German

production was between 5000 to 6000 planes a year. Against these figures the British Government's statement that the programme for producing by March 1939, a first-line strength of 1750 machines, with reserves unspecified is 'up to schedule' does not impress and Lord Winterton's promise that the metropolitan force will be 2370 planes strong by March 1940 is a promise and no more. The parity with any European aggressor to which Lord Baldwin pledged the Government recedes into the immeasurable distance."

या उताऱ्याच्या जोडीला मजूरपक्षाचे पुढारी मेजर अॅटले यांच्या भाषणांतील एक उतारा घेणे जरूर आहे. ते म्हणतात

'According to my information, the guns now in use in the Air-Force are obsolete and there are only a few being used. I am also informed that there has been trouble about getting cartridges for them.'

## जुनीं विमानें, जुनीं शस्त्रें

ब्रिटिश वैमानिक दलांतील शस्त्रे जुनीपुराणी असावीत, यांत कांहींच नवल नाहीं. निरनिराळ्या युद्धखात्यांचें सहकार्य घडवून आणण्याच्या कामावर नेमलेले मंत्री सर थॉमस इन्स्किप यांनी स्वतःच कबूल केलें होते 'The 1500 first line machines promised for March 1937 were available by July but they were not the modern machines.'

तेव्हा असल्या जुन्यापुराण्या विमानांच्या काफिल्यांत जुनींपुराणीं शस्त्रे असावींत हे उचितच आहे. आपले वैमानिक दल किती रद्दी आहे याची ब्रिटिश सरकारला पूर्ण जाणीव असल्यामुळे कांही दिवसांपूर्वी अमेरिकेकडून एक हजार विमानें विकत घेण्यासाठी ब्रिटिश वैमानिक अधिकाऱ्यांचें एक मंडळ अमेरिकेला गेलें होते. पण त्यांचा हेतु सफळ झाला नाहीं. खुद्द इंग्लंडांतील कारखाने इतके नालायक आहेत की, ऑर्डर देऊन दोन वर्षे झाली तरी त्यांच्याकडून ठराविक माल मिळत नाहीं. सर ह्यू सीली यांनी पार्लमेंटांत सांगितलें आहे—

340 'Hawker Hurricanes' were ordered in June 1936, but to-day there are only 28 in service. Similarly with the 'Spit-fires.' Orders for these were first placed in March 1936, but to-day there is only one in being.'

या साऱ्या साऱ्या तक्रारींचा उघड अर्थ असा आहे कीं, इंग्लंडच्या कारखान्यांतून दर महिन्याला दोनशेंहून अधिक विमाने तयार होऊं शकत नाहीत आणि जर्मनीच्या कारखान्यातून मात्र दर महिन्याला चारशें ते पांचशें विमानें बाहेर पडतात. शांततेच्या दिवसांत लष्करी विमानांचे आयुष्य सरासरी दोन वर्षें असते व लढाईच्या दिवसांत ते अवघे तीन महिने असते. या प्रमाणावरून असा अंदाज निघतो की, भावी महायुद्धाच्या दिवसांत इंग्लंडच्या कारखान्यांतून जर महिन्याला तीन हजार विमाने तयार होतील तरच त्या राष्ट्राचा निभाव लागेल. आजचा अंदाज तर असा आहे की, इग्लंडांतील सध्याच्या कारखान्यांतून युद्ध काळांत दहा हजारांहून अधिक विमाने तयार होणे अशक्य आहे.

## लंडन शहराला असलेला धोका

आता वैमानिक स्वारीचा इंग्लंडवर किती भयंकर परिणाम होणार आहे, याचा थोडासा विचार केला पाहिजे. ग्रेटब्रिटनच्या सुमारे ४। कोटि लोकसंख्येपैकी एक कोटि लोक एकट्या लंडनमध्येच राहतात. धुके आणि ढग यांची लंडनवर नेहमी कृपादृष्टि असल्याने त्या शहराची हवा विमानांच्या अचानक स्वारीला विशेष अनुकूल आहे. जर्मनीला जर कधी काळी इंग्लंडबरोबर युद्ध करावेसे वाटले तर एखाद्या हिवाळ्या रात्रीमध्ये लंडनवर विमानांचा अचानक हल्ला करूनच जर्मनी युद्धाला सुरुवात करील ही गोष्ट निश्चित आहे. विमानांचा हल्ला आल्यानंतर लंडनचे सारे दिवे मालवून सुद्धा फारसा उपयोग होणार नाही. कारण दिवे मालविले तरी शत्रूच्या विमानांना थेम्स नदी दिसत राहीलच व त्या एकाच खुणेच्या अनुरोधाने इष्ट स्थळी बॉबगोळ्यांचा वर्षाव करून लंडन शहराला अतिप्रचंड आग लावणें अगदी सोपे आहे, कारण इंग्लंडांतील सर्वांत मोठी पेट्रोलची तळी लंडन शहरांतच आहेत. इंग्लंडांत येणाऱ्या पेट्रोलपैकीं ३३ टक्के पेट्रोल लंडनच्या बंदरांतच येते. इंग्लंडच्या एकंदर व्यापाराचा तिसरा हिस्सा व्यापार लंडन बंदरांतूनच होतो. यावरून लंडन बंदराचा विध्वंस

झाल्यास इंग्लंडला किती मोठा धक्का बसेल, याची कोणालाहि कल्पना येईल. याशिवाय सॅलिस्बरी, आल्डरशॉट, कोल्चेस्टर इत्यादि इंग्लंडच्या मोठमोठ्या लष्करी छावण्या अगदी उघड्या मैदानांत आहेत व त्यांवर विमानांचे हल्ले करणें जितके सोपें, तितकेंच महत्त्वाचें पण आहे. या बाबतीत एका इंग्रज युद्धशास्त्रज्ञानें म्हटलें आहे.

'Our strength is concentrated in a region where the dislocation to transport and other facilities caused by air attack would most likely be greatest and hence the movement of the military forces might be hampered at a time when their mobility would be of paramount importance.'

## व्यापारी जहाजांचा तुटवडा

वैमानिक स्वारीपासून इंग्लंडचा बचाव करणें अशक्य आहे, असें मत बाल्डविनसाहेबांनी पूर्वीच प्रकट केलें असल्यानें विमानवाहिनीच्या आक्रमणाच्या परिणामांची चर्चा इथेंच थांबवून युद्धाच्या दिवसांत इंग्लंडच्या आयात व्यापाराची अवस्था काय होईल, इकडे आता लक्ष दिलें पाहिजे. इंग्लंडला लागणाऱ्या अन्नसामुग्रीपैकी ८० टक्के साखर, ८५ टक्के गहू व कणीक, ५५ टक्के मांस, ८५ टक्के लोणी इत्यादि माल परदेशांहून येतो. एकंदर अन्नसामुग्रीची बेरीज केली तर ती सव्वादोन कोटि टनांवर जाईल. याशिवाय एक कोटि टन पेट्रोल व सव्वा कोटि टन निरनिराळ्या धातु इंग्लंडला परदेशांहून आणाव्या लागतात. प्रत्यक्ष युद्धाच्या वेळी अन्नसामुग्रीची आयात कांहींशी कमी झाली तरी खनिज पदार्थांची आयात निदान तिप्पटीनें वाढेल. याशिवाय सैन्य आणि दारूगोळा यांच्या वाहतुकीचा नवीन बोजा ब्रिटिश गलबतांवर पडेल. गेल्या महायुद्धापासून इंग्लंडची एकट्या पेट्रोलचीच आयात सातपटीनें वाढली आहे व इतर खनिज पदार्थांच्या आयातींतहि अशीच वाढ झाली आहे. उलटपक्षीं गेल्या वीस वर्षांत इंग्लंडच्या जहाजांचें टनेज ३५ लक्ष टनांनी कमी झालें आहे. गलबतें सुमारें दोन हजारांनी कमी झालीं आहेत व नौकानयनाच्या धंद्यांतील लोकांची संख्या सुमारें ५९००० रांनी कमी झाली आहे. महासागरांतून प्रवास करूं शकणाऱ्या ३ हजार टनांवरील बोटींची संख्या १०४७ नी कमी झाली असून त्यांचें टनेजहि २०८५००० रांनी कमी झालें

आहे. इंग्लंडच्या वसाहतींच्या जहाजांची संख्या थोडी वाढली आहे पण त्यांचीं जहाजें महासागरांत हाकारण्याच्या लायकीचीं नाहीत.

या सर्वांचा परिणाम असा झाला आहे की आता ब्रिटिश बंदरांत येणाऱ्या मालापैकीं अवघा ५६ टक्के मालच ब्रिटिश मालकीच्या जहाजांतून येतो. इंग्लंडचें परराष्ट्रांशीं युद्ध जुंपल्यास परराष्ट्रांची जहाजे ब्रिटिश बंदरांत येणे अजीबात बंद पडेल, ब्रिटिश जहाजांना भूमध्यसमुद्रांतून जाणे अशक्य होईल, इंग्लंडच्या पूर्वकिनाऱ्यावरील बंदरें वैमानिक हल्ल्यामुळे निकामी होऊन बंद पडतील. या साऱ्या संकटांना यशस्वी रीतीने तोंड देण्याचे सामर्थ्य इंग्लंडमध्ये आहे असें इंग्लंडच्या आजच्या तयारीवरून तरी दिसत नाही. उदाहरणार्थ थोड्याच दिवसांपूर्वी इंग्लंडच्या वाहतूकखात्याचे मंत्री मि. बुर्गिन यांनी पार्लमेंटांत असें जाहीर केले कीं युद्धाच्या दिवसांत पूर्वकिनाऱ्यावरील बंदरांचा व्यापार पश्चिम किनाऱ्यावरील बंदरांकडे वळविण्याची योजना सरकाराने १८ महिने खपून तयार केली आहे. इंग्लंडचीं पत्रें असें सांगतात —

'Exact information from the survey is available as to the berthing, docking and transport possibilities of every harbour of any importance on the west coast of Britain.'

## बंदरांत सोयींचा अभाव

पण केवळ माहिती मिळवून हा प्रश्न सुटण्यासारखा नाही. कारण लंडनच्या बंदरांत येणारे पेट्रोल एखाद्या पश्चिमेच्या बंदरांत उतरावयाचे असल्यास त्या बंदरांत पेट्रोलचीं तळी आहेत की नाहीत, असलीच तर त्यांत किती पेट्रोल राहूं शकेल व लंडनचा अवाढव्य व्यापार त्या बंदराकडे वळविल्यास ते बंदर किती वाढवावें लागेल, तिथें पेट्रोलची तळीं किती बांधावी लागतील किंवा लंडनला येणारे मांस जर दुसरीकडे उतरावयाचें असल्यास त्या ठिकाणीं ते मांस उतरविल्याबरोबर कुजूं नये, याकरिता मांस सुरक्षित ठेवण्याचीं अत्यंत थंड कोठारे आहेत कीं नाहीत त्याची चौकशी करून त्या सगळ्या सोयी स्वतः सरकाराने करणे जरूर आहे. असली तरतूद अद्यापपावेतों झाली नाही. युद्ध सुरू झाल्यास ब्रिटिश व्यापारी जहाजांवर सहा इंची तोफा ठेवण्याची योजना तयार होत आहे. ही योजना अमलांत आल्यास व्यापारी जहाजांचें माल वाहून नेण्याचें सामर्थ्य

अधिकच कमी होईल. गेल्या महायुद्धांत अमेरिकेच्या जहाजांनी इंग्लंडला माल पुरविण्याच्या बाबतीत फार मोठी कामगिरी केली होती. तीहि मदत यापुढे होणें अशक्य आहे. कारण यापुढे युध्यमान राष्ट्रांनी आपल्याला लागेल तो माल रोख पैसे देऊन आपल्याच जहाजांतून आपल्या देशाला न्यावा, अशा आशयाचा नवा कायदाच अमेरिकेने करून टाकला आहे. याशिवाय भूमध्य-समुद्रांतील जवळची वाट बंद झाल्यास ब्रिटनला पूर्वीइतकाच माल आणण्याला पूर्वीच्या दीडपट जहाजे लागतील, ती गोष्ट निराळीच आहे. या साऱ्या परिस्थितीचा विचार केला व गेल्या महायुद्धाच्या वेळेपेक्षा विमाने व पाणबुड्या यांचे सामर्थ्य सध्या फारच अधिक वाढलें आहे, ही गोष्ट लक्षांत घेतली तर भावी युद्धांत इंग्लंडला व्यापारी जहाजांचा तुटवडा अतिशय जाचणार असे उघड दिसते.

व्यापारी जहाजांच्या तुटवड्यामुळे आपली उपासमार होऊं नये म्हणून सर्व तऱ्हेच्या युद्धोपयोगी व जीवनोपयोगी वस्तूंचा संचय करून ठेवण्याची खबरदारी इंग्लंडचें सरकार घेत आहेच. त्याचबरोबर भूमध्यसमुद्राची वाट आपल्याला बंद होऊं नये, यासाठी इंग्लंडचे शक्य तितके प्रयत्न चालले आहेत. याच हेतूने हिंदुस्थानांतील ब्रिटिश सैन्य दोन डिव्हिजन्सनी कमी करून त्या दोन डिव्हिजन्स सुएझ कालव्याच्या प्रदेशांत नेऊन ठेवाव्यात व सुएझ कालव्याच्या संरक्षणावरच हिंदुस्थानचे संरक्षण अवलंबून आहे, या निमित्ताने त्यांचा खर्च पुनः हिंदुस्थानावरच लादावा, अशी शक्कल युद्धमंत्र्यांनी काढली आहे. हिंदुस्थानांतील सैन्य कमी करावयाला हरकत नाही, असें प्रतिपादन करतांना मि. होअर–बेलिशा यांनी म्हटले आहे

‘ In those regions where the task of maintaining internal order falls upon our Army, the improvement in internal communications and the quickening of transport has increased the effectiveness of a given quantity of soldiers by adding to their mobility. ’

या विधानाची लष्करी दृष्ट्या थोडी चिकित्सा करणे जरूर आहे.

## येथलें सैन्य हलविता येणार नाही

हिंदुस्थानांतील एकंदर सैन्यापैकीं सुमारें २४००० हिंदी सैनिक व सुमारें २८ हजार ब्रिटिश सैनिक हे अंतर्गत संरक्षणासाठी राखून ठेवलेले असतात. १८५७ सालाप्रमाणें हिंदुस्थानांत पुन्हा बंड होण्याची भीति आतां पुष्कळ कमी झाली आहे. तरी देखील बंगाल्यांतील क्रांति-कारकांचा बंदोबस्त करण्यासाठीं निदान दहा हजार सैन्य बंगाल्यांत न्यावें लागले होते. पण यापेक्षा विशेष महत्त्वाची गोष्ट ही की, मॉटेग्यूचेलम्स्फोर्ड सुधा-रणा अस्तित्वांत आल्यावेळेपासून मुसलमानांच्या महत्त्वाकांक्षा अमर्याद वाढल्या आहेत व त्यामुळे मुसलमानांच्या दंग्यांचे प्रमाण पूर्वीच्या दसपटीने वाढलें आहे. हे दंगे पूर्वीप्रमाणे आता नुसत्या पोलिसांना बंद पाडतां येत नसल्याने प्रत्येक लहान मोठ्या दग्यांत मुलकी अधिकाऱ्यांना लष्कराची कमी अधिक प्रमाणाने कुमक मागावी लागते. यामुळे देशाच्या अंतर्गत संरक्षणाचा प्रश्न अधिकाधिक अव-घड होत चालला आहे. मुसलमानांच्या बेदिलीचा दुसरा परिणाम असा होणार आहे की, वायव्य सरहद्दीवरील शत्रुराष्ट्रांशी हिंदुस्थानाचे युद्ध जुंपल्यास सिंध आणि पंजाब या दोन्ही प्रांतांतील मुसलमान आपापल्या प्रांतांतील आगगाड्या मोडून टाकण्याचा हटकून प्रयत्न करतील. इग्रज लष्करी अधिकाऱ्यांचे मत असे आहे की सिंध, सरहद्द आणि पजाब या प्रांतांतील आगगाड्यांच्या संरक्षणासाठीं निदान ५०००० सैन्याची योजना करावी लागेल. कारण आगगाडी-वर अपघात घडवून आणणे ही अत्यंत सोपी गोष्ट आहे. एकेकट्या माणसाला देखील अगदी साध्या उपायांनी आगगाडीचे अपघात घडवून आणता येतात व डोळ्यांत तेल घालून जपणाऱ्या ड्रायव्हरांना देखील ते अपघात टाळणे अशक्य होते. हिंदुस्थानांतील आगगाड्यांच्या बाबतीत आणखी एक विशेष भानगड आहे. ती अशी की, हिंदुस्थानांतील ब्रॉडगेज रेल्वेच्या इतकी रुंद रेल्वे साऱ्या जगामध्ये केवळ स्पेन देशांतच आहे. यामुळे हिंदुस्थानांतील रेल्वेची जर मोठ्या प्रमाणावर मोडतोड झाली तर ताबडतोब इतर कोणत्या तरी देशाचीं इंजिने व डबे आणवून काम भागवून नेतां येत नाही. मेजर डी. एच. कोल म्हणतात—

## रेल्वेची अडचण

stock of this particular guage could be obtained at short notice.'

पण स्पेन देशांत घनघोर सग्राम चालू असल्याने या बाबतीत स्पेनचा उपयोग आणखी दोन चार वर्षें तरी होऊं शकत नाही. हिंदुस्थानांतील रेल्वेची कार्यक्षमता गेल्या आठ वर्षांत बरीच कमी झाली आहे व तितक्याच प्रमाणांत हिंदुस्थानाच्या सैन्याची जलद हालचाली करण्याची क्षमताहि कमी झाली आहे. या साऱ्या परिस्थितीचा विचार केला व हिंदुस्थानांतून ब्रिटिश सैनिक कमी झाल्यास त्यांचा पहिला उपयोग पॅलेस्टाइनमधील अरबांना ठेचून टाकण्यासाठी व्हावयाचा आहे ही गोष्ट लक्ष्यांत घेतली म्हणजे हिंदुस्थानांतील ब्रिटिश सैन्य कमी झाल्यापासून एका वर्षाच्या आंतच हिंदुस्थानांतील व परदेशी मुसलमान ब्रिटिशांच्या विरुद्ध उठावणी केल्यावांचून राहणार नाहीत असें निश्चितपणें सांगतां येतें.

## सरहद्दीवरील धोका

अशा प्रकारे हिंदुस्थानी व परदेशी मुसलमानांनी एकाच काळी उठावणी केली तर तिचा प्रतिकार करण्याला हिंदुस्थानाचे सध्याचें सैन्य सर्वस्वी अक्षम आहे. कारण सरहद्दीवरील एखाद्या लढाऊ टोळीने दंगा सुरू केला तर तिचा प्रतिकार करण्यासाठी देखील हिंदुस्थानसरकाराला आपलें अर्धें सैन्य युद्धक्षेत्रांत न्यावें लागतें. मुंबईच्या ' टाइम्स'ने २५ जून १९३८ रोजीं आपल्या अग्रलेखांत म्हटले आहे.

" Within her own internal border India cherishes a military and financial commitment liable at any moment to monopolise the attentions of half her armies and to make illimitable calls on her purse. While in other respects internal and external peace is enjoyed this might be considered an unavoidable if expensive inconvenience. In the unhappy event of other ever potential preoccupations it would become an incalculably dangerous embarrassment. "

अशा परिस्थितीत हिंदुस्थानांतील सैन्य कमी करणें अगदी अविचाराचें होईल. हिंदुस्थानांतील ब्रिटिश सैन्याच्या दोन डिव्हिजन्स कमी करावयाच्या

असल्याच तर केवळ हिंदु सैनिकांच्या नव्या चार डिव्हिजन्स तावडतोब उभ्या करणें अत्यंत अवश्य आहे. नाही तर देशी व परदेशी मुसलमान हिंदुस्थानाच्या दुबळेपणाचा फायदा घेतल्यावांचून राहणार नाहीत.

## जर्मनी, व जपान व इटाली यांचें त्रिकूट

हिंदुस्थानांतील ब्रिटिश सैन्य कमी करून आपले संरक्षण करून घेण्याचा इंग्लंडचा प्रयत्न दांत कोरून पोट भरण्याइतकाच हास्यास्पद आहे. इंग्लंडला जर खरोखरीच स्वतःचे व साम्राज्याचे सरक्षण करावयाचे असेल तर त्या देशाला सक्तीच्या लष्करी नोकरीचा कायदा लागू करणे जरूर आहे. कारण इंग्लंडच्या साम्राज्याचे तुकडे तोडण्यासाठी गतवर्षीच जपान, जर्मनी व इटाली या तीन युद्ध-प्रिय राष्ट्रांनी आपापसांत संगनमत केले आहे. या त्रिराष्ट्रसंधीचा खरा अर्थ जपानचे सध्याचे मुख्य प्रधान प्रिन्स कोनोए यांनी राजकारणी भाषेत जितका स्पष्ट करून सांगतां येईल, तितका सांगितला आहे. ते म्हणतात—

" I cannot but feel that at this present time when the negative principle of maintenance of the status quo, built up after the last world war has forfeited its function as a result of the conflicts and contradictions which it has brought in its train, the responsibility for the creation of peace devolves on the three powers Italy, Germany and Japan."

जर्मनीला इंग्लंडच्या हातून आपल्या वसाहती परत मिळवावयाच्या आहेत, इटालीला इजिप्त आणि पॅलेस्टाइन या प्रदेशांत आपले अधिराज्य स्थापून इंग्लंडच्या आरमाराची भूमध्यसमुद्रांतून हकालपट्टी करावयाची आहे आणि जपानला चीन व हिंदुस्थान या देशांतून इंग्रजांचें उच्चाटन करून व आस्ट्रेलियासारख्या इंग्लंडच्या वसाहती हस्तगत करून आपल्या व्यापाराला व वसाहतीला निर्वेध क्षेत्र मिळवावयाचें आहे. या तीन राष्ट्रांच्या प्रचंड लष्करी सामर्थ्याला तोंड देण्याला इंग्लंडचें लष्कर अगदी असमर्थ आहे तरी देखील इंग्लंडचे युद्धमंत्री मि. होअरबेलिशा म्हणतात

" From troops raised in this country under a voluntary system there can be mobilized in an emergency, for action

in various fields of our imperial responsibility 500000 soldiers. This is exclusive of the 150000 soldiers maintained by the dominions, of the Indian which with reserves is about 170000 and of many thousands of local forces of the colonies and protectorates. Such difficulties as confront us are not difficulties of manpower, but of its correct organization and distribution. Given these we shall not be underinsured."

## मि. चर्चिल यांचा इषारा

पण सारेच ब्रिटिश मुत्सद्दी कांहीं या युद्धमंत्र्याप्रमाणे आत्मसंतुष्ट बनलेले नाहीत. ९ मे रोजीं मॅंचेस्टर येथील हॉलमध्ये भाषण करतांना मि. विन्स्टन चर्चिल यांनीं सांगितलें आहे,

"Germany has been re-arming night and day. For four years past they have never spent less in any year than F. 800000000 sterling on war preparations. Every six weeks a new army corps is added to their active army. At present we are shielded to some extent by the strength of the French army, but the German numbers are overtaking them month by month. We have still our navy; but our Air Force so far from overtaking Germany is actually falling farther and farther behind. If we are to place ourselves in security from such oppression, we must throw ourselves into the business of national defence with the vigour and concentration which Germany now displays."

—केसरी, ता. ८ जुलै, १९३८.



# मित्रराष्ट्रांमधील मतभेद

## इंग्लंड व फ्रान्स यांचा संधि

नाझी जर्मनीने आपला किंवा युरोपांतील आपल्या मित्रराष्ट्रांचा मुलूख काढून घेऊं नये, या हेतूने अलीकडे फ्रान्सच्या राजकर्त्यांनी इंग्लंडशी परस्परसंरक्षणाचा संधि केला आहे. फ्रान्स व इंग्लंड यांमधील नव्या मैत्रीचें महत्त्व जर्मनीच्या नजरेत भरावे, याकरिता फ्रान्सच्या अध्यक्षांनी जॉर्ज बादशहांना पारिसला बोलावून त्यांचे मोठ्या थाटामाटाने स्वागतहि केले. या स्वागताच्या वर्णनाने इंग्लंड व फ्रान्स या देशांतील वर्तमानपत्रे भरून गेली होती. बादशहांच्या बरोबर इंग्लंडचे परराष्ट्रमंत्री लॉर्ड हॅलिफाक्स पारिसला गेले होते व फ्रेंच मुत्सद्दीमंडळीबरोबर त्यांची जी चर्चा झाली, तिचीहि थोडीबहुत हकीकत वर्तमानपत्रांतून आली आहे. याच वेळी युद्धमंत्री मि. होअरबेलिशा हेहि पारिसला गेले होते व त्यांची फ्रेंच जनरलस्टाफच्या बरोबर चर्चाहि झाली. पण या चर्चेचा प्रतिध्वनि मात्र कोठेहि उमटलेला नाही. या चर्चेची परिस्फुटता न होण्याचें मुख्य कारण हेच कीं इंग्लंडच्या युद्धमंत्र्यांच्या धोरणामुळे फ्रेंच सेनापतींची अत्यंत निराशा झाली आहे. एखाद्या स्त्रीने पुत्रप्राप्तीसाठी पति करावा पण प्रथमभेटीच्या प्रसंगीच तिला कळून यावे की, आपल्या पतीने ब्रह्मचर्याची शपथ घेतली आहे. असलाच विचित्र अनुभव मि. होअरबेलिशा यांच्या भेटीमुळे फ्रेंच सेनापतींना आला आहे. जर्मनीविरुद्ध इंग्लंडच्या सैन्याची गेल्या युद्धांतल्याप्रमाणे मदत मिळावी, याकरिता फ्रान्सने इंग्लंडशी तह केला. पण इंग्लंडचे युद्धमंत्री फ्रेंच सेनापतींना सांगूं लागले की, जर्मनीच्याविरुद्ध युरोपखंडांत सैन्य पाठवावयाचे नाही, असा आमच्या सरकारचा निश्चय होऊन चुकला आहे. मि. होअरबेलिशा यांचे हे उद्गार ऐकून चकित झालेल्या फ्रेंच सेनापतींनी त्यांच्याशी हरतऱ्हेचा बुद्धिवाद करून पाहिला, पण तो सारा फुकट गेला. यामुळे इंग्लंड व फ्रान्स या उभयतांचा तह होऊन देखील तह नसल्यासारखीच फ्रान्सची असहाय अवस्था झाली आहे.

१९३६ सालीं लोकार्नोचा करार मोडून जर्मन सैन्याने ऱ्हाइन नदीच्या तीरावरील प्रदेश व्यापला तेव्हा फ्रेंच सरकारने ब्रिटिश सरकारला अशी सूचना केली कीं, जर्मनीच्या कृतीमुळे पुन्हा जर एखादें युद्ध उपस्थित झाले तर पूर्वीप्रमाणें ब्रिटिश सैन्याने फ्रान्सला कशी मदत करावी, याची आगाऊ योजना ठरविण्याकरिता दोन्ही देशांच्या प्रमुख सेनापतींची एक संयुक्त कमिटी नेमूं या. फ्रान्सच्या या सूचनेची सयुक्तिकता इंग्लंडने लगेच कबूल केली. पण कमिटी नेमण्याच्या तपशिलाची चर्चा करण्यांतच कित्येक महिने घालविले. पुढे जेव्हा ही कमिटी अस्तित्वांत येण्याचा रंग दिसूं लागला तेव्हा लंडन टाइम्सने फ्रान्समध्ये ब्रिटिश सैन्य पाठविण्याच्या तत्त्वालाच कसून विरोध केला. विशेषतः लंडन टाइम्सचे युद्धशास्त्रज्ञ कॅप्टन लिड्डेल हार्ट यांनी फ्रान्समध्ये ब्रिटिश सैन्य पाठविणे युद्धशास्त्राच्या दृष्टीने किती धोक्याचे आहे, याचें दोन लेखांत सविस्तर विवेचन करून इंग्लंडच्या लोकमतांत विलक्षण खळबळ उडवून दिली. लंडन टाइम्सच्या या विरोधामुळे ब्रिटिश सैन्य फ्रान्समध्ये पाठविण्याची कल्पनाहि बाल्डविनसाहेबांच्या सरकारला सोडून द्यावी लागली. त्यानंतर जर्मनी व झेकोस्कोव्हाकिया याच्या भांडणामुळे यंदा हा प्रश्न पुन्हा उद्भवला आहे व चंचल लोकमत ब्रिटिश सैन्य फ्रान्समध्ये पाठविण्याला तेव्हापेक्षा आता किंचित् कमी प्रतिकूल दिसत आहे.

## इंग्लंडचें युद्धविषयक धोरण

लोकमतामधील या परिवर्तनाचा प्रतिकार करण्यासाठी लंडन टाइम्सने गेल्या जून महिन्याच्या १७ तारखेला फिरून एकवार या विषयाची चर्चा केली आहे. या धोरणाविरुद्ध लंडन टाइम्सची पहिली तक्रार अशी आहे कीं युरोपांत सैन्य पाठविण्याचे धोरण इंग्लंडच्या परंपरागत धोरणाच्या विरुद्ध आहे. टाइम्स म्हणतो,' Our traditional strategy has for its object the defence of England and the Empire and the maintenance of our strength during the whole period of the war and even after the end of the war. '

म्हणजे शेजाऱ्यांच्या युद्धामध्ये तटस्थ राहूं नये, अशी राजनीति असल्याने इंग्लंडने प्रत्येक युद्धांत कोणाचा तरी पक्ष स्वीकारावा पण, जमिनीवरच्या लढायांमध्ये

आपण शक्य तोवर भाग घेऊं नये; इतर राष्ट्रांना आपापसांत लढून निर्बल होऊं द्यावें व अशा रीतीने प्रत्येक युद्धाच्या अंती युद्धारंभापेक्षा आपलें सामर्थ्य अधिक वाढेल, असें वर्तन करीत राहावें, हें इंग्लंडचें परंपरागत धोरण आहे. हे धोरण फार दूरदर्शीपणाचें आहे. पण इंग्लंडच्या शेजाऱ्यांचे सामर्थ्य अमर्याद वाढत असल्या-मुळे तें अमलांत आणणे आता अशक्य झालें आहे, ही गोष्ट लंडन टाइम्सचे संचालक विसरले आहेत की काय अशी शंका येते.

टाइम्सचा दुसरा मुद्दा हा आहे की कोणतेहि राष्ट्र सैन्य, आरमार व वैमानिक दल या तीनहि बाजूंनी सर्व राष्ट्रांपेक्षा बलिष्ठ असूं शकत नाही, तेव्हा यांपैकी कोणत्या तरी एखाद्या अंगाकडे आम्हांला दुर्लक्ष्य करणें भाग आहे, म्हणून आम्ही आरमार व वैमानिक दल यांची वाढ करण्याकडे आमचें सर्व सामर्थ्य एकत्रित केले आहे. टाइम्सने सांगितलेले हें तत्व बरोबर आहे, पण या तत्वाप्रमाणे वागतांना युद्धपूर्व परिस्थिति व युद्धकालीन परिस्थिति यांमधील फरक लक्ष्यांत घेणे जरूर आहे. या दोन परिस्थितींमधील फरक असा असतो की, एखाद्या राष्ट्राच्या आरमारी सामर्थ्याची वाढ ही मुख्यतः शांततेच्या काळांतच होऊं शकते, युद्धाला प्रारंभ झाल्यानंतर आरमाराचे शत्रूवर चढाई करण्याचें सामर्थ्य मोठ्या प्रमाणावर वाढविणें सध्याच्या परिस्थितींत अशक्य आहे. लष्कर आणि वैमानिक दल यांची वाढ प्रत्यक्ष युद्धांत देखील मोठ्या प्रमाणावर करतां येते; यामुळे लष्कराची कायमची उपेक्षा करून आरमार व वैमानिक दल यांचीच तेवढी वाढ करीत राहणे हे प्रत्यक्ष युद्धाला तोंड देण्या-च्या दृष्टीने चुकीचे ठरते. युद्धारंभापासून दहा बारा दिवसांच्या आंत ज्या राष्ट्राला आपलें लष्करी सामर्थ्य शांततेच्या काळांतील लष्कराच्या चौपटीने वाढविता येणार नाही, त्या राष्ट्राला भावी महायुद्धानंतर आपल्या बलिष्ठ शेजाऱ्यांचें दास्य पत्करावें लागेल असा युद्धशास्त्रज्ञांचा अंदाज आहे व या अंदाजाप्रमाणें इंग्रज सरकाराने आपले लष्करी सामर्थ्य वाढविणें जरूर आहे.

## लंडन टाइम्सचा स्वार्थी कोटिक्रम

इंग्लंडला बलाढ्य वैमानिक दलाची अत्यंत आवश्यकता आहे, ही गोष्ट सर्वांनाच मान्य आहे. पण इंग्लंडच्या संरक्षणाला बलाढ्य लष्कराचीहि

तितकीच आवश्यकता आहे, ही गोष्ट अजून इंग्लंड ध्यानांत घेत नाही. इंग्लंडने युरोपखंडांत सैन्य न पाठविण्याचा आपला बेत बदलला नाही व जर्मनीने गेल्या महायुद्धांतल्याप्रमाणे बेल्जम देश व्यापून टाकला तर इंग्लंडला आपल्या आरमाराच्या व वैमानिक दलाच्या जोरावर आत्मसंरक्षण करणे अशक्य आहे असे युरोपांतील सर्व युद्धशास्त्रज्ञांचे मत आहे आणि हें मत इंग्लंडांतील युद्धशास्त्रज्ञांना न पटण्याइतके ते निर्बुद्ध असतील असें आम्हांला वाटत नाही. असे असूनसुद्धा इंग्लंड जर युरोपखंडांत सैन्य पाठविण्याची तयारी करीत नसले तर भावी महायुद्धांत इंग्लंड जर्मनीच्या विरुद्ध पक्षाला मिळणार नाही असेंच अनुमान काढावे लागतें. या दृष्टीने विचार केला असता लंडन टाइम्सचा १७ जून १९३८चा लेख फार महत्त्वाचा आहे. या लेखांत टाइम्सकार म्हणतात की, कोणत्याहि दृष्टीने पाहिले तरी फ्रान्सला इंग्लंडच्या सैन्याच्या मदतीची आवश्यकता नाही. कारण झेकोस्लोव्हाकियावर जर्मनीने आक्रमण केले असता फ्रान्सला जर्मनीवर चढाई करावीशी वाटली तर त्या चढाईंत प्रारंभापासून इंग्रज सैन्य भाग घेऊं शकत नाही. इंग्लंडांतून युद्धक्षेत्रावर सैन्य पोचायलाच पंधरा दिवस लागतील व एवढ्या मुदतींत फ्रान्स देशाच्या राजकीय व लष्करी परिस्थितींत किती अतर्क्य घटना घडून येतील, याचा अंदाज करणे अत्यंत अवघड आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, आधुनिक युद्धशास्त्राच्या नियमाप्रमाणे चढाई करणारें सैन्य हें बचाव करणाऱ्या सैन्याच्या पांचपट तरी असावे लागतें आणि फ्रान्सजवळ जर्मनीच्या पांचपट तर जाऊंद्याच, पण जर्मनीच्या पाऊणपट देखील सैन्य नाही. त्यामुळे फ्रान्सला जर्मनीवर चढाई करणें शक्य नाही. लोकमताच्या दृष्टीने विचार केला तर इंग्लंडांतील लोकमत दिवसेंदिवस युद्धालाच अधिकाधिक प्रतिकूल होत चाललें आहे. तेव्हा जर्मनीवर चढाई करण्याला लोकमताचा पाठिंबा मिळणे अशक्य आहे. उलटपक्षीं जर्मनीने फ्रान्सवर चढाई केली तर फ्रान्सच्या अभेद्य तटबंदीवर जर्मनीचे कपाळ फुटेल व या तटबंदीचें संरक्षण करण्याला फ्रेंच सैन्य पूर्णपणे समर्थ आहे. याकरिता कोणत्याहि परिस्थितीत इंग्लिश सैन्य फ्रान्समध्ये उतरविण्याची आवश्यकता नाही, असा लंडन टाइम्सचा सिद्धांत आहे.

## फ्रेंचांचा टिकाव लागणार नाही

या उतान्यांतील लंडन टाइम्सची माहितीहि चुकीची आहे. फ्रान्स आणि जर्मनी या उभयतांमध्ये लढाई जुंपली तर ती त्या उभयतांमधील सरहद्दीवरच लढली जाईल असे गृहीत धरणे, गेल्या महायुद्धांतील अनुभवाच्या विरुद्ध आहे. प्रो. बान्सेसारख्या जर्मन युद्धशास्त्रज्ञांच्या शिकवणीकडे लक्ष दिले असतां असें कळून येईल की, भावी फ्रांकोजर्मन युद्ध हें उत्तरसमुद्रापासून भूमध्यसमुद्रापर्यंतच्या फ्रान्सच्या सर्व पूर्वसरहद्दीवर लढलें जाण्याचा संभवच अधिक आहे आणि हा संभव जर खरा ठरला तर जर्मनी व इटाली यांच्या संयुक्त सैन्यापुढे फ्रेंच सेनेचा टिकाव लागणे अशक्य आहे. असे असूनसुद्धा फ्रान्सच्या मदतीला जाण्याची योजना करण्याचे तत्त्वदेखील लंडन टाइम्सला पटत नाही, ही सकृद्दर्शनीं मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. पण लंडन टाइम्सने असें धोरण पत्करण्याला दोन महत्त्वाचीं कारणें आहेत. एकतर भावी महायुद्धांत इंग्लंड आपल्या शत्रूंना मिळणार नाही, अशी जर्मनीच्या नेत्यांची खात्री झाली नाही तर, जर्मनीचा पहिला हल्ला लंडन शहरावरच होणार आहे. टाइम्सच्या संपादकांचे परम मित्र लॉर्ड लोदियन यांनी हाऊस ऑफ लॉर्ड्समध्ये सांगितलेंच आहे.

'The German General Staff was saying 'Can you assure us that if there is a war in the East we shall not be attacked in the West ? If we have to face a War on both frontiers we must begin in the West.'

## लंडनवर हल्ला करू नका

अशा रीतीने पहिला हल्ला स्वतःवर ओढवून घेणे हे इंग्लंडच्या परंपरागत रणनीतीच्या सपशेल विरुद्ध आहे. यामुळे 'मानापमानां'तील लक्ष्मीधर दरवडेखोरांशी ज्या धोरणाने वागला, त्याच धोरणाने इंग्लंडने जर्मनीशीं वागावें असा लंडन टाइम्सचा सल्ला आहे. आमच्या दोस्त राष्ट्रांचा मुलूख घ्या, आमच्या वसाहती हव्या असल्या तर त्याहि घ्या, पण लंडनवर हल्ला करू नका, एवढेंच लंडन टाइम्सचें जर्मनीपाशी हात जोडून मागणे आहे. लंडन टाइम्ससारख्या कट्टया साम्राज्यवादी पत्राने जर्मनीसारख्या जित राष्ट्राची अशी लाजिरवाणी विनवणी

करण्याचें दुसरे कारण म्हणजे जर्मनीच्या प्रचंड वैमानिक दलामुळे ब्रिटिश सैन्य इंग्लिश खाडी ओलांडून फ्रान्समध्यें जाण्याला आज असमर्थ झालें आहे.

इंग्लिश खाडी ओलांडण्याला आगबोटींना सामान्यतः दोन ते तीन तास लागतात. लढाईच्या वेळीं सैन्य वाहून नेणाऱ्या बोटींना इंग्लिश खाडी ओलांडून जाईपर्यंत आरमाराचें व विमानांचें संरक्षण मिळालें तरच त्या फ्रेंच किनाऱ्यावर सुखरूप जाऊन पोंचतील, नाहीं तर त्या जर्मनीच्या विमानांना किंवा पाणबुड्या बोटींना बळी पडतील. पाणबुड्या बोटीपासून आगबोटींना काय धोका असतो हें सर्वांना माहीत आहेच. विमानापासून आगबोटींना दोन प्रकारचें भय असतें. एक तर विमानांतून बॉबगोळे टाकून आगबोटी बुडवितां येतात किंवा विमानांतून विषारी धूर पसरून आगबोटीवरील सर्व उतारूंचा निःपात करतां येतो. या धोक्यासंबंधीं कमांडर केनवर्दी म्हणतात,

## सैन्याच्या मार्गांतील धोका

'A couple of squadrons of aeroplanes, fitted to lay poison-gas-cloud fly out and lay a gas-cloud just ahead of the convoy. The anti-aircraft guns of the destroyers might bring down one or two of them though anti-aircraft practice at sea from guns is a very difficult business. The remainder lay their gas-cloud and choke to death the crews of the whole convoy and probably disable the warships as well.'

या विषारी धुरापासून बचाव करून घेण्यासाठीं प्रतिबंधक मुखोटे निघाले आहेत खरे. पण त्यांचा उपयोग फुप्फुसांत विषारी वायु न जाऊं देण्यापुरताच होतो. मस्टार्ड गॅससारखे जे विषारी वायु अंगावरील त्वचेमधूनच शरीरांत भिनतात, त्यांच्यापासून कांहीं मुखोटे वापरून बचाव होत नाहीं. कित्येकजण असे म्हणतील कीं, असल्या विषारी धुरांच्या हल्ल्यांतूनहि कांहीं आगबोटी फ्रान्सच्या किनाऱ्यावर सुरक्षित पोंचतील. ती कल्पना खरी आहे, पण तेवढ्यानें ब्रिटिश सैन्य आपल्या शस्त्रास्त्रांसकट फ्रान्समध्यें नेण्याचा हेतु सिद्धीला जात नाहीं.

'Winged Warfare' या गतवर्षींच प्रसिद्ध झालेल्या ग्रंथाच्या तज्ज्ञ कर्त्यानें म्हटलें आहे,

"Even if a limited number of ships with munitions and warstores could run the gauntlet, a convoy of transports carrying troops, horses, mechanical transport and all the necessary supplies and equipment could never attempt a passage without overwhelming local air superiority. This fact becomes clearer when it is realized that some one and a half million tons of shipping would be required to transport a force of four infantry divisions and one cavalry division east of the Mediterranean."

## इंग्लिश खाडीखालून बोगदा

ही गोष्ट खरी आहे की, फ्रान्समध्ये पांच डिव्हिजन सैन्य न्यावयाला १५ लक्ष टनांची गलबतें न लागतां थोडी कमी गलबते पुरतील. पण एकंदरीत विमानांच्या तावडींतून आधुनिक शस्त्रास्त्रांनी युक्त असें सैन्य फ्रान्सच्या किनाऱ्यावर उतरविणे अत्यंत अवघड आहे, ही गोष्ट वरील दोन्ही उताऱ्यावरून सिद्ध होते.

या साऱ्या परिस्थितीचा विचार केला म्हणजे असे वाटते की, इंग्लिश खाडीखालून बोगदा खणून इंग्लंड व फ्रान्स हे देश परस्परांना जोपर्यंत जोडले गेले नाहीत तोपर्यंत इंग्लंडच्या मैत्रीपासून फ्रान्सला सुरक्षिततेचा फायदा मिळणार नाही.

—केसरी, ता. २३ ऑगस्ट, १९३८.

## CHANNEL TUNNEL SCHEME

PARIS

The urgent need, for military and economic reasons, of the construction of a Channel tunnel is brought once more to the attention of the French Government in a resolution by M. Marcel Boucher, deputy for the Vosges Department.

M. Boucher states in his report:

" Just as in 1914, Great Britain and France suddenly realised in September last, in face of common peril, how sadly lacking was the Channel tunnel.

" Between two nations whose very existence faces the same risks a rapid and safe communicating link is of capital importance and of the utmost urgency. "

M. Boucher quotes the words of Marshal Foch that if the Channel tunnel had existed in 1914 the World War might have been avoided. —टाईम्स, ता. २४ जानेवारी, १९३९.



# युद्धशास्त्रदृष्ट्या हिंदुस्थानाच्या संरक्षणाचा प्रश्न

## संरक्षणाच्या प्रश्नाचें महत्त्व

अबिसीनिया, स्पेन, चीन, युटोपिया इत्यादि देशांच्या संरक्षणाच्या महत्कार्यांत मग्न झालेल्या आमच्या पुढाऱ्यांनी आजपर्यंत स्वदेशसंरक्षणाच्या प्रश्नाकडे दुर्लक्षच केले आहे. यामुळे हिंदुस्थानांतील सामान्य जनतेलाच नव्हे तर हिंदुस्थानांतल्या कित्येक पुढाऱ्यांनाहि अर्वाचीन युद्धशास्त्रदृष्ट्या आपल्या देशाची परिस्थिति काय आहे, याची देखील कल्पना नाही. या जिव्हाळ्याच्या विषयाच्या चर्चेला चालना मिळावी, याकरिता हा लेख लिहिण्याचे धाडस करीत आहे.

या चर्चेच्या अगदी आरंभीच असा प्रश्न उपस्थित होतो की, हिंदुस्थान देशाच्या संरक्षणाच्या मर्यादा कोणत्या? कारण एखाद्या राष्ट्राची भौगोलिक मर्यादा व युद्धशास्त्रदृष्ट्या त्या राष्ट्राच्या सुरक्षिततेची मर्यादा, या दोन्ही मर्यादांमध्ये महदंतर असूं शकते. उदाहरणार्थ, राष्ट्र या दृष्टीने ब्रिटिश राष्ट्राची मर्यादा ग्रेटब्रिटन या बेटा इतकीच संकुचित आहे. पण इंग्लंडच्या सुरक्षिततेची मर्यादा ऱ्हाइन नदीपासून सुएझ कालव्यापर्यंत विस्तार पावली आहे. या दृष्टीने वरील प्रश्नाचा विचार केला असतां असे स्पष्टपणे सांगावे लागते की, बलुचिस्थान, अफगाणिस्थान, ब्रह्मदेश आणि सिंहलद्वीप हे सर्व प्रदेश हिंदुस्थानाच्या संरक्षणाच्या कक्षेत येतात व या सर्व प्रदेशावर हिंदुस्थानसरकाराची लष्करी सत्ता प्रस्थापित झाल्यावांचून हिंदुस्थानाला सुरक्षितता लाभणें अशक्य आहे. या प्रदेशांपैकी बलुचिस्थान व ब्रह्मदेश या दोन प्रदेशांवर तेवढी हिंदुस्थानसरकारची लष्करी सत्ता चालते. उरलेल्या दोन प्रदेशांवर हिंदुस्थानसरकारची लष्करी सत्ता प्रस्थापित होणे आवश्यक आहे. अफगाणिस्थानावर हिंदुस्थान सरकारचा पूर्वीप्रमाणें अधिकार प्रस्थापित होणें आवश्यक आहे असे विधान केल्याबद्दल लहान राष्ट्रांच्या कैवाऱ्यांचे प्रस्तुत लेखकाला शिव्याशाप खावे लागतील, हें त्याला माहीत आहे. पण वांशिक, सामाजिक, राजकीय व ऐतिहासिक कारणांकरिता हिंदुस्थानची सरहद्द हिंदुकुश पर्वताला भिडाविणें अगदी आवश्यक आहे.

## हिंदुकूश पर्वत हीच सरहद्द

वांशिक दृष्ट्या हिंदुकूश पर्वताच्या उत्तरेकडील म्हणजे काबूल व हिरात या दोन शहरांना जोडणाऱ्या रेषेपलीकडील अफगाणिस्थान व दक्षिणेकडील अफगाणिस्थान यांच्यामध्ये जमीनअस्मानाचें अंतर आहे. हिंदुकूश पर्वताच्या उत्तरेकडील उझबेक, ताजिक, तुर्कोमान वगैरे लोक हूण, मोगल वगैरे पीतवर्णी वंशांचे असून दक्षिणेकडील शिनवारी, मोहमंद, दुराणी, गिलचे, मंगल, हजारा वगैरे जमातींचे लोक मुख्यतः आर्यवंशीय आहेत. या दक्षिणेकडील अफगाणिस्थानांतच पुश्तू भाषा प्रचलित आहे. उत्तरेच्या लोकांच्या भाषा वेगळ्या आहेत. उत्तरअफगाणिस्थानांतील लोक शिया पंथाचे असून दक्षिण-अफगाणिस्थानांतील हजारा जमातीखेरीज इतर सर्व लोक सुन्नी पंथाचे आहेत. एकाच वंशाचे एकच भाषा बोलणारे व एकमेकांच्या अगदी शेजारी राहणारे लोक जर भिन्न राज्यपद्धतींच्या अमलाखालीं असले तर त्यांच्यामध्ये आपली राज्यपद्धति अभिन्न घडवून आणण्याची कारस्थानें सतत चालू राहतात व त्यामुळे कोणालाहि स्वस्थता मिळणें अशक्य होतें, असा राजकारणशास्त्राचा नियम आहे. या नियमाचा अनुभव हिंदुस्थानाच्या वायव्यसरहद्दीवर नेहमीच येत असतो. तेव्हा ही कारस्थानें व त्यामुळे नित्य उत्पन्न होणारी छोटीं युद्धे कायमचीं थांबविण्यासाठी हिंदुस्थानाची सरहद्द हिंदुकूश पर्वताला नेऊन भिडविणें अत्यावश्यक झालें आहे. दक्षिण अफगाणिस्थानांत सबक्तागिनाचे राज्य प्रस्थापित होण्यापूर्वी हिंदुस्थानाची सरहद्द हीच होती व ही सरहद्द हिंदू राजांच्या हातून गेल्यामुळेच हिंदुस्थानावर गझनीच्या महंमदाच्या स्वाऱ्या होऊं शकल्या. त्या वेळेपेक्षाहि आता विमानांच्या शोधामुळे हिंदुकूश पर्वताचे महत्त्व अधिकच वाढले आहे. हिंदुकूश पर्वत आपल्या हाती नसेल तर मध्यआशियांतून एखादी विमानवाहिनी हिंदुस्थानावर चालून आल्यास तिचा प्रतिकार करणे फार अवघड होईल. पर्वतांचा वैमानिक युद्धांत किती उपयोग होतो, याची ज्यांना माहिती करून घ्यावयाची असेल त्यांनी, ऑस्ट्रियांतील आल्प्स पर्वताचा जर्मनीच्या विमानवाहिनीला किती उपयोग होणार आहे, या विषयांवर युरोपांतील पत्रांतून आलेले लेख पहावेत म्हणजे त्यांना हिंदुस्थानाला हिंदुकूश पर्वताची आवश्यकता किती आहे याची कल्पना येईल.

## पठाणांचा उपद्रव

हिंदुस्थानाची सरहद्द हिंदुकुश पर्वताला भिडविणे तर दूरच राहिलें ती अफगाणिस्थानाच्या सरहद्दीला भिडविणे देखील अद्यापि इंग्रजांच्या हातून घडून आलें नाही. यामुळे हिंदुस्थान व अफगाणिस्थान यांच्यामधील सुमारे तीस लक्ष लोकवस्तीचा मुलूख सरहद्दीवरील रानटी टोळ्यांच्या मालकीचा होऊन बसला आहे. या मुलुखांतून सरहद्द प्रांतांतील सुखवस्तू लोकांवर नेहमी दरवडे पडतात. सरहद्द प्रांताच्या पांच जिल्ह्यांपैकी हजारा हा एकच जिल्हा सिंधुनदाच्या पूर्वेला आहे. त्यामुळे त्या जिल्ह्यावर आक्रमण करणें पठाण लुटारूंना फारसें जमत नाही. पण पेशावर, डेराइस्माइलखान, कोहाट व बन्नु हे चार जिल्हे सिंधुनदाच्या पश्चिमेला असल्याने त्यांच्यावर दरवडे घालणें पठाणांना फार सुलभ जाते. या दरवड्यापासून पठाणांना प्राप्तिहि फार चांगली होते. उदाहरणार्थ, या चार जिल्ह्यांपासून सरकाराला वार्षिक साठ लक्षांची प्राप्ति होते, तर पठाण दरवडेखोरांना विशेष लाभदायक वर्षी तीस लक्षांपर्यंत प्राप्ति झालेली आहे ! याशिवाय पकडून नेलेल्या लोकांच्या मुक्ततेसाठी त्यांच्या आप्तेष्टांनी भरलेली खंडणी वेगळीच. या पठाणांच्या दरवड्यांचा प्रतिकार करतांना किती पोलीस यंदा मारले गेले, याचा नक्की आंकडा सरकारलाहि उपलब्ध नसल्यामुळे तो प्रसिद्ध करता येत नाही, असें १९२० च्या रिपोर्टांत हिंदुस्थानसरकारने स्वतः प्रसिद्ध केलें आहे ! त्या प्रांतांतील अंदाधुंदीच्या कारभाराची यापरती निंदा तरी काय करावयाची ? तरीपण आणखी एका गोष्टीचा उल्लेख करणें जरूर आहे. सरहद्द प्रांतांत सुमारे चारशे रुपयाला कोणाचाहि खून करावयाला मारेकरी मिळूं शकतो. त्यामुळे सरहद्द प्रांतांतील खुनांचें प्रमाण बाकीच्या हिंदुस्थानांतील सर्वांत अधिक खून होणाऱ्या प्रांताच्या पांचपट आहे.

## लढाऊ लोकांचें संख्याबल

सरहद्दीवरील बेबंद प्रांतांत सुमारें तीस लक्ष वस्ती आहे व त्याच्या पलीकडील अफगाणिस्थानाची लोकसंख्या एक कोटीच्या आसपास आहे. या दोन्ही मुलुखांतून मिळून सुमारें वीस लक्ष सैन्य हिंदुस्थानाविरुद्ध लढाईला उभें राहूं शकते. या संयुक्त सैन्याला जिंकण्याइतकें मनुष्यबळ हिंदुस्तानाजवळ आहे

कीं नाही, याचा आतां विचार केला पाहिजे. हिंदुस्थानाची लोकसंख्या ३५ कोटि असली तरी या लोकसंख्येपैकी सुमारे ३२॥ कोटि लोकांचे क्षात्रतेज अगदी म्लान होऊन गेले असल्याने उद्या एखादी लढाई उपस्थित झाली तर त्यांचा लढाईला उपयोग होणार नाही. ही परिस्थिति बदलण्याचा प्रयत्न केला पाहिजे, हे सर्वांना मान्य आहे. पण आजच्यां परिस्थितीत हिंदुस्थानांतील लढाऊ जातीवर सर्वस्वी अवलंबून राहणें आपल्याला आवश्यक आहे, ही गोष्ट विसरून चालत नाही. या लढाऊ जातींपैकी डोग्रा रजपुतांची संख्या किती आहे याचा अंदाज उपलब्ध नाही. गढवाली ५ लक्ष, गुरखे ३५ लक्ष, जाट २० लक्ष, मराठे ४० लक्ष, रजपूत ३० लक्ष, शीख ३० लक्ष, पंजाबी मुसलमान ६० लक्ष, दिल्लीभोवतालचे मुसलमान १७ लक्ष, सरहद्द प्रांतांतील पठाण ८ लक्ष व इतर किरकोळ जाती ५ लक्ष अशी एकंदर मिळून ३५ कोटींच्या हिंदुस्थानांत लढाऊ जातीची लोकसंख्या जेमतेम अडीच कोटि भरते.

या अडीच कोटीमध्ये ८५ लक्ष मुसलमान आहेत. हे मुसलमान हिंदुस्थानासाठी परदेशी मुसलमानांबरोबर लढावयाला तयार होतील की नाही ही गोष्ट संशयास्पद आहे. हिंदुस्थानांतील लढाऊ मुसलमानांनी विदेशांतील मुसलमानांशीं एकजूट केली तर मुसलमानांची संख्या दोन कोटीवर जाईल व हिंदूंची संख्या पावणेदोन कोटीच्या आंतच येईल. मुसलमानांच्या लढाऊ जातीतून, हिंदूंच्या लढाऊ जातींपेक्षा, लढाईला लायक असलेल्या लोकांचे प्रमाण अधिक आहे. उदाहरणार्थ, ४० लक्ष मराठ्यांपेक्षा ४० लक्ष पठाणांत लढाईला लायक असलेल्यांची संख्या फार अधिक असते. या साऱ्या परिस्थितीचा सूक्ष्म विचार केला म्हणजे हिंदुस्थानाचें संख्याबल आत्मसंरक्षणाला किती अपुरे आहे, याची पूर्ण कल्पना येते. ही लज्जास्पद स्थिति दूर व्हावी, याकरिता हिंदवासियांमध्ये क्षात्रवृत्तीची पुनः प्राणप्रतिष्ठा करण्याचा राष्ट्रनायकांनी निकराने प्रयत्न करणें जरूर आहे.

## लष्कराचे तीन विभाग

एकंदर मनुष्यबळावरून खऱ्या लष्कराकडे दृष्टि वळविली, तर अशीच शोचनीय अवस्था आढळून येते. हिंदुस्थानांतील एकंदर लष्कराचे, आघाडीचें संरक्षक सैन्य, लढाऊ सैन्य व अंतर्गत संरक्षणार्थ राखून ठेवलेलें सैन्य असे तीन

विभाग आहेत. आघाडीच्या संरक्षक सैन्याच्या तीन ब्रिगेड्स पेशावर जिल्ह्यांत असतात. कुर्रम येथे दोन व वजिरिस्थानांत तीन, फोर्ट सांडेमान व लोरेलाई या ठिकाणीं एक याप्रमाणे आघाडीच्या सैन्याची विभागणी झाली आहे. याशिवाय सुमारें पांच हजार स्काउटस् व दहा हजार खासदार यांचाहि या संरक्षक सैन्यांत समावेश झालेला आहे. यांपैकी स्काउट्स हे प्रामाणिक व उत्तम लढाऊ सैनिक आहेत. खासदारांपैकी बहुतेक सर्वजण दिवसा इंग्रज सरकाराची चाकरी करतात व रात्रीं इंग्रज सरकाराच्या प्रजाजनांना लुटतात आणि लढाईची वेळ आली तर शत्रूंना फितूर होतात ! लढाऊ सैन्याच्या चार डिव्हिजन्स रावळपिंडी, मिरत, क्वेट्टा व पुणे या विभागांत राहतात. याशिवाय घोडदळाच्या चार ब्रिग्रेड्सचा लढाऊ सैन्यांत समावेश होतो. लढाऊ सैन्यापेक्षा अंतर्गत संरक्षणाचे सैन्य थोडे अधिकच आहे. कारण अंतर्गत संरक्षणाच्या सैन्यांत पायदळाच्या चारच डिव्हिजन्स असल्या तरी घोडदळाच्या पांच ब्रिगेड्स आहेत. सैन्याच्या या विभागणीकडे पाहून असा विचार मनांत येतो की, देशांतील संरक्षणाचे सैन्य व लढाऊ सैन्य यांची संख्या जवळजवळ सारखीच आहे, अशी परिस्थिति हिंदुस्थानाखेरीज इतरत्र कोठेहि आढळणार नाही. त्याचप्रमाणे स्वदेशाच्या सरहद्दीच्या संरक्षणाच्या कामावर त्या देशाच्या शत्रूंच्या जातभाईंची योजना केल्याचे उदाहरणहि हिंदुस्थानाखेरीज इतरत्र आढळणार नाही. जर्मनीचे सुप्रसिद्ध लष्करी तज्ज्ञ प्रो. बान्से हे म्हणतात—

'Nowhere does a nation need to take such care to maintain and impose its nationality as in its frontier districts; nowhere has it to concentrate so much on defending itself against the evil designs of its neighbour.'

प्रत्येक राष्ट्राला सरहद्दीवरील प्रांतांत राष्ट्रीयत्वाला किती जपावें लागतें हे इंग्रज सरकाराला चांगलें कळतें. पण हिंदुस्थानाच्या राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीने त्यांचा कारभार चालतच नाही. आपल्या देशाच्या पुढाऱ्यांना तर अद्यापि आपले कोण व परके कोण याचाच उमज पडलेला नाही.

हिंदुस्थानांतील खऱ्या सैन्याची संख्या २२०००० आहे, या संख्येंतून अंतर्गत सुरक्षिततेसाठी राखून ठेवलेलें सैन्य वजा केले असतां सुमारें दीड

आपले सैन्य परशत्रूंना तोंड देण्याला शिल्लक राहते. एवढ्या फौजेच्या जोरावर हिंदुस्थानाचा जास्तीत जास्त आठ महिने बचाव करतां येईल असा लष्करी खात्याचा अंदाज आहे. हा अंदाज देखील, हिंदुस्थानांतलि मुसलमान जनता व हिंदुस्थानाच्या सैन्यांतील मुसलमान सैनिक परशत्रूंना फितूर होणार नाहीत असें गृहीत धरून केलेला असल्याने थोडा धाडसाचाच आहे. शिवाय स्पेन व चीन या दोन्ही देशांना रशिया ज्या तऱ्हेने मदत करीत आहे त्याच तऱ्हेने त्याने अफगाणिस्थानाला मदत केली तर हिंदुस्थानाच्या लष्करी खात्याचे सर्व अंदाज एका क्षणात कोलमंडून पडतील. लष्करी खात्याने वरील अंदाज ज्या वेळी केला त्या वेळीं तटस्थतेचे व्रत हें शिवव्रतासारखें कडकडीत होते. पण अलीकडे युध्यमान राष्ट्रांना शस्त्रास्त्रेंच काय पण हजारो सैनिक व लष्करी अधिकारी पुरविले तरी त्या व्रताचा भग होत नाही. अफगाणिस्थानाचे व हिंदुस्थानाचे युद्ध जुपल्यास इतर इस्लामी राष्ट्र व रशिया तटस्थतेच्या या नव्या आदर्शांचा फायदा घेतल्यावांचून राहणार नाहीत.

## युद्धसामुग्रीची वाट काय ?

देशसंरक्षणाच्या प्रश्नाचा विचार करितांना सैन्याइतकेंच युद्धसामुग्रीलाहि महत्त्व द्यावे लागते. सुमारे दोन वर्षांपूर्वी हिंदुस्थानाचे माजी सेनापति सर फिलिप चेटवूड यांनी एका व्याख्यानात सांगितले होते—

‘India now makes 90 percent of the requirements of her armed forces, Guns, Shells, Machine guns, Rifles, Ammunition, Boots, Clothes, Saddlery, Harness, Vehicles and almost everything except Motor cars and Planes and these will come soon.’

हिंदुस्थानाच्या लष्करी कारखान्यांपैकी इशापूर येथील रायफल फॅक्टरी व मेटल ॲंड स्टील फॅक्टरी, अरुवंकडु येथील कॉर्डाइट फॅक्टरी, जबलपूर येथील गन कॅरेज फॅक्टरी, काशीपूर येथील गन ॲंड शेल फॅक्टरी, खडकी येथील ॲम्युनिशन फॅक्टरी आणि मद्रास व शहाजहानपूर येथील क्लोदिंग फॅक्टरी हे कारखाने महत्त्वाचे आहेत. पण या कारखान्यांना हिंदी सैन्याच्या ९० टक्के गरजा

भागवितां येतात, हे माजी सेनापतीचे विधान बरोबर नाही. मेजर डी. एच्. कोल यांनी सांगितलें आहे,

'All the finer technical equipment, all motor **transport** and air-craft with their accessories, most of the **explosives** used, a large part of the woolens and textiles and several of the necessities of life for white troops and the white populations must still, however be imported.'

विमानें व मोटारी यांचे कारखाने हिंदुस्थानांत लौकरच निघतील, असें भाकित सर फिलिप चेटवूड यांनी १९३६ सालीच केले होते, पण ते खरे होण्याचा काळ अजून आलेला दिसत नाही.

## रासायनिक कारखान्यांची जरूरी

आत्मवंचनेसाठी किंवा परवंचनेसाठी सर फिलिफ चेटवुडसारखे सेनापति काय वाटेल ते सांगोत, खरे बोलावयाचें म्हणजे हिंदुस्थानांतील दारूगोळ्यांचे कारखाने अगदी प्राथमिक अवस्थेमध्ये आहेत. याचे कारण असे आहे की, दारूगोळ्यांच्या कारखान्याला लागणाऱ्या द्रव्यांचा पुरवठा होणे हे देशांत रासायनिक उद्योगधंद्यांची वाढ होण्यावर अवलंबून असते आणि आपल्या हिंदुस्थानांत तर रासायनिक उद्योगधंदे अजीबात नाहीत. आपल्या देशांत ज्या रसायनशाळा आहेत त्यांना औषधांचे व अत्तरांचे कारखाने म्हटले तरी चालेल आणि ते देखील परदेशाहून आणविलेल्या मालावरच अवलंबून असतात. डॉ. ब्राउन या रसायनशास्त्रज्ञांनी म्हटले आहे,

'The world's annual production of sulphuric acid is now in the neighbourhood of ten million tons per annum, of which India supplies only a small fraction of one per cent. If the demand for sulphuric acid is taken as the chemical barometer of industrial conditions, industrial activity in India is in its infancy.'

## युद्धोपयोगी रसायनें

दारूगोळ्यांच्या कारखान्यांतून गनकॉटन तयार करण्यासाठी नायट्रिक

ॲसिड व सल्फ्यूरिक ॲसिड यांची जरूर असते. गनकॉटनपेक्षाहि अधिक भयंकर स्फोटक द्रव्य जें नायट्रोग्लिसरिन, त्याचे घटक नायट्रिक ॲसिड व ग्लिसरीन हे असतात. गनकॉटन आणि नायट्रोग्लिसरिन व्हॅसलिनमध्ये मिसळून कॉर्डाइट ही बिनधुराची दारू तयार करतात. कॅर्बालिक ॲसिडमध्ये नायट्रिक ॲसिड मिसळलें म्हणजे पिक्रिक ॲसिड तयार होते. नायट्रिक ॲसिड हे टोलूएनमध्ये मिसळलें म्हणजे टी. एन्. टी. या नांवाने प्रसिद्ध असलेले स्फोटक द्रव्य उत्पन्न होतें. अमोनियम नायट्रेटमध्ये टी. एन्. टी मिसळले असतां आमाटोलची प्राप्ति होते. या त्रोटक उल्लेखावरून स्फोटक द्रव्यांचे उत्पादन करण्यासाठी देशांत रासायनिक धंद्यांची वाढ करणे किती आवश्यक आहे हे कळून येईल. स्फोटक द्रव्यांचे उत्पादन जसें रासायनिक उद्योगधंद्यांवर अवलंबून असते, तसेंच विषारी धुरांचे उत्पादन हे देशांतील रंगांच्या कारखान्यांच्या वाढीवर अवलंबून असते. रंग आणि विषारी वायू यांचा अन्योन्य संबंध लक्षांत आल्याबरोबर इंग्लंडने जर्मनीचे रंग घेणे बंद करून आपल्याला लागणारे सर्व रंग स्वदेशांत तयार करण्यासाठी इंपीरियल केमिकल ही निमसरकारी कंपनी स्थापन केली. मेजर डी, एच्. कोल म्हणतात,

‘It is indeed in the field of chemical industry that our situation has most improved since the War. Nitrates, dyes and a vast range of essential chemicals can now be produced in this country rendering us less dependent on foreign sources and saving about 2 millions ton of shipping annually.’

रंगाच्या धंद्याप्रमाणे खतांच्या वाढीनेहि देशाच्या युद्धसिद्धतेला आतिशय मदत होते. कारण खतांना लागणाऱ्या सोरा, गंधक, अमोनिया वगैरे पदार्थांचा दारूगोळ्यांच्या कारखान्यांत फार मोठ्या प्रमाणावर उपयोग केला जातो. याकरिता जपान सरकारने आपल्या देशांतील खतांचा धंदा सरकारी मालकीचा करून टाकला आहे. यावरून सुधारलेली शेती व युद्ध यांचा अन्योन्य संबंध कळून येईल. हिंदुस्थानाने आपली सर्व शेती जर आधुनिक पद्धतीची केली व आपल्याला लागणारीं सर्व खतें स्वदेशांतच तयार केली, तर हिंदुस्थानच्या युद्धसिद्धतेंत फार मोठी भर पडेल.

## युद्धोपयोगी धातू

आता युद्धोपयोगी पदार्थांचा हिंदुस्थानांत कितपत पुरवठा आहे, याचा थोडा विचार केला पाहिजे; ॲल्युमिनियमचा उपयोग टॉर्पेडो बोटी व पाणबुड्या बोटी बांधण्यासाठी आणि आगलावे बॉंब तयार करण्यासाठी होतो. आयर्न ऑक्साइड व ॲल्यूमिनियम यांचे चूर्ण हा आगलाव्या बॉंबमधील प्रमुख घटक असतो. या बॉंबचा स्फोट होतांच ३००० सेंटिग्रेड डिग्री इतकी उष्णता उत्पन्न होते. या बॉंबने लावलेली आग विझविणे अशक्य असते. ॲल्यूमिनियम हें बॉक्साइट या खनिज पदार्थापासून काढण्यांत येते. जबलपूर जिल्ह्यांत कटनी येथे, गुजराथेंतील खेडा-जिल्ह्यांत व दक्षिणेकडील सावंतवाडी या संस्थानांत बॉक्साइटच्या मोठ्या खाणी आहेत व खाणीची कामेंहि चालू आहेत. याशिवाय मध्यप्रांतातील बालाघाट, बिलासपूर व मंडला या जिल्ह्यात, काश्मीर संस्थानांतील जम्मू जिल्ह्यांत, बहार प्रांतांतील रांची जिल्ह्यांत व कोल्हापूर संस्थानांतील राधानगरी प्रदेशांतहि बॉक्साइटच्या मोठाल्या खाणी आहेत. सामान्यतः या शतकांत तरी हिंदुस्थानास ॲल्युमिनियमचा तुटवडा पडूं नये असे वाटते.

### ॲंटिमनी

ॲंटिमनीची श्रापूनेल जातीचे तोफांचे गोळे करतांना फार गरज असते. त्याशिवाय अनेक प्रकारच्या गोळ्यांमध्येहि ॲंटिमनीचा उपयोग करतात. गेल्या युद्धांत हिंदुस्थानाला ॲंटिमनीचा पुरवठा ब्रह्मदेशांतील नामतू येथील बर्मा कॉर्पोरेशनच्या भट्टीमधून झाला. याच कंपनीने अमेरिकेलाहि आतापर्यंत मोठ्या प्रमाणावर ॲंटिमनीचा पुरवठा केला आहे. ब्रह्मदेश व सयाम यांच्या सरहद्दीवर ॲंटिमनीच्या मोठ्या खाणी आहेत, पण दळणवळणाच्या साधनांच्या अभावी त्यांचा सध्या उपयोग करता येत नाही. पंजाबांत शिगरी या हिमनदीच्या शेजारींहि ॲंटिमनीच्या खाणी आहेत, पण तेथील हवा अत्यंत थंड असल्याने वर्षांतून दोन-तीन महिनेच तिथल्या खाणीतून काम करणे शक्य असते. म्हैसूर संस्थानांतील चितळदुर्ग जिल्ह्यांतहि ॲंटिमनीच्या खाणी सांपडल्या आहेत, पण त्या अगदींच दरिद्री आहेत. एकंदरीनें पाहता हिंदुस्थानांत ॲंटिमनीचा प्रत्यक्ष अभाव नसला तरी तिची पैदास वाढविणे बरेच अवघड आहे. निदान युद्धासारख्या अवघड प्रसंगी वेळ निभावून नेण्यापुरती ही धातु हिंदुस्थानांत आहे असे म्हणतां येईल.

### क्रोमियम

क्रोमियमचा युद्धांतील मुख्य उपयोग म्हणजे जहाजाचें पोलादी चिलखत करण्यासाठी व तें चिलखत फोडणारें तोफेचे गोळे करण्यासाठी होतो. साध्या पोलादापेक्षा क्रोमियममिश्रित पोलाद फार कठीण असतें व तसल्या पोलादाला कधीं गंज चढत नाहीं. यामुळे क्रोमियमचा उपयोग अलीकडे फार वाढला आहे. हिंदुस्थानांत बलुचिस्थान, म्हैसूर व बहार या तीन प्रांतांत क्रोमियमच्या मोठ्या खाणी चालू आहेत. याशिवाय अंदमान बेटांत, सालेम, रांची, भागलपूर व मणिपूर या जिल्ह्यांतूनहि क्रोमियमच्या खाणी सांपडल्या आहेत. पण त्या विशेष महत्त्वाच्या नाहीत.

### टुंग्स्टेन

टुंग्स्टेन मिसळून तयार केलेले पोलाद साध्यापोलादाच्या पांचपट काम देतें, असा अनुभव आहे. यामुळे एक शास्त्रज्ञ म्हणतो

'To deprive a nation of tungsten is to cripple its military power and to ruin its industrial life in times of peace.'

हिंदुस्थानांत फक्त सिंघभूम जिल्ह्यांतच टुंग्स्टेन सांपडते. ब्रम्हदेशांत आणि शान संस्थानांत मात्र टुंग्स्टेनच्या लहानमोठ्या शेकडो खाणी आहेत. महायुद्धाच्या प्रारंभीं टुंग्स्टेनच्या पैदाशींत ब्रम्हदेशाचा पहिला नंबर होता. पण पुढे अमेरिका, चीन, बोलिव्हिया या देशांनी त्याला मागे टाकले. ब्रम्हदेशांतील खाणीपैकी टॅव्हॉय जिल्ह्यांतील खाणी फार महत्त्वाच्या असून ब्रम्हदेशाच्या एकंदर पैदाशीचा निम्मा हिस्सा त्याच खाणींमधून निघतो.

### निकेल, तांबें, शिसें

निकेलचा मुख्य उपयोग मोटारी, विमानें, लढाऊ जहाजें इत्यादींना लागणारें पोलाद तयार करण्यासाठी होतो. याशिवाय तोफांचे गोळे करण्याकरिताहि निकेलची जरूर लागते. जयपूर व त्रावणकोर या संस्थानांत निकेलच्या खाणी सांपडल्या आहेत, पण तिथे काम सुरू झालेलें नाहीं. १९३४ सालीं बहारमधील सिंघभूम जिल्ह्यांतहि निकेलची खाण सांपडल्याचें प्रसिद्ध झालें होतें.

पण तिची पुढील वार्ता अजून प्रसिद्ध झाली नाही. सिंघभूम जिल्ह्यांतील तांब्याच्या खाणींतूनहि थोडेसे निकेल सांपडते पण तेथील तांबें गाळण्याच्या पद्धतीने त्यांतले बरेच फुकट जातें. तो कारखाना विजेवर चालविला तर तांबें व निकेल या दोन्ही धातू पदरी पडतील. ब्रह्मदेशांतील बाडविन येथील खाणींतून शिसे, तांबे, निकेल या सार्‍या धातू मिश्रस्थितीत सांपडतात व बर्मा कॉर्पोरेशनच्या नामतू येथील भट्टीत त्या विभक्त केल्या जातात. हिंदुस्थानची निकेलची पैदास साडेतीन हजार टनांची आहे.

बाडविन येथील खाणी अतिशय महत्त्वाच्या आहेत. त्या खाणीतून अँटिमनी, कोबाल्ट, रुपे, जस्त इत्यादि धातूहि सांपडतात. पण त्या खाणीतील धातूंचा पुरवठा आणखी पांच वर्षांतच संपून जाईल असा अंदाज आहे. यासाठी या सर्व धातूंच्या खाणीचा हिंदुस्थानांतील शास्त्रज्ञांनी कसून शोध करणे जरूर आहे. हिंदुस्थानांतील तांब्याच्या सर्वांत महत्त्वाच्या खाणी मोसाबोनी येथील होत. या खाणीतून गेल्या पंधरा वर्षांत दहा लक्ष टन अशुद्ध तांबें निघालें आहे. मँगेनीजच्या बाबतींत विशेष कांहीच लिहावयाला नको. मॅंगेनीजच्या पैदाशीत हिंदुस्थानाचा सार्‍या जगांत तिसरा नंबर लागतो. दगडी कोळशाची हिंदुस्थानांतील पैदास दोन कोटि टनांवर आहे. लोखंड व पोलाद यांची पैदास वीस लक्ष टनांच्या आसपास आहे. हिंदुस्थानाला लागणार्‍या पेट्रोलियमचा अर्धा हिस्सा हिंदुस्थानांत उत्पन्न होतो. गंधकाची एकच महत्त्वाची खाण हिंदुस्थानांत आहे. त्या खाणीतील सारें गंधक हिंदुस्थानच्या एका वर्षाच्या गरजेपुरतेंच आहे. पार्‍याच्या खाणी तर हिंदुस्थानांत नाहीतच. या सार्‍या चिकित्सेवरून हिंदुस्थानाचे लष्करी यंत्र परराष्ट्रांवर किती अवलंबून आहे, याची कोणालाहि कल्पना येण्याजोगी आहे.

## असफअल्लींची विचित्र विचारसरणी

हिंदुस्थानाचा परराष्ट्रांशी होणारा बहुतेक सर्व व्यापार जलमार्गाने होत असल्याने युद्धाच्या वेळीं आपल्या व्यापाराला जलमार्ग मोकळा राहण्याची खबरदारी घेणे हें हिंदुस्थानाच्या युद्धमंत्र्यांचे एक महत्त्वाचें कर्तव्य होईल. ही परिस्थिति उघड उघड दिसत असून सुद्धा पंडित जवाहरलाल नेहरू व बॅ. असफअल्ली

कॉंग्रेससारख्या प्रमुख पुढाऱ्यांनीं हिंदुस्थानाला आरमाराची फारशी गरज नाही, असा प्रचार अलीकडे सुरू केला आहे, ही अतिशय शोचनीय गोष्ट आहे. बॅ. असफअली म्हणतात,

"I attach a great deal of importance to the development of the sea strength, but pending its inevitably gradual growth, we can easily depend on the sea-power of the countries which desire trade with us and whose self-interest would demand the protection and safety of trade-routes to India. We are exporters of raw material in the main and as such those who are in need of our products are bound to safeguard the sea-routes which bring their bottoms to India."

बॅ. असफअलीच्या या विचारसरणीत ऐतिहासिक दृष्ट्या दोन ढोबळ दोष दिसून येतात. पहिला दोष हा की, हिंदुस्थानाच्या जलमार्गांच्या संरक्षणाची जबाबदारी आपण परक्यांवर टाकली की त्यांना संपूर्ण हिंदुस्थानाच्याच संरक्षणाची जबाबदारी आपल्या शिरावर घ्यावी, असे वाटूं लागते. अरब, पोर्तुगीज, आणि इंग्रज या तीन्ही जातींनी याच स्तुत्य उद्देशानें हिंदुस्थानांत प्रवेश केला, ही गोष्ट आमच्या पुढाऱ्यांनी तरी केव्हाहि दृष्टीआड करूं नये. शिवाय गेल्या जागतिक मंदीपासून असा अनुभव आला आहे की, कच्चा माल उत्पन्न करणाऱ्या कोणाहि राष्ट्रानें आपल्या मालाच्या अभावी दुसऱ्या एखाद्या राष्ट्राचें नडेल, अशी अवास्तव अपेक्षा करूं नये. आमचें असफअलींना इतकेंच सांगणे आहे की, हिंदुस्थानाच्या जलमार्गांच्या संरक्षणाची जबाबदारी परराष्ट्रांवर टाकून आपण स्वतंत्र राहूं शकूं, हा भ्रम त्यांनी टाकून द्यावा व आपण आपला कच्चा माल एखाद्या राष्ट्राला विकण्यानें त्या राष्ट्रावर आपले इतके उपकार होतात कीं, त्याच्या मोबदला त्या राष्ट्रानें आपल्या राष्ट्राच्या संरक्षणाला केवळ व्यापारी दृष्टीनें मदत केलीच पाहिजे, असल्या भ्रमांतहि त्यांनी राहूं नये.

## समुद्रकिनाऱ्याचें संरक्षण

पंडित जवाहरलाल नेहरूंनी 'कोल्हा व द्राक्षें' या गोष्टींतील कोल्ह्याचें अनुकरण करून सांगितलें आहे 'Some experts maintain that navies

are out of date ' पण ही शुद्ध आत्मवंचना आहे. खाड्या व सामुद्रधुन्या यांच्यासारख्या संकुचित क्षेत्रांत विमानांपासून लढाऊ जहाजांचा बचाव करणें अशक्यप्राय झाले असले तरी हिंदी महासागरासारख्या अफाट महासागरांत किनाऱ्यावरील विमानांकडून आरमाराचे कांहीहि वाकडे होणें अशक्य आहे. आरमारांचा मुख्य उपयोग म्हणजे समुद्रावरील व्यापाराचे संरक्षण करणें व शत्रूंच्या स्वारीपासून समुद्रकिनाऱ्याचे संरक्षण करणे हा होय. हीं कार्यें विमानां-कडून होऊं शकत नाहीत. चीनजवळ बरेच मोठे वैमानिक दल असून-सुद्धा जपानने आपलें सैन्य चीनच्या किनाऱ्यावर उतरविलेंच. चीनच्या या अनुभवामुळे तरी आरमाराचें महत्त्व पंडित जवाहरलाल नेहरू यांना कळाव-याला पाहिजे. असफअल्लीनी सांगितले आहे 'आम्ही आमच्या समुद्रकिना-ऱ्याच्या संरक्षणासाठी समुद्रांत यथेच्छ पाणसुरुंग पेरूं व किनाऱ्यावर लांब-पल्ल्याच्या तोफा रोखून ठेऊं. म्हणजे कोण आमच्या किनाऱ्याकडे वाकडया दृष्टीने पाहणार आहे ? ' कित्येक वेळा संततिनियमनाची साधनें हीं संततिसंगोप-नाच्या खर्चापेक्षा महाग ठरतात. तीच गत बॅ. असफअल्लीनी सुचविलेल्या उपा-याची होणार आहे. हिंदुस्थानाच्या सहा हजार मैलांच्या किनाऱ्याभोंवती पाणसुरुंग लावणें व किनाऱ्यावर लांबपल्ल्याच्या तोफांच्या बातेऱ्या लावून ठेवणें हें आर-मार बांधण्यापेक्षांहि अधिक महाग ठरेल. कित्येकजण असे म्हणतील की, पाण-सुरुंग व तोफा यांची तरतूद साऱ्या किनाऱ्यावर करावयाची नसून ती केवळ शत्रूंची लढाऊ जहाजे येऊं शकतील, अशा बंदरांवरच करावयाची आहे. या आक्षेपाला आर्थर व्हिन्सेंट यांनी उत्तर दिले आहे

"The 6000 miles of India's coast-line compose an immense length to watch and guard, its local harbours offer an unlimited number of bases for local maintenance of craft so long as illicit arrangements for maintenance, can be made and continued unobserved."

तेव्हा इतक्या साऱ्या बंदरांच्या संरक्षणासाठी पाणसुरुंग व तोफा यांची तरतूद करण्यापेक्षा समुद्रावरील शत्रूंना पिटून लावण्यासाठी जरूर तितके आरमार बांधणेंच श्रेयस्कर होईल.

## खुष्कीचे दळणवळणाचे मार्ग

आता जमिनीवरील दळणवळणाच्या मार्गांचा थोडा विचार केला पाहिजे. हिंदुस्थानांत सुमारें ४३००० मैलांची रेल्वेलाइन आहे. यापैकी अर्धी लाइन ब्रॉडगेजची असून सुमारे १७५०० मैलांची लाइन मीटरगेजची आहे. उरलेल्या रेल्वेचे गेज २॥ फूट किंवा दोन फूट आहे. यामुळे एका रेल्वेवरील डबे व इंजिने दुसऱ्या रेल्वेवर चालूं शकत नाहींत. लष्करी दृष्टया हा फार मोठा दोष आहे. दुसरी गोष्ट अशी की, रेल्वेला शक्य तितका अधिक फायदा व्हावा, याकरिता या देशांतील नद्यांवर शक्य तितके कमी पूल बांधलेले आहेत व त्या पुलांपैकीहि बरेचसे पूल रेल्वेखेरीज इतर दळणवळणाला पूर्णपणे निरुपयोगी आहेत. मेजर डी. एच्. कोल म्हणतात,

"Perhaps the most serious illustration of this is the river Indus,, which is crossed in its whole course by only five railway bridges at Kotri, Rohri, Kalabagh, Khusalgarh and Attock.'

सिंधुनदापलीकडील प्रदेशांत लष्करी गरजेच्या दृष्टीने रेल्वे किंवा मोटारचे रस्ते फारच कमी आहेत. हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांच्यामध्ये तर मुळी आगगाडीच नाही. देशांतील खडीचे रस्ते सुमारे ६०००० मैल लांबीचे आहेत. या रस्त्यांचे वर्णन करावयाला नकोच. एक डिव्हिजन सैन्याच्या मोटारी, तोफखाना व टॅन्क्स जर या रस्त्यांवरून जातील तर दुसरे दिवशी रस्ता कुठे होता याचा कोणाला मागमूसहि लागणार नाहीं.

## ॲ. केदार यांचा इषारा

युद्धसाधनांच्या दृष्टीने हिंदुस्थानाच्या संरक्षणाच्या प्रश्नाचा विचार केल्यानंतर सरतेशेवटी मनाला असे वाटल्यावांचून रहात नाही की, कोणत्याहि देशाची सुरक्षितता ही त्या देशांतील युद्धसाधनांच्या विपुलतेपेक्षा त्या देशांतील नागरिकांच्या स्वतंत्र राहण्याच्या निश्चयावरच अधिक अवलंबून असते. या दृष्टीने विचार केला असतां आपला हिंदुस्थान हा जगामध्ये सर्वांत पंगू देश आहे, यांत कांहीं संशय नाहीं. असे असून सुद्धा आमचे पुढारी अहिंसा,

विश्वबंधुत्व इत्यादि अशक्य तत्त्वांचा प्रचार करून देशाचा हा पंगूपणा अधिक वाढविण्याचें पाप करीत आहेत ! अशा परिस्थितीत नागपूर युनिव्हर्सिटीचे व्हाइसचॅन्सलर ॲ. केदार यांनी दिलेला पुढील इषारा विशेष स्मरणीय आहे

'विश्वबंधुत्वाच्या कल्पनेने आकाशाला गवसणी घालण्याच्या प्रयत्नांत न पडतां जर्मनीप्रमाणे माझे राष्ट्र जगावे ही भावना दृढमूल करून भारतकालीन साम्राज्यशाहीच्या कल्पनेचेंहि पुनरुज्जीवन करावे आणि त्या दृष्टीनेच आपली शिक्षणयोजना योग्य वळणार विचारपूर्वक आखली जावी, तरच आपला तरणोपाय आहे.'

ॲ. केदार यांनी जर्मनीचा उल्लेख केलाच आहे, तेव्हा जर्मनीचे सुप्रसिद्ध युद्धशास्त्रज्ञ प्रो. बान्से यांचा एक उतारा देऊन हा लेख संपवितों. प्रचारखात्याचें मुख्य कर्तव्य सांगतांना प्रो. बान्से म्हणतात

"The first function of propaganda is to gain the support of once's own nation for the idea of the war, fill it with hatred and bitterness against the enemy, to fill it with an unquenchable war-spirit; in short, to do everything possible to fill it with a passionate determination not to sheathe the sword till the enemy is laid low."

—केसरी, ता. २ ऑगस्ट, १९३८.



# हिंदुस्थानाच्या संरक्षणाची जबाबदारी

लंडनच्या गोलमेज परिषदेत इंग्रजांनी हिंदुस्थानाचे द्रव्यशोषण व संरक्षण या दोन बाबी वगळून उरलेले पूर्ण स्वराज्य आम्हांला देऊं केलें आहे ! पैकीं द्रव्य-शोषणाची जबाबदारी पार पाडण्याला इंग्रज लोक समर्थ आहेत, यांत संशय नाही. पण हिंदुस्थानच्या संरक्षणाचा भार सहन करणे यापुढे त्यांना शक्य होईल की नाही याविषयीं संशय वाटतो. कारण गेल्या महायुद्धापासून इंग्रजांच्या आरमारी सत्तेला ओहोटी लागली आहे व त्यामुळे हिंदुस्थानसारखे दूरचे देश संभाळणें त्यांना दिवसेंदिवस दुर्घट होऊन बसणार आहे.

## इंग्लंडची आरमारी सत्ता

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत इंग्रजांच्या आरमारी सत्तेला साऱ्या जगांत कोणीहि प्रतिस्पर्धी नव्हता. विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकांत जर्मनीने आपले आरमार इंग्लिश आरमाराच्या दोनतृतीयांशाइतके वाढविले. तेव्हा जर्मन आरमाराची पुढील वाढ थांबविण्यासाठी इंग्रजांनी बेल्जमचें निमित्त पुढे करून जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारले. या युद्धांत जर्मनीचा पराभव करण्यासाठी इंग्रजांना अमेरिकेची मदत घ्यावी लागली. ही संधि साधून अमेरिकेने आपले आरमार इंग्रजांच्या जोडीला आणून बसविले. महायुद्ध संपल्यानंतरदेखील आपल्या आर-माराची वाढ पुढे चालू ठेवण्याचा अमेरिकेचा विचार होता. पण इंग्लंडने अँग्लो-जपानी तह रद्द करण्याचें व इराणइराकांतील तेलाच्या खाणींचा वांटा देण्याचें आमिष पुढे करून अमेरिकेला आपला आरमारवाढीचा कार्यक्रम तहकूब करावयाला लावलें. पण अशा प्रकारे अमेरिकेशी समेट करण्यांत इंग्लंडचें एकंदरींत नुकसानच झाले आहे. कारण जपानच्या दोस्तीची मुदत संपल्याने पूर्वेकडील आपल्या वसाहतीं-च्या संरक्षणासाठी इंग्लंडला सिंगापूर येथे नवीन आरमारी बंदर सज्ज करून ब्रिटिश आरमाराचा एक मोठा काफिला त्या बंदरांत कायमचा ठेवावा लागला व मोसलच्या खाणींत अमेरिकेचे हात शिरल्याने त्या खाणींतून तेल काढावयाचाहि

अजून सुरुवात झाली नाही. ते कांहीहि असले तरी ही गोष्ट निर्विवाद आहे की, ज्या आरमारी वर्चस्वासाठी इंग्रजांनी महायुद्ध केलें तें वर्चस्व सध्या अमेरिकेकडे जाऊं पहात आहे आणि अमेरिकेचे कोणत्याहि प्रकारचें वांकडें करणें इंग्लंडला आज शक्य नाही.

## चार्चिलने लावून ठेवलेला सुरुंग !

अमेरिकेच्या वर्चस्वाखेरीज आणखीहि एक मोठे संकट ब्रिटिश आरमाराला ग्रासूं पाहात आहे. हे संकट सुप्रसिद्ध साम्राज्यसंरक्षक मि. विन्स्टन चर्चिल यांनी आपल्या कर्तबगारीने उपस्थित केले आहे. महायुद्धापूर्वी चार्चिल हे इंग्लंडचे आरमारमंत्री होते, व तेव्हा त्यांनी ब्रिटिश आरमारांत एक मोठी सुधारणा घडवून आणली ! ही सुधारणा म्हणजे लढाऊ जहाजांतील इंजिनांतून पूर्वी दगडी कोळसा जाळीत असत त्याच्याऐवजी रॉकेल जाळण्याची पद्धति चर्चिलनी सुरू केली, 'The use of oil fuel adds 50 percent to the value of any any fleet that uses it.' असें या सुधारणेविषयी ॲडमिरल लॉर्ड फिशर यांनी उद्गार काढले आहेत. या रॉकेल जाळण्याच्या पद्धतीने इंग्रजी आरमाराचें सामर्थ्य वाढले असले तरी त्यामुळे ते आरमार एका दृष्टीने परावलंबी बनलें आहे. कारण इंग्लंडमध्ये कोळशाच्या खाणी मुबलक असल्या तरी रॉकेलाची खाण एकहि नाही. या परावलंबनामुळे एखाद्या आणीबाणीच्या प्रसंगी रॉकेलच्या अभावी आपल्या आरमाराला बंदरांत बसून राहण्याची पाळी येऊं नये म्हणून ब्रिटिश सरकाराने ॲंग्लो-पर्शियन ऑईल कंपनी आपल्या मालकीची करून घेतली आहे व मोसलचा प्रांत आपल्या कबजांत घेतला आहे. अशा रीतीने रॉकेलवर अवलंबून राहण्याचे दुष्परिणाम टाळण्याचा प्रयत्न इंग्रजांनी केला असला तरी इंग्लंडचें मर्मस्थान शत्रुराष्ट्रांना कळून चुकले आहे आणि त्यावर शत्रुराष्ट्रांना केव्हाहि घाव घालतां येण्यासारखा आहे. मोसलच्या खाणींवर तुर्कांचा व इराणांतील खाणीवर पर्शिया-रशियांचा संयुक्त हल्ला झाल्यास ब्रिटिश आरमाराचा तेलाचा पुरवठा तात्काळ थांबेल व त्या आरमाराचें हिंदी महासागरावरील आधिपत्य नष्ट होईल. हें अरिष्ट टाळण्यासाठी ब्रम्हदेशांतील तेलाच्या खाणी निर्विवादपणें आपल्या हातीं राखण्यासाठीं ब्रम्हदेश अलग करण्यांत येत आहे.

## मुसलमानांचीं अंतःस्थ कारस्थानें

हिंदुस्थान आपल्या हातचा जाऊं द्यावयाचा नसल्यास इंग्रजांना हिंदीमहासागराप्रमाणेंच भूमध्यसमुद्रावरहि आपलें वर्चस्व राखणें जरूर आहे. पण भूमध्यसमुद्रावरील इंग्रजांचें वर्चस्व त्या समुद्राच्या तळाशी जात चाललें आहे. कारण भूमध्यसमुद्रांतील जिब्राल्टर, माल्टा, सायप्रस वगैरे महत्त्वाच्या आरमारी नाक्यांचे फ्रान्स किंवा इटाली यांच्या वैमानिक हल्लयांपासून संरक्षण करणे दिवसेदिवस अशक्य होत जाणार. शिवाय त्या समुद्रांतील महत्त्वाच्या सामुद्रधुन्यांची पाणबुड्या बोटींनी नाकेबंदी केल्यास कोणत्याहि बलाढ्य आरमाराला त्यांच्या तावडींतून सुटणें कठिण जाईल. याखेरीज भूमध्यसमुद्रांतून हिंदुस्थानाकडे येण्याला सुएझचा कालवा ही एकच वाट आहे आणि या कालव्याच्या दोन्ही कांठावरील मुसलमानी राष्ट्रें इंग्रजाशी दोन हात करण्याला अनुकूल संधीचीच वाट पहात आहेत. अशा अनुकूल संधीचा फायदा कसा घ्यावा हे ठरविण्यासाठीच इजिप्तांतील व अरबस्थानांतील मुसलमानांनी कैरो व मक्का येथे सर्व जगांतील मुसलमानांच्या खिलाफत परिषदा भरविल्या होत्या. डॉ. बोमान नांवाचा एक तज्ज्ञ अमेरिकन लेखक म्हणतो, " Those conferences have started organisations that may result in united action of greater import. The Arab, not Turkish domination, is now the ruling idea among advocates of militant Mohomedanism." याच लेखकाने इतरत्र म्हटले आहे " The Indian Mohomedans if they join their co-religionists in the Arab world, might threaten British hold on south-western Asia. "

यासाठीच इंग्रजसरकार मुसलमानांना इतके नमून असते.

वर उल्लेखिलेल्या मार्गांपैकी कोणत्याहि एका मार्गाने जर हिंदुस्थान व इंग्लंड यांमधील दळणवळण तुटले तर हिंदुस्थानसरकारला या देशाच्या संरक्षणाची सारी भिस्त देशांतील सैन्यावर टाकावी लागेल, हें उघड आहे. पण हिंदुस्थानांतील सैन्य तूर्त विलायतेंतील मदतीचे अभावीं परशत्रूचा प्रतिकार करण्याला असमर्थ आहे, हें जगजाहीर आहे. वायव्य सरहद्दीपलीकडील पठाणी मुलुखांतच सुमारें चार लक्ष पठाण हिंदुस्थानावर केव्हाहि स्वारी करण्यास

सज्ज आहेत व अफगाणिस्थानाचे हिंदुस्थानाशी वांकडें आल्यास या चार लाख पठाणांत कमीतकमी आठ लाख अफगाणांची भर पडेल. या प्रचंड सेनेला तोंड देण्यासाठी सध्याच्या परिस्थितीत हिंदुस्थानसरकारला फार तर दीड लाख सैन्य उभे करता येईल. एवढ्या फौजेच्या जोरावर हिंदुस्थानाचा जास्तीत जास्त आठ महिने बचाव करितां येईल, असा लष्करी खात्याचा सध्याचा अंदाज आहे. हा अंदाज देखील धाडसाचाच आहे. कारण या दीड लाखांतलें बरेचसें सैन्य भाडोत्री आहे आणि भाडोत्री सैन्य देशसरक्षणाला सहसा उपयोगी पडत नाही, असा इतिहासाचा सिद्धांत आहे.

## हिंदीकरण कां पाहिजे ?

हा संभवनीय अनर्थ टाळावयाचा असल्यास हिंदुस्थानांतील खड्या सैन्याची, शिलकी सैन्याची व युद्धशास्त्रांत पारंगत झालेल्या हिंदी अधिकाऱ्यांची संख्या शक्य तितकी आधिक वाढवावयाला पाहिजे. ही वाढ अर्थात् सध्याच्या लष्करी खर्चाच्या मर्यादेंतूनच झाली पाहिजे. कारण सध्याचा लष्करी खर्च आणखी अधिक वाढविणें हे दरिद्री हिंदुस्थानाला झेपण्यासारखें नाही. या दोन्ही गोष्टी साधावयाच्या असल्यास हिंदुस्थानांतील गोऱ्या सैन्याची व गोऱ्या अधिकाऱ्यांची संख्या ताबडतोब कमी केल्यावांचून गत्यंतर नाही. सध्या हिंदुस्थानांत सुमारें ६५००० गोरें सैन्य आहे. या सैन्याच्या खर्चांतच निदान तीन लाख हिंदी सैन्य पोसतां येईल.

आजपर्यंत हिंदुस्थानचा सर्वच कारभार इंग्रज सरकाराच्या हाती असल्यामुळे हिंदुस्थानचें संरक्षण हें एक साम्राज्यशाहीचे कर्तव्यच होऊन बसलें होतें व त्याकरिता इंग्लंडला आपलें गोरें सैन्य हिंदुस्थानांत ठेवणें शक्य व आवश्यक वाटत होते. परंतु यापुढे हिंदुस्थानचा राज्यकारभार जर स्वावलंबी व्हावयाचा तर त्या देशाच्या संरक्षणाची तरतूद हिंदी लष्कर व हिंदी लष्करी अधिकारी यांच्या हातूनच झाली पाहिजे. कारण यापुढे गोरे सैन्य हिंदुस्थानच्या संरक्षणासाठी हिंदी लष्करी मंत्र्याच्या हाताखाली पूर्वीसारखे आत्मीयभावनेने लढणार नाही आणि वर दर्शविल्याप्रमाणें गोऱ्या लष्कराचा आयत्या वेळीं पुरवठा करणेंहि दुर्घट होईल. याकरितां हिंदुस्थानच्या संरक्षणाची दिवसेंदिवस अवजड होत जाणारी जबाब-

दारी इंग्लंडने हिंदी लष्करी अधिकारी व सैनिक यांच्याकडेच सोपविण्याच्या तजविजीला आतांपासून लागले पाहिजे आणि त्याकरितां हिंदुस्थानांतच अव्वल दर्जाचें लष्करी शिक्षण देण्यास सुरुवात केली पाहिजे. नुसत्या एका सॅंढर्स्ट कॉलेजाने हे काम भागणार नाही. फ्रान्ससारखीं युरोपांतील राष्ट्रे आपल्या जनतेला लष्करी शिक्षण देण्याकरिता किती विविध प्रकारची लष्करी विद्यालये चालवितात, ते पाहिले म्हणजे इंग्रजांच्या हलगर्जीपणाची चीड येते. इंग्रजांनी या कामी आजवर हेळसांड केल्यामुळे हिंदुस्थानच्या संरक्षणाची जबाबदारी पार पाडणे इंग्रज सरकाराला दिवसेंदिवस दुर्घट होत जाईल.

—केसरी, ता. १७ फेब्रुवारी, १९३१.



# आंग्लो-जर्मन आरमारी तह

गेल्या महायुद्धापासून इंग्लंडच्या आरमारी सत्तेला सारखी उतरती कळा लागली आहे व त्यामुळे सर्व जगभर पसरलेल्या आपल्या साम्राज्याचें संरक्षण करणें इंग्लंडला प्रतिवर्षी अधिकाधिक कठिण होत चालले आहे. विशेषतः हिंदुस्थानाच्या वाटेवरील सर्व नाकी आपल्या ताब्यांत ठेवणें व त्या मार्गातील सर्व समुद्रांवर आधिपत्य गाजविणे हे जे ब्रिटिश आरमाराचे मुख्य कर्तव्य, ते कर्तव्य बजाविणे त्याला अलीकडे अशक्य होत चालले आहे. इंग्रजांना हिंदुस्थानाकडे येण्याचा सर्वात जवळचा जलमार्ग हा भूमध्य समुद्रांतून आहे. या समुद्रांत आजपर्यंत इंग्रजांचे वर्चस्व होतें. पण अलीकडे फ्रान्स व इटाली या भूमध्यसमुद्रकिनाऱ्यावरील दोन राष्ट्रांनी आपले आरमारी व विशेषतः वैमानिक सामर्थ्य सपाटून वाढविल्याने त्या समुद्रावरील आपले वर्चस्व अबाधित रहावें, यासाठी ब्रिटिश आरमारीखात्याला आपल्या प्रयत्नांची शिकस्त करणे जरूर झालें आहे. आणि या प्रयत्नाकडे पूर्ण लक्ष पुरवितां यावे यासाठीच परवा इंग्लंडने जर्मनीबरोबर आरमारी तह केला आहे. जर्मनीशी सख्य करून उत्तरसमुद्र स्वतःला सुरक्षित करून घेणे व जर्मन आरमाराच्या दहशतीमुळे फ्रान्सला आपले भूमध्य समुद्रांतील सामर्थ्य कमी करावयाला लावणे हाच या तहाचा मुख्य हेतु आहे.

१९२२ साली वॉशिंग्टन येथील आरमारी परिषदेत जगांतील प्रमुख राष्ट्रांपैकी प्रत्येक राष्ट्राने किती टनांची ड्रेडनॉट जहाजे बांधावीत, याचे आंकडे ठरविण्यांत आले. या तहाप्रमाणे इंग्लंडला सव्वापांच लक्ष टनांची व फ्रान्सला पावणेदोन लक्ष टनांची ड्रेडनॉट जहाजे बांधण्याची परवानगी मिळाली आहे. यांपैकीं फ्रान्सच्या वांट्याला आलेला पावणेदोन लक्षांचा आंकडा फारच कमी असल्याने तो बदलून घेण्याचा प्रयत्नहि फ्रान्सने कित्येक वेळा केला होता; पण इंग्लंडने आपल्या दोस्ताच्या मागणीला संमति न दिल्याने फ्रान्सला हताश व्हावें लागलें होतें. असे असूनसुद्धा परवाच्या तहांत इंग्लंडने जर्मनीला १८४००० टनांची

ड्रेडनॉट जहाजे बांधण्याची सवलत दिली आहे. अशा रीतीने जर्मनीला फ्रान्सपेक्षा वरचढ होऊ देण्याचा हेतु काय हे कोणालाहि न सांगतां समजण्याजोगे आहे.

## जर्मनीचें नवें आरमार

परवाच्या तहाने जर्मनीला १८४००० टनांच्या ड्रेडनॉट जहाजांखेरीज ४७००० टनांची विमानवाहक जहाजें, ५२००० टनांची अव्वल दर्जाची क्रूझरें ६७००० टनांची दुय्यम दर्जाची क्रूझरे ५२००० टनांच्या टॉर्पेडो बोटी व २०००० टनांच्या पाणबुड्या बोटी बांधण्याची परवानगी मिळाली आहे. यांपैकी पाणबुड्या बोटीच्या टनांचा आंकडा जर अपुरता वाटला तर जर्मनीने ५३००० टनांपर्यंत पाणबुड्या बोटी बांधल्या तरी चालेल, असेहि जर्मन सरकाराला इंग्लंडने आश्वासन दिले आहे. यांपैकीं एकंदर ४०००० टनांची तीन अव्वल दर्जाची क्रूझरे व एकंदर ३६००० टनांची सहा दुय्यम दर्जाची क्रूझरे जर्मनीने यापूर्वीच बांधली आहेत आणि आता प्रत्येकी २२ ते २५ हजार टनांची पाच ड्रेडनॉट जहाजे, प्रत्येकी २२००० टनांची दोन विमानवाहक जहाजे, प्रत्येकीं ७ ते ८ हजार टनांची सहा दुय्यम क्रूझरें, प्रत्येकी १००० टनांच्या ३६ टॉर्पेडो बोटी व प्रत्येकी ८०० टनांच्या १९ पाणबुड्या बोटी बांधण्याचा कार्यक्रम हातीं घेतला आहे.

## फ्रेंचांची मागणी

जर्मनीच्या नव्या आरमाराला तोंड देण्यासाठी फ्रेंचांनी यापूर्वीच प्रत्येकीं २६००० टनांची दोन व प्रत्येकी ३५००० टनांची दोन अशी चार ड्रेडनॉट जहाजें बांधण्याला सुरुवात केली आहे. शिवाय आंग्लो-जर्मन आरमारी करारानें जर्मनीला, वॉशिंग्टनच्या तहाने फ्रान्सला जितक्या टनांची ड्रेडनॉट जहाजे बांधतां येतात त्याहून अधिक टनांचीं ड्रेडनॉट जहाजें बांधण्याची परवानगी मिळाली असल्याने आपण इतःपर वॉशिंग्टनचा आरमारी तह मानणार नसल्याची नोटीसहि फ्रान्सने इंग्लंडला देऊन टाकली आहे. त्याचप्रमाणे पूर्वीच्या आरमारी परिषदेंत कोणीहि २५०००टनांहून अधिक मोठीं ड्रेडनॉट जहाजे बांधू नयेत, असें इंग्लंडने प्रतिपादिलें होतें व त्याला फ्रान्सने संमतिहि दिली होती. ती संमतिहि आता फ्रान्सने

परत घेतली आहे. पूर्वी फ्रान्सने आपल्याला सवासहा लक्ष टनांहून अधिक आरमाराची आवश्यकता नसल्याचे इंग्लंडच्या आरमारी खात्याला कळविले होतें; पण आता तो आंकडा बदलून फ्रान्सने इंग्लडच्या आरमारी खात्याशी बोलणे चालविले आहे की आम्हांला कमीत कमी सात लक्ष टनांच्या आरमाराची जरूरी आहे. त्यांतल्या त्यांत जर्मन ड्रेडनॉटांच्या नव्या संकटाला तोंड देण्यासाठी आम्हांला सुमारे तीन लाख टनांचीं ड्रेडनॉट जहाजें हवी आहेत. यासाठी पूर्वीचा पावणेदोन लाखांचा करार रद्द करून आम्ही तीन लाख टनांची ड्रेडनॉट जहाजे बांधलीं किंवा इतर जहाजांच्या संख्येतहि थोडीशी वाढ केली तरी तुम्ही तुमच्या ड्रेडनॉट जहाजांच्या किंवा इतर जहाजांच्या संख्येंत भर टाकू नये; उलटपक्षी आम्ही तुम्हांला असें आश्वासन देतों कीं, ब्रिटिश आरमाराच्या ५५ टक्क्याहून अधिक आरमार आम्ही बांधणार नाही, मात्र आज इंग्लंडच्या पाणबुड्या बोटी फ्रान्सच्या पाणबुड्या बोटींच्या दोन-तृतीयांश आहेत, तें प्रमाण वाढविण्याचा प्रयत्न इंग्लंडने करू नये.

## इंग्लंडची संमति मिळणें अशक्य

फ्रेंचांच्या या साऱ्या मागण्या अगदीच एकतर्फी असल्याने त्यांना ब्रिटिश आरमारी खात्याची संमति मिळणे अशक्यच आहे. विशेषतः आपल्या ड्रेडनॉट जहाजांची संख्या न वाढविता फ्रेंचांना तीन लाख टनांचीं ड्रेडनॉट जहाजें बांधूं देण्याला इंग्लंड केव्हाहि कबूल होणार नाही. कारण फ्रेंचांच्या बरोबरीने ड्रेडनॉट जहाजे बांधण्याचा इटालीचा आग्रह आहे आणि फ्रान्स व इटाली या उभयतांनी जर प्रत्येकीं तीन लाख टनांचीं ड्रेडनॉट जहाजें बांधली तर त्यांची आरमारे उद्या इंग्लंडला भूमध्य समुद्रांत फिरकूंदेखील देणार नाहीत. आजच इटालीच्या चढाईच्या धोरणामुळे ब्रिटिश आरमारी खात्याच्या मनांत माल्टा बेटांतील आपल्या आरमारी तळाच्या सुरक्षिततेविषयी व उपयुक्ततेविषयी शंका उत्पन्न झाली आहे, त्याचप्रमाणे तांबड्या समुद्रांतील इटालीच्या कारस्थानांपासून आपल्या साम्राज्याला धोका पोचूं नये म्हणून इग्लंडला त्या समुद्रांतील आकाबा बंदरांत नवा आरमारी तळ बांधण्याचें काम सुरू करावें लागलें आहे. या सर्व गोष्टींचा विचार केला असतां, प्रत्यक्षतः फ्रेंच व पर्यायाने इटालियन आरमारांच्या वाढीला इंग्लंडची संमति मिळणें अशक्य दिसतें.

आता इंग्रजांच्या गैरमर्जीपेक्षा जर्मनीच्या भीतीचा फ्रेंचांच्या मनावर अधिक प्रभाव झाला व इंग्लंडच्या संमतीशिवाय त्यांनी आरमारवाढीला हात घातला तर इंग्लंड काय करील, या प्रश्नाचा थोडासा विचार केला पाहिजे. फ्रान्स व इटाली या उभयतांचे आरमारवाढीकडे दुर्लक्ष व्हावे यासाठी इंग्लंडला एकच उपाय योजतां येण्याजोगा आहे. तो म्हणजे जर्मनीला ऑस्ट्रियाशी जूट करण्याला उत्तेजन देणे हा होय. तसा आणीबाणीचा प्रसंग आला तर इंग्लंड हाहि उपाय योजण्याला माघार घेणार नाही. कांही वर्षांपूर्वी चॅन्सेलर ब्रुएनिंगने ऑस्ट्रियाशी संयुक्त जकातीचा करारनामा करण्याचा प्रयत्न केला, तेव्हा इंग्लंडने त्याला आंतून पाठिंबाच दिला होता. यावरून असे दिसते की, आजच्या आंग्लो-जर्मन आरमारी तहामुळे उद्याच्या जर्मनी व ऑस्ट्रिया यांच्या एकीचा मार्ग सोपा होणार आहे.

केसरी, ता. ९ ऑगस्ट, १९३५.



# इंग्लंडचें परराष्ट्रीय धोरण

नव्या बादशहांच्या राज्यारोहणसमारंभाच्या निमित्ताने ब्रिटिश साम्राज्यांतील सर्व प्रमुख मुत्सद्दी येत्या मे महिन्यांत लंडन येथे जमणार आहेत. या संधीचा फायदा घेऊन, साम्राज्याचें भावी धोरण ठरविण्यासाठी लंडनला त्याच वेळीं साम्राज्यपरिषदहि भरणार आहे. या परिषदेत मुख्यतः साम्राज्याचें परराष्ट्रीय धोरण व साम्राज्यसंरक्षणाच्या योजना यांचा विचार व्हावयाचा आहे. अशा वेळीं इंग्लंडच्या पुढाऱ्यांनी साम्राज्यपरिषदेपुढील प्रश्नांची चर्चा करणें स्वाभाविकच आहे. अगदी अलीकडे अमेरिकेच्या 'फॉरेन अफेयर्स' या नामांकित त्रैमासिकाच्या ताज्या अंकांत 'साम्राज्य-परिषदेपुढील प्रश्न' या विषयावर आरमार व डोमीनियन या खात्यांचे माजी मंत्री मि. ॲमेरी यांनी एक लेख लिहिला आहे. त्या लेखांतील इंग्लंडच्या परराष्ट्रीय राजकारणाविषयीच्या कांही विधानांची चर्चा करणें हा या लेखाचा उद्देश आहे.

### फ्रान्सशीं सख्य

मि. ॲमेरी म्हणतात, 'ब्रिटिश कॉमनवेल्थचे परराष्ट्रीय धोरण असे राहील की, ते सर्व राष्ट्रांची मैत्री जोडण्याचे उद्दिष्ट नजरेसमोर ठेवून प्रथम फ्रान्स व त्याच्यालगतचे बेल्जमादि देश यांची मैत्री करण्याचे विशेष प्रयत्न करील. तसेंच भूमध्य समुद्रांत इटालीशी स्नेहसंपादन करण्याची खटपटहि त्याजकडून होईल'.

यापैकी फ्रान्सचें सख्य इंग्लंडने अलीकडे संपादन केले आहे, इतकेंच नव्हे तर या दुक्कलीपैकी कोणत्याहि एका राष्ट्रावर जर्मनीचा हल्ला झाल्यास परस्परांना साहाय्य करण्याचा संधिहि नुकताच त्यांच्यामध्ये घडून आला आहे. एवढ्यापुरतें ॲमेरीसाहेबांचे म्हणणें खरे असलें, तरी त्यांच्या इच्छेप्रमाणे इंग्लंड व इटाली यांचें भूमध्य समुद्रांत सख्य होईल, अशी लक्षणें तूर्त तरी दिसत नाहीत.

### जपानचें भय

इंग्लंड व इटाली यांचे सख्य होणें हे सध्या अनेक कारणामुळे अशक्य

झालें आहे. त्यांतलें सर्वांत प्रमुख कारण म्हणजे गेल्या महायुद्धानंतर अमेरिकेच्या हुकुमामुळे इंग्लंडला आंग्लो-जपानी तह मोडून टाकावा लागला हें होय. महायुद्धापूर्वी इंग्लंड व जपान या उभयतांमध्ये परस्परसहायाचा तह अस्तित्वांत असल्यामुळे इंग्लंडला आपल्या पूर्वेकडील साम्राज्याची यत्किंचित् काळजी वाटत नव्हती. यामुळे त्या दिवसांत सिंगापूरचा आरमारी तळ अस्तित्वांत नसून-सुद्धा आपल्या पूर्वेकडील साम्राज्यावर संकट ओढवल्यास संकटांत सापडलेल्या प्रदेशांना शक्य तितक्या लवकर मदत व्हावी, यासाठी भूमध्यसमुद्रांत बहुतेक सर्व आरमार एकत्रित करण्याची इंग्लंडला तेव्हा गरजहि वाटली नव्हती. इतकेंच नव्हे, तर त्या दिवसांत भूमध्यसमुद्राचे संरक्षण करण्याची जबाबदारी फ्रेंच आरमारावर सोपवून इंग्लंडने जर्मन आरमाराला तोंड देण्यासाठी आपलें सारें आरमार उत्तर समुद्रांत नेले होतें. पण ती परिस्थिति आता पार पालटून गेली आहे. स्वतः मि. अॅमेरी म्हणतात—' जपानचे आरमार वाढणें म्हणजे ब्रिटिश साम्राज्याला समुद्रावर जबरदस्त धोका उत्पन्न होणेंच होय. सिंगापूरचा तळ मजबूत झाला आणि भूमध्यसमुद्रांतून ब्रिटिश आरमार जलदपणें येऊं जाऊं शकले, तर मात्र ब्रिटिश साम्राज्याच्या एका मोठ्या भागाची सुरक्षितता कायम राहूं शकेल. दक्षिण आफ्रिका, हिंदुस्थान, मलाया बेटें, ऑस्ट्रेलिया आणि न्यूझीलंड इतका मोठा टापू त्या विभागांत मोडतो ! '

## भूमध्यसमुद्रावर स्वामित्व

यामुळे सध्या इंग्लंडला आपल्या आरमाराचा प्रमुख भाग इंग्लिश खाडी व सिंगापूरची सामुद्रधुनी यांच्या दरम्यान म्हणजे भूमध्य समुद्रांत किंवा तांबड्या समुद्रांत ठेवणे भाग आहे. ब्रिटिश आरमाराचा मुख्य भाग जर उत्तर समुद्रांतच ठेवला तर सिंगापूरवर जपानी आरमाराचा हल्ला आला असतां तेथील ब्रिटिश अधिकाऱ्यांना भूमध्य समुद्राच्याच मार्गाने ब्रिटिश आरमाराची कुमक पोचण्याला निदान एक आठवडाभर तरी उशीर होईल. पुनः आयत्या वेळीं आपल्या आरमाराला भूमध्य समुद्रातून वाट मिळेल की नाही, याविषयीं आरमारी खात्याला नेहमी काळजी करावी लागेल ती वेगळीच. शिवाय भूमध्य-समुद्रावर आपलें वर्चस्व न राखल्यास इंग्लंडच्या वैमानिक दलालाहि साम्राज्या

च्या पूर्वेकडील प्रदेशांशीं संबंध ठेवणें अशक्य होईल. या सर्व कारणांसाठीं इंग्लंडला भूमध्य समुद्रावर आपले वर्चस्व राखण्यासाठी शक्य ते प्रयत्न करणें जरूर आहे व त्यामुळे मुसोलिनीसारख्या महत्त्वाकांक्षी राष्ट्रसूत्रधाराशीं इंग्लंडचें वांकडें येणे स्वाभाविक आहे.

## जर्मनीची धास्ती

वास्तविक पाहता फ्रान्स व इटाली या उभयतांची आरमारें एकत्र झाल्यास ती इंग्रजी आरमाराला भूमध्यसमुद्रात फिरकूंदेखील देणार नाहीत. १९३५ सालच्या आरंभी जेव्हा फ्रान्स व इटॅली यांच्यामध्ये सख्याचा तह झाला, तेव्हा याच कल्पनेने ब्रिटिश आरमारी खात्याच्या हृदयांत धडकी भरली होती. यासाठी त्या खात्याच्या प्रमुखांनी आंग्लो-जर्मन आरमारी तह करून जर्मनीला इंग्लंडच्या ३५ टक्यांइतके आरमार बांधण्याला परवानगी दिली. त्याबरोबर फ्रेंच आरमारी खात्याला आपल्या आरमाराचा मुख्य भाग भूमध्यसमुद्रांतून काढून अटलांटिक महासागरांत आणून ठेवणे भाग पडलें व ब्रिटिश आरमारी खात्याच्या छातीवरील दडपण कमी झाले. पण त्या तहाचा परिणाम असा झाला आहे की, इंग्लंडला आता जर्मनीची मैत्री संभाळण्याखेरीज गत्यंतर उरलेले नाही.

मि. ॲमेरी म्हणतात—'नुकत्याच झालेल्या कराराप्रमाणे जर्मनीचे आरमार ३५ टक्केच राहिले तरी सुद्धा उद्या कांही कटकट उत्पन्न झाल्यास जर्मनीच्या तेवढ्या आरमारावरहि नजर ठेवण्यास ब्रिटनला आपले निम्मे आरमार योजावें लागेल. कारण अशा वेळी जर्मनीचे वैमानिक सामर्थ्य आणि आपली वाढती दुर्बलता ही लक्षांत घेणें अवश्य आहे जर्मनीबरोबर वांकडे आल्यास इंग्लंडला आपले अर्धे आरमार तरी जर्मनीवर नजर राखण्यासाठी उत्तर समुद्रांत ठेवणें जरूर आहे, ही गोष्ट मि. ॲमेरी यांच्याप्रमाणेच इतर सार्‍या आरमारी विशेषज्ञांनाहि मान्य आहे. तेव्हा अशा प्रसंगीं आपल्या उरलेल्या अर्ध्या आरमारापैकीं कांही भागच इंग्लंडाला भूमध्यसमुद्रांत ठेवणे शक्य होईल आणि सिंगापूरच्या आरमारी तळाच्या संरक्षणाला जपानी आरमाराच्या मानाने अगदीच क्षुद्र असा काफिला शिल्लक राहील.

## सिंगापूरवर हल्ला

अशी परिस्थिति जर खरोखरच निर्माण झाली तर जपान काय करील, हें

जपानी आरमारांतील एक माजी लेफ्टेनंट कमांडर टोटा इशिमारू यांनी स्पष्टच सांगितलें आहे. ते म्हणतात—'पासिफिक महासागरांत ब्रिटिशांचे सामर्थ्य वाढण्यास दोन गोष्टींची आवश्यकता आहे. पहिली गोष्ट अशी कीं, त्यांचा सिंगापूरचा तळ तयार झाला पाहिजे आणि दुसरी गोष्ट अशी की, तेथे आणी-बाणीच्या वेळीं एक सुसज्ज आरमार असावयास पाहिजे. लष्करी तळ लवकरच पूर्ण होईल. परंतु योग्य वेळी तेथे आरमार नसल्यास किंवा ते कार्यक्षम नसल्यास जपानी आरमाराला तेथे वावरण्यास पूर्ण वाव मिळेल व मग ऑस्ट्रेलिया, न्यूझी-लंड, हिंदुस्थान आणि असेच इतर देश व हिंदी महासागरावरील सत्ता हीं सर्व शत्रूच्या हातीं पडतील. ब्रिटिशांच्या आरमाराला हाँगकाँगइतकाच नव्हे तर त्यापेक्षा अधिक उपयोग सिंगापूरचा आहे. सिंगापूरनंतर जवळ असें ऑस्ट्रेलिया-शिवाय इंग्लंडला दुसरें ठाणें नाहीं; म्हणून कितीहि किंमत द्यावी लागली तरी आपण त्याच्यावर हल्ला करण्यांतच आपला फायदा आहे.'

जपानी दर्यासारंगांच्या या साहसी योजनांचा प्रतिकार करावयाचा असल्यास इंग्लंडच्या दर्यासारंगांना आपल्या आरमाराचा शक्य तितका मोठा काफिला सिंगापूर येथे कायमचा ठेवणे भाग आहे.

## होअर यांच्या अटी

जपानच्या या साहसी योजनांचे इंग्लंडला किती विलक्षण भय वाटत आहे, याचा एक पुरावा येथे सांगण्याजोगा आहे. १९३६ सालीं इटालीने ॲबिसीनिया देश जिंकल्यामुळे ब्रिटिश आरमारीखात्याला जपानशी सख्य करण्याची अत्यंत आवश्यकता भासू लागली. तेव्हा आरमारमंत्री सर सॅम्यूएल होअर यांनी पुढील अटीवर जपानने इंग्लंडशी तह करावा, अशी इच्छा प्रदर्शित केली होती. जपानने चीनच्या राष्ट्रैक्याला विरोध करूं नये व चीनमध्ये सर्व राष्ट्रांना मुक्तद्वार असावे. इंग्लंडने मांचुकुओच्या सरकारला मान्यता द्यावी व उत्तर चीनमधील जपानच्या विशेष हक्कांना संमति द्यावी. मध्य व दक्षिण चीनमधील ब्रिटिशांच्या हितसंबंधांना जपानने धक्का लावूं नये. इंग्लंडने जपानी मालावरील कर कमी करून ब्रिटिश साम्राज्यांत जपानच्या व्यापाराला सवलती द्याव्या व त्याच्या मोबदला जपानने ब्रिटिश साम्राज्यांतील मालाची खरेदी वाढवावी. जपानच्या वाढत्या लोकसंख्येचा

व कच्च्या मालाच्या पुरवठ्याचा प्रश्न सोडविण्याला इंग्लंडने सहानुभूतिपूर्वक मदत करावी. इंग्लंड, अमेरिका व फ्रान्स यांच्यामधील आरमारी तहाची तत्त्वें जपाननेंहि मान्य करावी व आरमार वाढविण्याची शर्यत सुरू करूं नये. सर सॅम्यूएल होअर यांच्या या अघळपघळ अटीची बातमी जपानच्या 'असाही' पत्राने १९३६ च्या ऑगस्ट महिन्यांत बाहेर फोडली. तेव्हा या अटी पूर्व आशियाला 'मन्रो डॉक्ट्रिन' लागू करण्याच्या जपानी धोरणाच्याविरुद्ध जातात, असा जपानी पत्रांनी गिल्ला केला व जपान सरकारनेंहि सर सॅम्यूएल यांचे बोलणे फेटाळून लावले.

## फ्रान्सची पोकळ हमी ?

वास्तविक पाहतां असल्या अटीवर जपानशी सलोखा करावयाला तयार होणे इंग्लंडला किती मानहानिकारक होतं, हे परराष्ट्रीय राजकारणाची ज्यांना थोडीबहुत तरी माहिती आहे, त्यांना सहज कळून येईल. पण इतका अपमान सोसूनसुद्धा जेव्हा त्याचा कांहीहि उपयोग झाला नाही; इतकेच नव्हे, तर त्याच वर्षाच्या नोव्हेंबर महिन्यांत जपानने इंग्लंडला झिडकारून जर्मनीशी तह केला, तेव्हा इंग्लंडला निरुपायाने आत्मसंरक्षणासाठी फ्रान्स-बरोबर परस्परसंरक्षणाचा तह करावा लागला. या तहाने फ्रान्स जपानविरुद्ध इंग्लंडला मदत करण्याला अटीने बांधलेला नाही, केवळ फ्रेंच मुत्सद्दी आयत्या-वेळी फ्रेंच आरमाराची तुम्हांला मदत होईल, अशी आश्वासने देत आहेत. या तहाचा आणीबाणीच्या वेळी इंग्लंडला कितपत उपयोग होणार आहे, तें भवित-व्यतेला ठाऊक. आज तर या तहाने इंग्लंडच्या वसाहतींना चिंता लागली आहे खरी. हा तह झाल्याबरोबर सर्व स्वायत्त वसाहतींनी इंग्लंडला असा प्रश्न केला कीं फ्रान्सच्या संरक्षणाची हमी इंग्लंडने घेतली तरी त्याला आमची हरकत नाही, पण या हमीचाच व्यापक अर्थ करून फ्रान्सच्या मध्ययुरोपांतील व पूर्वयुरोपांतील मित्रराष्ट्रांच्या संरक्षणासाठींहि युद्ध करण्याची तुमची तयारी आहे की काय ? या प्रश्नाचीहि येत्या साम्राज्यपरिषदेत चर्चा व्हावयाची आहे. या प्रश्नावर खुद्द वसाहतींचें मत काय आहे, ते ब्रिटिश साम्राज्यवाद्यांचें मुखपत्र ' राउंड टेबल ' याने स्पष्टच सांगितलें आहे.

ते पत्र म्हणते—' कोणत्याहि परिस्थितींत ( मध्ययुरोप किंवा पूर्वयुरोप

या बाबतच्या कसल्याहि प्रश्नावरून ) ग्रेटब्रिटनने आपला जीव लढाईच्या धोक्यांत घालू नये. पूर्वयुरोपचा प्रश्न साऱ्या युरोपचा होण्याची एक अशी खूण आहे की, निष्कारण आक्रमणाने फ्रान्स किंवा बेल्जम यांची सुरक्षितता धोक्यांत आली आहे काय हे मि. एडन यांच्या लीमिंग्टन येथील भाषणांत दिग्दर्शित केल्याप्रमाणे पहावे म्हणजे झाले. या प्रश्नाचा निकाल वसाहतीच्या इच्छेप्रमाणें लागला तर झेकोस्लोव्हाकिया देश गिळंकृत करण्याच्या आपल्या योजना शक्य तितक्या लौकर अमलांत आणणे जर्मनीला सुलभ जाईल व भावी रूसोजर्मनयुद्धाचा मार्ग मोकळा होईल.

—केसरी, ता. २७ एप्रिल, १९३७.



# भूमध्य समुद्रांतील इंग्लंडचें वर्चस्व

इटालीने ॲबिसीनियावर हल्ला केल्यावेळेपासून इंग्लंडाचे भूमध्यसमुद्रावरील वर्चस्व डळमळीत झाल्याचे जगाच्या निदर्शनास आले. पण अद्यापि ही गोष्ट इंग्लंडच्या आरमारखात्याला पटलेली दिसत नाही. याकरिता या प्रश्नाची युद्धशास्त्रदृष्ट्या चिकित्सा करणे जरूर आहे.

अर्वाचीन आरमारांना पाणबुड्या बोटीचे भय अतिशय आहे, हें सर्वांनाच मान्य आहे. संकुचित समुद्रांत युद्धक्षेत्र असल्यास पाणबुड्या बोटीच्या तावडीत सापडण्याचे भय आरमाराला अधिक असते व विस्तृत महासागरांत युद्धक्षेत्र असल्यास ते भय कमी असते. हा नियम भूमध्यसमुद्रांतील आरमारी लढायांना पूर्णपणे लागू पडतो. कारण या समुद्राची लांबी जरी हजारो मैल असली तरी त्याची रुंदी पश्चिम भागात पुष्कळ ठिकाणी शंभर ते दीडशे मैलच आहे. ही परिस्थिति लक्षांत न घेतां 'फॉरेन अफेयर्स'च्या जुलैच्या अंकांत एका लेखकाने भूमध्यसमुद्रांतील आरमारी युद्धाचा विचार करतांना म्हटले आहे, 'We do not need to give too much attention to the submarine which was fairly well under control at the end of the war.'

गेल्या युद्धांत पाणबुड्या बोटींचा पराभव झाला, हे प्रो. लॅंगेर यांचे विधान केवळ उत्तर समुद्रापुरतेच खरे आहे. भूमध्यसमुद्राबद्दल जपानी आरमारातील लेफ्टेनंट कमांडर टोटा इशिमारू म्हणतात "During the Great War a few Austrian and German submarines operating hundreds of miles from their base, and completely ignoring the British, French and Italian fleets, were by the end of the 1917 destroying allied shipping at the rate of 150000 tons a month."

वास्तविक पाहतां उत्तर समुद्र व भूमध्यसमुद्र या उभयतांमधील परिस्थितीत अतिशय अंतर आहे. उत्तरसमुद्र भूमध्यसमुद्राच्या मानाने अगदी उथळ आहे. त्यामुळे जाळीं लावून पाणबुड्या बोटी पकडणे किंवा समुद्रांत सर्वत्र पाण-

सुरुंग पेरून त्यांचा संचार संकटसंकुल करणें किंवा विमानांनी पाणबुड्या बोटींचा शोध लावून त्यांचा विध्वंस करणे किंवा विनाशिकांनी ध्वनिशोधक यंत्राच्या साहाय्याने त्यांचा शोध लावून विनाश करणे इत्यादि उपाय उत्तर समुद्रांत जसे शक्य आहेत, तसे भूमध्य समुद्रांत ते शक्य नाहीत. यासाठीच मि. टोटा इशिमारू म्हणतात 'The depth of the Mediterranean renders it especially suitable for submarine operations. It is so great that the English idea of laying mines is utterly futile.'

## पाणबुड्यांचा नाश कसा केला ?

गेल्या महायुद्धांत दोस्त राष्ट्रांनी जर्मनीच्या एकंदर १७८ पाणबुड्या बोटी बुडविल्या. त्यांपैकीं १९ पाणबुड्या दोस्त राष्ट्रांच्या पाणबुड्या बोटींनी बुडविल्या. व्यापारी जहाजांचे सोंग घेतलेल्या लष्करी जहाजांनी १४बोटी बुडविल्या. पाणसुरुंगांनी २० बोटींना जलसमाधि दिली. समुद्राच्या पोटांत लावलेल्या जाळ्यांतून ६ बोटी अडकून बुडाल्या. विमानांनी ५ बुडविल्या. विनाशिकांनी ७० बोटींचा विध्वंस केला. अपघाताने ९ बुडाल्या व उरलेल्या ३३ बोटी नष्ट होण्याची कारणे कळली नाहीत. पण त्यांतल्या बऱ्याचशा अपघातानेच बुडाल्या असाव्यात. पाणबुड्या बोटीविरुद्ध योजलेल्या या साऱ्या उपायांपैकी पाणसुरुंगांचा भूमध्यसमुद्रांत बिलकूल उपयोग नाही. खुद्द उत्तर समुद्रांत देखील इंग्रजांनी सुमारे साठ हजार सुरुंग पेरले, तेव्हा कोठे अवघ्या वीस पाणबुड्या त्यांना बळी पडल्या ! साऱ्या पश्चिम भूमध्य समुद्रांत सिसिली बेटापासून आफ्रिकेच्या किनाऱ्यापर्यंतचा समुद्र मात्र अतिशय उथळ आहे. त्यामुळे या भागांत पुरेसे पाणसुरुंग पेरल्यास त्यांचा चांगला उपयोग होण्याचा संभव आहे. पण हा सारा भाग पूर्णपणे इटालीच्या वर्चस्वाखालीं असल्याने इटालीला ब्रिटिश आरमाराची सर्वस्वी नाकेबंदी करावयाला तो उपयोगीं पडेल. इटालीच्या नेत्यांनाहि या परिस्थितीची पूर्ण जाणीव आहे व तिचा शक्य तितका फायदा घेण्यासाठी त्यांनी या भागांतील पांतेल्लारिया या बेटांत नवा आरमारी व वैमानिक तळ बांधण्याचें काम सुरू केलें आहे.

## नव्या तऱ्हेच्या पाणबुड्या

भूमध्य समुद्राच्या खोलीमुळे त्याच्या पोटांत जाळी लावण्याचा खटाटोप करणे म्हणजे निव्वळ व्यर्थ आहे. इतका

उपयोग व्हावयाचा नाही. त्याचप्रमाणें व्यापारी जहाजांचे सोंग घेतलेल्या लष्करी जहाजांच्या तावडींत यापुढे कोणाहि राष्ट्राच्या पाणबुड्या सहसा सापडणार नाहीत. इटालीच्या विमानांना भूमध्य समुद्रावर आधिपत्य गाजविणे शक्य असल्यामुळे त्या राष्ट्राच्या पाणबुड्यांना इंग्लंडाच्या विमानांपासून फारसा धोका नाही. आता राहतां राहिला विनाशिकांचा प्रश्न. या विनाशिकांचे मात्र पाणबुड्या बोटींना अजून पूर्वीइतकेच भय आहे. कारण विनाशिका ताशी साठसत्तर मैलांपर्यंत सुद्धा प्रवास करूं शकतात व विनाशिकांवरून टाकलेले समुद्राच्या पोटांत स्फोट होणारे बाँब पाणबुड्या बोटीपासून तीस फुटांच्या अंतरावर पडले तरी त्यामुळे पाणबुड्या बोटींना जबरदस्त इजा होऊं शकते. विनाशिकांपासून पाणबुड्या बोटीचे संरक्षण करण्याचे दोन उपाय आहेत. एक तर त्यांचा वेग वाढविणे किंवा त्यांचे वजन वाढविणे. यांपैकी पहिल्या उपायाचा अवलंब जर्मनीने केला आहे. जर्मन लोकांनी अलीकडे विनाशिकेइतक्या वेगाने जाणाऱ्या २५० टनांच्या पाणबुड्या बांधल्या आहेत. उलटपक्षी जपानाने विनाशिकांवरील बॉंबच्या स्फोटामुळे पाणबुड्या बोटींना धक्का पोचूं नये म्हणून दोन हजारांहून अधिक टनांच्या व ताशी १७ मैल वेगाने जाणाऱ्या क्रूझर पाणबुड्या बांधल्या आहेत. यांपैकी कोणता नमुना इटालीला उपयुक्त होईल, हें निश्चितपणें सांगतां येत नाही. तरी देखील जपानचे नमुनेच इटालीला अधिक उपयुक्त होतील असा अंदाज आहे.

## इटालीचें सामर्थ्य

पाणबुड्या बोटींची संख्या व त्यांचें सामर्थ्य या दोन्ही दृष्टींनी इटाली देश हा बहुतेक साऱ्या देशांहून श्रेष्ठ आहे. भूमध्य समुद्रांत तर त्याच्या तोडीचें दुसरें राष्ट्रच नाही. आता सध्या इटालीच्या पाणबुड्या बोटींची संख्या सुमारें ११० आहे. अत्यंत खोल पाण्यांतून पाणबुड्या बोटी चालविण्यांत इटालीच्या नाविकांनी सर्व राष्ट्रांच्या नाविकांना मागे टाकलें आहे. त्याप्रमाणें पाणबुड्या चालविणें, टार्पेडो मारणें, ध्वनिशोधक यंत्रांच्या साहाय्याने शत्रूच्या जहाजांचा तलास लावणें वगैरे बाबतींत देखील इटालीचे नाविक अत्यंत दक्ष आहेत.

अर्वाचीन आरमारांना पाणबुड्या बोटींपेक्षाहि विमानांचे भय अधिक आणि हें भय देखील भूमध्य समुद्र व तांबडा समुद्र या टापूंतच सर्वांत अधिक आहे.

'फॉरेन अफेयर्स' मधील लेखकानेहि म्हटलें आहे 'Fighting planes and bombers flying at 200–240 miles an hour have made the Mediterranean a very narrow passage and have given riparian states like Italy and Spain an advantage they have never enjoyed before.'

अशा परिस्थितींत इंग्लंडला जर भूमध्यसमुद्रांत आपला बचाव करून घ्यावयाचा असेल, तर त्यानें त्या समुद्रांत शक्य तितके अधिक वैमानिक तळ प्रस्थापित करणें अवश्य आहे. हे तत्त्व ब्रिटिश आरमारी खात्यालाहि पटलें आहे, पण तें अमलांत आणणें जवळ जवळ अशक्यच आहे. कारण जिब्राल्टर येथे वैमानिक तळ स्थापण्याला मुळी जागाच नाही आणि जिब्राल्टरपासून माल्टापर्यंतच्या पश्चिम भूमध्य समुद्रांतील एकहि ठिकाण इंग्रजांच्या हातांत नसल्यानें त्या भागांत इंग्रजांना कोठेंहि थारा मिळण्याजोगा नाही. खुद्द माल्टा बेटांतील वैमानिक तळांची ब्रिटिश आरमारीखात्यानें सध्या वाढ चालविली आहे, पण इटाली व इंग्लंड यांचे युद्ध जुंपल्यास पहिल्या आठवड्यांतच तें बेट इटालीच्या हातीं जाईल आणि त्या बेटातील आरमारी व वैमानिक तळावर झालेला खर्चहि फुकट जाईल.

## सुएझचा कालवा सहज बंद करतां येईल

भूमध्यसमुद्रांतील वैमानिक सामर्थ्याच्या वाढीच्या दृष्टीनें सायप्रस बेटाचा मात्र इंग्लंडला अतिशय उपयोग होण्याजोगा आहे व तेथील वैमानिक तळाचीहि इंग्लंडनें जारीनें वाढ चालविली आहे. सायप्रस बेटांतील वैमानिक व आरमारी तळांचा उपयोग पश्चिम भूमध्यसमुद्रांत फारसा नसला तरी सुएझ कालव्याच्या संरक्षणाच्या दृष्टीनें त्या बेटाचें महत्त्व फार आहे. पण इथे हा महत्त्वाचा प्रश्न उद्भवतो कीं, सुएझ कालव्याचें संरक्षण करणें तरी शक्य आहे काय? या महत्त्वाच्या प्रश्नावर ब्रिटिश आरमारी खात्याचा इतर सर्व आरमारी खात्यांशीं मतभेद आहे. जपान, इटाली व अमेरिका या तीन्ही राष्ट्रांच्या आरमारी विशेषज्ञांचें मत असें आहे कीं, सुएझ कालव्याचें संरक्षण करणें अगदीं अशक्य आहे. उदाहरणार्थ, मि. टोटा इशिमारू हे म्हणतात—

'Suez canal is the weakest link in the long chain that connects England with India and should it pass into other

hands or should it be temporarily closed the backbone of England would be completely crushed. A small raiding party could capture and hold it for a time. A ship unexpectedly sunk in it would block it. As the defences of the Suez canal zone are as different from those of that of Panama as mud from clouds this operation would be comparatively simple.'

१९३४ साली झालेल्या आरमारी मॅनूव्हर्सवरून अमेरिकेच्या आरमारी खात्याने असा अंदाज केला आहे की जपानी वैमानिकांना पनामा कालव्यावर हल्ला करून त्याचे बरेचसे नुकसान करणे शक्य आहे. तेव्हा इटालीच्या वैमानिक स्वारीला सुएझ कालवा निरुपयोगी करून टाकणे अगदी शक्य आहे.

## भूमध्यसमुद्रांतील धोका

सुएझ कालवा बंद पडो किंवा न पडो, इटाली व इंग्लंड यांची लढाई जुंपल्यास इंग्लंडच्या व्यापारी जहाजांना भूमध्यसमुद्रांत फिरकणे अगदी अशक्य होईल. गेल्या महायुद्धांत इंग्रजांनी आपल्या व्यापारी जहाजांच्या संरक्षणासाठी सुमारे तीन हजार लढाऊ जहाजांची योजना केली होती. तरी देखील या सर्व जहाजांना न जुमानता जर्मनीच्या पाणबुड्या बोटींनी इंग्रजांची लक्षावधि टनांची जहाजे बुडविली. भूमध्यसमुद्रांत तर इटालीच्या पाणबुड्या बोटीना प्रचंड वैमानिक दलाची मदत होण्याजोगी आहे. त्या समुद्रांत आत्मसंरक्षणाला अक्षम अशा व्यापारी जहाजांची तर गोष्टच बोलायला नको. केवळ आत्मसंरक्षण व शत्रूचा विध्वंस याकरिताच बांधलेली ड्रेडनॉट जहाजें देखील तेथे विमानांपासून आत्मसंरक्षण करून घेण्याला असमर्थ आहेत, हें कॅप्टन लिड्डेल हार्ट या इंग्रज युद्धशास्त्रज्ञाचेंच मत आहे. इंग्लंडच्या व्यापारी जहाजांना भूमध्यसमुद्रांत फिरकणें अशक्य झाल्यास त्या राष्ट्राला आपल्या निकडीच्या गरजा भागविण्यापुरता आयात व्यापार चालू ठेवायला कमींत कमी तीन हजार व्यापारी जहाजें नवीन बांधावीं लागतील !

## इंग्लंडचा नवा तळ

भूमध्यसमुद्रांतील दळणवळणाच्या सुरक्षिततेसाठी इंग्लंडने जिब्राल्टर, माल्टा,

सायप्रस इत्यादि तळांच्या जोडीला तुर्कस्थानाकडून, स्मर्ना बंदरापासून ७० मैलां-वर असलेलें त्सेस्मे हे बेट नुकतेच मिळविले आहे. हे बेट लढाऊ जहाजांना फार सोइस्कर आहे. पूर्व भूमध्यसमुद्रांत आरमारी तळ स्थापण्याला उपयुक्त असे बंदर शोधण्याकरिता आरमारी तळांचे तज्ज्ञ सर सिरिल कर्कपॅट्रिक यांनी गतवर्षीच इजिप्त, ग्रीस व तुर्कस्थान यांच्या समुद्रकिनाऱ्यांची पाहणी केली होती. तेव्हापासून चाललेल्या खटपटींना यश येऊन आता इंग्रजांना आपल्या मनाजोगें बंदर मिळालें आहे. या बंदरामुळे एजियन समुद्रांतील दोदेकानेज बेटांतील इटा-लीच्या वैमानिक व आरमारी तळांचे भय कमी होणार आहे. तरीदेखील हा तळ बांधून होइपर्यंत इंग्लडची थोडी तारांबळच आहे. याशिवाय इटालीच्या यंदा पूर्ण झालेल्या व्हित्तोरिया व लित्तोरिया या बलिष्ठ ड्रेडनॉट जहाजांशीं टक्कर देण्याजोगें जहाज आज इंग्लंडच्या आरमारांत एकहि नसल्याने भूमध्य समुद्रांत सध्या इंग्लंडच्या आरमाराला कोणी विचारीनासे झाले आहे. इंग्लंडने सध्या पांच नवी ड्रेडनॉट जहाजे बांधायला घेतली आहेत खरी; पण ती १९३९ च्या उत्तरार्धांत संपूर्ण होतील. तोपर्यंत तरी भूमध्य समुद्रांत इटालीचाच वरचष्मा राहणार. ही संधि साधूनच इटालीने गतवर्षापासून स्पेनमध्ये लष्कर पाठवून त्या देशाचें राजकारण आपल्या कक्षेत आणण्याचा प्रयत्न चालविला आहे. इटालीचा हा प्रयत्न सफळ झाल्यास इंग्लंडला भूमध्यसमुद्राचें दारच बंद होईल व त्या राष्ट्राचें आपल्या वसाहतीशीं असलेलें दळणवळण आफ्रिकेच्या दक्षिणदिशेकडून ठेवावें लागेल व त्यामुळे दूरदूरच्या वसाहतींस धोका पोचेल.

केसरी, तारीख २९ आक्टोबर, १९३७.



# जर्मनीच्या चढाईचे परिणाम



१९२५ साली लोकार्नोच्या तहावर सही करतांना पोलंडचे प्रतिनिधि कौंट स्किन्स्की यांनी असे उद्गार काढले होते कीं, या तहामुळे युरोपांत पांच ते दहा वर्षेपर्यंत शांतता नांदेल. कौंट स्किन्स्की यांचा हा अंदाज अक्षरशः खरा ठरला आहे. लोकार्नोच्या तहाला दहा वर्षे लोटताच जर्मनीने तो तह फाडून युरोपांतील शांतता नष्ट केली आहे. यापुढे प्रत्यक्ष युद्धाला कधी सुरुवात होणार असेल ती होवो, पण आता अनुकूल संधि लाभताच जर्मनी युद्धाला प्रारंभ करणार याविषयीं कोणाला शंका उरलेली नाही.

## लाजिरवाणा तह

लोकार्नोचा तह अस्तित्वांत होता तोपर्यंत जर्मनीला कोणाशीहि युद्ध करणे शक्य नव्हते. कारण या तहांत जर्मनीने आपण फ्रान्सवर केव्हाहि स्वारी करणार नाही, असे लिहून दिले होते. उलटपक्षी ऱ्हाईन नदीच्या तीरावरील निःशस्त्र प्रदेशांत जर्मन सैन्य घुसल्यास जर्मनीवर हल्ला करण्याचा अधिकार फ्रान्सने स्वतःला राखून ठेवला होता. इतकेंच नव्हे तर जर्मनीने पोलंड किंवा झेकोस्लोव्हाकिया या राष्ट्रांशी आपण होऊन युद्ध सुरू केल्यास, जगांत शांतता रहावी या राष्ट्रसंघाच्या ध्येयाचे निमित्त करून राष्ट्रसंघाच्या संमतीचीहि वाट न पाहता, फ्रान्सने ऱ्हाईनलँडमधील निःशस्त्र प्रदेश खुशाल व्यापावा, अशीहि त्या तहामधून फ्रान्सने स्वतःला परवानगी घेऊन ठेवली होती. या असल्या एकतर्फी तहाला जर्मन राष्ट्रीय पक्षाने १९२५ साली देखील निकराने विरोध केला होता व राष्ट्रीय पक्षाच्या तिघां प्रधानांनीं तेव्हा या तहाच्या निषेधासाठी राजीनामेहि दिले होते. असला लाजिरवाणा तह जर्मनीने मोडला, यांत कांहीच आश्चर्य नाही. उलट हा तह फाडून टाकण्याला योग्य संधि मिळेपर्यंत वाट पाहिल्याबद्दल हेर हिटलेरच्या समयज्ञतेचें कौतुक करावेसें वाटतें.

वास्तविक पाहतां फ्रांको-रशियन तह हा लोकार्नो येथील तहाच्या तत्त्वा-

विरुद्ध आहे, अशी तक्रार जर्मनीने गतवर्षींच केली होती व हा तह घडून आल्यास त्याचा परिणाम चांगला होणार नाही, अशी फ्रान्सला सूचनाहि दिली होती. पण तेव्हा इंग्लंड आणि इटाली यांच्या सहाय्याच्या भरंवशावर फ्रान्सने जर्मनीच्या या सूचनेकडे दुर्लक्ष केले होते. त्यानंतर थोड्याच महिन्यांनी इटालीचे ॲबिसीनियाशी युद्ध सुरू झाले आणि त्याबरोबर इंग्लंड व इटाली या उभयतांचें वांकडे आले. शिवाय या भांडणाऱ्या राष्ट्रांपैकीं एकाचाहि पक्ष पूर्णपणे न उचलल्याबद्दल ती दोन्ही राष्ट्रे फ्रान्सवर चडफडूं लागली. अशा परिस्थितीत फ्रांको-रशियन तह फ्रेंच पार्लमेंटाकडून मंजूर करून घेऊन जर्मनीला एक प्रकारे आव्हान देणे हा कमालीचा अदूरदर्शीपणा होता. यामुळे १९३५ च्या मे महिन्यांत जरी या तहावर फ्रान्स व रशिया यांच्या प्रतिनिधीच्या सह्या झाल्या होत्या तरी फ्रान्सचा दूरदर्शी मुत्सद्दी मो. लाव्हाल हा मुख्य प्रधान असेपर्यंत त्याने हा तह फ्रेंच पार्लमेंटापुढे मांडलाच नव्हता पण लाव्हालाच्या मागून मुख्य प्रधान झालेल्या मो. सारोला इतका विवेक न राहिल्याने त्याने यंदाच्या मार्च महिन्याच्या आरंभी तो तह फ्रेंच पार्लमेंटाकडून पास करून घेतला. त्याबरोबर ता. ७ मार्च रोजी तीस हजार जर्मन सैन्य ऱ्हाईनलॅंडमध्ये नेऊन हेर हिटलेरने त्या तहाला उत्तर दिले.

जर्मनीच्या या कृत्यामुळे केवळ फ्रान्सचेच नव्हे तर फ्रान्सबरोबर इंग्लंडचेहि नाक ठेचले गेलें आहे. कारण गतवर्षापासून 'ऱ्हाईन नदी ही ब्रिटिश साम्राज्याची वास्तविक सरहद्द आहे व त्या नदीतीरावरील निःशस्त्र केलेल्या प्रदेशांत कोणाच्याहि सैन्याचा प्रवेश झाल्यास त्यापासून ब्रिटिश-साम्राज्याला धोका आहे' असे उद्गार इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. बाल्डविन यांनी अनेकवार काढले आहेत. असें असूनसुद्धा जर्मनीला त्या प्रदेशांतून घालवून देण्यासाठी इंग्लंडला आज कांहीहि करतां येत नाही, हा प्रकार पाहिला म्हणजे ब्रिटिश साम्राज्याला खरोखरीच ओहोटी लागली आहे, असें त्या साम्राज्यांतील प्रजाजनांना देखील वाटूं लागते.

## फ्रान्सची धमकी

ब्रिटिश साम्राज्याच्या वाढत्या दौर्बल्याचा असा प्रत्यय आल्यामुळे फ्रान्सला आता इंग्लंडचा संबंध तोडून टाकून इटालीशीच मैत्री करावी असें

प्राट लागले आहे. व्हाईनलँडमध्ये जर्मन सैन्य शिरल्यावर फ्रान्सचे सध्याचे परराष्ट्रमंत्री मो. फ्लांद यांनी इंग्लंडला असे चक्क बजाविले की, तुम्ही जर जर्मनीचा प्रतिकार करण्यांत आम्हांला मदत करणार नसाल तर आम्ही राष्ट्रसंघां-तून बाहेर पडून इटालीबरोबर चढाईचा व बचावाचा तह करूं. तेव्हा नाइलाज होऊन ब्रिटिश सरकारने आपल्या युद्धखात्याला फ्रेंच युद्धखात्याशी बोलणे करून जर्मनीच्या चढाईला विरोध कसा करावा, याविषयीच्या योजना करण्याला परवानगी दिली आहे. यांतला हास्यास्पद प्रकार हा आहे कीं, इंग्लंड व फ्रान्स यांच्या लष्करी खात्यांचे असे संगनमत होण्यापूर्वीच इंग्लंड व जर्मनी यांच्या आरमारखात्यांनी फ्रान्स व इटाली यांच्या संयुक्त आरमाराला कसे तोंड द्यावे याविषयीं चर्चा करून आपल्या योजनाहि मुक्रर केल्या आहेत. अशा प्रकारें इंग्लंडच्या लष्कर आणि आरमार या दोन खात्यांच्या धोरणांत जर विरोध उत्पन्न झाला तर इंग्लंडमध्ये आरमारी खात्याचे धोरणच प्रभावी ठरणार याविषयी शंका नाही.

तरी देखील कित्येक लोक म्हणतात की, जर्मनीचे वर्चस्व युरोपांत होणें हें इंग्लंडला अनिष्ट असल्यामुळे इंग्लंड जर्मनीच्या शत्रूंच्या पक्षालाच मिळेल. सर ऑस्टेन चेंबरलेन यांनीहि एका भाषणात म्हटले आहे,

"All our greatest wars have been fought to prevent one great military power dominating Europe and at the same time dominating the coasts of the Channel and the ports of the Low countries."

पण या तत्त्वासाठी इंग्लंड सध्याच्या जर्मनीशी युद्ध करीलच, असें वाटत नाही. महायुद्धापूर्वी इंग्लंड व जर्मनी यांची व्यापारी व आरमारी चढाओढ अत्यंत तीव्र झाली होती. याशिवाय महायुद्धाच्या सुरुवातीला बेल्जमवर हल्ला करून जर्मनीने अगदी इंग्लंडच्या काळजालाच हात घातला होता. त्यामुळे तेव्हा इंग्लंडला जर्मनीशीं लढणें भागच पडलें होते. पण असला प्रसंग पुनः येऊ नये याविषयीं हिटलेर अतिशय काळजी घेत आहे. आज ब्रिटिश आणि जर्मन आरमारखात्यांचे परस्परसंबंध पूर्णपणे सलोख्याचे आहेत. इंग्लंड आणि जर्मनी यांच्यांत सध्या व्यापारी चढाओढहि नाही. लोकार्नोचा तह मोडल्याबद्दल जर्मनीवर राष्ट्रसंघामार्फत आर्थिक बहिष्कार

घालण्याची फ्रान्सची सूचना इंग्लंडने ताबडतोब फेटाळून लावली. त्याचप्रमाणें फ्रान्स आणि बेल्जम या दोन्ही देशांच्या सरहद्दीना आपण केव्हाहि धक्का लावणार नाही, असेहि जर्मनीने इंग्लंडाला अभिवचन दिलेले आहे. शिवाय ब्रिटिश साम्राज्याचा जुना शत्रु रशिया व नवा शत्रु इटाली या उभयतांशी आज जर्मनीचे वितुष्ट आले आहे. या साऱ्या परिस्थितीचा विचार केला असता सध्या इंग्लंड जर्मनीविरुद्ध जाणार नाही, असेच वाटते.

## रशियाला वाटणारी भीति

१९२५ साली लोकार्नोच्या तहाची बोलणी चालू असतानाच रशियाला अशी भीति पडली होती की या तहावर सह्या झाल्या म्हणजे इंग्लंड व जर्मनी एकत्र होऊन रशियावर स्वारी करण्याच्या उद्योगाला लागतील. ही आपत्ति टळावी यासाठी रशियाचे तेव्हाचे परराष्ट्रमंत्री मो. चिचेरिन यांनी स्वतः बर्लिनला येऊन त्या तहावर सही न करण्याबद्दल जर्मनीचे मन वळविण्याचा प्रयत्न केला होता, पण तो प्रयत्न फसला तेव्हा चिनी राष्ट्रीय पक्षाला इंग्लडाविरुद्ध चिथावून देऊन रशियाने इंग्लंडाला पायबंद लावला होता. तेव्हाची स्वारीची भीति रशियाच्या मनांत आता फिरून उद्भवली आहे. त्यांचे सेनापति उघडपणे म्हणत आहेत की ऱ्हाईनलॅंडमध्ये तटबंदी बांधून जर्मनीची पश्चिम-सरहद्द सुरक्षित झाली की, जर्मन लष्कराची टोळधाड रशियावर पडणार. याच वेळी ब्रिटिश सेनापतींना रशियाची हिंदुस्थानावर स्वारी होणार असल्याची स्वप्नें पडूं लागली आहेत. हिंदुस्थानाचे माजी मुख्य सेनापति सर फिलिप चेटवूड यांनी ता. ७ एप्रिल १९३६ रोजी लंडन येथे एका व्याख्यानांत सांगितले—

"Nobody can imagine now that there is lik·ly to be a cause of war between the British Empire and Russia. But international situations altered with great rapidity and the Russians had the biggest, possibly the best equipped army and airforce in the world Given cause, given leader and the opportunity, the cause being weak India with an indifferent army and the object being to loot India-was it outside all possibility that a leader might appear with such a tempting bait and offer his followers that they would sink their differences?"

**हिंदुस्थानाच्या सरहद्दीवरील दुर्गम पर्वतांतून सैन्य नेण्याचा त्रास चुकावा, म्हणून रशियाने गेल्या वर्षापासून विमानांतून सैन्य उतरविण्याची योजना केली असून प्रयोगाअंती ती यशस्वीहि ठरली आहे, या गोष्टीचा येथे उल्लेख करणें अवश्य आहे. हिंदुस्थानासारख्या निःशस्त्र देशाला या योजनेपासून किती भय आहे, हें सांगावयाला नकोच.**

## युद्ध कधी होईल ?

आता रशियावरील जर्मनीची चढाई सुरू कधी होणार, याचा थोडासा विचार केला पाहिजे. या प्रश्नाचा युद्धसिद्धतेच्या दृष्टीने आणि आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या दृष्टीने असा दुहेरी विचार करता येईल. सध्या जर्मनीमध्ये नवें लष्करी यंत्र पूर्णतेला नेणे, नवे आरमार बांधणे, भावी महायुद्धांतील वाहतुकीसाठी ५० टनांच्या प्रचंड लॉऱ्या तयार करणे, असल्या लॉऱ्या ज्यांच्यावरून वर्षानुवर्षे प्रवास करू शकतील असल्या भक्कम सडका बांधणे, देशांत पेट्रोल वगैरे युद्धोपयोगी द्रव्यांचा सांठा करणें, वगैरे जे कार्यक्रम आता सुरू आहेत, ते सर्व पूर्ण होण्याला अजून चार वर्षे लागतील. ब्रिटिश युद्धखात्याची जी माहिती मिळते तविरून असे दिसते कीं, १९३९ च्या अखेरीपर्यंत इंग्लंडचीहि तयारी संपणें शक्य नाही. शिवाय १९३९ च्या अखेरीपर्यंत २० वर्षे पुरी होऊन लष्करी नोकरीला लायक होणाऱ्या तरुणांचा युरोपांत दुष्काळ असल्यामुळे तोंपर्यंत महायुद्ध उपस्थित करणे सर्वच युरोपियि राष्ट्रांना अशक्य आहे.

आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या दृष्टीने विचार केला असताहि जर्मनीने इतक्यांत युद्ध उपस्थित न करणे हेच स्वाभाविक दिसते. कारण आज नाही उद्या फ्रान्स देशांत यादवी माजण्याची स्पष्ट चिन्हे आता सर्व मुत्सद्दी लोकांना दिसूं लागली आहेत आणि उद्याचे मरण आज ओढवून घेण्याच्या बुद्धीनेच की काय कोण जाणे कम्युनिस्ट पुढारी त्या देशांतील अंतःकलहाच्या आगींत तेल ओतत आहेत. फ्रान्समध्ये क्रान्तीचा अग्नि पेटला म्हणजे जर्मनीला पारिसचा तह गुंडाळून ठेवून ऑस्ट्रिया देश खाता येईल व मग कडेकोट तयारी करून रशियाविरुद्ध जिहाद पुकारता येईल. —केसरी, ता. ५ मे, १९३६.

---

# पापेनचें ऑस्ट्रियांतील राजकारण

ऱ्हाईनलॅंडमध्ये जर्मन सैन्याचा पाय रुजल्यामुळे जर्मनीचे लक्ष फिरून एकवार ऑस्ट्रियाकडे वळलें आहे. वास्तविक पाहतां कांही वर्षांपासून इंग्लंड आणि फ्रान्स यांच्या संमतीने इटालीने ऑस्ट्रियाला आपला अंकित देश बनविला आहे. पण सध्या ॲबिसीनियन युद्धांत गुतल्यामुळे ऑस्ट्रियाला पूर्वीप्रमाणें आर्थिक मदत करणे इटालीला अशक्य झाले आहे. शिवाय त्या युद्धामुळे इटालीच्या चढेल धोरणाची परराष्ट्रांना पूर्ण जाणीव झाल्याने त्यांनाहि इटालीचे ऑस्ट्रियांतील वर्चस्व नकोसें झालें आहे. पण या परराष्ट्रांना इटालीपेक्षा जर्मनीची दहशत अधिक असल्याने त्यांना ऑस्ट्रियाला इटालीच्या तावडींतून सोडविण्यासाठी काय करावें, हे सुचत नाही. खुद्द ऑस्ट्रियांतील सत्ताधारी पक्षाचे म्हणणें असे आहे की, ऑस्ट्रियाचें स्वातंत्र्य राखण्याचा एकच उपाय आहे. तो म्हणजे ऑस्ट्रियांतील माजी राजघराण्याचा वारस प्रिन्स ओटो याला ऑस्ट्रियाच्या गादीवर बसवावे. पण या योजनेला ऑस्ट्रियाविरुद्ध बंड करून स्वतंत्र झालेल्या झेकोस्लोव्हाकिया राष्ट्राचा निकराचा विरोध आहे. झेकोस्लोव्हाकियाने ऑस्ट्रियाला अशी धमकी दिली आहे की, ओटोला जर व्हिएन्नाच्या गादीवर बसविलें तर आम्हांला ऑस्ट्रियाविरुद्ध युद्ध पुकारणे भाग पडेल. झेकोस्लोव्हाकियाचा हा विरोध शांत करण्यासाठी ऑस्ट्रियाचा चॅन्सेलर शूश्निग हा स्वतः प्रागला जाऊन आला, पण झेकोस्लोव्हाकियाच्या मुत्सद्दी लोकांनी आपला आग्रह सोडला नाही. उलटपक्षी ओटोला गादीवर बसविण्याच्या बाबतीत इंग्लंड आणि फ्रान्स यांची मदत मिळविण्यासाठी ऑस्ट्रियन व्हाइसचॅन्सेलर प्रिन्स स्टारेंबेर्ग याने लंडन व पारिस यांची सफर केली. पण त्यालाहि यश आले नाही. या साऱ्या अडचणीच्या भरीला आता चॅन्सेलर शूश्निग याचा कॅथोलिक पाद्रयांचा पक्ष व व्हाइसचॅन्सेलर स्टारेंबेर्ग याचा फॅसिस्ट पक्ष यांच्यांत जाहीर भांडणें सुरू झालीं आहेत आणि प्रिन्स स्टारेंबेर्गने चॅन्सेलर शूश्निगला अशी धमकी दिली आहे कीं, तुमच्या मित्रांविरुद्ध मला माझ्या हाइमव्हेर या खाजगी सैन्याचा उपयोग करावा लागेल.

चॅन्सेलर आणि व्हाइसचॅन्सेलर यांच्यामधील या भांडणाच्या मुळाशी व्हिएन्ना येथील जर्मन वकील हेर फॉन पापेन हा आहे. १९३४ च्या जुलै अखेरीला आस्ट्रियांतील नाझी लोकांनी तेव्हाचा चॅन्सेलर डॉलफुस याला मारून टाकले. या प्रकरणांत तेथील जर्मन वकिलाचे अंग असल्यामुळे त्याला परत जावें लागले. त्यानंतर हिटलेरने हेर फॉन पापेनची त्याच्या जागी खास नेमणूक केली. हेर फॉन पापेन हा कायसरच्या कारकीर्दीतील परराष्ट्रीय खात्याचा एक नामांकित मुत्सद्दी असून १९३२ सालच्या उत्तरार्धांत जर्मनीचा चन्सेलरहि होता. तेवढ्या मुदतीत त्याने नुकसानभरपाईच्या नांवाखाली जर्मनीला द्यावी लागणारी खंडणी देण्याचे साफ नाकारले आणि उलट जर्मनीला इतर राष्ट्रांच्या बरोबरीने सैन्य ठेवण्याचा अधिकार असल्याची दोस्त राष्ट्रांकडून कबूलीहि मिळविली. याच्याच सल्ल्यामुळे १९३३ साली प्रेसिडेंट हिंडेनबुर्ग याने हेर हिटलेरला चॅन्सेलरच पद दिले. १७-६-१९३४ रोजी त्याने एका व्याख्यानांत नाझी पक्षाच्या राजकारणावर निर्भयपणें टीकाहि केली होती व त्यामुळे त्याच्या जिवावरदेखील प्रसंग ओढवला होता. या महाकारस्थानी मुत्सद्द्याला जर्मनीचा वकील म्हणून आपल्या देशांत येऊं द्यावे की नाही, याविषयी ऑस्ट्रियन सरकारला शंकाच वाटत होती. ती शंका साधार होती, हे आता हेर फॉन पापेनच्या कारस्थानांनी सिद्ध झाले आहे.

## थंडी राज्यक्रांति

पापेनच्या आगमनापूर्वी ऑस्ट्रियांत रक्तपाताने राज्यक्रांति घडवून आणण्याचा प्रयत्न नाझी लोकांनी करून पाहिला. पण असल्या राज्यक्रांतीमुळे परराष्ट्रांना आपल्या देशाच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याची संधि सांपडते, हे पाहून आता त्यांनी आपला कार्यक्रम बदलला आहे. या नव्या कार्यक्रमाला Kalter Putsch म्हणजे थंडी राजक्रांति असे नांव दिले आहे. ही थंडी राज्यक्रांति घडवून आणण्याची सारी जबाबदारी हेर फॉन पापेनने आपल्या शिरावर घेतली आहे.

पापेनचें पाऊल व्हिएन्नांत पडण्यापूर्वी ऑस्ट्रियातील नाझी चळवळीचीं सारी सूत्रे अत्याचारी पुढाऱ्यांच्या हाती होती व त्यांच्या अत्याचारांमुळे ऑस्ट्रियात नाझी पक्ष बेकायदेशीर ठरला होता. पापेन व्हिएन्नाला आल्यापासून तेथल्या नाझी पक्षांतील अत्याचारी पुढाऱ्यांचे वर्चस्व कमी झाले व

एकंदरीने अत्याचारांना आळा पडला. त्याचप्रमाणे जर्मन आणि ऑस्ट्रियन वर्तमानपत्रांतून जी परस्परांच्या सरकारांची निंदा चालत असे तिचाहि पापेनने बंदोबस्त केला. त्यानंतर नाझी पक्ष जरी बेकायदेशीर झाला होता, तरी त्या पक्षाशी सहकार्य करणारे १६७ आखाडे परत सुरू करण्याची परवानगी त्याने मिळविली. पुढे १९३४ च्या डिसेंबरमध्ये ऑस्ट्रियन सरकारकडून अटकेंत असलेल्या नाझीपैकी अर्ध्याहून अधिक लोकांची सुटका त्याने करविली. १९३५ च्या प्रारंभी १३ जानेवारीच्या सार्वत्रिक मतमोजणीमुळे सार प्रांत परत मिळाला, तेव्हा हेर फॉन पापेनने असे जाहीर केले की जर्मनीला सार परत मिळाल्याबद्दल ज्या ऑस्ट्रियन लोकांना जर्मन सरकाराचे अभिनंदन करायचें असेल त्यांनी जर्मन वकिलातीतील पुस्तकावर सह्या करून जावे. त्याबरोबर सह्या करण्यासाठी जर्मन वकिलातीसमोर ऑस्ट्रियन लोकांची येवढी गर्दी झाली कीं येणाऱ्याजाणाऱ्या लोकांना वाटा काढून देण्यासाठी तेथे पोलिसांची तुकडी आणावी लागली. या उत्साहपूर्ण अभिनंदनाबद्दल पापेनने ऑस्ट्रियन लोकांचे मनःपूर्वक आभार मानले. अशा रीतीने ऑस्ट्रियन सरकारच्या डोळ्यांदेखत त्याने बेकायदेशीर ठरलेल्या नाझी पक्षाचे रजिस्टर तयार केले.

## पापेनची वशीकरणविद्या

व्हिएन्ना येथील जर्मन वकिलातीत पापेन अगदी जरूरीपुरताच राहतो. त्याचे मुख्य काम ऑस्ट्रियांतील नाझी पक्षाची संघटना व विरुद्ध पक्षांची विघटना हें असून त्या कामासाठी तो देशभर फिरत असतो. वास्तविक पाहतां पर-राष्ट्रीय वकिलाने राजधानीचें शहर सोडून बाहेर कुठे जाऊं नये असा सामान्य नियम आहे. पण असले निर्बंध पापेनला लागू नाहीत. निवडणुकीच्या पूर्वी अमेरिकन प्रेसिडेंटने जसा दौरा काढावा तसा हा ऑस्ट्रियांत सारखा फिरत असतो. कोणालाहि वश करून घेण्याची कला पापेनला चांगली अवगत असल्यामुळे तो जेथे जातो, तेथल्या ऑस्ट्रियन अधिकाऱ्यांना जर्मनीचे हस्तक बनवितो. या वशीकरण-विद्येच्या प्रभावाने पापेनने टायरोल, साल्झबुर्ग, अप्पर ऑस्ट्रिया, स्टिरिया, कारिंथिया वगैरे प्रांतांतील गव्हर्नरांपासून सारे अधिकारी आपल्याला अनुकूल करून घेतले आहेत. नाझी पक्षाचा एक शत्रू डॉ. गेसनेर म्हणतो

"About three-quarters of the Vienna police and the administrative and judicial bureaucracy are Nazi or have Nazi sympathies and the same applies to the army-offiicers." अशी ऑस्ट्रियांतील परिस्थिति असल्यामुळे कोणाहि ऑस्ट्रियनाला 'तुमच्या देशांत सत्ता कोणाची चालते ?' असा प्रश्न केल्यास 'हेर फॉन पापेनची' असेच उत्तर मिळते. १९३५च्या प्रारंभींच बहुतेक सारे प्रमुख अधिकारी, कांही प्रांतांचे गव्हर्नर व बरेचसे मेयर पापेनने अनुकूल करून घेतले आहेत, व्हिएन्नाचा मेयर मात्र अजून त्याला वश झालेला नाही, असे एका फ्रेंच बातमीदाराने लिहिले होतें. पुढे सहा महिन्यांतच व्हिएन्नाचा मेयर डॉ. श्मिट्झ हा पापेनचा दोस्त बनला, इतकेंच नव्हे तर, प्रत्यक्ष प्रधानमंडळांत फूट पाडून कित्येक प्रधानहि त्याने जर्मन पक्षाला वळविले. विशेष मौजेची गोष्ट ही की, ऑस्ट्रियन सरकाराचे मुखपत्र जे 'राइश् पोस्ट' त्याचा प्रमुख संपादक डॉ. फुंडेर हा पापेनचा हस्तक बनला आहे. या डॉ. फुंडेरने १२-३-३६ रोजी आपल्या पत्रांत लिहिले आहे की, ऑस्ट्रियाने शक्य तितक्या लौकर जर्मनीशीं समेट करून टाकावा, हा घरगुती प्रश्न मिटला म्हणजे जर्मनीला अखिल जर्मन जातीचा उद्धार करणें व वसाहती परत मिळविणें या महत्कार्याकडे निर्वेध लक्ष पुरवितां येईल. ऑस्ट्रियन सरकाराच्या मुखपत्रांतून जर अशा प्रकारे पापेनच्या विचारांचा प्रतिध्वनि उमटूं लागला तर आस्ट्रियांत पापेनचे राज्य प्रस्थापित झाले आहे असे म्हणावयाला काय हरकत आहे !

## डान्यूबियन कराराची योजना

१९३५ च्या जूनपर्यंत ऑस्ट्रियांत पापेनचे प्रस्थ इतके वाढलें की, इंग्लंड व फ्रान्स या देशांतील मुत्सद्दीमंडळींनी ऑस्ट्रियाला वांचविण्यासाठी डान्युबियन पॅक्टची योजना पुढे आणली. या करारावर सह्या करणाऱ्या राष्ट्रांनी एकमेकांच्या अंतर्गत राजकारणांत हात घालूं नये व ऑस्ट्रियाविरुद्ध कोणी चढाई केल्यास सर्वांनी एक विचाराने त्या चढाईचा प्रतिकार करावा, अशा या कराराच्या अटी होत्या. पण ऑस्ट्रियन सरकारने या कराराला अशी एक दुरुस्ती सुचविली की, ऑस्ट्रियावर परचक्र आल्यास आमच्या इच्छेप्रमाणें आम्हांला वाटेल त्या राष्ट्राची मदत घेण्याचा अधिकार असावा. ता. ९।९।१९३५ रोजी ही वरवर पाहतां सोज्वळ दिसणारी पण वस्तुतः इटालीचे मांडलिकपण स्वीकारणारी

ऑस्ट्रियन सरकारची सूचना जाहीर झाली. याच सुमारास ऑस्ट्रियन सरकारने मार्ज राजघराण्याची खासगी मालमत्ता परत देण्याचा व त्या राजघराण्यांतील मंडळीना ऑस्ट्रियांत परत येऊं देण्याचा कायदा केला होता. हा कायदा मंजूर झाल्यावर ऑस्ट्रियांतील अनेक नगरसंस्थांनी प्रिन्स ओटोला आपल्या नागरिकत्वाचे अधिकार अर्पण करून स्वदेशी परत येण्याची विनंति केली होती. पण ऑस्ट्रियन सरकाराची वरील सूचना जाहीर झाल्यावर प्रिन्स ओटोने एक पत्र प्रसिद्ध करून ऑस्ट्रियाच्या सरकारावर कडक टीका केली. त्या पत्रांत त्याने ऑस्ट्रियन जनतेला उद्देशून म्हटले आहे 'I wish you to know that it is not I who delays in giving the natural effect to the revocation of my banishment. The insincerity which displays ardour to defend the independence of Austria while attacking that independence postpones the day for which I long.'

## जर्मनी-ऑस्ट्रियाचा तह

याच सुमाराला पापेनने पुढील अटीवर जर्मनी ऑस्ट्रियाशी समेट करायला कबूल असल्याचे कळविले. जर्मनी व पोलंड यांच्या तहाच्या धर्तीवर ऑस्ट्रियाने जर्मनीशी तह करावा. परस्परांनी परस्परांना आर्थिक सवलती द्याव्या, जर्मनीतील ऑस्ट्रियन नाझीना ऑस्ट्रियांत परत येण्याला हरकत नसावी. पानजर्मन पक्षाचे दोघे मंत्री प्रधानमंडळांत घ्यावे. नवीन नाझी मेयर नेमावे. उलटपक्षी नाझी पक्षाने ऑस्ट्रियाविरुद्ध चालविलेली चळवळ थांबवावी. या अटी कळविल्यावर साल्झबुर्गच्या गव्हर्नरच्या घरी पापेन व शुश्निग यांची मुलाखत झाली. या मुलाखतीच्या वेळी साल्झबुर्गच्या गव्हर्नराने शुश्निगला अशी धमकी दिली की, आपण जर्मनीच्या अटी मान्य केल्या नाहीत तर टायरोल, कारिंथिया, स्टिरिया, अप्पर ऑस्ट्रिया या सर्व प्रांतांच्या गव्हर्नरांशी संगनमत करून मी बंड करीन. पापेनने आपल्या या उतावीळ मित्राला आवरण्याचा प्रयत्न केला. पण तो सफळ झाला नाही व ती मुलाखत तशीच सोडून द्यावी लागली. त्यानंतर डॉ. शुश्निगने पापेनला वश झालेले चौघे मंत्री आपल्या मंत्रिमंडळांतून काढून टाकले व प्रिन्स स्टारेबेर्गचे दोघे मित्र व

स्वतःचे दोघे मित्र यांची त्यांच्या जागी नेमणूक केली. या फेरबदलामुळे शूश्निग हा पूर्णपणे इटालीच्या आहारीं गेला आहे, हा व्हिएन्नामधील लोकांचा ग्रह अधिकच दृढ झाला.

ऑस्ट्रियांतील सध्याचे मंत्रिमंडळ १७।१०।१९३५ रोजी अस्तित्वांत आले. तेव्हापासून शूश्निग आणि स्टारेबेर्ग या उभयतांमध्ये भांडणे लावण्याचे पापेनचे उद्योग चालले होते. ते भांडण सध्या निकरावर आले आहे, हे सर्वांना माहीतच आहे. सध्याच्या भांडणाचे पर्यवसान कांहीहि झाले तरी आज नाही उद्या हेर फॉन पापेन आपला हेतु सिद्धीस नेणार, ही गोष्ट आता जर्मनीच्या कट्टया शत्रूंनादेखील कबूल करावी लागत आहे. डॉ. सेटन वाटसनसारख्या जर्मनीचा द्वेष करणाऱ्या तज्ज्ञाने म्हटले आहे 'It seems that Germany, led very skilfully by Von Papen, is just waiting for the moment in which she would be able to Nazify Austria from within without committing the crass blunders which she committed a year or two ago, and in such a way that the rest of Europe would be able to raise no obstacle to prevent it.'

—केसरी, ता. ८ मे, १९३६.



# ऑस्ट्रियांतील ताज्या घडामोडी

गेल्या दोन महिन्यांत ऑस्ट्रियामध्ये अनेक महत्त्वाच्या घडामोडी झाल्या आहेत. त्यांची या लेखांत संक्षिप्त माहिती द्यावयाची आहे. कांही आठवड्यांपूर्वी ऑस्ट्रियांतील जनतेने व सरकारने प्रिन्स अजेनची द्विशतवार्षिक पुण्यतिथि मोठ्या समारंभाने साजरी केली. प्रिन्स अजेन हा अठराव्या शतकाच्या आरंभी ऑस्ट्रियन सैन्याचा फील्डमार्शल होता. त्या वेळी ऑस्ट्रियावर पूर्वेकडून तुर्कांचे व पश्चिमेकडून फ्रेंचांचे परचक्र आले होते. अशा परिस्थितीत प्रिन्स अजेनने इंग्लंडचा नामांकित सेनापति ड्यूक ऑफ मार्लबरो याच्या मदतीने प्रथम स्पॅनिश वारसाच्या युद्धांत फ्रेंचांचा पुरा मोड केला आणि मग १७१३ नंतर तुर्कांवर चढाई केली. या चढाईंत कार्लेनबेर्गच्या लढाईमध्ये तुर्कांचा सपशेल पराभव होऊन त्यांना १७१७ साली ऑस्ट्रियाने सांगितलेल्या अटींवर सह्या करून कसेबसें युद्ध थांबवावे लागले. जर्मन जातीने स्वपराक्रमाने तुर्कांवर मिळविलेला हा पहिलाच विजय असल्याने प्रिन्स अजेनविषयी आखिल जर्मन राष्ट्राला अजूनदेखील अतिशय आदर वाटतो. यामुळे ऑस्ट्रियाप्रमाणे जर्मनीतहि प्रिन्स अजेनची पुण्यतिथि सरकारमार्फत पाळण्यांत आली. त्या दिवशी बर्लिनमध्ये ऑस्ट्रियाच्या वकिलातीचा लष्करी सल्लागार पोल व जर्मन सेनापति लेफ्टेनंट जनरल शौंबुर्ग या उभयतांसमोर जर्मन सैन्याचा 'मार्च पास्ट' झाला व ऑस्ट्रिया व जर्मनी यांचीं राष्ट्रगीते झाल्यावर हा समारंभ समाप्त झाला. त्यानंतर बर्लिनच्या वरिष्ठ अधिकारी वर्गापुढे ऑस्ट्रियाच्या कौन्सिल ऑफ स्टेटच्या एका सभासदाचें व्याख्यान झाले. शिवाय त्याच दिवशीं व्हिएन्ना येथे हेर फॉन पापेनने ऑस्ट्रियांतील सर्व लष्करी तज्ज्ञांना मेजवानी दिली.

असो, या साऱ्या समारंभापेक्षा या पुण्यतिथीच्या प्रसंगी जर्मनीचा मुख्य सेनापति फील्डमार्शल ब्लॉम्बेर्ग याने जर्मन सैनिकांना पाठविलेला संदेश अधिक महत्त्वाचा आहे. या संदेशांत तो म्हणतो, " प्रिन्स अजेनच्या हयातींत फ्रेंच

आणि तुर्क या उभयतांची सैन्ये। ऑस्ट्रियन साम्राज्याच्या पूर्व आणि पश्चिम सरहद्दीवर लुटालूट, जाळपोळ आणि खुनाखुनी करीत चालून आली असतां प्रिन्स अजेनने त्यांचा पाडाव करून तेव्हांच्या जर्मन साम्राज्याचे संरक्षण केले. पुढे कालक्रमाने ते जुने जर्मन साम्राज्य वृद्ध झाल्याने प्रशियाच्या राजांना बर्लिन येथे नवे जर्मन साम्राज्य स्थापावे लागले. तरी देखील एका काळी ऑस्ट्रियाचे साम्राज्य हेच अखिल जर्मन जातीचे साम्राज्य होते आणि त्या काळी प्रिन्स अजेनने मिळविलेल्या विजयांत आपले पूर्वज देखील भागीदार होते, ही गोष्ट विसरूं नका. प्रिन्स अजेनने आपले सर्व आयुष्य अखिल जर्मन जातीच्या सेवेमध्ये घालविले आहे. यासाठी आजच्या या पवित्र प्रसंगी जर्मन जातीच्या पूर्वेकडील व पश्चिमेकडील शत्रूंवर चिरस्थायी विजय मिळविणाऱ्या व समकालीन सेनापतींमध्ये सर्वांत अधिक प्रसिद्ध असलेल्या या फील्डमार्शलच्या मूर्तीला आपणहि सादर वंदन करूं या."

फील्डमार्शल ब्लोबेर्गच्या या संदेशाचे सर्व ऑस्ट्रियन वर्तमानपत्रांनी मनःपूर्वक स्वागत केले. Wiener Neueste Nachrichten या पत्राने असें लिहिलें कीं, ऑस्ट्रिया आणि जर्मनी या मायलेकीच्या परस्परसंबंधाचे तत्त्व केवळ सैनिकानांच समजते. याच संदेशाविषयी 'राइश्पोस्ट' या व्हिएन्नाच्या निमसरकारी पत्राने उद्गार काढले आहेत 'जर्मनीच्या मुत्सद्दी मंडळीना जर त्यांच्या सेनापतीप्रमाणे बोलायला येत असते तर किती छान झाले असते!' 'राइश्पोस्ट'ची ही इच्छा पूर्ण करण्यासाठीच कीं काय कोण जाणे यानंतर लौकरच जर्मनीचा निमसरकारी परराष्ट्रमंत्री हेर फॉन रिब्बेनट्रोप याने राल्फ बार्नेस नांवाच्या एका अमेरिकन बातमीदाराला मुलाखत देऊन ऑस्ट्रियाविषयींचे जर्मनीचें धोरण उघडपणें सांगितलें आहे. तो म्हणतो "लोकमताला जबाबदार असलेल्या एखाद्या ऑस्ट्रियन सरकाराने जर जर्मनींत सामील होण्याची इच्छा प्रगट केली तर तिला नकार देणें हें आमच्या दृष्टीने महत्पाप होईल. त्याचप्रमाणें जर्मन राष्ट्राच्या ऐक्याला इतर युरोपियन राष्ट्रांनी विरोध करणें हेंहि तितकेंच निंद्य पाप होय. बव्हेरिया जसा जर्मनीचा एक भाग आहे, तसाच ऑस्ट्रिया हाहि एक जर्मनीचा भाग आहे. ऑस्ट्रियाची राजधानी ही एका काळीं जर्मनीचीहि राजधानी होती. आम्ही स्वतः ऑस्ट्रियावर स्वारी करून तो देश जिंकूं इच्छीत नाही, पण आमच्या राष्ट्रैक्याला

जर तिसऱ्या राष्ट्राने विरोध केला तर त्याचें वर्तन अनीतीचेंच नव्हे तर शत्रुत्वाचें आहे, असें आम्ही मानूं. पारिसचा तह आम्हाला मान्य नसला तरी प्रेसिडेंट विल्सनचीं चौदा तत्त्वें आम्हांला मान्य आहेत. त्या तत्त्वांप्रमाणे कोणाहि तिसऱ्या राष्ट्राला जर्मनी व ऑस्ट्रिया यांच्या परस्परसंबंधांत लुडबूड करण्याचा अधिकार पोंचत नाही. आता सध्या ऑस्ट्रिया जर्मनींत सामील होण्याला तयार नाही, ही गोष्ट आम्हांला मान्य आहे. पण आज ऑस्ट्रियाने परक्या राष्ट्राच्या हातचे खेळणें होऊं नये, एवढीच आमची इच्छा आहे. ऑस्ट्रिया वंशाने जर्मन असल्यामुळे ऑस्ट्रियांतील सरकार हें जर्मनीशी सहकार्य करणारेच असलें पाहिजे, जर्मनीशीं विरोध करणारे असून चालणार नाही. ऑस्ट्रियांतील सरकार नाझी असलेंच पाहिजे, असाहि आमचा आग्रह नाही. दोन देशांतील राज्यपद्धति एक नसून सुद्धा त्यांच्यामध्ये पूर्ण सहकार्य असूं शकतें, याचे शेजारचेच उदाहरण हवे असल्यास फ्रान्स व बेलजम यांच्याकडे पहा." प्रिन्स अजेनच्या पुण्यतिथीच्या प्रसंगी ऑस्ट्रियन आणि जर्मन सैनिकांनी जी बंधुभावना प्रकट केली, त्याच बंधुभावनेच्या जोरावर हेर फॉन रिब्बेनट्रोपने ही मुलाखत दिलेली दिसते.

हेर फॉन रिब्बेनट्रोपच्या या मुलाखतीवरून एक गोष्ट स्पष्ट दिसते कीं ऑस्ट्रियाच्या भावी राज्यपद्धतीच्या प्रश्नावर ऑस्ट्रियन सरकारला एकवार रेफरेंडम घ्यावयाला लावणें, हे सध्या जर्मन सरकारचें उद्दिष्ट आहे. आणि हें जर्मनीचें उद्दिष्ट ऑस्ट्रियात बादशाही सत्ता पुनः स्थापण्याच्या चळवळीने एकाएकी उचल घेतल्यामुळे अनपेक्षित रीतीने साध्य होण्याचा रंग दिसत आहे. ऑस्ट्रियांत हाप्सबुर्ग घराण्याची पुनः स्थापन होऊ देण्याला जर्मनी अनुकूल आहे की नाही, याविषयीं फार शंका वाटते. १९३५ सालाच्या नाझीपत्रकांतून असें प्रतिपादिलेलें आढळतें की, हाप्सबुर्ग घराण्याच्या विरुद्ध शस्त्रें किंवा विषे यांचा उपयोग केला तरी ते न्याय्यच ठरेल. ही परिस्थिति अद्यापि बदललेली दिसत नाही. १९३६ च्या आरंभीं ऑस्ट्रियन राजकारणाचा इंग्लंडांतील सर्वांत प्रसिद्ध तज्ज्ञ डॉ. सेटन वाटसन हा ऑस्ट्रियाला गेला होता. त्याने आपला अनुभव सांगताना म्हटलें आहे

"I have heard Austrians commit themselves to the view that Otto would never leave Vienna alive or that if he

wanted to reach it in safety he had better come by air and not by land."

असें असूनसुद्धा ऑस्ट्रियाच्या अनेक भागांतून बादशहाला परत बोलावण्याच्या प्रश्नावर सर्व जनतेची मते घेतली असतां ती राजघराण्याला अनुकूल असलेली आढळून येतात हें कसे, या प्रश्नाचा खुलासा डॉ. सेटन वाटसनने असा केला आहे कीं रेफरेंडम घेतल्यास ते राजघराण्याला अनुकूलच होईल, असा ऑस्ट्रियन सरकाराला भ्रम व्हावा, यासाठी नाझी पक्षाने आपल्या अनुयायांना तूर्त राजघराण्याच्या बाजूने मते देण्याची सूचना दिली आहे, यामुळे राजपक्षियांची सध्या दिशाभूल होत आहे. डॉ. सेटन वाटसनच्या या विधानाला इतर अनेक प्रत्यंतर पुरावे दाखवितां येण्याजोगे आहेत, पण ते सारे येथे सांगणें अशक्य आहे.

रेफरेंडमचे परिणाम काय होतील, याविषयी एका ऑस्ट्रियन तज्ज्ञाचे उद्गार मात्र येथे उतरून घेतले पाहिजेत. तो म्हणतो—

"The foreign opinion would be doing Austria the worst possible disservice and playing straight into the hands of Nazi terrorists if it were to agitate for a plebiscite as the natural solution. If a plebiscite were physically possible, on an agreed questionnaire without stirring opinion to its depths it would doubtless be the ideal method; but with the memory of those years of terror and in view of the unlimited resources of propaganda which would undoubtedly be forthcoming it would be a most dangerous weapon, leading to wholesale intimidation and distortion of opinion."

ऑस्ट्रियांत बादशाही सत्ता पुनः स्थापण्याला झेकोस्लोव्हाकियाचा निकराचा विरोध आहे. झेकोस्लोव्हाकियाचा माजी प्रेसिडेंट मॅसारिक व आजचा प्रेसिडेंट बेनेश या दोघांनीहि असें अनेकवार जाहीर केलें आहे कीं, बादशहा परत येण्यापेक्षा ऑस्ट्रिया जर्मनींत सामील झालेला पुरवला, कारण बादशाही सत्तेपासून

झेकोस्लोव्हाकियाच्या स्वातंत्र्याला जितका धोका आहे, तितका कांही हिटलेरच्या डिक्टेटरशिपपासून नाही. आता कांही अतिधूर्त फ्रेंच मुत्सद्दी लोकांनी हिटलेरची अशी समजूत करून देण्याचा प्रयत्न चालविला आहे की, झेकोस्लोव्हाकियाच्या विरोधाला न जुमानतां ऑस्ट्रियांत बादशाही सत्तेची स्थापना करणे हा वास्तविक जर्मनीचा विजयच आहे. पण असल्या भुलथापाना बळी पडण्याइतका हिटलेर दूधखुळा आहे, असे वाटत नाही.

—केसरी, ता. ३ जुलै, १९३६.



# ऑस्ट्रियन साम्राज्याचा वारसा

महायुद्धापूर्वी मध्ययुरोपाचा बहुतेक भाग जर्मनी व ऑस्ट्रिया या दोन देशांच्या साम्राज्यांनी व्यापिला होता. या दोन देशांच्या साम्राज्यांची एकजूट साऱ्या जगाशीं टक्कर देण्याला समर्थ आहे, असा अनुभव महायुद्धांत आल्यामुळे तहाच्या वेळीं दोस्त राष्ट्रांनी जर्मन साम्राज्याचे अनेक भाग स्वतःच्या साम्राज्याला जोडून घेतले, पण निदान मूळच्या जर्मनी देशाला तरी फारसा धक्का लावला नाहीं. याच्या उलट ऑस्ट्रियन साम्राज्याची अवस्था झाली आहे. दोस्त-राष्ट्रांनी ऑस्ट्रियन साम्राज्याचे कांही भाग पोलंड, युगोस्लाव्हिया, रुमानिया व इटाली या देशांना जोडून टाकून उरलेल्या भागाचींहि तीन शकले करून त्यांची तीन अगदी स्वतंत्र राष्ट्रें बनविलेली आहेत. अर्थातच आर्थिक व लष्करी दृष्ट्या ही तीनहि राष्ट्रें अतिशय दुर्बल असल्याने ती स्वतःच्या पायावर उभीं राहण्याला असमर्थ आहेत. या तीन राष्ट्रांपैकी हंगारी व ऑस्ट्रिया ही दोन राष्ट्रें इतके दिवस इटालीचे तंत्राने चालत असत; झेकोस्लोव्हाकिया फ्रान्सच्या तंत्राने वागत असे. पण अलीकडे झेको-स्लोव्हाकिया हा देश रशियाचा हस्तक बनला आहे व ता. ११ जुलैपासून ऑस्ट्रि-यावर जर्मनीचें अधिराज्य प्रस्थापित झाले आहे. माजी ऑस्ट्रियन साम्राज्याचे सर्वच विभाग आपल्या वर्चस्वाखाली यावेत, यासाठी जर्मनीतील मुत्सद्द्यांचे सध्या निकराचे प्रयत्न चालू आहेत व त्यामुळे हा ऑस्ट्रियन साम्राज्याच्या वारसाचा प्रश्न उद्‌भवला आहे.

## इंग्लिशांची कारवाई

हा प्रश्न सोडविण्याचा एक प्रयत्न इंग्लंडने गेल्या एप्रिल महिन्यांत करून पाहिला. तेव्हा जर्मनीने नुकताच लोकार्नोचा करार मोडला असल्याने इंग्लंडचे मुत्सद्दी जर्मनीवर रुष्ट झाले होते. अशा वेळीं लोकार्नोचा करार घडवून आणण्यांत ज्यांनी बराच प्रमुख भाग घेतला होता असे इंग्लंडचे परराष्ट्रमंत्री सर ऑस्टेन चेंबरलेन यांनी ऑस्ट्रिया, हंगारी व झेकोस्लोव्हाकिया या तीनहि देशांच्या राज-

धान्यांना भेट दिली व प्रत्येक देशाच्या मुत्सद्दी मंडळीबरोबर वरील प्रश्नाची चर्चा केली. या चर्चेत सर ऑस्टेन चेंबरलेन यांनी ऑस्ट्रिया, हंगारी व झेकोस्लोव्हाकिया या देशांच्या नेत्यांना असे सुचविले कीं, ऑस्ट्रियन राजघराण्याचा वारस प्रिन्स ओटो याला ऑस्ट्रियाच्या गादीवर बसवावे व प्रिन्स ओटोने बुडापेस्ट व प्राग या दोन्ही शहरीं पुनः राज्याभिषेक करून घेऊन ऑस्ट्रियन साम्राज्याचीं तीनहि शकले एका राज्यछत्राखालीं आणावींत आणि इंग्लंडचा राजा ज्याप्रमाणे अनेक स्वयंशासित राष्ट्रांवर सर्वांचे हितसंबंध सारखेच संभाळून राज्य करतो, त्याप्रमाणे या तीनहि राष्ट्रांवर राज्य करावे. ही याजना ऑस्ट्रिया व हंगारी या दोन्ही देशांतील पुढाऱ्यांना मान्य होती, व या योजनेला इंग्लंड व फ्रान्स याचे पाठबळ मिळाल्यास ती झेकोस्लोव्हाकियाच्या पुढाऱ्यांना देखील आज नाही उद्या मान्य होईल, असे त्यांना वाटत होतें. पण हंगारीचे माजी परराष्ट्रमंत्री मो. ग्राट्झ हे असे सांगतात की, या कारस्थानांची कुणकूण जर्मनीच्या कानांवर येताच जर्मनीने इंग्लंडला अशी तंबी दिली की, प्रिन्स ओटोला ऑस्ट्रियांत परत आणण्याची कारस्थाने सुरू झाल्यास जर्मन सैन्य ताबडतोब व्हिएन्नावर चालून जाईल. या धमकीप्रमाणें एप्रिल महिन्याच्या उत्तरार्धांत ऑस्ट्रियाच्या सरहद्दीवर जर्मन सैन्याच्या हालचालीहि सुरू झाल्या व ऱ्हाईनलॅडप्रमाणेच आता व्हिएन्नांत देखील जर्मन सैन्य घुसते की काय अशी धास्ती सर्वांना वाटू लागली. एप्रिलच्या २६ तारखेला ऑस्ट्रियाच्या मुख्य प्रधानांनी एका जाहीर भाषणांत सांगितले

'A new attack is apparently being planned against the country, the aim of which is to rob Austria of her freedom.'

इतक्या थराला या गोष्टी आलेल्या पाहून चेंबरलेनसाहेब आपली कारस्थानें थांबवून लंडनला निघून गेले व जर्मन सैन्याच्या ऑस्ट्रियाच्या सरहद्दीवरील हालचालीहि थांबल्या. सर ऑस्टेन लंडनला निघून गेल्यावर सुप्रसिद्ध फ्रेंच बातमीदार मोरिस पेर्नो याने ऑस्ट्रियाचे चॅन्सेलर डॉ. शुश्निग यांची मुलाखत घेऊन त्यांना प्रश्न विचारला 'जर्मनीपासून ऑस्ट्रियाचें संरक्षण करण्याच्या बाबतींत इंग्लंडचे साहाय्य मिळण्याचा कितपत संभव आहे ?' तेव्हा ऑस्ट्रियाच्या चॅन्सेलरांनी उत्तर दिलें 'तूर्त तरी इंग्लंड मध्ययुरोपांतील राज-

कारणांत हात घालील असे मला वाटत नाही.' या उत्तरांतील 'तूर्त तरी' या शब्दांतील खोच वाचकांच्या लक्षांत येईलच. एप्रिल २९ रोजी व्हिएन्नांत सरकारी रीत्या पुढील बातमी प्रसिद्ध झाली

"It was stated officially that situation on the German frontier was fully 'normal.' Reports of movements of troops other than the seasonal changes of movements to the mountains for training and vice versa, were categorically denied. Sir Austen Chamberlain left Vienna for London."

## जर्मनीशीं समेट

सर ऑस्टेन चेंबरलेन यांच्या कारस्थानांचा लज्जास्पद अंत झालेला पाहून डॉ. शूश्निग यांनी कसेहि करून जर्मनीशी समेट करण्याचा संकल्प केला व या समेटाची पूर्वतयारी म्हणून जर्मनीशी समेट करण्याला प्रतिकूल असलेल्या तिघां प्रधानांना त्यांनी आपल्या मंत्रिमंडळांतून काढून टाकले. या काढून टाकलेल्या प्रधानांपैकी प्रिन्स स्टारेबेर्ग व बॅरन फॉन बेर्गेर-व्हाल्डेनेग हे दोघे मंत्री राजपक्षीय असल्याने जर्मनीच्या विरुद्ध होते व तिसरा प्रधान हेर डोब्रेट्झबेर्गेर हा सोशालिस्टांशी तडजोड करावी अशा मताचा असल्याने जर्मनीच्या विरुद्ध होता. याप्रमाणे आपल्या प्रधानमंडळांतील विरोधाचे डॉ. शूश्निग यांनी निराकरण केलें तरी त्यांना जर्मनीशी समेट करण्यापूर्वी इटालीची संमति मिळविणें अवश्य होते. कारण जर्मनीने आपल्या समेटाच्या अटी १९३५ च्या सप्टेंबर महिन्यांत हेर फॉन पापेन यांच्या मार्फत कळविल्या होत्या, तेव्हा फ्रान्सचे मुख्य मंत्री मो. लाव्हाल यांच्या आधारावर अवलंबून इटालीने ऑस्ट्रियाला त्या अटी अमान्य करण्याचा सल्ला दिला होता. यासाठी डॉ. शूश्निग हे ता. १ जून रोजी रोमला गेले. यावेळीं फ्रान्समध्ये सोशालिस्टांचें मंत्रिमंडळ अस्तित्वांत आलें होतें व कम्यूनिस्टांचे संप सुरू झाले होते. हे दोन्ही पक्ष इटालीच्या विरुद्ध असल्याने इटालीलाहि जर्मनीशी सख्य करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली होती. यामुळे डॉ. शूश्निग यांना इटालीच्या सर्वाधिकाऱ्यांची संमति लगेच मिळाली व त्यांनी जर्मनीचे व्हिएन्ना येथील वकील हेर फॉन पापेन यांच्याबरोबर तडजोडीची बोलणी सुरू केली. या समेटाच्या बोलण्यांत डॉ. शूश्निग यांनी असा

आग्रह धरला की, जर्मनीने ऑस्ट्रियाचे पूर्ण स्वातंत्र्य मान्य करावे, पण जर्मनीचे वकील कांही केल्या या अटीला संमति देईनात. सरते शेवटी तहाच्या अटीत Independence या शब्दाच्या ऐवजी Full sovereignty हे शब्द घालण्याला हेर फॉन पापेन यांनी मोठ्या कष्टाने संमति दिली व मग परस्परांनी परस्परांना कोणकोणत्या सवलती द्यावयाच्या याच्या वाटाघाटी सुरू झाल्या. या वाटाघाटी चालू असतां ब्रिटिश आणि फ्रेंच परराष्ट्रमंत्र्यांनी डॉ. शूश्निग यांना जिनीव्हा येथे आपल्या भेटीला येण्याची विनंति केली. पण ऑस्ट्रियाच्या चॅन्सेलरांना या दोनहि राष्ट्राच्या दुबळेपणाचा पूर्ण प्रत्यय येऊन चुकल्यामुळे त्यांनी जिनिव्हाला जाण्याचे साफ नाकारले. या बाबतीत डॉ. शूश्निग यांनी प्रसिद्ध केलेले सरकारी पत्रक मोठे नमुनेदार आहे. ते असे—

'An official statement, regarding the suggestion that the Chancellor should go to Geneva, explained that his commitments of work prevented this but that he would take the opportunity of the next League meeting to establish personal contact with Mr. Eden and M. Delbos !''

अशा रीतीने फ्रेंच आणि ब्रिटिश परराष्ट्रमंत्र्यांना झिडकारून टाकून डॉ. शूश्निग यांनी ११-७-१९३६ रोजी ऑस्ट्रो-जर्मन करारावर सही केली. या करारावर सह्या होतांच ऑस्ट्रियन सरकाराने एक नवे फर्मान काढून देशांतील वर्तमानपत्रांचे उरलेसुरले स्वातंत्र्य काढून घेतले आणि लष्करांतून व दिवाणी खात्यांतून हिटलेरविरोधी अधिकाऱ्यांना काढून टाकण्याला सुरुवात केली; होर्स्टेनाउ व श्मिट या दोन जर्मनीच्या विश्वासांतील प्रधानांची नेमणूक केली. त्यानंतर ऑस्ट्रियन आणि जर्मन वरिष्ठ अधिकाऱ्यांची एक कमिटी दोन्ही देशांची राज्यपद्धति एकसारखी करण्यासाठी नेमली गेली. या कमिटीचे काम पुरे झाल्यावर ऑस्ट्रिया आणि जर्मनी यांच्यांत नांवाखेरीज कसलाहि भेद राहणार नाही.

## जर्मनीचें आर्थिक वर्चस्व

ऑस्ट्रियाप्रमाणेंच माजी ऑस्ट्रियन साम्राज्याच्या इतर अनेक भागांवर आपलें आर्थिक व लष्करी वर्चस्व स्थापण्याचा जर्मनीचा प्रयत्न चालू आहे. माजी

ऑस्ट्रियन साम्राज्याचे अनेक भाग सध्या हंगारी, युगोस्लाव्हिया व रुमानिया या देशांच्या हातांत आहेत. या सर्व देशांचा मुख्य धंदा शेतकी हा असून त्यांच्या निर्यात मालापैकी सुमारे पंचवीस टक्के माल सध्या जर्मनीत खपत असतो. पण इतक्या मालाची किंमत द्यावयाला जर्मनीजवळ सोने नसल्याने जर्मनीला या तीन राष्ट्रांचें मिळून सध्या साडेदहा कोटि मार्कांचे देणे झालें आहे. या कर्जाच्या फेडीची वाटाघाट करण्यासाठी जर्मनीचे प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ डॉ. शाख्ट हे कांही दिवसांपूर्वी बुडापेस्ट, बेलग्राड वगैरे ठिकाणी गेले होते. तेव्हा त्यांनी हंगारी, युगोस्लाव्हिया वगैरे देशांच्या सरकारांना असे सांगितलें की, हुंडणावळींचे दर प्रतिकूल असल्यामुळे इतर कोणताहि जर्मन माल घेणे तुम्हांला परवडत नसल्यास तुम्ही तुमची सर्व शस्त्रसामुग्री जर्मनीकडून घ्या, ती आम्ही सवलतीच्या दराने देऊं, म्हणजे तुमचेंहि भांडवल गुंतून पडणार नाही व आमच्याहि कारखान्यांना भरपूर काम मिळेल, अशा रीतीने तुमचे पैसे फेडून घेण्याचे तुम्ही नाकारल्यास आम्हाला पूर्वीप्रमाणे जर्मन मार्कांची किंमत उतरवावी लागेल व मग तुमचेंच नुकसान होईल. सध्याच्या परिस्थितीत वरील राष्ट्रांना डॉ. शाख्ट यांचे म्हणणे ऐकण्याखेरीज गत्यंतर नसल्याने त्यांना आर्थिक व लष्करी बाबतीत सर्वस्वी जर्मनीवर अवलंबून राहण्याची पाळी आली आहे.

## युगोस्लाव्हियाची समजूत

वर उल्लेखिलेल्या राष्ट्रांपैकी युगोस्लाव्हियाचे इटालीशी आधीच अहिनकुलवत् शत्रुत्व आहे आणि इटालीने अॅबिसीनिया देश जिंकल्यावेळेपासून तर युगोस्लाव्हि-याला जर्मनीशी सख्य करण्याखेरीज आपल्या सुरक्षिततेचा उपाय दिसेनासा झाला आहे. यामुळे तो देश आज राजकीयदृष्ट्याहि जर्मनीच्या कक्षेत आल्यासारखाच आहे. इटालीप्रमाणेंच हंगारीशीहि युगोस्लाव्हियाचे एक मुत्सद्दी मो. स्तोयादिनोव्हिच यांनी हंगारीचे सध्यांचे परराष्ट्रमंत्री मो. दा कान्या यांची मुलाखत घेऊन समेट करण्याचा यशस्वी प्रयत्न केला; त्यामुळे युगोस्लाव्हियाच्या समान-शत्रुत्वामुळे हंगारी व इटाली यांचे जे जूग जमले होते ते सध्या फुटलें आहे. याचा फायदा घेण्यासाठी पोलंडचे तेव्हांचे मुख्य प्रधान मो. कोशियाल्कोव्स्की यांनी स्वतः बुडापेस्ट येथे येऊन हंगारीला जर्मनी व पोलंड यांच्या गटांत ओढण्याचा प्रयत्न केला व 'पेस्टेर लॉईड' या मो. दा कान्या यांच्या मुखपत्रा-वरून असे समजते की, तो प्रयत्न बराच सफळ झाला आहे.

—केसरी, ता. ४ सप्टेंबर, १९३६.

---

# युरोपांतील राजकारण

२५ ऑगस्ट रोजी जर्मनीने एक नवा कायदा करून स्वदेशांतील सक्तीच्या लष्करी नोकरीची मुदत दोन वर्षें ठरविली आहे. जर्मनीच्या या नव्या योजनेमुळे १९३७ च्या पावसाळ्यांत जर्मनीचें खडे सैन्य १२ लक्षांवर जाईल असा अंदाज आहे. जर्मन सैन्यांत सुमारें ३ लक्ष धंदेवाईक सैनिक आहेत. त्याशिवाय १९३५ साली हिटलेरने तह मोडून सक्तीच्या लष्करी नोकरीचा कायदा जर्मनीला लागू केला तेव्हा बाविसावे वर्ष लागलेल्या पांच लक्ष तरुणांची जर्मन सैन्यांत नवी भर पडली. १९१५सालीं जर्मनीची जननसंख्या घटल्यामुळे येत्या ऑक्टोबर महिन्यांत जर्मन सैन्यामध्ये केवळ चार लक्ष तरुणांचीच भर पडणार आहे. या नव्या रिकुटांचे शिक्षण १९३७ च्या पावसाळ्यापर्यंत पूर्ण होऊन ते खदे लढवय्ये होतील आणि त्यावेळी जर्मनीच्या लष्करी सामर्थ्याची पराकाष्ठा होईल. पुढे १९१६ व १९१७ या दोन्ही सालांतील जर्मनीची जननसंख्या अतिशय कमी असल्याने १९३७ च्या ऑक्टोबरमध्ये खड्या जर्मन सैन्याची संख्या १० लक्ष होईल व १९३८ च्या ऑक्टोबरमध्ये तर ती नऊ लक्षांपर्यंत उतरेल. याखाली मात्र ती पुढे उतरणार नाही. त्यामुळे जर्मनीला आपण होऊन रशियाशीं युद्ध सुरू करावयाचे असल्यास ते १९३७ च्या पावसाळ्यांत सुरू करणे फायदेशीर होईलसे दिसते.

रशियाबरोबर लढावयाला जर्मनी एका पायावर तयार असला तरी रशिया व फ्रान्स या उभयतांबरोबर एकाच वेळी टक्कर घेण्याची त्याची तयारी नाही. यामुळे भावी रूसोजर्मन युद्धामध्ये फ्रान्सला कसेहि करून तटस्थ राहणें भाग पाडावें, या दृष्टीने जर्मनीचे डावपेच चालू आहेत. फ्रान्सच्या पिछाडीवर त्याला एक कायमचा शत्रु उत्पन्न करून ठेवावा या हेतूनेच जर्मनी स्पेनच्या बंडवाल्यांना मदत करीत आहे. स्पेनमधील बंडाळीत बंडवाल्यांचा जय झाल्यास फ्रान्सच्या सरहद्दीवर तीन बाजूंनी तीन महत्त्वाकांक्षी शत्रूंचें भय उत्पन्न होईल व लोकसंख्येची वाढ न होणाऱ्या त्या राष्ट्राची अवस्था अत्यंत अनुकंपनीय होईल. फ्रान्सचें हे भवितव्य

आज इंग्लंडलाहि स्पष्ट दिसत आहे व त्यासाठी लॉइड जॉर्जसारखे इंग्लंडचे माजी मुख्य प्रधान व सर रॉबर्ट वान्सिटार्टसारखे आज परराष्ट्रखात्याचे कायमचे डायरेक्टर असलेले मुत्सद्दी जर्मनीशी सख्यसंबंध जोडण्यासाठी बर्लिनच्या वाऱ्या करीत आहेत.

## फ्रान्समधील कम्यूनिस्ट

फ्रान्सला तटस्थ रहावयाला लावणें हे जर्मनीचे उद्दिष्ट फ्रेंच कम्यूनिस्टांच्याकडून परस्परच साध्य होईल, असे त्यांच्या सध्याच्या वर्तनावरून दिसत आहे. सध्याचे फ्रेंच सरकार अस्तित्वांत आल्यापासून कम्यूनिस्टांच्या उपद्रवामुळे एकीकडे फ्रेंच तिजोरींचें दिवाळे वाजण्याची पाळी आली आहे, तर दुसरीकडे सर्व देशभर अराजकता माजण्याची लक्षणे दिसत आहेत. १९३५ च्या सप्टेंबर महिन्यांत बॅंक ऑफ फ्रान्समध्ये ७१ अब्ज फ्रॅंकांचे सोने शिल्लक होते. ती शिल्लक आता अवघ्या ५३ अब्जांवर आली आहे. १९३५ सालीं रेल्वेच्या बजेटांत चार अब्ज फ्रॅंकांची तूट आली होती, ती यंदा सहा अब्जांवर जाण्याची लक्षणे दिसत आहेत. १९३५ च्या पहिल्या सात महिन्यांत फ्रान्सने नऊ अब्ज फ्रॅंकांचा माल परदेशी पाठविला होता. तो आंकडाहि यंदा आठ अब्जांवर आला आहे. १९३६ च्या पहिल्या सात महिन्यांतच निर्यात मालापेक्षा आयात मालाची किंमत साडेपांच अब्जांनी अधिक झाली आहे. सरकारी करवसुलीचीहि हीच रड आहे व खर्च मात्र सारखा वाढत चालला आहे. या साऱ्या संकटांवर उपाय म्हणून सध्याच्या फ्रेंच सरकाराने देशाच्या आर्थिक परिस्थितिविषयी अविश्वास उत्पन्न होईल, असली माहिती प्रसिद्ध करणाऱ्यांना दोन वर्षे कैद व दहा हजार फ्रॅंक दंड अशी शिक्षा करण्याचा कायदा पास करून घेतला आहे. या एकाच गोष्टीने फ्रान्सची अंतःस्थिति सध्या किती अवघड झाली आहे याची वाचकांना यथार्थ कल्पना येईल. फ्रेंच रॅडिकल पक्षाचे एक पुढारी व फ्रान्सचे माजी फडणीस मो. काइयो यांनी फ्रेंच सेनेटच्या कमिटीत नुकतेच असे उद्गार काढले होते "Let the country know that very soon we shall have to face a formidable financial situation." या सर्व गोष्टींचा निःपक्षपाती दृष्टीने विचार केला असतां फ्रान्स लौकरच आपलें आंतरराष्ट्रीय राजकारणांतील स्थान घालवून बसणार आहे असें वाटल्यावांचून रहात नाही.

कित्येकांची अशी एक समजूत आहे कीं जर्मनीविरुद्ध इंग्लंड रशियाला मदत करील; पण हा त्यांचा केवळ भ्रम आहे. इंग्लंडच्या मनांत जर जर्मनीबरोबर लढावयाचेंच असतें तर यंदाच मार्च महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत युद्ध पुकारण्याला उत्तम निमित्त सापडलें होतें. गेल्या फेब्रुवारी महिन्याच्या अखेरीला जपानी लष्करी अधिकाऱ्यांनी एकाएकी मुलकी सत्तेविरुद्ध बंड पुकारलें व त्या बंडानंतर जपानच्या मंत्रिमंडळांत लष्करी अधिकाऱ्यांचे अधिकच वर्चस्व झालें. त्याबरोबर जपानचें व रशियाचें आता लौकरच युद्ध जुंपण्याचा संभव असल्यामुळे त्यांत भाग घेण्याला आपले हात मोकळे असावेत, म्हणून मार्च ७ रोजी जर्मनीने मोठ्या तांतडीने ऱ्हाईन नदीतीरावरील निःशस्त्र केलेल्या प्रदेशांत आपलें सैन्य आणून उभे केले पण जर्मनीला भावी रूसोजपानी युद्धांत भाग घेतां यावा, या हेतूने चाललेल्या जर्मनीच्या हालचालींना सशस्त्र विरोध करण्याची कल्पनासुद्धा तेव्हा इंग्लंडच्या मनाला शिवली नाही. या एकाच उदाहरणावरून इंग्लंडचा कल कोणाकडे आहे, हे स्पष्ट कळून येतें. परवाच्या लॉईड जॉर्जसाहेबांच्या मुलाखतीवरून ही गोष्ट अधिकच उघड झाली आहे.

लॉईड जॉर्जसाहेबांच्या मुलाखतीत असा एक उल्लेख आला आहे कीं रशियाचा आपल्यावर अकस्मात् हल्ला होईल अशी जर्मनीला भीति वाटत आहे. तेव्हा या बाबतींत जर्मनीला कोणीकडून विशेष भीति वाटत आहे, याविषयी थोडासा खुलासा केला पाहिजे. गेल्या मार्च महिन्यांत रशियाचा व झेकोस्लोव्हाकियाचा परस्परांना मदत करण्यासंबंधीं तह झाला. तेव्हापासून रशियन विमानांना बर्लिनवर हल्ला करण्याला सोयीस्कर होतील, असे तीसचाळीस वैमानिक तळ बांधण्याचें काम झेकोस्लोव्हाकियांत सुरू झाले आहे. पारिसच्या 'पति पारिसियां' या पत्रांत प्रथम या प्रकरणाचा उल्लेख आला होता आणि गेल्या जुलै महिन्याच्या १५ तारखेला रशियाच्या एयरमार्शलनी आपल्या साऱ्या मदतगारांसह झेकोस्लोव्हाकियाला भेट दिली, त्यामुळे त्या बातमीला दुजोरा मिळाला आहे. या प्रसंगीं रशियांतील पाहुण्यांचें 'Representatives of an army with which the Czechoslovak army is united by a brief, but nevertheless for that reason all the more cordial co-operation' अशा शब्दांनी झेकोस्लोव्हाकियाच्या सरकारने स्वागत केले, ही गोष्टहि लक्षात ठेवण्याजोगी आहे. रशियन

सैन्याला रुमानियाच्या मार्गाने झेकोस्लोव्हाकियाकडे येणे सुकर व्हावें, याकरिता रेल्वे बांधण्याच कामहि झेकोस्लोव्हाकिया व रुमानिया या दोन्ही देशांतून सुरू झाले आहे. या रेल्वेसाठी व एकदरीने युद्धाची तयारी करण्यासाठी झेकोस्लोव्हाकियाने एक भलीमोठी रक्कम रुमानियाला कर्जाऊहि दिली आहे.

## आजचे मित्र, उद्याचे शत्रु

या ठिकाणी आणखी एका महत्त्वाच्या बाबीचा उल्लेख केला पाहिजे. ती बाबत ही की फ्रान्सचे बहुतेक मित्र हे फ्रान्सकडून मिळणाऱ्या कर्जासाठीच त्याचे मित्र झाले आहेत; त्यामुळे आणीबाणीच्या प्रसंगी त्यांचा फ्रान्सला कितपत उपयोग होईल, याची शंकाच आहे. उदाहरणार्थ, यंदा सप्टेंबरमध्ये पोलंडच्या नव्या सर्वाधिकाऱ्यांनी फ्रान्सबरोबर नवा तह केला व फ्रान्सकडून भले मोठे कर्ज काढलें. आधींच असली कर्जें फिटण्याची आशा थोडी असते. त्यांतून फ्रान्सला आपल्या ऋणकोबरोबर सलोख्याने वागण्याची इंग्रजी विद्या अवगत झालेली नाही, यामुळे कर्जफेडीचे तगादे सुरू झाले कीं फ्रान्सचे आजचे मित्र त्याच्या शत्रूशी सख्य करण्याला उत्सुक होतात. अशा रीतीने फ्रान्सचे राजकीय व आर्थिक अशा दोनहि दृष्टींनी नुकसान होते. असले नुकसान जर्मनीने आजपर्यंत कधींच करून घेतले नाही. स्वतःच्या लढाया लढण्यासाठी परराष्ट्रांना कर्जें देण्याच्या ऐवजीं स्वतःच्या युद्धसिद्धतेसाठी मात्र जर्मनीने पाण्यासारखा पैसा खर्चला आहे. १९३३ पासूनच्या तीन वर्षांत जर्मनीने लष्करी सामर्थ्याच्या वाढीसाठी सुमारे बारा अब्ज मार्कांचा खर्च केला आहे व यंदाचाच आंकडा सहा अब्ज मार्कांवर जाईल असा अंदाज आहे. इतका अवाढव्य खर्च करूनसुद्धा जर्मन सरकाराला व्याजासाठी आपल्या वार्षिक उत्पन्नामधून शेंकडा आठ टक्केच कायते खर्चावे लागतात. याच्या उलट फ्रान्सला आपल्या उत्पन्नापैकी जवळ जवळ २५ टक्के उत्पन्न व्याजासाठी खर्चावे लागत. तूर्त तरी एकट्या रशियाचाच लष्करी खर्च कायतो जर्मनीच्या लष्करी खर्चाहून अधिक आहे.

—केसरी, ता. २ ऑक्टोबर, १९३६.

# रशियावरील स्वारीची योजना

न्युरेंबेर्ग येथील नाझी पक्षाच्या परिषदेपासून आज नाही उद्या जर्मनी रशियावर हल्ला करणार ही गोष्ट निश्चित झाली आहे. या स्वारीची राजकीय पूर्वसिद्धता बहुतांशी संपत आली आहे. गेल्या महिन्यांत बेल्जमने भावी महायुद्धांत आपण तटस्थ राहणार, असे प्रसिद्ध केल्यामुळे रशियाचा सर्वांत प्रबळ मित्र जो फ्रान्स त्याची एकाएकी पक्षघात झाल्यासारखी अवस्था झाली आहे. त्याशिवाय जर्मनी व इटाली यांचा नवा तह, स्पेनमधील बंडवाल्यांचा विजय, सध्याच्या ब्रिटिश सरकाराचा जर्मनीकडे असलेला कल, स्वतः फ्रान्समधील आर्थिक घोटाळे इत्यादि गोष्टींच्या समुच्चयामुळे फ्रान्सला देखील रशियाच्या साहाय्याला जाणे अशक्य होईल असा रंग दिसत आहे. बेल्जमने आपली तटस्थ वृत्ति जाहीर करताच रुमानियाचे मुख्य प्रधान मोठ्या तातडीने बेलग्राड येथे गेले व तेथे युगोस्लाव्हियाच्या मुख्य प्रधानाशी व परराष्ट्रमंत्र्यांशी त्यांच्या गुप्त वाटाघाटी झाल्या. या गुप्त कारस्थानाची त्रित्तंबातमी अजून बाहेर पडली नाही. पण अमेरिकेच्या ' न्यू रिपब्लिक ' या पत्रावरून कळते—

"Rumania which has been friendly to the Soviet union and recently announced the building of a strategic railway to connect Russia with Czecho-Slovakia so as to avoid the necessity of contact between these two states through an anti-Soviet Poland has suddenly turned in the fascist direction."

याप्रमाणे रुमानिया जर जर्मनीला वश झाला असला तर झेकोस्लोव्हाकियालादेखील रशियाची संगत सोडून निरुपायाने जर्मनीशी समेट करणे भाग पडेल. कारण झेकोस्लोव्हाकियाच्या सरहद्दीवर सध्या त्याला एकमुद्धा मित्र नाही. उलट पक्षी पोलंडशी व आपल्या नित्या शेजाऱ्याशी त्याचे हाडवैर आहे. शिवाय त्याच्या दीड कोटी लोकसंख्येत सुमारे ३५ लक्ष जर्मन आहेत. हंगेरिअन, पोल वगैरे

इतर शत्रुजातियांची संख्या वेगळीच. सध्या हंगारी व जर्मनी या उभयतांत देखील फार महत्त्वाची कारस्थानें चाललीं आहेत. हंगारीचे रीजंट अॅडमिरल हॉर्टी हे परदेशी न जाण्याचा आपला नेहमीचा शिरस्ता सोडून हेर हिटलेर व डॉ. शूश्निग या दोघा डिक्टेटरांना भेटून आले व त्यानंतर जर्मनीचे परराष्ट्रमंत्री बॅरन फॉन नायराट हेहि बुडापेस्ट येथे गेले होते.

## लेनिनग्राडचा रस्ता

अशा रीतीने रशियावरील स्वारीची जर्मनीची योजना राजकीय दृष्ट्या परिपूर्ण होत आली असल्याने आता या प्रश्नाचा लष्करी दृष्ट्या विचार करणें अत्यंत आवश्यक झाले आहे. या प्रश्नाचा विचार करतांना ही गोष्ट प्रथम लक्षांत घेतली पाहिजे की, बोल्शेव्हिक राज्यक्रांतीमुळे लिथुआनिया, लाट्व्हिया, फिन्लंड, एस्थोनिया हे प्रदेश रशियाचे हातून गेल्यामुळे जर्मनीला रशियाच्या मर्मस्थानांवर हल्ला करणें गेल्या महायुद्धाच्या मानाने आता फारच सोपे झाले आहे. गेल्या महा-युद्धांत साडेतीन वर्षांच्या लढाईनंतर ब्रेस्टलिटॉव्हिस्कच्या तहाच्या वेळीसुद्धा जर्मन सैन्य रशियाची तेव्हाची राजधानी जी पेट्रोग्राड, तेथपर्यंत पोचलें नव्हते. पण आता पेट्रोग्राड ( लेनिनग्राड ) जवळचा फिन्लंड देश जर्मनीला मिळण्याचा संभव असल्याने भावी रूसो-जर्मन युद्धाच्या पहिल्या आठवड्यांतच जर्मन सैन्याचा लेनिनग्राडवर हल्ला होण्याचा संभव आहे. फिन्लंडच्या सरहद्दी-पासून लेनिनग्राड हे अवघे बावीस मैलांवर आहे. बाल्टिक समुद्रावरील क्रोन्स्टाड येथील रशियाच्या आरमारी तळाचा विध्वंस करतां आल्यास लेनिनग्राड शहर आरमारी हल्ल्यानेसुद्धा घेणे जर्मनीला शक्य आहे. खुद्द जर्मन सरहद्दी-पासून लेनिनग्राडचें अंतर सुमारें ४५० मैल आहे. पण वाटेंतील लिथु-आनिया, लाट्व्हिया आणि एस्थोनिया ही तीनहि नवीं राष्ट्रे अत्यंत दुर्बळ आहेत. या तीनहि राष्ट्रांचें एकत्रित सैन्य सरासरी नऊ डिव्हिजन्स भरेल. शिवाय हीं तीनहि राष्ट्रें बाल्टिक समुद्राच्या किनाऱ्यावर असल्याने जर्मन आरमाराला यांना एका दिवसांत शरण यावयाला लावता येईल. हीं राष्ट्रें जर्मनीला शरण आल्यास जर्मनीच्या यंत्रचालित व यांत्रिक डिव्हिजन्स दोन दिवसांतच लेनि-नग्राडच्या शेजारीं येऊन पोचतील. या बाल्टिक समुद्रतीरावरील राष्ट्रांतून जर्मन

लोकांची आज चारपांचशे वर्षांपासूनची वस्ती आहे व त्यांचे त्या मुलखांतून वजनहि चांगले आहे. शिवाय १९१८ साली व १९१९ च्या आरंभी जनरल हॉफमान व जनरल काउंट फॉन डेर गोल्टझ यांची सैन्ये या प्रदेशांत सचार करीत असल्यामुळे जर्मनीच्या जनरलस्टाफला या भागाची संपूर्ण माहिती आहे. या सर्व गोष्टींचा विचार केला असता भावी रूसो-जर्मन युद्धाच्या प्रारंभी लेनिनग्राड व त्यासभोवतालचा प्रांत जर्मनांच्या हाती पडणे अशक्य नाही, हे वाचकांना कळून येईल.

## लेनिनग्राडवरच रोख का ?

आता जर्मनानी लेनिनग्राड जिंकल्यास त्याचे राजकीय परिणाम काय होतील, याचा विचार केला पाहिजे. लेनिनग्राड ही बोल्शेव्हिक राज्यक्रांतीची तर जन्मभूमि आहेच शिवाय पीटर दी ग्रेट याच्या वेळेपासून सुमारे २२५ वर्षें ती रशियाची राजधानी असल्यामुळे रशियाच्या आशा व आकांक्षा यांचे ते केंद्रस्थान बनलें आहे. पुन्हा लेनिनग्राड हे रशियाचे सर्वांत मोठे व्यापारी बंदर आहे, यामुळे लेनिनग्राड हातचे गेल्यास रशियाला राजकीय, आर्थिक व नैतिक दृष्टीने मोठाच धक्का बसणार आहे. लेनिनग्राड काबीज केल्याबरोबर रशियाच्या त्या जुन्या राजधानीत फॅसिस्ट सरकाराची जर्मनी प्राणप्रतिष्ठा करणार हे निश्चित आहे. फॅसिस्ट सरकाराची स्थापना होताच सोव्हिएट सरकारच्या विघटनेला सुरुवात होईल. सर्व रशियामध्ये क्रांतिविरोधी पक्षाच्या हालचालीना जोर चढेल व मॉस्कोवर चाल करून जाण्याचें जर्मन सैन्याचे कार्य सुकर होईल, असा जर्मनीचा अंदाज आहे.

## युक्रेनवर हल्ला करण्याला अडचण

लेनिनग्राडवरील हल्ला हा जर्मनीच्या रशियावरील स्वारीच्या योजनेचा एक भाग झाला. याच योजनेचा दुसरा भाग युक्रेन, क्रिमिया व ट्रान्सकॉकेशिया या प्रांतांवरील हल्ला. हा हल्ला एका दृष्टीने सोपा आहे, पण दुसऱ्या एका दृष्टीने अवघडहि आहे. युक्रेन प्रांताची प्रजा ही बोल्शेव्हिकांच्याविरुद्ध असल्याने सोव्हिएट सरकारच्याविरुद्ध बंड करण्याला व त्यांच्या शत्रूंना साहाय्य करण्यालाहि तत्पर आहे. पण या प्रदेशावर हल्ला करणाऱ्या सैन्यांत जर्मन सैन्य अल्पसंख्याक असल्यामुळे

लष्करी दृष्ट्या हा हल्ला कमजोर होईल कीं, काय अशी शंका वाटते. कारण दक्षिण रशियावरील स्वारीचा भार मुख्यतः ऑस्ट्रिया, हंगारी, रुमानिया, पोलंड व झेकोस्लोव्हाकिया या राष्ट्रांच्या सैन्यावर पडावयाचा. गेल्या महायुद्धांत दक्षिण रशियावर हल्ला करणाऱ्या ऑस्ट्रिया-हंगारीच्या संयुक्त सैन्याने झारच्या सैन्याकडून अनेकदा मार खाल्ला होता. झारच्या सैन्याच्या मानाने सोव्हिएट रशियाचे सैन्य अनेक पटींनी अधिक सुसज्जित आहे या भागात रशियाला जय मिळण्याची आशा अधिक आहे; शिवाय युद्धसमाप्तीपासून ऑस्ट्रिया व हंगारी या देशांची सैन्ये अतिशयच दुर्बळ झाली आहेत. यामुळे झेकोस्लोव्हाकिया, रुमानिया व पोलंड या तीनहि राष्ट्रांनी मनःपूर्वक या स्वारीत भाग घेतल्याखेरीज जर्मनीला या विभागांत जय मिळण्याचा संभव नाही.

जर्मनी व रशिया यांचे युद्ध जुंपल्यास वरील राष्ट्रे कशीं वागतील, यांचा अंदाज माकियाव्हेलीच्या एका सूत्रावरून करतां येण्याजोगा आहे आपल्या राजकीय कक्षेतील राष्ट्रामध्ये युद्ध जुंपल्यास प्रत्येक राष्ट्राने त्यांत भाग घ्यावा, असे माकियाव्हेलीच सांगणे आहे. माकियाव्हेलीच्या वास्तववादी राजकारणाला झेकोस्लोव्हाकियाच्या मुत्सद्दी मंडळींत विशेष मान्यता मिळत असल्याने ते या नियमाला अनुसरून वागतील, याविषयी शंका नाही आणि युद्धांत भाग घ्यावयाचे एकदा ठरल्यावर मग त्यांत अर्धवटपणा कशाला, या विचाराने तेहि जर्मनीला विजय मिळत असेल, तोपर्यंत आपल्या प्रयत्नांची शिकस्त करतील. पोलंड आणि रुमानिया यांना वरील नियम तर लागू आहेच; शिवाय त्या दोन्ही राष्ट्रांतील पुढारी रशियाला पूर्णपणे प्रतिकूल आहेत.

## सैन्याचा अंदाज

आता युक्रेनवरील जर्मनीच्या चढाईत एकंदर किती सैन्य सामील होऊं शकेल, याचा अंदाज केला पाहिजे. युद्धाच्या पहिल्या महिन्यांतच जर्मनीला सुमारे तीस लक्ष सैन्य रशियाच्या आघाडीवर पाठवितां येईल. यापैकी फार तर दहा लक्ष सैन्य युक्रेनच्या स्वारीकडे जाऊं शकेल फिन्लंडपासून पोलंडपर्यंतची रशियाची सरहद्द सुमारे ३४० मैलांची आहे. या सरहद्दीवर रशियाच्या कमीत कमी सत्तर डिव्हिजन्स येऊं शकतील, असा अंदाज आहे. या सैन्याला पहिल्या

सलामींतच चीत करून लेनिनग्राड हस्तगत करण्यासाठी जर्मनीला निदान वीस लक्ष सैन्य पाठवावे लागेल. त्यानंतर पोलंड व व्हाइट रशिया यांमधील सरहद्द सुमारे अडीचशे मैलांची आहे. या सरहद्दीवर युद्धारंभी रशियाला चाळीस डिव्हिजन्स जमवितां येतील, असें वाटते. तेव्हा पोलंडच्या एकंदर साठ डिव्हिजन्सपैकीं अवघ्या वीस डिव्हिजन्स काय त्या युक्रेनकडे वळूं शकतील. रशिया व रुमानिया यांच्यामधील हद्द सुमारे तीनशे मैलांची आहे व या सरहद्दीवर रशिया चढाईचें धोरण स्वीकारील असा अंदाज आहे. यासाठी रुमानियाला आपले सारें सैन्य स्वतःच्या बचावासाठीच राखून ठेवावे लागेल. म्हणजे ऑस्ट्रिया, हंगारी व झेकोस्लोव्हाकिया या सर्वांचें मिळून सरासरी दहा लक्ष सैन्य, पोलंडच्या वीस डिव्हिजन्स व जर्मनीचे दहा लक्ष सैन्य मिळून एकंदर बावीस लक्ष सैन्य पोलंड व युक्रेन यांमधील २३० मैलांच्या सरहद्दीवर एकत्र होऊं शकेल.

या साऱ्या शत्रुसंघांचे सैन्य रशियाला भारी आहे अशांतला भाग नाही. पण आपण होऊन युद्ध उकरून न काढण्याच्या रशियाच्या धोरणामुळे जर्मन सैन्याला स्वतःला अनुकूल अशा वेळी रशियावर अचानक हल्ला करण्याची संधि सांपडणार आहे व त्यामुळे युद्धारंभी रशियाची तारांबळ होण्याचा संभव आहे. वास्तविक पाहता फॅसिस्ट व कम्यूनिस्ट या दोन तत्त्वज्ञानांच्या संघर्षांत पहिलाच विजय कोणाला मिळतो, याचे महत्त्व अतिशय असल्यामुळे, रशियाने आपण होऊन युद्धाला प्रारंभ करणे इष्ट आहे. पण आंतरराष्ट्रीय परिस्थितीमुळे अशी चढाई करणें रशियाला शक्य नाही. रशियाने आपण होऊन जर्मनीची कुरापत काढली तर नुसत्या जपानशीच नव्हे तर इंग्लंडशीदेखील रशियाचे लगेच युद्ध जुंपेल.

—केसरी ता. १३ नोव्हेंबर, १९३६.



# मध्ययुरोपांतील राजकारण

## झेकोस्लोव्हाकिया

रुमानियाच्या मुख्य प्रधानांनी बेलग्राडला भेट देऊन युगोस्लाव्हियाच्या सरकाराशी गुप्त वाटाघाटी केल्याचा उल्लेख मागील लेखांत आलाच आहे. त्यानंतर रुमानियाचे राजे कारोल, युवराज मायकेल व परराष्ट्रमंत्री आंतोनेस्कू हे सर्व झेकोस्लोव्हाकियाला गेले होते. या प्रसंगी त्यांनी झेकोस्लोव्हाकियाच्या सर्व प्रांतांतून प्रवास करून तेथील परिस्थितीचे निरीक्षण केले व प्राग शहरीं झेकोस्लोव्हाकियाच्या सरकाराबरोबर उभय राष्ट्रांच्या राजकारणाची चर्चा केली. या चर्चेचा पुढील निष्कर्ष सरकारी रीत्या जाहीर झाला आहे—

"The discussions in Prague dealt with the idea of extending contacts between the States of the little Entente and of the Rome Protocol and understanding with Germany consistent with the interests of a sound Central European settlement."

रुमानियाच्या अनुकरणाने झेकोस्लोव्हाकियादेखील आता जर्मनीशी मिळतें घेण्याचा प्रयत्न करीत आहे, ही गोष्ट या पत्रकावरून उघड झाली आहे. या पत्रकांत फ्रान्सचा उल्लेखहि नाही, या गोष्टीकडे 'मँचेस्टर गार्डियन'ने आपल्या वाचकांचे लक्ष वेधलें आहे. फ्रान्सचें वाढते दौर्बल्य हे झेकोस्लोव्हाकियाच्या धोरणांत बदल होण्याचें एक कारण आहेच, त्याखेरीज ऑस्ट्रिया व जर्मनी या उभयतांचें संगनमत झाल्यापासून लष्करी दृष्ट्या झेकोस्लोव्हाकियाची परिस्थिति फार अवघड झाली आहे व त्यामुळे त्याला आपल्या परराष्ट्रीय धोरणाचा पुनर्विचार करणे अवश्य झालें आहे.

झेकोस्लोव्हाकियाचे बोहेमिया, मोराव्हिया, स्लोव्हाकिया व रुथेनिया असे चार प्रांत आहेत. यांपैकी बोहेमिया प्रांताच्या चारी बाजूंनी डोंगर असल्यामुळे लष्करी दृष्ट्या तो प्रांत बराच सुरक्षित आहे. पण त्या प्रांतांत जर्मन भाषा

बोलणाऱ्या लोकांचें संख्याधिक्य असल्याने जर्मनीची स्वारी झाल्यास झेकोस्लोव्हाकियाला तो प्रांत राखणे अशक्य आहे. मोराव्हिया हा प्रांत लष्करी हालचालींना फार सोइस्कर आहे. जर्मन युद्धशास्त्रज्ञांचे मत असे आहे की, This province is the weakest point in the defences of the Czechoslovakian Republic, which can easily be split in two by a simultaneous attack upon Moravia from the north and the south. आपल्यावरील या संकटाची झेकोस्लोव्हाकियाच्या सरकारला अर्धवट जाणीव होती व त्यासाठी त्याने मोराव्हिया व जर्मनी यांच्या सरहद्दीवर फ्रान्सच्या तटबंदीसारखीच भक्कम तटबंदी बांधण्याचे काम कित्येक वर्षांपूर्वीच सुरू केले असून आता ते संपतहि आले आहे. पण यंदाच्या जुलैत ऑस्ट्रिया जर्मनीला मिळेपर्यंत ऑस्ट्रिया व मोराव्हिया यांच्या सरहद्दीवर तटबंदीचे काम सुरू झाले नव्हते आणि आता सुरू झाले असलें तरी तें पूर्ण होईपर्यंत झेकोस्लोव्हाकियाच्या सरकारला अतिशय सावधगिरी बाळगणें जरूर आहे. त्याचप्रमाणें सध्या झेकोस्लोव्हाकियाचे शस्त्रास्त्रांचे कारखाने जर्मनीच्या सरहद्दीजवळ व जर्मन वस्तीच्या प्रांतांत पिल्सेन या गांवी आहेत. एखादा अचानक हल्ला करून जर्मन सैन्याने हे कारखाने हस्तगत केले किंवा जनरल गोएरिंगच्या वैमानिक दलाने आकाशांतून धाड घालून त्यांचा विध्वंस केला, तर झेकोस्लोव्हाकियाच्या सरकाराला युद्ध चालविणेच अशक्य होणार आहे. यासाठी हे कारखाने सध्याच्या धंद्याच्या दृष्टीने सोइस्कर पण असुरक्षित अशा ठिकाणाहून हलवून गैरसोयीच्या पण अधिक सुरक्षित अशा स्लोव्हाकिया प्रांतांत नेण्याच्या योजना झेकोस्लोव्हाकियाच्या सरकारापुढे आहेत. अशा परिस्थितीत जर्मनीशी मिळते घेण्याला झेकोस्लोव्हाकियाने तयार होणें साहजिकच आहे.

या साऱ्या परिस्थितीचा फायदा घेण्यासाठी जर्मनीचे सुप्रसिद्ध मुत्सद्दी हेर फॉन पापेन यांनी सध्या झेकोस्लोव्हाकियांत कारस्थाने आरंभिली आहेत. झेकोस्लोव्हाकियाच्या पार्लमेंटांत आज जमीनदारवर्गाचे प्राबल्य आहे व हा वर्ग रशियाचा पक्ष सोडून झेकोस्लोव्हाकियाने जर्मनीच्या पक्षाला मिळावे, अशा मताचा आहे. या पक्षाचे अध्यक्ष मो. बेरान यांच्याशी अलीकडे हेर फॉन पापेन यांनी सख्यसंबंध जोडला आहे. झेकोस्लोव्हाकियाच्या मंत्रिमंडळांत आजच तीन

जर्मन आहेत. या जर्मनांना लवकरच फादर लिंका या कॅथोलिक धर्मोपदेशकाच्या अनुयायांचे पाठबळ मिळण्याचा संभव आहे. स्लोव्हाकिया या प्रांतांत कॅथोलिक व कम्यूनिस्ट या उभय पक्षांचा निकराचा झगडा चालू असून तेथील कॅथोलिकांना डॉ. बेनेश हे लवकरच झेकोस्लोव्हाकियाच्या मंत्रिमंडळात घेतील असे वाटते. डॉ. बेनेश यांना प्रेसिडेंटचे पद मिळण्याच्या प्रसंगी कॅथोलिक पक्षाचा विशेष उपयोग झाला असल्याने त्यांना त्या पक्षाचे ऋण फेडावयाचे आहे. म्हणजे जमीनदार, जर्मन व कॅथोलिक हे तीन कट्टे बोल्शेव्हिकविरोधी पक्ष लवकरच झेकोस्लोव्हाकियाच्या मंत्रिमंडळांत दिसू लागतील व देशाच्या राजकारणावरहि त्याच्या युतीचा परिणाम होईल.

## रुमानिया

झेकोस्लोव्हाकियांत पापेनची कारस्थाने चालू असली तर रुमानियांत आल्फ्रेड रोझेनबेर्गची कारस्थाने चालू आहेत. रुमानियाचा सुप्रसिद्ध कवि गोगा याला त्याने वश करून घेतले आहे व त्या देशांतील सुमारे साठ वर्तमानपत्रकारांना रोझेनबेर्गमार्फत जर्मनीकडून मदत मिळते. रुमानियात पाचसहा फॅसिस्ट पक्ष आहेत. त्यांत ‘ आयर्न गार्ड ’ या नांवाने ओळखला जाणारा अत्याचारी पक्ष सर्वांत प्रसिद्ध आहे. या ‘ आयर्न गार्ड ’ पक्षाने रशियाच्या वतीने रुमानिया युद्धांत पडल्यास सर्व रुमानियन सरकाराचा खून करण्याची प्रतिज्ञा केली असल्याचें जाहीर झाले आहे. रुमानियाचा व्यापार मुख्यतः धान्य व पेट्रोल यांचा असून जर्मनी हें या मालाचे सर्वात मोठे गिऱ्हाइक आहे. हिटलेर अधिकारारूढ झाल्या दिवसापासून रुमानियाच्या पेट्रोलची जर्मनीची खरेदी पूर्वीच्या सहापट झाली आहे. नाझी लोकांप्रमाणे रुमानियन लोकहि ज्यू लोकांचे शत्रु असल्याने त्यांना हिटलेरच्या पक्षाविषयी आपलेपणा वाटतो. रुमानियांत आठ लक्षांवर जर्मन लोक आहेत, इतकेंच नव्हे, तर तिथला राजाहि होहेन्झोलेर्न घराण्यांतील आहे. या सर्व कारणांमुळे रुमानिया जर्मनीच्या कच्छपीं लागणे अगदी स्वाभाविक आहे. तसेंच रुमानियाच्या पेट्रोलची जर्मनीला भावी युद्धांत फार जरूरी असल्याने तो देश आपल्या पक्षाला मिळावा, यासाठी जर्मनीहि शक्य तितके प्रयत्न केल्यावांचून राहणार नाही.

## जर्मनीने जपानाशीं सख्य कां जोडलें ?

जर्मनीचें राजकारण हें नेहमी युद्धशास्त्राच्या नियमांना अनुसरतें. याचे एक

उत्कृष्ट उदाहरण म्हणजे परवाचा जपान-जर्मनीचा तह होय. जर्मन युद्धशास्त्रज्ञांचा असा एक सिद्धांत आहे की दाट लोकसंख्येचे देश व विरळ लोकसंख्येचे देश या दोघांनाहि आपल्याच बळावर फार दिवस युद्ध चालविता येत नाही. कारण एखाद्या देशाची लोकसंख्या फार दाट असली तर त्या देशाला आपले अन्न परदेशाहून आणावे लागते व युद्धप्रसंगी परराष्ट्रीय व्यापार थाबला तर उपासमारीमुळे शत्रूला शरण जावे लागते. उलटपक्षी विरळ लोकसंख्येचा देश मुख्यतः कृषिप्रधान असल्याने त्याला अन्नाचा तुटवडा पडत नाही. पण आधुनिक युद्धाला लागणारी शस्त्रास्त्रे प्रचंड प्रमाणावर तयार करण्यासारखी त्या देशाच्या उद्योगधंद्यांची स्थिति नसल्याने तोफा, बंदुका, दारूगोळा इत्यादिकांचा पुरवठा परराष्ट्राकडून न झाल्यास त्यालाहि शत्रूंना शरण जावें लागते. यांपैकी पहिल्या प्रकारचे ठळक उदाहरण म्हणून इंग्लंड व दुसऱ्या प्रकारचे ठळक उदाहरण म्हणुन रशिया या दोन देशांचा उल्लेख करता येईल. यांपैकी रशियाशी युद्ध करण्याचा जर्मनीचा निश्चय झाला आहे. सोव्हिएट रशियाचे सैन्य, विमानें, चिलखती मोटारगाड्या, तोफा वगैरे कितीहि असल्या तरी प्रत्यक्ष युद्धाला प्रारंभ होताच वर सांगितलेल्या तत्त्वाप्रमाणे रशियाला परराष्ट्रांच्या व्यापारी मदतीची गरज भासणारच असा जर्मन युद्धशास्त्रज्ञाचा सिद्धांत आहे रशियाचा परराष्ट्रीय व्यापार मुख्यतः बाल्टिक समुद्र, काळा समुद्र व पॅसिफिक महासागर या तीन किनाऱ्यांवरील बंदरावर अवलंबून आहे. यांपैकीं बाल्टिक समुद्र जर्मनीच्या आरमाराच्या कक्षेत असल्याने त्या बंदरांचा व्यापार जर्मनीला लगेच थांबवितां येईल. त्याचप्रमाणे रुमानियाच्या मदतीने काळ्या समुद्रांत पाणबुड्या बोटींचा सुळसुळाट करून तो समुद्रदेखील असुरक्षित करणे जर्मनीला अशक्य नाही. पण पॅसिफिक महासागरातील रशियाच्या व्यापाराला प्रतिबंध करणें जर्मनीला शक्य नसल्याने जपानमार्फत त्या बंदरांची नाकेबंदी घडवून आणावी, अशी जर्मनीची इच्छा आहे व तेवढ्या मदतीनेदेखील आपण रशियावर खात्रीने जय मिळवूं, अशी जर्मन सेनापतीची समजूत आहे.

—केसरी, ता. ४ डिसेंबर, १९३६.

---

# काउंट चियानोंचीं बर्लिन येथील कारस्थानें

गेल्या ऑक्टोबर महिन्यांत इटालीचे परराष्ट्रमंत्री काउंट चियानो यांनी बर्लिन नगरीला भेट देऊन जर्मनीच्या मुत्सद्दी मंडळीशी फार महत्त्वाचीं कारस्थानें केली. इंग्लिश आणि फ्रेंच वर्तमानपत्रे या कारस्थानांविषयी लिहितांना, त्यांतून कांहींहि निष्पन्न झाले नाहीं, असे भासविण्याचा प्रयत्न करीत आहेत, पण ती त्यांची चूक आहे. जर्मनीशी अत्यंत निकटचा संबंध जोडण्याचे जे नवें धोरण सि. मुसोलिनी यांनी स्वीकारिले आहे, त्याचा युरोपीय राजकारणावर फार महत्त्वाचा परिणाम होणार आहे.

वास्तविक पाहतां इटालीला जर्मनीपेक्षा इंग्लंडच्याच सख्याचे अधिक महत्त्व वाटते व त्यासाठी सि. मुसोलिनी यांनी गेल्या उन्हाळ्यांत इंग्लंडशीं मिळते घेण्याचा प्रयत्नहि करून पाहिला. पण तेव्हा त्यांना असे दिसून आलें कीं, आपल्या युद्धसामर्थ्याची पूर्ण वाढ होऊन भूमध्य समुद्रांत पूर्वीप्रमाणें आपलें वर्चस्व प्रस्थापित होईपर्यंत इंग्लंड इटालीशी कसलेंहि बोलणे करावयाला तयार नाहीं. ॲबिसीनियाच्या स्वारीपासून इंग्लंडचा हिटलेरपेक्षा मुसोलिनीवर अधिक राग झाला आहे, कारण युरोपखंडांत जर्मनीचे वर्चस्व प्रस्थापित झाल्यास इंग्लंडला त्यापासून धोका उत्पन्न होण्याचा संभव असला तरी इटालीच्या साम्राज्यवाढीच्या धोरणामुळे ब्रिटिश साम्राज्याची नाडी आजच कापली जात आहे. ब्रिटिश परराष्ट्रमंत्री मि. एडन यांनी स्वतःच कांही दिवसांपूर्वी म्हटलें होते की भूमध्य समुद्रांतील वाट बंद झाल्यास मेंदूकडे जाणारी प्रमुख रक्तवाहिनी तुटल्यासारखीच ब्रिटिश साम्राज्याची अवस्था होईल. ब्रिटिश नेत्यांच्या या मनोवृत्तीची पूर्ण जाणीव झाल्यावर मगच सि. मुसोलिनी यांनी जर्मनीशी सख्य करण्याचा संकल्प केला.

१९३४ च्या जुलै महिन्यांत ऑस्ट्रियाचे तेव्हाचे चान्सेलर डॉल्फुस यांचा नाझीपक्षियांनी खून केला, तेव्हापासून जर्मनी व इटाली या उभयतांमध्ये वितुष्ट

आलें होतें. पण ॲबिसीनियावरील स्वारीच्या प्रसंगीं इंग्लंड वगैरे इतर राष्ट्रांप्रमाणें जर्मनीनें इटालीला विरोध न करतां शक्य तितके साहाय्यच केल्यामुळे अलीकडे इटालीचा जर्मनीवरील राग बराच कमी झाला होता. ॲबिसीनिया देश जिंकल्यापासून तर सि. मुसोलिनी यांना जर्मनीच्या मैत्रीची अत्यंत आवश्यकता भासूं लागली आहे. कारण ॲबिसीनिया देश खालसा करण्याच्या त्यांच्या जाहीरनाम्याला अद्यापि युरोपखंडाची व विशेषतः इंग्लंड आणि फ्रान्स या प्रमुख राष्ट्रांची मान्यता मिळाली नाही. या मान्यतेविना आज इटालीचें फारसे नडत नाही. पण परराष्ट्रीय राजकारणांत त्याचा अर्थ असा होतो की इंग्लंड आणि राष्ट्रसंघातील इंग्लंडची अनुयायी राष्ट्रें हीं ॲबिसीनियाच्या प्रकरणांत आपला जो पराजय झाला तो विसरून जावयाला तयार नाहीत. इंग्लंडचे माजी राजे एडवर्ड यांनी गेल्या उन्हाळ्यांत भूमध्य समुद्रातील इटालीखेरीज बहुतेक साऱ्या राष्ट्रांना भेटी दिल्या, तेव्हा युगोस्लाव्हियाला त्याच्या आरमारासाठी चाळीस लढाऊ जहाजें सवलतीच्या दराने बांधवून देण्याचें त्यांनी वचन दिले होते असे म्हणतात युगोस्लाव्हियाचे रीजंट प्रिन्स पॉल हे नुकतेच इंग्लंडला गेले होते, यावरून या किंवदंतीला दुजोराच मिळतो. त्याचप्रमाणे इटालीचे कट्टे शत्रु कमालपाशा यांच्याकडून तुर्कस्थानांत लोखंडी व पोलादी सामानाचे कारखाने सुरू करण्याचें व दार्दानेलिसच्या तटबंदीचे कंत्राटहि त्यांनी इंग्रजी कंपन्यांना मिळवून दिलेले आहे. ग्रीसचे राजे तर सर्वस्वी इंग्रजांचे हातांत आहेत. या परक्या देशाप्रमाणेच स्वतःच्या ताब्यांतील इजिप्त देशहि आपल्याला पूर्ण अनुकूल असावा, यासाठी इंग्लंडने इजिप्तबरोबर बंधुत्वाचा नवा करारनामाहि केला आहे. इंग्लंडचे नवे आरमारमंत्री सर सॅम्युएल होअर हे भूमध्यसमुद्रातील आपल्या आरमारी तळांची नुकतीच तपासणी करून स्वदेशी परत आले. अशाप्रकारे इटालियन साम्राज्य बुडविण्यासाठी भूमध्य समुद्रांत पाणसुरुंग लावण्याचा इंग्लंडचा उद्योग निरलसपणे चालू आहे. असल्या अवघड परिस्थितीत इटालीच्या ॲबिसीनियावरील स्वामित्वाला निदान जर्मनीची तरी संमति मिळविणें हे इटालीच्या दृष्टीने फार महत्त्वाचें होतें, यांत शंका नाही; आणि हे कार्य काउंट चियानो यांनी मोठ्या कुशलतेने पार पाडलें आहे. जर्मनीचा इटालीला पाठिंबा मिळाल्याचें कळताच ता. १ नाव्हेंबर रोजी सि. मुसोलिनी यांनी मिलान येथे एक जाहीर भाषण करून ब्रिटिश मंत्रिमंडळाला ताकीद दिली कीं,

The reasoning brains of the British Empire must realise that the fact was accomplished and irrevocable. या ताकिदीचा इंग्लंडच्या मंत्रिमंडळावर तत्काळ परिणाम होऊन नोव्हेंबरच्या सहाव्या तारखेला आदिसअबाबा येथील हिंदी सैन्य परत बोलाविण्याचे व तेथील वकिलात मोडून यापुढे तिथे फक्त एक कॉन्सल ठेवण्याचे ब्रिटिश सरकाराने इटालियन सरकाराला आश्वासन दिले व त्याच दिवशी इटाली व ग्रेटब्रिटन या उभयतामधील नव्या व्यापारी करारनाम्यावर सह्याहि झाल्या. यानंतर 'डेलीमेल' पत्राचे रोम येथील बातमीदार मि. वार्ड प्राइस यांना एक सामोपचाराची मुलाखत देऊन सि. मुसोलिनी यांनी ब्रिटिश सरकाराशी फिरून एकवार तडजोडीचे बोलणे सुरू केले आहे, पण त्या कारस्थानाची हकीकत अजून बाहेर फुटलेली नाही.

सध्या जर्मनीशी सख्य करण्यांत ॲबिसीनियाच्या प्रकरणांत इंग्लंडला नमतें घ्यावयाला लावण्याव्यतिरिक्त सि. मुसोलिनी यांचा दुसराहि एक डाव आहे. गेल्या तीन वर्षांच्या अनुभवावरून त्यांना असे कळून आले आहे कीं, इटालीने जर्मनीला कितीहि विरोध केला तरी मध्य-युरोपांत जर्मनीचे वर्चस्व वाढत जाणारच; तेव्हा जर्मनीला निष्फळ विरोध करून आपल्या शत्रूंची संख्या वाढविण्यापेक्षा जर्मनीशी सख्य करून उभयतांनी मध्य-युरोपांतील आपापल्या वर्चस्वाचीं क्षेत्रे आंखून घेतल्यास ते उभयतांनाहि हितावह होईल. मुसोलिनीच्या पूर्वी ॲबिसीनियावर स्वारी करणारे इटालीचे मुख्य प्रधान सि. क्रिस्पी यांनीहि मेल्या शतकांत अशाच धोरणाने ऑस्ट्रिया व जर्मनी या उभयतांशी समान शत्रु-मित्रत्वाचा तह केला होता. ॲबिसीनियावरील स्वारीप्रमाणे याहि बाबतीत सि मुसोलिनी हे त्यांचेच अनुकरण करीत आहेत. काउंट चियानोच्या बर्लिन येथील मुलाखतीत असे ठरले आहे की ऑस्ट्रिया व झेकोस्लोव्हाकिया या देशांत इटालीने ढवळाढवळ करू नये आणि हंगारी व युगोस्लाव्हिया येथील राजकारणांत जर्मनीने ढवळाढवळ करू नये. या करारापासून इटालीचा काय फायदा होणार आहे, हे सांगणे कठिण आहे; जर्मनी मात्र येत्या वर्षी आपल्या वांट्याचे दोन्ही देश खाऊन टाकणार, अशी लक्षणे दिसत आहेत. बर्लिन येथील कराराला सि. मुसोलिनी यांची संमति मिळताच नोव्हेंबर ता. ३ रोजी ऑस्ट्रियाच्या मंत्रिमंडळाची पुनर्घटना होऊन जर्मनीला विरोध करणाऱ्या

सर्व प्रधानांना अर्धचंद्र मिळाला. या पुनर्घटनेनंतर प्रे. मिक्लास यांनी एक फर्मान काढून मंत्रिमंडळांतील जर्मन पक्षाचे प्रमुख हेर फॉन ग्लेत्सेहॉर्स्टेनाउ यांच्याकडे प्रेसिडेंटची निवडणूक, रेफरेंडमसंबंधींची व्यवस्था, कोणालाहि नागरिकत्वाचे हक्क देण्याचे अधिकार व सरहद्दीच्या प्रश्नाचा निकाल वगैरे खातीं दिलीं आहेत. या साऱ्या अधिकारांचा उपयोग करून वर्षा दोन वर्षांत आपण ऑस्ट्रियांत पूर्णपणे नाझीराज्य प्रस्थापित करूं अशी ऑस्ट्रियांतील नाझी पुढाऱ्यांना आशा वाटत आहे. ऑस्ट्रियांतील नाझी चळवळीचे पुढारीपण हेर हिटलेर यांनी कॅप्टन लेओपोल्ड याच्याकडे सोपविलें असून चळवळीला लागतील तितके पैसे जर्मनीतून पुरविण्याचे आश्वासन दिलें आहे. ऑस्ट्रियाचें परराष्ट्रीय राजकारण, अंतर्गत राजकारण व देशाचे संरक्षण सर्वस्वी जर्मनीवर अवलंबून असून व्यापारहि लौकरच पूर्णपणे जर्मनीच्या हातीं जाईल, अशी लक्षणें दिसत आहेत. झेकोस्लोव्हाकियाला गिळकृत करणे हे ऑस्ट्रियाला गिळंकृत करण्यापेक्षा अधिक अवघड आहे. तरी देखील जर्मनीतील नद्यांमधील वाहतुकींचे नियंत्रण करण्याचे सर्वाधिकार ता. १४ नोव्हेंबर रोजी तह मोडन जर्मनीने आपल्या हाती घेतल्यामुळे झेकोस्लोव्हाकियाचे नाकच जर्मनीच्या मुठींत आलें आहे; कारण ओडेर आणि एल्ब या जर्मन नद्यांमधूनच झेकोस्लोव्हाकियाचा बहुतेक सारा निर्यात व्यापार चालतो. जर्मनीच्या या संधिभंगाचा निषेध करण्याची फ्रान्सने इटालीला विनंति केली असतां इटालीने ती साहजिकपणेंच झिडकारून टाकली; कारण असे करणे म्हणजे काउंट चियानोंच्या बर्लिन येथील कारस्थानांचा निषेध करणे झालें असतें.

मध्ययुरोपांतील राजकारणाप्रमाणेच स्पेनमधील बंडाच्या प्रश्नाचीहि बर्लिन येथील मुलाखतीत चर्चा झाली व या प्रश्नाचा तेथे जो निर्णय लागला, त्यामुळे काऊंट चियानोंच्या बर्लिनमधील कारस्थानांना विशेष महत्त्व आलें आहे. स्पेनच्या बाबतीत जर्मनीचे धोरण सुप्रसिद्धच आहे. जर्मनीचे एक युद्धशास्त्रज्ञ सांगतात

"Spain is Germany's natural ally against France as she was in the sixteenth and seventeenth centuries Unhappily Spain's political and military importance has greatly diminished in the last two hundred years and more, which is

one reason why France has so enormously increased her strength. This being so, it must be our first interest to make Spain strong again. The Spaniards are a Mediterranean race and like the Southern Italians an indolent and easygoing people lacking in vigorous determination and perseverance. If however a Mussolini were to arise among them, the Spanish nation might quite possibly play a part worthy of its past."
हा विशिष्ट लष्करी हेतु मनांत ठेवून जर्मनी स्पेनच्या बंडवाल्यांना मदत करीत आहे. या प्रश्नावर जर्मनी व इटाली यांचे एकमत होण्याचें कारण हेंच कीं, नीस, सॅव्हाय आणि कॉर्सिका हे तीन इटालियन वस्तीचे प्रांत फ्रान्सनें गिळंकृत केले आहेत व ते इटालीला परत मिळवावयाचे असल्याने फ्रान्सचे लष्करी सामर्थ्य कमी होणे इटालीला इष्टच आहे याशिवाय अबिसीनियाच्या स्वारीपासून इटालीच्या महत्त्वाकांक्षा वाढल्या असल्याने त्या राष्ट्राला संपूर्ण भूमध्य समुद्र आपल्या कब-जांत आणण्याची हाव सुटली आहे. स्पेन देश आपल्या कह्यांत आल्यास ही आकांक्षा सहज सफळ होईल, अशा अपेक्षेने इटालीहि स्पेनच्या बंडवाल्यांना साहाय्य करण्याला सिद्ध झाला आहे. याप्रमाणे स्पेनच्या प्रश्नावर जर्मनी व इटाली यांचे एकमत झाल्याने काउंट चियानाच्या भेटीत या दोन्ही राष्ट्रांनी जनरल फ्रांकोच्या सरकाराला मान्यता द्यावयाचे व तटस्थतेचे निर्बंध धाब्यावर बसवून बंडवाल्यांना साहाय्य करावयाचे ठरविले.

या कारस्थानाची कुणकूण रशियाच्या कानांवर जातांच त्याने तावडतोब तटस्थ राष्ट्राच्या कमिटीतून अंग काढून घेण्याची धमकी दिली. पण त्यानंतर तटस्थ राष्ट्रांची कमिटी ही स्पेनच्या बाबतीत तटस्थपणा राखण्या-साठी नसून आज सार्वत्रिक युद्ध उपस्थित होऊं नये याकरिता, स्पेनमधील उभय-पक्षांना कोणीहि कशीहि मदत केली तरी तिकडे डोळेझाक करण्यासाठी आहे, अशी रशियाची इतरांनी समजूत केल्यावर रशियाने त्या कमिटीतून अंग काढून घेण्याचा विचार रहित केला. वास्तविक पाहतां या कमिटींत भाग घेण्याने रशि-याचें कांही नडत आहे असें मुळीच नाही. काळ्या समुद्रांतून रशियाची विमानें, तोफा, दारूगोळा, टँक्स, सैनिक व अधिकारी यांचा अखंड प्रवाह आलिकांते व कार्ताजेना या बंदरांकडे चाललाच आहे. स्पेनमधील रशियाचा वकील हा स्पॅनिश

सरकाराचा जवळ जवळ मुख्य प्रधानच बनला आहे. खुद्द माद्रिदच्या संरक्षणाची जबाबदारी एका रशियन सेनापतीच्या शिरावरच आहे. सध्या स्पेनमध्ये तटस्थ राष्ट्रांपैकीं इंग्लंडचे २५०, फ्रान्सचे ४०००, इटालीचे २००० व जर्मनीचे ५००० इतके सैनिक लढत आहेत. रशिया व पोर्तुगाल या दोन राष्ट्रांचे आंकडे मात्र अद्यापि जाहीर झाले नाहीत. असे असले तरी तटस्थ राष्ट्रांमध्ये खरा लढा हा मुख्यतः रशिया व जर्मनी या उभयतांमध्येच आहे. किंबहुना स्पेनमधील यादवी ही भावी रूसोजर्मन-युद्धाची रंगीत तालीमच आहे, असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

स्पेनच्या बाबतीत स्टालिनने इतका नेट धरण्याची कारणे दोन आहेत. स्वदेशांत विरोधी पक्षाचा प्रादुर्भाव झाला तर कॉमरेड स्टालिन हा त्या पक्षाचा अगदी चाणक्या-प्रमाणे समूळ उच्छेद करतो; पण मागाहून आपण स्वतःच विरोधी पक्षाचे धोरण स्वीकारतो, असा आतापर्यंतचा अनुभव आहे. स्पेनच्या बाबतीत देखील हाच प्रकार घडून आला आहे. सध्या स्टालिनने रशियांतील ट्रोट्स्कीच्या अनुयायांचा उच्छेद आरंभिला आहे पण स्पेनच्या बाबतींत आपण स्वतः ट्रोट्स्कीचे अनुयायित्व पत-करले आहे. स्टालिनने स्पेनला इतकी मदत करण्याचे दुसरे कारण हे की स्पेन-मध्ये जर्मनीच्या इच्छेप्रमाणे डिक्टेटरशिप सुप्रतिष्ठित झाली म्हणजे झेकोस्लोव्हा-कियामध्ये कम्यूनिस्टांचे प्राबल्य होत आहे, असे निमित्त करून त्या देशांतील जर्मन लोक बंड करतील व मग कम्यूनिस्टांचा उच्छेद आणि स्वजातियाना साहाय्य करण्याच्या मिषाने जर्मनी त्या देशावर स्वारी करील, अशी रशियाच्या सत्ताधाऱ्यांना धास्ती वाटत आहे. ही कांही काल्पनिक भीति नव्हे. उद्या स्पेनमध्ये बंडवाल्यांचे राज्य प्रस्थापित होऊन त्यांनी अराजकांची व कम्यूनिस्टांची कत्तल आरंभिली म्हणजे लगेच शेजारच्या फ्रान्समध्येहि यादवी युद्धाला सुरुवात होईल आणि या यादवीमुळे फ्रान्स आपल्या दोस्तांना मदत करूं शकत नाही, अशी खात्री झाली की जर्मनी एखादे खुसपट काढून झेकोस्लोव्हाकियावर स्वारी करील, अशी भीति इंग्लंडमधील मुत्सद्दी लोकांनाहि वाटत आहे. नोव्हेंबर ता. २८ च्या 'एकॉनॉमिस्ट'ने म्हटले आहे

"It is insistently reported that Czechoslovakia is to be soon treated by Germany as another Spain, disintegrating

**under Bolshevist influences. Germany might thus be conveniently 'forced' to intervene militarily."** ही भीति खरी ठरली आणि झेकोस्लोव्हाकियाला फ्रान्सची मदतहि मिळाली नाही, तर रशियाला निमूटपणें त्या मित्रराष्ट्राचा विनाश पहावा लागेल, कारण रशिया व झेकोस्लोव्हाकिया या उभयतांमधील परस्परसहायाचा करार फ्रान्स झेकोस्लोव्हाकियाला मदत करण्याला सिद्ध असला, तरच अमलांत यावयाचा आहे.

—केसरी, तारीख २५ डिसेंबर, १९३६.



# लॉर्ड हॅलिफाक्स यांची बर्लिनला भेट

## महायुद्धाची प्रस्तावना ?

१९११ मधील अगॅदीर प्रकरणानंतर इंग्लंडला, आता लौकरच जर्मनीशीं युद्ध उपस्थित होणार, अशी भीति वाटूं लागली, म्हणून १९१२ साली इंग्लंडचे तेव्हाचे मुख्य प्रधान मि. ॲस्क्विथ यांनी जर्मनीशी सख्य करण्याचा शेवटचा प्रयत्न करण्यासाठी जर्मनीच्या मुत्सद्दी मंडळीच्या विश्वासांतील आपले मंत्री लॉर्ड हाल्डेन यांना जर्मनीला पाठविले होतें. लॉर्ड हाल्डेन यांना जेव्हा त्यांच्या सफरींत असें दिसून आलें की, जर्मनीचे मुत्सद्दी आपल्या महत्त्वाकांक्षेला इंग्लंडच्या इच्छेप्रमाणे मर्यादा घालून घेण्याला तयार नाहींत, तेव्हा त्या अनुभवावरून सावध होऊन इंग्लंडचे मुत्सद्दी न बोलतां महायुद्धाची सिद्धता करू लागले व दोन वर्षांनीच महायुद्धाला प्रारंभ झाला. लॉर्ड हॅलिफाक्स यांची नोव्हेंबर महिन्यांतील जर्मनीची सफरहि लॉर्ड हाल्डेन यांच्या फेब्रुवारीतील सफरीप्रमाणेच भावी महायुद्धाची प्रस्तावना ठरणार आहे की काय अशी आज स्वाभाविकपणेच सर्वांना काळजी वाटत आहे. यासाठी या सफरीच्या उपक्रमापासून उपसंहारापर्यंत जे डावपेंच लढविले गेले, त्यांचें चिकित्सकपणाने निरीक्षण करणें आवश्यक झाले आहे.

## इंग्लंड बोटचेपें झालें

लॉर्ड हॅलिफाक्स हे आंतरराष्ट्रीय मृगयाप्रदर्शन पहावयाच्या निमित्ताने बर्लिनला गेले होते. यावरून असे दिसते की, त्यांच्या सफरीचा उपक्रम ज. गोएरिंग यांच्याकडून झाला असला पाहिजे. कारण शिकारीच्या निमित्ताने परराष्ट्रांतील मुत्सद्दी लोकांच्या मुलाखती घेण्याची ज. गोएरिंग यांची नेहमीची वहिवाट आहे. लॉर्ड हॅलिफाक्स यांना मृगयाप्रदर्शनाच्या निमित्ताने बर्लिनला बोलावण्यापूर्वी इंग्लंडचे मुत्सद्दी जर्मनीशी वाटाघाट करण्याइतके नरम आले आहेत कीं नाहीत याचीहि जनरल गोएरिंग यांनी आपल्या विशिष्ट पद्धतीने चांचणी करून

पाहिली होती. ता. २८ आक्टोबर रोजी सि. मुसोलिनी यांनी फॅसिस्ट राज्य-स्थापनेच्या वार्षिक उत्सवानिमित्त भाषण करतांना असे उद्‌गार काढले की, A great people such as the German people must regain the place which is due to it and which it used to have beneath the sun of Africa. सि. मुसोलिनी यांच्या या विधानाला १ नोव्हेंबर रोजी मि. एडन यांनी पार्लमेंटांत उत्तर दिले 'We do not admit the right of any Government to call upon us for a contribution when there is no evidence to show that that Government are prepared to make any contribution on their account.'

मि. एडन यांच्या या उत्तरावर टीका करताना ज. गोएरिंग यांच्या National Zeitung या पत्राने म्हटले 'Whether they like it or not, certain states would be personally reminded by Germany that their method of colonial robbery had no basis in any internationally ordered statute.' इंग्लडने एखाद्या दरवडेखोराप्रमाणे जर्मनीच्या वसाहती चोरल्या आहेत, अशा आशयाचे भाषण ज. गोएरिंग यांनी १९३६ साली एकदां केले असतां, ब्रिटिश सरकाराने आपल्या बर्लिन येथील वकिलामार्फत जर्मन सरकाराकडे तक्रार केली होती. त्याच भाषणाचा ४ नोव्हेंबर रोजी ज. गोएरिंग यांच्या पत्राने पुनरुच्चार केला असतां ब्रिटिश सरकाराने व ब्रिटिश वर्तमानपत्रांनीहि चकारशब्द काढला नाही. यावरून इंग्लंडशी बोलणे करण्याला सध्याची वेळ अनुकूल दिसते, असा अंदाज करून ज. गोएरिंग यांनी आपल्या विश्वासांतील दोन अधिकारी लंडनला पाठवून लॉर्ड हॅलिफाक्स यांना मृगयाप्रदर्शनाचे निमंत्रण दिले व चेंबरलेनसाहेबांच्या संमतीने त्यांनीहि ते निमंत्रण स्वीकारिले.

## जपानच्या विजयाचा परिणाम

या वेळी इंग्लंडचे मुत्सद्दी इतके नरम येण्याचे प्रमुख कारण म्हणजे जपानचा चीनमधील विजय व त्या विजयामुळे इटालीने जपानशीं केलेला तह होय. अबिसीनियाच्या लढाईपासून इटालीने इंग्लंडच्या भूमध्य समुद्रांतील सत्तेचा डोलारा डळमळीत केला आहे. व आता जपानच्या वाढत्या विजयाने इंग्लंडच्या

चीनमधील वर्चस्वाचे बारा वाजले आहेत. चीनमध्ये इंग्लंडचे कमीत कमी दीड-हजार कोटि रुपयांचे भांडवल गुंतले असल्यामुळे ब्रिटिश भांडवलवाल्यांचे प्राण आज अगदी कासावीस झाले आहेत. जपानच्या वाढत्या सत्तेला पायबंद लावण्या-साठी इंग्लंड, अमेरिका, रशिया व फ्रान्स या चारी राष्ट्रांनी एकत्रित होऊन आपल्या लष्कराच्या जोरावर जपानला चीन देशातून हांकून द्यावे व आरमारा-च्या साहाय्याने त्याची नाकेबंदी करून त्याला शरण यावयाला लावावे अशा तऱ्हेच्या योजना या चारी राष्ट्रांच्या युद्धशास्त्रज्ञांनी १९३३ पासून करून ठेवल्या होत्या. पण त्या अमलात आणण्यापूर्वीच जपानने स्वतःच चीन देशावर सार्वभौमसत्ता प्रस्थापित करण्याचा घाट घातलेला पाहून वरील सर्व देशातील साम्राज्यवाद्यांचे धाबे दणाणले आहे. १९३५ साली इंग्लंडचे सर्वांत प्रसिद्ध इतिहासकार डॉ. अर्नोल्ड टॉयनबी यानी इंग्लंडच्या मुत्सद्दी मंडळीना असा इषारा दिला होता की, The British Empire could be broken up any day by a concerted attack from Nippon in league with any single continental European power. आणि आज तर युरोपांतील एक सोडून दोन बलाढ्य राष्ट्रांशी जपानचा सांधे झाला आहे, यामुळे सध्या इंग्लंडला कसेहि करून जर्मनीशी सख्य जुळविणे आवश्यक झाले आहे. याकरिताच ज. गोएरिंगच्या मुखपत्राने इंग्लंडला पुन्हा एकवार दरवडेखोराची उपमा दिली असून सुद्धा लॉर्ड हॅलिफाक्स यांनी ज. गोएरिंगचे निमंत्रण स्वीकारले !

आता सांगण्याजोगी मौज ही की, ज. गोएरिंग यानी या महत्त्वाच्या कारस्थानाची वार्ता जर्मनीचे लंडन येथील वकील हेर फॉन रिब्बेनट्रोप यांच्या कानांवर देखील जाऊं दिली नव्हती. उलटपक्षी मि. चेंबरलेन यांनीहि आपले परराष्ट्रमंत्री मि. एडन याची संमति न घेतांच लॉर्ड हॅलिफाक्स यांना जर्मनीत पाठविण्याचा बेत केला होता. यावेळी मि. एडन हे ब्रुसेल्स येथील नवराष्ट्र-परिषदेंत गुंतले होते व हेर फॉन रिब्बेनट्रोप हे जपान व इटाली यांचा तह घडवून आणण्या-च्या नाजूक कामगिरींत गुंतले होते. या महत्त्वाच्या तहावर ता. ६ नोव्हेंबर रोजी रोम येथे सह्या झाल्या व त्यानंतर हेर फॉन रिब्बेनट्रोप हे लंडन येथे परत आले. ते लंडनला आल्यानंतर थोड्याच दिवसांत 'इव्हिनिंग स्टॅंडर्ड' या पत्रांत अशी बातमी प्रसिद्ध झाली की, जर्मनीला मध्ययुरोपांतील राष्ट्रे आपल्या आधिपत्याखाली आणण्या-

न्वी इंग्लंडने पूर्ण मुभा दिल्यास जर्मनी आणखी दहा वर्षेपर्यंत इंग्लंडजवळ आपल्या वसाहती परत मागणार नाही, या अटीवर जर्मनीशी तहाच्या वाटाघाटी करण्या-करिता लॉर्ड हॅलिफाक्स हे लवकरच जर्मनीला जाणार आहेत. ही बातमी हेर फॉन रिब्बेनट्रॉप यांच्या कानांवर येताच त्यांच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन पोचली व लॉर्ड हॅलिफाक्स यांच्या सफरीचा मुख्य हेतु जर्मनी, इटाली व जपान या त्रिकूटाची पुनः तीन शकले करणे हाच असला पाहिजे, हे ओळ-खून त्यांनी या बातमीचा ताबडतोब इनकार करण्याबद्दल डॉ. गोएबेल्स यांना टेलिफोन केला. डॉ. गोएबेल्स यांनाहि जनरल गोएरिंगविषयी पराकाष्ठेचा मत्सर वाटत असल्याने त्यांनी लगेच सर्व जर्मन पत्रांतून पुढील आशयाचा लेख प्रसिद्ध केला. 'To hope and to believe that the Italo-German-Japanese political friendships could be the subject of discussion is completely to misjudge the situation. If the visit is to be made in such atmosphere, the serious question arises whether it will not be more profitable, in the interests of lessening the political tension to postpone the visit. With regard to the colonies, the German public have noted the views of London and Paris and will know how calmly to await developments.' रिब्बेनट्रॉप यांच्या या लेखामुळे साऱ्या जर्मनीत एकदम खळबळ झाली व लॉर्ड हॅलिफाक्स यांचे प्रयाण तूर्त तहकूब होते की काय असें वाटूं लागलें. पण लौक-रच हेर हिटलेर यांच्या सक्तीच्या हुकुमामुळे ज. गोएरिंगच्या प्रतिपक्षियांना मौनव्रत पतकरणे भाग पडलें व ठरल्याप्रमाणे नोव्हेंबर १६ रोजी लॉर्ड हॅलि-फाक्स यांनी लंडनहून जर्मनीला प्रयाण केले. ता. १७ व १८ रोजी लॉर्डसाहेबांचा मुक्काम बर्लिन नगरीत होता व तेवढ्या अवधीत त्यांनी जर्मनीतील बहुतेक प्रमुख पुढाऱ्यांच्या मुलाखती घेतल्या. त्यानंतर १९ तारखेला बॅरन फॉन नायराट यांच्या समवेत त्यांनी बव्हेरिया प्रांतांत जाऊन जर्मनीचे राष्ट्रपति हेर हिटलेर यांची मुलाखत घेतली व बर्लिन शहरी पुनः एकवार पुढारी मंडळींच्या मुलाखती घेऊन ते लंडनला परत आले.

### जर्मनीच्या तोंडावर कांही तरी टाका

या साऱ्या वाटाघाटीतून काय निष्पन्न झाले, याचा आता थोडासा अंदाज

केला पाहिजे. हिटलेर-हॅलिफाक्स युति घडवून आणण्याच्या कारस्थानांत सध्या हिंदुस्थानांत संचार करीत असलेले कारस्थानपटु लॉर्ड लोदियन यांनी प्रमुख भाग घेतला होता. लॉर्ड लोदियन यांचा लंडनच्या 'टाईम्स' पत्राशी फार निकटचा संबंध आहे. या टाईम्स पत्राने जर्मनीची वसाहतींची मागणी इंग्लंडने कोणत्या ना कोणत्या तरी रूपाने पूर्ण करावी, अशाबद्दल अलीकडे अगदी कसून प्रचार चालविला आहे. गेल्या ऑक्टोबर महिन्याच्या अखेरीला लंडन टाईम्सने लिहिलें होतें 'Some acceptable field for development should be opened to Germany by the common action of three or four of the great colonising powers with contiguous African territories.' यावरून असें दिसते की, इंग्लंड, फ्रान्स, बेल्जम आणि पोर्तुगाल या सर्वांनी मिळून टोगोलँड, कॅमेरून, बेल्जियन कोंगो व पोर्तुगीज आंगोला यांतून कांही कांही भाग कोणत्या तरी रूपाने जर्मनीला समर्पण करून त्या बुभुक्षित राष्ट्राची क्षुधाशांति करावी असा इंग्लंडच्या पुढाऱ्यांचा डाव आहे व या प्रश्नांची चर्चा लॉर्ड हॅलिफाक्स यांच्या भेटीत झाली असलीच पाहिजे.

यांत लक्षांत घेण्याजोगी गोष्ट ही की, दोन वर्षांपूर्वी जर्मनीला वसाहती परत देण्याचा प्रश्न निघाला असतां बहुतेक साऱ्या ब्रिटिश मुत्सद्दी लोकांनी जिंकलेल्या वसाहतीचा एक तुकडा देखील जर्मनीला परत देण्याला विरोध केला होता. त्या चर्चेच्या प्रसंगी लॉर्ड स्ट्राबोल्जी यांनी असे उद्‌गार काढले होते 'There is in the British Empire a country whose people desire to emigrate and do emigrate when they get the chance and that country is India, whose demands on the grounds of overcrowding are as legitimate as any one else's.'

पण वरील उद्गार काढल्याला दोन वर्षे लोटतात न लोटतात तोच तेच ब्रिटिश मुत्सद्दी जर्मनीला कोणत्या वसाहती परत द्याव्यात, याची काळजीपूर्वक चर्चा करीत आहेत. ज. गोएरिंग यांनी म्हटलेंच आहे 'The strengthening of the military force and determination of Germany has altered the conditions which made possible the colonial injustice of Versailles and Geneva.'

## चेंबरलेनसाहेबांचें धोरण

वास्तविक पाहता आज जर्मनीला वसाहतीचा प्रश्न सोडवून घेण्याची घाई नाही. जर्मनीच्या पुढचा आजचा तातडीचा प्रश्न म्हणजे जर्मन भाषा बोलणाऱ्या सर्व लोकांना परत जर्मन साम्राज्यांत आणणे व जर्मनीला पूर्वीप्रमाणें इस्तंबूलचा रस्ता खुला करून घेणे हा होय. नाझी पक्षाच्या परराष्ट्रीय खात्याचे प्रमुख हेर रोझेनबेर्ग यांनी ता. २८ ऑक्टोबर रोजी जर्मनीतील परराष्ट्रांच्या प्रतिनिधींना असें बजावले की, Germany could not recognise a European order until a genuine unification of Germans in one stable state had secured the protection of her blood. पण या महत्त्वाच्या प्रश्नाविषयीं इंग्लंडचे अधिकृत मत काय आहे, हें अद्यापि उघडकीस आलेलें नाही. स्वतः चेंबरलेनसाहेबांच्या एडिंबरो येथील भाषणावरून असा अंदाज निघतो की, जर्मनीने पूर्व व दक्षिण युरोपांतील प्रश्न कसेहि सोडवून घेतले तरी इंग्लंडने त्यांत हात घालण्याचे कांहीहि कारण नाही, असेच मुख्य प्रधानांचें मत आहे. लोकप्रवाद असा आहे की, याच धोरणाने लॉर्ड हॅलिफाक्स यांनी जर्मनीच्या पुढाऱ्यांबरोबर वाटाघाटी केल्या व ही गोष्ट परराष्ट्रमंत्री मि. एडन यांच्या कानांवर येतांच त्यांनी आपल्या जागेचा राजीनामा देऊन टाकला आणि या धोरणाचा फ्रान्सच्या मंत्र्यांबरोबर पुनर्विचार करण्याचे मुख्य प्रधानांनी आश्वासन दिल्यावरच तो परत घेतला !

## सगळें गाडें पुनः उलटलें

लॉर्ड हॅलिफाक्स यांच्याबरोबर झालेल्या वाटाघाटीत जर्मनीने राष्ट्रसंघांत परत येण्याच्या प्रश्नाचीहि चर्चा झाली होती. विजिगीषु राष्ट्रांना राष्ट्रसंघाकडून कोणताहि उपद्रव होणार नाही, अशी त्यांत सुधारणा झाल्यास राष्ट्रसंघांत पुनः प्रवेश करण्याची जर्मनीची तयारी आहे, असा त्या वाटाघाटींचा निष्कर्ष लॉर्ड हॅलिफाक्स यांनी काढला होता. पण मि. एडन यांनी राजीनामा देऊन तो परत घेतला व फ्रान्सचे मंत्री इंग्लंडबरोबर वाटाघाटी करण्यासाठी लंडनला जाणार आहेत, ही वार्ता जर्मनीत पसरतांच जर्मनीच्या पुढाऱ्यांचे मत बदलले. असें मतपरिवर्तन व्हावें, यासाठी सि. मुसोलिनी यांनीहि याच वेळी माकियाव्हेलीच्या

अनुयायाला शोभेल, अशा तऱ्हेचा एक डाव टाकला. ता. १९ नोव्हेंबर रोजी रोम येथील 'त्रिबूना' नांवाच्या पत्रांत त्या पत्राच्या पारिस येथील बातमीदाराचा 'फ्रान्स व इटाली यांचे परस्परसंबंध' या विषयावर एक लेख प्रसिद्ध झाला. त्यांत त्या लेखकाने म्हटले होते की दोन देशांची राज्यपद्धति सारखी असली म्हणजे तेवढ्याने त्या दोन देशांचे चिरस्थायी सख्य होतेच असे नाही; लोकसत्ताक राज्य व फॅसिस्ट राज्य या दोघांनाहि परस्परांशी सलोख्याने राहणे शक्य आहे व भविष्यकाळांतील संकटाकडे लक्ष देऊन फ्रान्स आणि इटाली यांनी परस्परांशी मैत्री करणे व ती टिकविणेच इष्ट आहे. या लेखाच्या अंती त्या लेखकाने म्हटले होते ' We can live in peace, without there being any need to love each other passionately or exchange serenades.'

प्रस्तुत लेख पाहतांच सर्वांनी स्वाभाविकपणेंच असा अंदाज केला की, सि. मुसोलिनी यांच्या प्रेरणेशिवाय कांही हा मजकूर प्रसिद्ध झालेला नाही. या कल्पनेने फ्रान्समधील बहुतेक साऱ्या प्रमुख पत्रांनी इंग्लड जसे आता जर्मनीशी बोलणे करीत आहे, तसे फ्रान्सनेहि आता इटालीशी बोलणे सुरू करावे अशा आशयाचे लेख लिहिले. हे सारे लेख प्रसिद्ध झाल्यावर सि. मुसोलिनी यांनी १९ नोव्हेबरचा 'त्रिबूना'चा अंक जप्त केला व त्या पत्राच्या पारिस येथील बातमीदाराला परत बोलाविले.

अशा रीतीने फ्रान्स पुनः एकवार इटालीशी तह करण्याला उत्सुक आहे, हे सि. मुसोलिनी यांनी जर्मनीच्या निदर्शनास आणून दिल्यानंतर जर्मनीने इंग्लंडचें सख्य संपादन करण्यापेक्षा इटालीशी असलेला सख्यसंबंधच अधिक दृढ करावा, असे म्हणणारा रिब्बेनट्रोप-गोएब्बेल्स यांचा पक्षच अधिक प्रबळ झाला व त्याप्रमाणें इटाली व जर्मनी या उभयतांत फिरून नव्या वाटाघाटी होऊन इटालीने राष्ट्रसंघ सोडावा आणि जर्मनीने आपण राष्ट्रसंघांत फिरून प्रवेश करणार नाही असें जाहीर करावे, असा त्या उभयतांचा संकेत ठरला.

या दोन्ही घोषणा ता. १२ डिसेंबर रोजी झाल्या. इटालीने जपानाशीं संधि केल्यापासून तो देश राष्ट्रसंघाबाहेर पडणार, हे निश्चित झाल्यासारखेंच होतें.

त्यामुळे सि. मुसोलिनी यांच्या घोषणेने इंग्लंडच्या मुत्सद्दी मंडळींना फारसें नवल वाटले नाही. पण जर्मनी कोणत्या अटीवर राष्ट्रसंघांत पुन्हा प्रवेश करण्याला तयार होईल, याच्या वाटाघाटी नुकत्याच झाल्या असल्याने जर्मनीच्या घोषणेचें मात्र त्यांना फार नवल वाटले.

—केसरी, ता. २८ डिसेंबर, १९३७.



# जर्मनीच्या राष्ट्रैक्याची स्थापना

शनिवार ता १२ मार्च रोजी जर्मनीचे नेते हेर हिटलेर यांनी ऑस्ट्रिया देशांत ससैन्य प्रवेश करून तो देश जर्मनीला जोडून टाकल्याचे जाहीर केलें. पारिसच्या तहाने धुळीला मिळविलेल्या जर्मन राष्ट्राला त्याचे पूर्वीचे स्थान परत मिळवून देण्याचें वचन देऊन जर्मनीच्या चॅन्सेलरचे पद प्राप्त करून घेतल्या-पासून हेर हिटलेर यांनी आतांपर्यंत जी अलौकिक कामगिरी करून दाखविली आहे, त्या साऱ्या कामगिरीवर त्यांच्या परवांच्या धाडसी कृतीने देदीप्यमान कळस चढविला आहे असे म्हणण्यांत यत्किंचित् देखील अतिशयोक्ति नाही. ऑस्ट्रिया देश वंशाने व भाषेने सर्वस्वी जर्मन असूनसुद्धा पारिसच्या तहाच्या वेळी दोस्त राष्ट्रांनी त्या दोन्ही देशाच्या एकीकरणाला प्रतिबंध करणारे एक कलम त्या तहांत घालून ठेविले होते. पुढे १९३१ साली जर्मनीचे तेव्हाचे चॅन्सेलर डॉ. ब्रुएनिग यांनी ऑस्ट्रिया व जर्मनी यांचे जकातखाते एक करण्याचा तह घडवून आणला असतां तो तह पारिसच्या तहा-विरुद्ध आहे, असा खोटाच गिल्ला करून इंग्लंड व फ्रान्स या राष्ट्रांनी जर्मनी व ऑस्ट्रिया यांना तो तह रद्द करणे भाग पाडले. जर्मनी व ऑस्ट्रिया यांच्या एकी-करणाला परराष्ट्रांचा इतका विरोध असल्यामुळे हेर हिटलेर यांनी योजलेल्या उपायाखेरीज इतर कोणत्याहि उपायाने या दोन्ही देशाचे एकीकरण इतक्या सत्वर आणि सुकर रीतीने घडवून आणणे अशक्य होते. जर्मन राष्ट्राच्या अंतस्थ राज-कारणांत परराष्ट्रांनी हात घालू नये, यासाठीच हेर हिटलेर यांना ऑस्ट्रियांत ससैन्य प्रवेश करावा लागला. पण तेवढ्यामुळे जर्मनी व ऑस्ट्रिया यांचे केवळ मिश्रण घडून आले आहे, त्यांचा अद्यापि एकजीव झालेला नाही, अशी जर कोणाची कल्पना झाली असेल तर ती सपशेल चुकीची आहे. फील्डमार्शल गोएरिंग यांनी आपल्या जोरदार भाषेत सांगितलेच आहे

"It is conceivable that Germany may go under but she will never permit herself to be torn asunder again.'

## यांत वचनभंग नाही

जर्मनी व ऑस्ट्रिया यांचे एकीकरण न्याय्य आणि अनिवार्य होते ही गोष्ट पुष्कळांना मान्य आहे. पण जर्मनीने ही गोष्ट वचनभंग करून अन्यायाने घडवून आणावयाला नको होती, इतकाच त्यांचा आक्षेप आहे. पार्लमेंटांत चेंबरलेनसाहेबांनीहि याच आशयाचे उद्गार काढले आहेत. ते म्हणतात 'ऑस्ट्रियाचें स्वातंत्र्य राखण्याचें जर्मनीने वचन दिले होते, ते वचन मोडून ऑस्ट्रियावर हल्ला करणे हें एखाद्या दरवड्याइतकेंच निंदास्पद कृत्य आहे.' टाईम्स पत्रानेहि म्हटले आहे 'Dr. Shushnigg the Austrian Chancellor yielded to the mailed fist brandished in the most open manner by a country which pledged itself to maintain Austrian independence.'

हे सारे आक्षेपक जर्मनीच्या विरुद्ध लोकमत कलुषित करण्याकरिता मुद्दामच खोटे बोलत आहेत, अशी शंका आली नसती तर त्यांच्या आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या अज्ञानाची कीवच आली असती. ता. ११-७-१९३६ रोजी झालेल्या करारनाम्याविषयी लिहितांना ४-९-३६ च्या 'केसरी' त मी लिहिलेंच होते की, या समेटाच्या बोलण्यांत डॉ. शूश्निग यांनी असा आग्रह धरला कीं, जर्मनीने ऑस्ट्रियाचे पूर्ण स्वातंत्र्य मान्य करावें पण जर्मनीचे वकील कांही केल्या या अटीला संमति देईनात; परतेशेवटी तहाच्या अटीत Independence या शब्दाच्या ऐवजी Full sovereignty हे शब्द घालण्याला हेर फॉन पापेन यांनी मोठ्या कष्टाने संमति दिली. या दोन शब्दांमधील फरक सर्व राजकारणी लोकांना माहीत आहे व केवळ चेंबरलेनसाहेबांनाच तो कळत नसल्यास हिंदुस्थानांतील संस्थानिकांजवळून तो त्यांनी शिकून घ्यावा.

## १९३६ च्या कराराचा परिणाम

१९३६ च्या करारनाम्यावर सही होतांच ऑस्ट्रियन सरकारने एक फर्मान काढून ऑस्ट्रियांतील वर्तमानपत्रांना जर्मन सरकारावर टीका करण्याला मनाई केली, लष्करांतून व दिवाणी खात्यांतून हिटलेरविरोधी अधिकाऱ्यांना काढून टाकले, ऑस्ट्रिया व जर्मनी या दोन्ही देशांची राज्यपद्धति एकसारखी करण्यासाठी ऑस्ट्रियन व जर्मन वरिष्ठ अधिकाऱ्यांची एक कमिटी नेमली व होर्स्टेनाउ व श्मिट या

जर्मनीच्या विश्वासांतील पुढाऱ्यांना मंत्रिमंडळांत घेतले. त्यानंतर ता. ३ ११-३६ रोजी ऑस्ट्रियन मत्रिमडळाची पुनर्घटना होऊन जर्मन सरकाराला अनिष्ट वाटणाऱ्या साऱ्या प्रधानांना काढून टाकण्यांत आले. या पुनर्घटनेनतर ऑस्ट्रियाचे तेव्हाचे प्रेसिडेट मिक्लास यांनी एक फर्मान काढून मंत्रिमंडळांतील जर्मन पक्षाचे प्रमुख होर्स्टेनाउ यांच्याकडे प्रेसिडेटची निवडणूक, रेफरेडमसंबंधीची सर्व व्यवस्था, कोणालाहि नागरिकत्वाचे हक्क देण्याचे अधिकार व सरहद्दीच्या प्रश्नाचा निकाल वगैरे खाती दिली. इतके सारे अधिकार हिटलेरच्या हस्तकांच्या हाती दिल्यानंतर ऑस्ट्रियाचे स्वातंत्र्य कुठे अस्तित्वात राहिले होते, हे समजणे दुष्कर आहे. याच अधिकारांपैकी रेफरेडमच्या अधिकारांत गैरसनदशीर रीतीने ढवळाढवळ केल्यामुळे हेर हिटलेर यांनी डॉ. शूश्निग याना राजीनामा द्यावयाला लाविले.

वास्तविक पाहता ता. ११-७-३६ च्या तहापासून ऑस्ट्रियन सरकाराची परिस्थिति अत्यंत अवघड झाली होती. कारण त्या तहात आपण जर्मन राष्ट्राचेच एक भाग आहोत व ऑस्ट्रियाच्या अंतर्गत राजकारणाव्यतिरिक्त इतर सर्व बाबतीत आम्ही जर्मनीशी सहकार्य करावयाला सिद्ध आहोत, असे आश्वासन ऑस्ट्रियन सरकाराने जर्मनीला दिले होते. 'Moral union as much as you like, but no political union' हे ऑस्ट्रियन सरकाराचे ब्रीदवाक्य झाले होते. पण असला दुतोंडीपणा सामान्य जनतेला कळतहि नाही व पटतहि नाही. ऑस्ट्रियाच्या सरकाराने हिटलेरपुढे लोटांगणे घालावीत पण एकाद्या ऑस्ट्रियन इसमाने चोरूनमारून Mein Kampf ची प्रत मिळविली तर त्याच सरकाराने त्याला तुरुंगांत टाकावे, हा न्याय साध्यासुध्या लोकांना न कळला तर त्यांत नवल काय ! हेर हिटलेर यांचा हा ग्रंथराज ऑस्ट्रियांत आणण्याला १९३७ च्या जुलैमध्ये ऑस्ट्रियन सरकाराने परवानगी दिली व त्याबरोबर त्या ग्रंथाची कोणीहि स्तुति करूं नये, किंवा निंदाहि करूं नये, दुकानदारांनी तो ग्रंथ प्रमुख ठिकाणी ठेवून लोकांची दृष्टि वेधूं नये किंवा त्याची जाहिरातहि देऊ नये, असे हुकूम काढले. असल्या हुकुमांनी देशांतील लोकांमध्ये सरकाराचे वजन वाढते कां कमी होतें, हें कोणालाहि कळून येण्यासारखें आहे.

## ऑस्ट्रियन नाझींवर सूड

असलाच आणखी एक आचरट प्रकार त्याच जुलै महिन्याच्या अखेरीला घडून आला. त्या वेळी जर्मनीमध्ये ब्रेस्लाउ या शहरीं आखिल जर्मनीची संगीत-परिषद भरली होती. या परिषदेसाठी वीस हजारांहून अधिक आस्ट्रियन लोक जर्मनीला गेले होते. या परिषदेच्या प्रसंगी ऑस्ट्रियन लोकांना हेर हिटलेर यांचें प्रथमच दर्शन झाले व ऑस्ट्रियन प्रतिनिधींनी अत्यंत उत्साहाने त्यांच्याविषयींचें आपले प्रेम व्यक्त केलें. ऑस्ट्रियन प्रतिनिधींच्या या हृदयाविष्करणाचा जर्मनीच्या नेत्यांच्या मनावर काय परिणाम झाला, ते सांगावयाला नकोच. हे प्रतिनिधि जर्मनीहून परत येतांच ऑस्ट्रियन सरकाराने त्या सर्वांना सरहद्दीवर अडवून त्यांची झडती घेतली व जर्मनीहून आणलेले सारे कागदपत्र जप्त करून मगच त्यांना स्वस्थानीं जाऊं दिले. जर्मनीशी कराव्या लागणाऱ्या सहकार्याचा सूड ऑस्ट्रियांतील प्रजाजनांवर उगवावयाचा, हा ऑस्ट्रियन सरकारचा नियमच होऊन बसला होता. असल्या प्रकारामुळे हेर हिटलेर हे ऑस्ट्रियन सरकारावर इतके संतापून गेले होते कीं, जर्मनीचे माजी युद्धमंत्री मार्शल ब्लोबेर्ग यांनी ब्यूडापेस्ट येथे एकदा बोलून दाखविले 'I dare not pronounce the word Austria, before the Fuehrer.'

## हेर फॉन पापेनचा राजीनामा परत

या वेळी हेर हिटलेर हे ऑस्ट्रियन सरकारावर जितके संतापून गेले होते, तितकेच ऑस्ट्रियांतील नाझी पक्षाचे अनुयायी हेर हिटलेर यांच्यावर रुष्ट झाले होते. जर्मनीला ऑस्ट्रियांतील नाझी पक्षावर होणारा जुलम थांबविता येत नसला तर ऑस्ट्रियातील नाझी पक्ष हा जर्मन नाझी पक्षापासून विभक्त करावा व ऑस्ट्रियांत फिरून एकवार अत्याचारांची मोहीम सुरू करावी असा या वेळी ऑस्ट्रियांतील जहाल नाझींचा विचार होऊं लागला. ऑस्ट्रियन नाझी पक्ष अशा प्रकार जर्मनीपासून विभक्त होऊं नये यासाठी हेर हिटलेर यांनी नेमलेले ऑस्ट्रियन नाझी पक्षाचे पुढारी कॅ. लेओपोल्ड यांनी ताबडतोब सरकारविरोधी चळवळ सुरू केली. पण त्यामुळे जर्मनीचे ऑस्ट्रियांतील वकील हेर फॉन पापेन यांना ऑस्ट्रियन सरकाराशी सलोख्याने वागणे अशक्य होऊन त्यांनी आपल्या अधि

काराचा राजीनामा दिला. त्यावेळीं हेर फॉन पापेन यांना परत बोलावणें म्हणजे आदल्या वर्षीच्या तहाने मिळालेल्या साऱ्या अधिकारांवर आपल्या हाताने पाणी सोडणें अशी परिस्थिति असल्याने हेर हिटलेर यांनी कॅ. लेओपोल्ड यांना सक्तीचे हुकूम पाठवून नाझी पक्षाच्या चळवळीला आळा घातला व हेर फॉन पापेन यांना आपला राजीनामा परत घ्यावयाला लावलें. याच वेळी डॉ. शूश्निग यांनी हेर फॉन पापेन यांच्या सल्ल्याप्रमाणे आपल्या मंत्रिमंडळाची पुनर्घटना करून डॉ. साइस इनूक्वार्ट व हेर पेम्बौएर या दोघां ऑस्ट्रियन नाझींना प्रधानांच्या जागा दिल्या. हेर फॉन पापेन यांनी ही दोनहि नांवे अशी शोधून काढली होती की, जर्मनीच्या अगदी कट्टया शत्रूंनी देखील त्या वेळीं उद्गार काढले आहेत 'या दोन्ही प्रधानांचे स्वभाव सौम्य आणि विचारी आहेत व त्यांची कर्तबगारी आणि महत्त्वाकांक्षा अगदी मर्यादित आहेत, तेव्हा त्यांच्या नेमणुकीमुळे ऑस्ट्रियाचे कांही अनिष्ट होईल अशी भीति बाळगायला नको.' असल्या गोगलगाईसारख्या गरीब हस्तकांच्या मार्फत अर्वाचीन परराष्ट्रीय राजकारणांतील सर्वांत अवघड कारस्थान यशस्वी करून दाखविल्याबद्दल हेर फॉन पापेन यांची स्तुति करावी तितकी थोडीच आहे.

## बेकारांच्या संख्येंत भर

ऑस्ट्रियन मंत्रिमंडळांत डॉ. साइस इनूक्वार्ट यांचा प्रवेश झाल्यावेळेपासून डॉ. शूश्निग यांनी जर्मनीच्या सर्व शत्रूंबरोबर कारस्थाने आरंभिली. गेल्या नोव्हेंबरच्या अखेरीला ऑस्ट्रियाचे अर्थमंत्री इंग्लंडला गेले व त्यांनी इंग्लंडकडून आर्थिक मदतीची आश्वासने मिळविली. या वेळी ऑस्ट्रियन सरकाराला खरोखरीच पैशाची अतिशय गरज होती. कारण जर्मनीने ऑस्ट्रियाकडून लागेल तितका माल विकत घेतला होता, पण त्या मालाचे पैसेच थकविले होते. यामुळे ऑस्ट्रियाला आपला जर्मनीशी असलेला निर्यात व्यापार निम्याने कमी करावा लागला व त्यामुळे देशातील बेकारांच्या संख्येत अधिक भर पडली. गतवर्षीच्या सप्टेंबरमध्येच पासष्ट लक्ष लोकसंख्येच्या ऑस्ट्रियांत सुमारें सात लक्ष बेकार होते व वर्षाअखेरीला त्यांची संख्या बहुधा दोन लक्षांनी वाढली असावी. याच वेळीं जर्मनीमध्ये सरकारी अधिकाऱ्यांच्या सांगण्याप्रमाणें

एकहि बेकार नव्हता व लंडन टाइम्सच्या अंदाजाप्रमाणे सुमारे पांच लक्ष बेकार होते. या आंकड्यांवरून असे दिसून येते की जर्मनीची लोकसंख्या ऑस्ट्रियाच्या दहापट असून सुद्धा त्या देशांतील बेकारांची संख्या ऑस्ट्रियांतील बेकारांच्या निम्म्याइतकीच होती. सारा ऑस्ट्रिया देश याप्रमाणे बेकारीच्या बकासुराला बळी पडत असतां १० डिसेंबर रोजी अशी बातमी प्रसिद्ध झाली की, ऑस्ट्रियन सरकाराने महायुद्धांत पंगू झालेल्या सैनिकांना इतःपर मदत करावयाची नाही असे ठरविले आहे व त्याचप्रमाणे माजी ऑस्ट्रियन राज-घराण्याला त्यांच्या इस्टेटीचा बराच मोठा भाग परत द्यावयाचे ठरविले आहे. सरकारी रीत्या प्रसिद्ध झालेली ही बातमी वाचून त्या देशांत किती तीव्र लोकक्षोभ झाला असेल व त्याचा नाझी लोकांनी कसा फायदा घेतला असेल याची कोणालाहि कल्पना करतां येईल. अशा रीतीने अनाथपंगू लोकांच्या तोंडचा घास काढून घेऊन त्या पैशाच्या जोरावर राजपक्षियांनी Iron Legion नांवाची स्वयंसैनिकांची सेना उभारली. डॉ. शूश्निग यांचा हा नवा डाव पाहून नाझी अत्यंत क्षुब्ध झाले व त्यांनी या राजपक्षियांच्या सर्व सभा मारामाऱ्या करून मोडून टाकल्या. तेव्हा नाझी पक्षाच्या या अत्याचारांचे निमित्त सांगून डॉ. शूश्निग यांनी सर्वत्र नाझीपक्षियाची धरपकड सुरू केली. एकट्या ग्राझ शहरीच सहा लष्करी अधिकाऱ्यांना अटक झाली. खुद्द व्हिएन्ना राजधानीत सैनिक व अधिकारी मिळून चाळीस जणांना तुरुंगांत टाकले. सरते शेवटी हेर ट्वास नांवाच्या एका प्रमुख नाझी पुढाऱ्याला व्हिएन्नाच्या पोलिसांनी पकडून नेले व स्वतः कॅ. लेओपोल्ड यांनाहि चौकशीसाठी पोलिसठाण्यावर नेण्यांत आले. हा प्रकार ता. २६ जानेवारी रोजी घडला व २८ तारखेला हेर हिटलेर यांच्या हुकुमावरून हेर फॉन पापेन यांनी बर्लिनला प्रयाण केलें.

## राज्यक्रांतीची पूर्वतयारी

यापूर्वीच ऑस्ट्रियांत कांही तरी नवीन घडामोड करण्याचा हेर हिटलेर यांचा संकल्प ठरला असावा, असे अनुमान करण्याला आधार आहे. ऑस्ट्रियाचे परराष्ट्रमंत्री डॉ. श्मिट हे नोव्हेंबरच्या प्रारंभी जर्मनीला गेले होते. तेथून परत आल्यावर ता. ९ नोव्हेंबर रोजी त्यांनी प्रसिद्ध केलें ‘ The pact of July

1936 was working well and a yet more favourable development was expected in the future.' या पत्रकाला जर्मनीने एका निमसरकारी पत्रकाने उत्तर दिले 'Time and again attempt had been made from abroad to separate Austria from the Reich on the pretence that she was threatened by Germany. Seen from Berlin it seemed that it should not be so difficult to achieve a normal state of affairs which would meet to the full the needs of the Reich, Austria and the whole German nation.' यावेळी जर्मनीला ऑस्ट्रियाचे अडीच कोटि मार्कांचे देणे झाले होतें व त्या प्रश्नाची चर्चा करण्याच्या निमित्ताने हेर हिटलेर यांचे आर्थिक सल्लागार हेर केप्लेर १२ नोव्हेंबर रोजी व्हिएन्ना येथे आले. या प्रवासांत मिळालेल्या माहितीवरून त्यांना असे दिसून आले की, ऑस्ट्रिया देशात राज्यक्रांति घडवून आणण्याला अतिशय अनुकूल परिस्थिति उत्पन्न झाली आहे हेर केप्लेर यानी व्हिएन्नाहून आणलेल्या माहितीवरून हेर हिटलेर यांची ऑस्ट्रिया देश जर्मनीला जोडून टाकण्याची मनीषा अधिकच बळावली. पण त्यावेळी जर्मनीचे अर्थमंत्री डॉ. शाख्ट, युद्धमंत्री मार्शल ब्लोबेर्ग व परराष्ट्रमंत्री बॅरन फॉन नायराट या सर्वांचा या योजनेला विरोध असल्याने त्याना ती इच्छा तात्पुरती दडपून ठेवावी लागली. पुढे जानेवारीत डॉ. शाख्ट व फेब्रुवारीत मार्शल ब्लोबेर्ग व बॅरन फॉन नायराट हे अधिकारभ्रष्ट झाले व हेर हिटलेर यानी आपली आवडती योजना अमलांत आणण्याचें ठरविले.

यावेळी आंतरराष्ट्रीय परिस्थितिहि असली धाडसाची योजना अमलांत आणण्याला अतिशय अनुकूल होती. फ्रान्समध्ये रॅडिकल पक्षाचे एक लळेपांगळें मंत्रिमंडळ अस्तित्वांत आले होते व साऱ्या देशभर साम्यवादी व राजसत्तावादी हे दोन्ही पक्ष यादवीयुद्धाची तयारी करीत होते. इटालीची सैन्यें ॲबिसीनिया, लिबिया व स्पेन या तीन ठिकाणी वांटली गेली असल्याने १९३४ सालाप्रमाणें जर्मनीला विरोध करण्याची त्या देशालाहि शक्ति उरली नव्हती. कोणाहि राष्ट्राच्या वाढत्या सामर्थ्याला विरोध करण्यामध्ये नेहमी इंग्लंड पुढाकार घेत आलें आहे; पण सध्या साऱ्या युरोपखडांत अंतःकोपाने ग्रस्त झालेल्या फ्रान्स

देशाखेरीज इंग्लंडला कोणीहि मित्र उरलेला नाही. यामुळे इंग्लंडला स्वतःच्या सुरक्षिततेची काळजी लागली आहे. यासाठी अलीकडे इंग्लंडने आलटून पालटून जर्मनी व इटाली या दोन्ही देशांशीं सख्यसंबंध जोडण्याची खटपट चालविली आहे. आपले वैभव टिकविण्यासाठी जर्मनी व इटाली या देशांची मनधरणी करतांना इंग्लंडला पाहिलें म्हणजे आपले वैभव राखण्यासाठी गोनेरिल आणि रेगन या राक्षसी कन्यांची विनवणी करणाऱ्या शेक्सपीअरच्या लीयर राजाची आठवण होते.

## डॉ. शूश्निग यांस धमकी

याप्रमाणे एकंदर परिस्थिति अनुकूल असलेली पाहून हेर हिटलेर यांनी हेर फॉन पापेन यांच्या मार्फत ऑस्ट्रियाचे चॅन्सेलर डॉ. शूश्निग यांना आपल्या भेटीला येण्याबद्दल सक्तीचें निमंत्रण पाठविले. त्याचवेळी जर्मनीचे नवे परराष्ट्र-मंत्रि हेर फॉन रिब्बेनट्रोप यांनी इटालीचे परराष्ट्रमंत्रि काउंट चियानो यांना टेलि-फोन करून कळविले ‘ The best possible time has already arrived. The effect of a German coup in Austria will be to scare the British to the point where they will certainly be willing to make large concessions to Italy. ’ यामुळेच सि. फारिनाची या प्रसिद्ध फॅसिस्ट पुढाऱ्याने ‘रेजिमे फाशिस्ता’ या इटालियन पत्रांत लिहिले ‘ There is nothing genuine in British advances towards Italy. They are merely the sequel to the latest events in Germany.’ एकंदर परि-स्थिति पाहून ऑस्ट्रियन चॅन्सेलरानी हेर हिटलेर यांचे निमंत्रण स्वीकारले व ता. १२-२-३८ रोजी त्यांनी बेर्श्टेसगाडेन येथे हेर हिटलेर यांची भेट घेतली. या मुलाखतीच्या वेळी ऑस्ट्रियाच्या वतीने डॉ. शूश्निग व डॉ. श्मिट हे दोघेच मुत्सद्दी होते व त्यांत देखील डॉ. श्मिट यांना जर्मनीने आधीच आपल्या पक्षाला वळवून ठेविलें होतें. जर्मनीच्या वतीने हेर हिटलेर, हेर फॉन रिब्बेनट्रोप, हेर फॉन पापेन, जनरल राइशेनाऊ हे सारे पुढारी हजर होते. ही मुलाखत ११ तास चालली होती. या मुलाखतीत कशा तऱ्हेने बोलणी झालीं, याचे वर्णन करतांना टाइम्सचा व्हिएन्नाचा बातमीदार म्हणतो

' Shushnigg was called a murderer and traitor, because he had had the men executed who killed his predecessor Dollfuss. He was told to liberate all Nazi prisoners, including some who had helped to kill Dollfuss and had plotted against his own life, to give the Austrian Nazis political liberty and to hand-over the Austrian police to a nominee of Hitler, Arthur von Seyss–Inquart. '

याशिवाय ऑस्ट्रियाच्या मुख्य सेनापतीला काढून टाकणे व ऑस्ट्रियाच्या युद्धखात्याने जर्मनीच्या युद्धखात्याशी पूर्ण सहकार्य करणे या इतर अटी होत्या. या साऱ्या अटी डॉ शुश्निग यांनी ताबडतोब मान्य केल्या नाहीत, पण व्हिएन्ना येथे परत गेल्यावर प्रेसिडेंट मिक्लास यांच्याशी वाटाघाटी करून मग मान्य केल्या.

## चेंबरलेनचा खुलासा

या वाटाघाटीची वार्ता पारिस येथे कळल्यावर फ्रेंच परराष्ट्रमंत्री मो. देल्बो यांनी आपल्या लंडन येथील वकिलामार्फत इंग्लंडकडे पुढील आशयाची मागणी केली ' England was asked to join in a declaration that she and France would not tolerate any more accomplished facts in Central Europe and any further encroachment on Austrian sovereignty. ' अशा प्रकारचा खलिता जर्मनीकडे पाठविण्याला मि. एडन हे अनुकूल होते, पण या प्रश्नाचा निर्णय लागण्यापूर्वीच इटालीचे वकील काउंट दिनो ग्रांदी यांच्या कारस्थानामुळे मि. एडन याना राजीनामा द्यावा लागला व त्यानंतर नवीन परराष्ट्रमंत्रि नेमण्याला उशीर झाल्यामुळे इंग्लंडला ऑस्ट्रियाच्या राजकारणाकडे लक्ष देण्याला सवड झाली नाही. सरतेशेवटी २८ फेब्रुवारीला चेंबरलेनसाहेबांनी पार्लमेंटांत खुलासा करताना सांगितले की ऑस्ट्रिया व जर्मनी यांच्या चॅन्सेलरांच्या मुलाखतीने कोणत्याहि तहाची कलमे मोडली आहेत, असे आम्हांला वाटत नाही व त्यामुळे ब्रिटिश सरकाराने त्या देशाच्या परस्परसंबंधात ढवळाढवळ करण्याजोगी परिस्थिति उत्पन्न झाली आहे, असे मानण्याचे काहीहि कारण नाही.

## डॉ. शूश्निग यांची अखेरची धडपड

मि. चेंबरलेन यांच्या या पोचट खुलाशामुळे डॉ. शूश्निग यांची पराकाष्ठेची निराशा झाली. या वेळेपर्यंत त्यांना अशी अर्धवट आशा वाटत होती की ऑस्ट्रियाचे स्वातंत्र्य टिकावे, यासाठी इंग्लंड व फ्रान्स ही दोनहि राष्ट्रे काही तरी प्रयत्न केल्यावांचून राहणार नाहीत. हा शेवटचा आशातंतु तुटल्यावर त्यांनी ऑस्ट्रियाच्या स्वातंत्र्याच्या प्रश्नावर सर्व जनतेची मते घ्यावीत व स्वदेशांतील लोकमताच्या जोरावर जर्मनीला शक्य तितका विरोध करावा, असा संकल्प केला. बेर्श्टेसगाडेन येथील मुलाखतीत ऑस्ट्रियन चॅन्सेलरांचा जो असह्य अपमान झाला होता, त्याने सर्व ऑस्ट्रियन जनतेला धक्का बसला होता व शिवाय सामान्य लोक नेहमीच पुराणप्रिय असल्यामुळे नाझी पक्षाच्या हातात ऑस्ट्रियाचे भवितव्य देण्याच्या विरुद्धच त्यांची मते पडतील, अशी डॉ. शूश्निग यांची अपेक्षा होती. या जनमताच्या नोंदणीच्या जाहीरनाम्यात चालू वर्षी ऑस्ट्रियात सार्वजनिक उपयुक्ततेची कामे सुरू करून बेकारांना काम मिळवून देण्याचीहि डॉ. शूश्निग यांनी लालूच दाखविली होती. त्याचप्रमाणे नाझी पक्षाला लोकमताचे परिवर्तन घडवून आणण्याला अवकाश मिळू नये, याकरिता मते घेण्याची तारीखहि शक्य तितकी जवळची ठेवण्यात आली होती.

डॉ. शूश्निग यांची मतनोंदणीची घोषणा प्रसिद्ध होण्यापूर्वी व ऑस्ट्रियातील नाझीपक्षियांनी आपल्यावरील सर्व निर्बंध दूर व्हावेत, यासाठी चळवळ सुरू केली होती. पण ता. ३ मार्च रोजी भरलेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत निर्बंध उठविण्याच्या विरुद्ध बहुमत असलेले आढळून आले. तेव्हा डॉ. साइस इनक्वार्ट यांनी गृहमंत्रि या नात्याने स्वस्तिक चिन्ह धारण करणे, जर्मन राष्ट्रगीत म्हणणे, हिटलेरचा जयघोष करणे किंवा नाझी पद्धतीप्रमाणे प्रणाम करणे या अपराधांबद्दल कोणालाहि अटक करूं नये, असा हुकूम काढला. हा हुकूम निघाल्यानंतर चारच दिवसांनी डॉ. शूश्निग यांचा सार्वत्रिक मतनोंदणीचा जाहीरनामा बाहेर पडला व ऑस्ट्रियांत एकदम यादवीयुद्धाला अनुकूल अशी परिस्थिति उत्पन्न झाली आणि देशांत सर्वत्र हिटलेर व शूश्निग या उभयतांच्या अनुयायांच्या मारामाऱ्या सुरू झाल्या.

## शेवटचा निर्वाणीचा खलिता

डॉ. शुश्निग यांनी एकाएकी जनतेचा कौल घेण्याचे ठरविल्याने हेर हिटलेर यांना क्षणभर गोंधळांत पडल्यासारखे झाले. यामुळे त्यांनी प्रथम फक्त सार्वत्रिक मतनोंदणी तहकूब करण्याचा खलिता डॉ. शुश्निग यांच्याकडे पाठविला. पण ही मागणी व्हिएन्नांतील परिस्थिति समक्ष पाहून आलेले आर्थिक सल्लागार हेर केप्लेर व जर्मनीचे धाडसी परराष्ट्रमंत्री हेर फॉन रिब्बेनट्रोप या उभयतांना पुरेशी वाटली नाही. मुख्यतः या उभयतांच्या अत्याग्रहामुळे हेर हिटलेर यांनी हेर केप्लेर यांच्याच हस्ते दुसरा निर्वाणीचा खलिता पाठवून डॉ. शूश्निग यांनी अधिकारसंन्यास करावा व डॉ. साइस इन्क्वार्ट यांना चॅन्सेलरचे पद द्यावें, अशी मागणी केली. यानतरचा इतिहास सर्वांना माहीत आहेच.

ऑस्ट्रियांतील ताज्या घडामोडीमुळे भावी महायुद्ध आता अगदी नजीक येऊन ठेपले आहे, असा इषारा सर्व राष्ट्रांना मिळाला आहे. तेव्हा या भावी महायुद्धापासून आपला शक्य तितका फायदा करून घेण्याची आतापासूनच तयारी केली तरच हिंदी राष्ट्राचा तरणोपाय आहे. गेल्या महायुद्धाच्या वेळीं हिंदुस्थानाच्या वतीने लो. टिळकांनी दोस्त राष्ट्रांना पन्नास लक्ष लोकांची मदत देऊं केली होती. पण ही स्वयंसैनिकांची सेना त्यावेळी प्रत्यक्ष खडी नसल्यामुळे ब्रिटिश सरकाराने साहजिकच त्यांच्या साहाय्याचा अव्हेर केला. या उदाहरणावरून धडा घेऊन आपण जर १९४० सालापर्यंत कवाईत करायला व बंदूक चालवायला शिकलेल्या ५० लक्ष स्वयंसैनिकांची वाहिनी सज्ज केली तर कोणालाहि भावी महायुद्धाच्या वेळी हिंदुस्थानच्या साहाय्याकडे दुर्लक्ष करणे अशक्य होईल. आपल्या यंदाच्या राष्ट्राध्यक्षांना स्वयंसेवकांच्या सेनेचे व परराष्ट्रीय राजकारणांतील घडामोडीचें महत्त्व चांगले कळते. तेव्हा ते हा कार्यक्रम शक्य तितक्या लवकर हाती घेतील, तर पारतंत्र्याची निशा संपून स्वातंत्र्याचा सूर्योदय होण्याची प्रसादचिन्हे दिसूं लागली आहेत, असा भरंवसा हिंदवासियांना वाटूं लागेल.

—केसरी, ता. २५ मार्च, १९३८.



# ऑस्ट्रियाच्या प्रकरणांत इंग्लंडची जबाबदारी

ऑस्ट्रिया देश खालसा करण्याच्या प्रकरणांत जर्मनीला इंग्लंडचा पाठिंबा होता की नाही, या महत्त्वाच्या प्रश्नाचा थोडा खोल विचार करणे जरूर आहे. कारण या प्रश्नाचा निर्णय लागल्यावाचून इंग्लंडच्या आजच्या राजकारणाचे मर्म कळणे अशक्य आहे.

### इंग्लंडचा युरोपियन राष्ट्रांशीं संबंध

या प्रश्नाचा विचार करण्यापूर्वी इग्लंड युरोपखंडांतील राजकारणाच्या भानगडीत कां पडते, याचा थोडासा विचार केला पाहिजे. इंग्लंडचे माजी परराष्ट्र-मंत्रि सर ऑस्टेन चेंबरलेन यांनी युरोपखंडाच्या भानगडीत पडण्याची तीन कारणे सांगितली आहेत. ते म्हणतात

'The independence of the Low Countries is a Britsh interest, their frontiers are in fact our frontiers, their safety inseparable from our own.'

हे कारण सामान्यतः निरपवाद आहे व ते प्रस्तुत प्रकरणी लागू पडण्यासारखे नसल्याने त्याचा अधिक विचार करावयाचे कारण नाही. सर ऑस्टेन यांचे दुसरें कारण अधिक महत्त्वाचे आहे

'A deliberate and purposeful abstention from all part and interest in Continental affairs is the one course of policy which might provoke a European combination against us by driving France into the arms of Germany and causing both to heal their quarrels at our expense.'

सर ऑस्टेन यांच्या या सूत्रावरून असें दिसतें कीं फ्रान्सला नेहमी जर्मनीचें भय वाटत रहावे व जर्मनीपासून आत्मसंरक्षण करून घेण्यासाठी त्या देशाने नेहमी इंग्लंडवर अवलंबून असावे, अशा तऱ्हेची कारस्थानें इंग्लंड युरोपांत सदासर्वदा

करीत असतें. महायुद्धाच्या समाप्तीपासून लॉर्ड हॅलिफाक्स यांच्या बर्लिनच्या प्रवासापर्यंत इंग्लंडने जर्मनीला अनुकूल अशीं जीं जी कारस्थानें आजपर्यंत केलीं आहेत, त्या सर्वांचे रहस्य सर ऑस्टेन चेंबरलेन यांच्या वरील सूत्राने समजून येते. जर्मनीचे सामर्थ्य वाढले की फ्रान्सचे भय वाढेल आणि फ्रान्सचे भय वाढले की त्या देशांत इंग्लंडवर अवलंबन राहण्याचे धोरण अधिकाधिक लोकप्रिय होईल, असा इंग्लंडच्या चाणक्यांचा हिशोब आहे.

अलीकडे फ्रेंच मुत्सद्दी जर्मनीशी मिळते घेण्याचा प्रयत्न करीत होते. फ्रान्सचे जर्मनींतील वकील मो. फ्रान्स्वा पोन्से यांचे नुकतेंच एक भाषण झालें. या भाषणांत त्यांनी म्हटले आहे—

'Many visits have been interchanged between France and Germany in recent months. These visits have been so successful that we feel we are on the path, a feeling which gives us the necessary heart to take further steps forward.'

मो. फ्रान्स्वा पोन्से यांच्या कारस्थानाची अधिक माहिती ब्रिटिश परराष्ट्रीय खात्याला लागली असावी व त्यामुळे ऑस्ट्रिया खालसा करण्याच्या जर्मनीच्या महत्त्वाकांक्षेला त्यांनी आपले बर्लिन येथील वकील सर नेव्हिल हेंडर्सन यांच्यामार्फत आंतून दुजोरा दिला असावा, असा तर्क केल्यास तो चुकीचा ठरणार नाही. आणि त्याशिवाय ऑस्ट्रियाच्या प्रकरणांत इंग्लंडने जे डोळ्यावर कातडे ओढून घेतले होते, त्याची उपपत्तिहि लागत नाही.

## हिटलेरने उडविलेली धांदल

ता. २०-२-३८ रोजी हेर हिटलेर यांचे राइश्टागपुढे भाषण झालें. त्या भाषणांत त्यांनी जर्मनीबाहेरील एक कोटि जर्मन लोकांच्या हितसंबंधाचें संरक्षण करण्यासाठी आपण शक्य तितके सर्व प्रयत्न करणार असल्याचें जाहीर केलें. हें भाषण प्रसिद्ध होताच साऱ्या युरोपखंडांत एकच धांदल उडाली. फ्रेंच चेंबरमध्ये तर तीन दिवस त्या भाषणाची चर्चा झाली व फ्रान्सचे परराष्ट्रमंत्रि मो. देल्बो यांनी जाहीर केलें

'France affirms to-day that the Austrian independence is an indispensable element of European equilibrium.'

पुढे जर्मनीचे हेतु अधिकाधिक स्पष्ट दिसू लागले, त्याबरोबर पोलंडचे परराष्ट्रमंत्रि कर्नल बेक यांनी ता. ७ मार्च रोजी रोमला जाऊन सि. मुसोलिनी यांची भेट घेतली. अमेरिकेचे माजी प्रेसिडेंट हूव्हर हे या वेळी व्हिएन्ना व प्राग या संकटांत सापडलेल्या राजधान्यांतून कारस्थानें करीत होते. इतर किरकोळ राष्ट्रांच्या मुत्सद्दी मंडळीच्या तर तारांबळींचे वर्णनच करावयाला नको. अशा आणीबाणीच्या दिवसांत, जर्मनीचे उद्देश पूर्णपणे माहीत असलेल्या लॉर्ड हॅलिफाक्स यांनी काय केलें, तर ब्रिटिश वर्तमानपत्रांना जर्मनीला प्रतिकूल असा मजकूर न छापण्याबद्दल ताकीद दिली. वर उल्लेखिलेल्या साऱ्या हालचाली न दिसण्याइतके कांही ब्रिटिश परराष्ट्रखातें आंधळें नाही. तेव्हा हे आंधळेपणाचे सोंग त्या खात्याने जाणूनबुजूनच घेतले होते, असें म्हणणें भाग आहे.

## हॅलिफाक्स यांची कारवाई

जर्मनीने आपल्या लष्कराच्या जोरावर ऑस्ट्रियाला कोणत्याहि प्रकारें अनिष्ट अशा अटी मान्य करावयाला लावल्या, तर ते आम्ही इतःपर सहन करणार नाही, अशा आशयाचा खलिता इंग्लंड व फ्रान्स या उभयतांनी मिळून जर्मनीकडे पाठवावा, अशी फ्रान्सची मागणी चेंबरलेनसाहेबांनी ता. २८ फेब्रुवारी रोजी धुडकावून लाविली, हे मागील लेखांत सांगितलेच आहे. त्यानंतर हाती आलेल्या माहितीवरून असे कळते कीं, ऑस्ट्रियांत जर्मन सैन्य पाठविण्याचा हेर हिटलेर यांचा संकल्प लंडन येथील फ्रेंच वकील मो. कोर्ब्यां यांना कळताच इंग्लंड व फ्रान्स या उभयतांनी मिळून तात्काळ जर्मनीचा निषेध करण्याच्या प्रश्नाची वाटाघाट करण्यासाठी त्यांनी लगेच लॉर्ड हॅलिफाक्स यांची मुलाखत मागितली. तेव्हा लॉर्ड हॅलिफाक्स यांनी मो. कोर्ब्यां यांना सहा तास तिष्ठत बसविलें व जर्मनीचे सैन्य आस्ट्रियांत घुसल्यावर मगच त्यांनी फ्रेंच वकिलांना मुलाखत दिली आणि आता निषेधाची वेळ टळून गेली असें सांगून मो. कोर्ब्यां यांना चडफडत घालवून दिलें. फ्रान्सचे वकील याप्रमाणें तिष्ठत बसले असतां लॉर्ड

हॅलिफाक्स हे हेर फॉन रिब्बेनट्रॉप यांच्याशी कारस्थाने करीत बसले होते ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

## रशियाचा द्वेष, जर्मनीची मनधरणी

ब्रिटिश परराष्ट्रखातें जर्मनीची मर्जी संपादण्यासाठी कोणतेंहि कृत्य करावयाला किती तत्पर असतें याचा एक अलीकडचा नमुना येथे सांगितला पाहिजे. गेल्या वर्षाच्या अखेरीला रशियानें इंग्लडला अशी सूचना केली की, युरोपांत जर्मनी रशियावर स्वारी करणार नाही, अशी हमी इंग्लंड देत असल्यास चीनमधून जपानला घालवून देण्याची रशियाची तयारी आहे. ही अत्यंत महत्त्वाची सूचना इंग्लंडला मान्य झाली नाही, इतकेंच नव्हे तर ब्रिटिश परराष्ट्रखात्यानें ती गुप्तहि ठेविली नाही. विलायतेतील 'डेली टेलिग्राफ' या पत्राचा ब्रिटिश परराष्ट्रखात्याशी अगदी निकटचा संबंध आहे आणि याच पत्रानें वरील कारस्थानांची बातमी प्रसिद्ध करून ती जर्मनीच्या कर्णी पडण्याची व्यवस्था केली. जपानचें चीनमध्यें साम्राज्य प्रस्थापित होणें हे रशियाचें चीनमध्यें साम्राज्य प्रस्थापित होण्याच्या मानानें ब्रिटिश हितसंबंधांना कमी घातक आहे, हा हेर हिटलेर यांचा सल्ला ब्रिटिशांना पूर्णपणे मान्य आहे, हे या प्रकरणावरून दिसून येते. शिवाय

'The stronger Russia becomes in Asia, the weaker will England become in India and the more accommodating in Europe.'

असे उद्गार एक नामांकित रशियन सेनापति जनरल स्कोबेलेफ यांनी काढले होते, त्याचीहि सत्यता इंग्लंडला पूर्णपणे पटलेली दिसते.

खुद्द ऑस्ट्रियाच्या प्रकरणांत देखील या डेली टेलिग्राफ पत्रानें कांही गूढ कारस्थानें केलीं आहेत. डेली टेलिग्राफचे व्हिएन्ना येथील बातमीदार मि. गेडी यांनी गेल्या उन्हाळ्यांत डॉ. शूश्निग यांची एक मुलाखत घेतली होती. या मुलाखतींत डॉ. शूश्निग यांनी नाझी पक्षाविषयी आपल्याला किती द्वेष वाटतो तें मि. गेडी यांना मोकळेपणानें निवेदन केले होते. ही महत्त्वाची मुलाखत डेली टेलिग्राफ पत्राच्या सूत्रचालकांनी यंदाच्या जानेवारीत प्रसिद्ध केली व त्याबरोबर साऱ्या जर्मन पत्रांनी डॉ. शूश्निग यांनी तावडतोब राजीनामा दिला पाहिजे, असा गिल्ला

करण्याला सुरुवात केली. त्यानंतरच हेर हिटलेर यांनी हेर फॉन पापेन यांना व्हिएन्नाहून बोलावून घेतले. या हकीकतीवरून ऑस्ट्रियाविरुद्ध उठावणी करण्यात ब्रिटिश परराष्ट्रखातें सामील झाले होते ही गोष्ट उघड होण्याजोगी आहे.

## अडीच वर्षांपूर्वीचें भाकित

भूमध्य समुद्रांतील इंग्लंडची सत्ता डळमळीत झाली कीं, इंग्लंड जर्मनी-ला ऑस्ट्रिया खाण्याला उत्तेजन देणार, असे भाकित मी पूर्वीच करून ठेविले होते. ता. ९-८-३५ च्या 'केसरीं'त आंग्लोजर्मन आरमारीतहाविषयी लिहितांना स्पष्टच म्हटले होते "फ्रान्स व इटाली या उभयतांचे आरमारवाढीकडे दुर्लक्ष व्हावें, यासाठी इंग्लंडला एकच उपाय योजतां येण्याजोगा आहे. तो म्हणजे जर्मनीला ऑस्ट्रियाशी जूट करण्याला उत्तेजन देणे हा होय. तसा आणीबाणीचा प्रसंग आला तर इंग्लड हाहि उपाय योजण्याला माघार घेणार नाही. यावरून असें दिसते की आजच्या आंग्लोजर्मन आरमारीतहामुळे उद्याच्या जर्मनी व ऑस्ट्रिया यांच्या एकीचा मार्ग सोपा होणार आहे." या कारणाचा थोडा अधिक खुलासा करणे जरूर आहे. सर ऑस्टेन चेंबरलेन यांनी युरोपखंडाच्या भानगडीत पडण्याचे तिसरे कारण सांगतांना म्हटले आहे

"We cannot afford to see Egypt and the Suez Canal dominated by another country, any more than the United States could tolerate the domination of the Panama Canal by a foreign power.'

आणि सध्या तर सुएझकालव्याच्या स्वामित्वासाठी इंग्लंड व इटाली या उभयतांमध्ये मोठी चुरस लागली आहे. इटालीचे लंडन येथील वकील काउंट दिनो ग्रांदी म्हणतात

'Can our population live and prosper in a territory half the size of Spain and Germany and pent up moreover in a closed sea beyond which its commerce lies, a sea the outlets of which are owned by other nations?'

सि. मुसोलिनी यांच्या परवाच्या भाषणावरून असे दिसते की, इजिप्तवर स्वारी करण्याचा विचार इटालीच्या नेत्यांच्या मनांत सध्या घोळत आहे. याकरिताच परस्परांना लागून असलेली राष्ट्रे ही निसर्गतःच परस्पराशीं वैर करतात, या राजनीतीच्या सनातन नियमावर विश्वास ठेवून इंग्लंडने इटाली व जर्मनी यांना एकमेकांजवळ आणण्याला मदत केली आहे. पण अलीकडील युद्धशास्त्राच्या प्रगतीमुळे आपल्या शेजाऱ्याबरोबर युद्ध करणें अत्यंत धोक्याचे होऊन बसले असल्यामुळे युद्धाचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेले इटाली व जर्मनी या देशांचे नेते परस्पराशी सध्याप्रमाणे सलोख्यानेच वागतील असे वाटते.

—केसरी, ता. १२ एप्रिल, १९३८.



# ऑंग्लो-इटालियन तह



इटालीचें स्वतंत्र राष्ट्र अस्तित्वांत आल्यापासून १९३५ सालापर्यंत इंग्लंड व इटाली या उभयतांचे संबंध सलोख्याचे होते. पण १९३५ साली अबिसीनियाच्या प्रकरणांत इंग्लंडला इटालीपुढे अनपेक्षित रीत्या माघार खावी लागली व तेव्हापासून या दोन राष्ट्रांच्या परंपरागत मैत्रीचें एकाएकी शत्रुत्वांत रूपांतर झाले आहे. या शत्रुत्वाच्या योगाने इंग्लंडच्या परराष्ट्रीय राजकारणांत पदोपदी विघ्नें उपस्थित होत असल्यामुळे मि. नेव्हिल चेंबरलेन यांनी आपण मुख्य प्रधान झाल्या दिवसापासून इटालीशी पुनः एकवार सख्य घडवून आणण्याचा संकल्प केला होता; तो संकल्प परवाच्या तहानें तडीस जाणार आहे की नाही, याचा या लेखांत विचार करावयाचा आहे.

### मत कसें बदललें ?

वास्तविक पाहतां इंग्लंडने आपण होऊन इटालीशी सख्य करण्याचा प्रयत्न करण्याची कल्पना देखील ब्रिटिश मुत्सद्दी मंडळीना प्रथम अपमानास्पद वाटत होती. १९३६ च्या सप्टेंबरमध्ये सर सॅम्युएल होअर यांनी मि. बायवाटर यांना दिलेल्या मुलाखतीत सांगितले होते

'Britain is determined to maintain in all circumstances and at all costs her position in the Mediterranean and to modernize and consolidate her naval, military, and air defences between Gibraltar and the Suez Canal in the light of recent experience. The British Government's technical advisers are satisfied that the development of air-power had neither revolutionized Mediterranean strategy nor endangered the position of the British Empire in the Mediterranean.'

पण ज्या युद्धशास्त्रज्ञांच्या मतांवर विश्वास ठेवून ब्रिटिश सरकाराने भूमध्य समुद्रांतील आपलें वर्चस्व कायम ठेवण्यासाठी विश्वप्रयत्न करावयाचे ठरविलें होतें,

त्यांचीं मतें गेल्या दीड वर्षांत पार बदलून गेली आहेत व त्यामुळे इंग्लंडचे सध्याचे युद्धमंत्री मि. होअर बेलिशा यांनी गेल्या मार्चमध्ये पार्लमेंटांत सांगितले

'There is now the complication to be faced in narrow seas (like the Mediterranean) at any rate, that we have had first, the development, of the submarine and then of aircraft.' या जाणिवेमुळेच आज इंग्लंडला इटालीची मनधरणी करणे आवश्यक झाले आहे.

१९३६ च्या अखेरीला स्पेनमधील राष्ट्रीय पक्षाच्या मदतीसाठी इटालियन सैन्य स्पेनमध्ये जाऊन उतरले व त्याचवेळी स्पेनच्या भूमध्यसमुद्रांतील बेटांपैकीं मिनोर्का बेटाखेरीज बहुतेक सारी बेटे त्या सैन्याने व्यापून टाकली. या अनपेक्षित घटनेमुळे भूमध्यसमुद्राचे प्रवेशद्वारच इटाली कायमचे बळकावून बसणार की काय अशी शंका ब्रिटिश सरकारला येऊं लागली. या शंकेचे निराकरण करण्यासाठी, स्पेनचा कोणताहि भाग कायमचा बळकावून बसण्याचा आपला इरादा नसल्याचें आश्वासन इटालियन सरकाराने ब्रिटिश सरकाराला दिले. तेव्हा ब्रिटिश सरकाराने हे आश्वासन लेखी मागितले. यावरून आणखी थोड्या वाटाघाटी होऊन २-१-१९३७ रोजी एका आंग्लो-इटालियन करारनाम्यावर दोन्ही राष्ट्रांनी सह्या केल्या. त्यात एक कलम असे आहे

'Both the Governments disclaim any desire to modify, or, so far as they are concerned, to see modified, the *Status quo* as regards national sovereignty of territory in the Mediterranean area.'

या तहाने तरी इटालियन सैन्य स्पेनला जाणे थांबेल, अशी इंग्लंडची कल्पना होती. पण या तहानंतर सि. मुसोलिनी यानी नाझी पक्षाचे मुखपत्र Voelkische Beobachter याच्या बातमीदाराला मुलाखत देऊन सांगितले 'The Government of Madrid must be defeated; for a Soviet in Spain will constitute an infringment of the *Status quo*.'

तहांतील अटीचा अर्थ लावण्याचें सि. मुसोलिनीचे हे कौशल्य पाहून ब्रिटिश राज्यकर्त्यांनीहि तहांतील अटी बाजूला ठेवून तुर्कस्थानाकडून स्मर्नाबंदरा-

शेजारचे एक बेट मिळवून सि. मुसोलिनी यांना सांगितलें की, आपला करार फक्त भूमध्यसमुद्रापुरताच आहे व या बेटाशेजारच्या समुद्राला एजियन समुद्र हें नांव आहे.

## परस्परांविरुद्ध डावपेंच

१९३७च्या जानेवारीतील करारनाम्याची अशी संभावना होण्याचें खरें कारण म्हणजे तो करार मुख्यतः स्पेनच्या ताब्यातील मोरोक्कोचा भाग जर्मनीने आपल्या घशांत घालूं नये, यासाठी घडवून आणलेला होता. हा करार प्रसिद्ध झाल्यापासून एका आठवड्याच्या आंत फ्रान्सने जर्मनीला स्पॅनिश मोरोक्कोमध्ये सैन्य न उतरविण्याची ताकीद दिली व इंग्लंड,फ्रान्स,इटाली ही तीनहि राष्ट्रें जर्मनीच्या विरुद्ध एकत्र झाल्यामुळे त्या वेळी जर्मनीला आपला अपमान गिळून स्वस्थ बसावें लागलें. या प्रकरणानंतर जनरल गोएरिंग यांनी स्वतः रोमला जाऊन सि. मुसोलिनीची मुलाखत घेतली व इंग्लंड आणि इटाली यांच्यामधील वैमनस्याच्या ज्वाला पुन्हा एकवार प्रज्वलित केल्या. या मुलाखतीनंतर सि. मुसोलिनी यांनी स्पेनमध्ये साठ हजार व लिबियामध्ये ऐंशी हजार सैन्य पाठविलें आणि अरब राष्ट्रांतून इंग्रजांच्या विरुद्ध द्वेष पसरविण्यास सुरुवात केली. याचें उट्टें काढण्यासाठी इंग्रजांनीहि हबशी लोकांना हत्यारे पुरवून अबिसीनियांतील इटालीचें साम्राज्य डळमळीत केलें.

## सलोख्याची पूर्वतयारी

इतक्या हकीकती घडून येईपर्यंत इंग्लंडच्या मन्त्रिमंडळांत बदल होऊन मि. नेव्हिल चेंबरलेन हे प्रधानमन्त्रि झाले. मि. चेंबरलेन याच्या हातीं अधिकार आल्यापासून त्यांनी ‘ येन केन प्रकारेण ’ इटालीशीं सख्य घडवून आणण्याचे प्रयत्न आरंभले. ता. १९-७-३७ रोजी प्रधानमंत्र्यांच्या प्रेरणेने परराष्ट्रमंत्रि मि. एडन यांनी इटालीला उद्देशून एक सलोख्याचें भाषण केलें. त्यानंतर आरमारमंत्रि मि. डफ कूपर यांनी त्याच भाषणाचा अनुवाद केला. मग इंग्लंडचे रोम येथील वकील सर एरिक ड्रमंड ( आता लॉर्ड पर्थ ) यांनी २७-७-३७ रोजी काउंट चियानोची लांबलचक मुलाखत घेतली. सरतेशेवटीं इटालीचे वकील काउंट ग्रांदी यांनी मुख्य प्रधानाची मुलाखत घेऊन त्यांना सि. मुसोलिनी यांचा स्नेहसंदेश

पोचविला. त्या संदेशाला प्रत्युत्तर म्हणून मि. नेव्हिल चेंबरलेन यांनी स्वदस्तूरचें पत्र सि. मुसोलिनी यांना पाठविले व सि. मुसोलिनी यांनी मि. नेव्हिल चेंबरलेन यांना परत पत्र लिहून तहाच्या बोलण्याचा मार्ग मोकळा करून दिला. अशा रीतीने गतवर्षी इंग्लंड व इटाली या उभयतांमध्ये तहाची बोलणीं सुरू करण्याची तयारी झाली.

## पुनश्च गैरसमज

पण या बोलण्यांना सुरुवात होण्यापूर्वीच इटालियन पाणबुड्या बोटींनी जनरल फ्रांकोच्या वतीने भूमध्य समुद्रांत इंग्लंडच्या बोटी बुडविण्याची मोहीम आरंभिली. या प्रकरणाचा सप्टेंबरमध्ये निकाल लागला, पण त्याच्या पाठोपाठ स्पेनमधील इटालियन सैन्य परत बोलावण्याच्या प्रश्नावर वाद उपस्थित झाला व आंग्लो-इटालियन तहाची बोलणी पुन्हा एकवार लांबणीवर पडली. या साऱ्या प्रकरणामुळे इंग्लंडचे परराष्ट्रमंत्रि मि. एडन यांचे मत इटालीविषयीं अधिकाधिक कलुषित होऊं लागले. उलटपक्षी इटालीच्या नेत्यांना अशी शंका येऊं लागली की, इंग्लंडला आपली युद्धाची सिद्धता संपूर्ण होईपर्यंत इटालीशी बोलणी करावयाचीच नाहीत. सि. गायदा यांनी जुलैमध्ये प्रश्न विचारला

'The British Empire is in a fury of armament. I ask against whom are all these preparations being made ?'

या युद्धसिद्धतेला तोंड देण्यासाठी सि. मुसोलिनी यांनी इजिप्तच्या सरहद्दीवर सैन्य जमविण्याला सुरुवात केली व वसाहतखात्याचे मंत्रिपद पुनः एकवार स्वतःकडे घेतले. इजिप्तच्या सरहद्दीवर इटालियन सैन्य जमत असलेले पाहून मि. एडन यांनी स्वाभाविकपणेच इटालियन सरकाराचा निषेध केला. त्याबरोबर सि. गायदा यांनी एडनसाहेबांना प्रत्युत्तर दिले

'Mr. Eden's stupid references to the dispatch of troops to Libia exhibited his sinister hatred of Italy.'

याशिवाय इटालीने रेडिओच्या द्वारे अरब लोकांमधून इंग्रजांच्या विरुद्ध जो प्रचार चालविला होता, त्याविषयींहि उभय राष्ट्रांत भांडण चालूच होती.

## इटालीच्या चढेल अटी

अशा परिस्थितीत ता. ३-१-३८ रोजी सि. गायदा यांनी 'बेर्लिनेर टागे-ब्लाट' या नामांकित जर्मन पत्रांत एक लेख लिहून इटालीच्या चार अटी जाहीर केल्या.

"Britain must display sincere desire for an understanding. Italy must be recognized with all her attributes including the Empire. Confidence and goodwill, lacking in the Spanish question, must be shown. The new historical realities must be frankly recognized.' पहिल्या अटीचा अर्थ असा होता की, मि. एडन हे इटालीचे शत्रु आहेत, त्यांना पदच्युत करून इटालीशी तह करण्याची आपली उत्सुकता इंग्लंडने इटालीला पटवून द्यावी. दुसऱ्या अटीचा अर्थ असा होता की अबिसीनियावरील इटालीचे साम्राज्य इंग्लडने मान्य करावे. तिसऱ्या अटीचा अर्थ असा की, इटालीने स्पेनमध्ये कांहीहि केले तरी युद्ध संपल्यानंतर इटालीची सैन्ये परत जातील, असा विश्वास बाळगून इंग्लंडने स्वस्थ बसावे. शेवटच्या अटीचा अर्थ असा होता की, भूमध्य समुद्रांत इंग्लंडने इटालीवर कुरघोडी करण्याचा प्रयत्न करू नये. या मागण्या प्रसिद्ध होऊन चार दिवस लोटतात न लोटतात तोंच इटालियन सरकारने ३५००० टनांची दोन ड्रेडनॉट जहाजें, १२ टेहेळणीची जहाजे व बऱ्याचशा पाणबुड्या बोटी बांधण्याला आपण सुरुवात केली असल्याचे जाहीर केले. या प्रसंगी सि. गायदा यांनी लिहिले

"Three or four years hence the nevy will contain 4 battleships of 35000 tons and 4 of 24000, 7 cruisers of 10000 tons and 12 of 5 to 8000 tons, 12 large scouts and 12 of about 2000 tons, and 20 large destroyers, 24 smaller, 32 torpedo boats and over 100 submarines. The African Empire must be linked to the mother country with safe instruments if it is to realise its unity with her.'

सि. गायदा यांनी प्रसिद्ध केलेल्या अटीविषयी इंग्लंडचे सरकारी किंवा निमसरकारीहि मत साऱ्या जानेवारी महिन्यांत प्रसिद्ध झाले नाही. तेव्हा इटालीने पुनः एकवार जनरल फ्रांको यांच्या वतीने ब्रिटिशांची व्यापारी जहाजे बुडविण्याचा उपक्रम आरंभिला.

## भांडवलवाल्यांचा आग्रह

याप्रमाणे इटालीशी सहकार्य करण्याचा प्रश्न कुजत पडला असतां ब्रिटिश भांडवलवाल्यांनी एकाएकी उचल घेऊन त्या प्रश्नाला पुन्हा तोंड पाडले. गेले वर्ष व्यापाराच्या दृष्टीने ब्रिटिश भांडवलवाल्यांना अतिशय लाभदायक झाल्याने यंदाच्या वर्षारंभी त्यांच्याजवळ खेळते भांडवल बरेच सांठले आहे व जपानने चीनविरुद्ध युद्ध आरंभिले असल्याने नवे भांडवल गुंतविण्याचे त्यांचे तिकडील क्षेत्र फार मर्यादित झाले आहे. यामुळे ब्रिटिश भांडवलवाल्यांनी परराष्ट्रांना कर्जे देण्यावरील निर्बंध सैल करण्याची आपल्या सरकाराला विनंति केली. ही विनंति ब्रिटिश सरकाराने मान्य केल्याचे १ फेब्रुवारीला सर जॉन सायमन यांनी जाहीर केले. त्याबरोबर इटालीत येणाऱ्या नवीन परदेशी भांडवलावर वीस वर्षेपर्यंत आपण कसलाहि कर बसविणार नसल्याचे सि. मुसोलिनी यांनी २ फेब्रुवारीला प्रसिद्ध केले. इटालीच्या या नव्या कायद्यामुळे त्या देशाशी ताबडतोब समेट करण्याची उपयुक्तता ब्रिटिश भांडवलवाल्यांना पटली व त्यांनी आपल्या सरकाराला तसा आग्रह करण्याला सुरुवात केली.

## जर्मनीचें कारस्थान

फेब्रुवारीच्या पहिल्या तारखेलाच इंग्लंडच्या सर्व प्रमुख सेनापतींची व युद्धशास्त्रज्ञांची एक गुप्त परिषद होऊन एकंदर साम्राज्याच्या लष्करी परिस्थितीची चर्चा झाली. या चर्चेचा निष्कर्ष असा निघाला की, इजिप्त, सुएझ कालवा आणि पॅलेस्टाइन हा भाग अत्यंत असुरक्षित आहे व हिंदुस्थानांत वाजवीपेक्षा जास्ती लष्कर निष्कारण ठेवले आहे, तेव्हा हिंदुस्थानांतील गोऱ्या सैन्याचे काळ्या सैन्याशी एकास दोन हे जें प्रमाण आहे, ते बदलून एकास तीन हें बंडापूर्वीचें प्रमाण फिरून एकवार अमलांत आणावें, म्हणजे सुमारे दोन डिव्हिजन गोरें सैन्य हिंदुस्थानांतून कमी करून पॅलेस्टाइनमध्ये ठेवतां येईल. आपल्या वरिष्ठ

सेनापतीचा हा निष्कर्ष ब्रिटिश सरकारच्या कानांवर येतांच त्यालाहि इटालीशी तह करण्याची आवश्यकता वाटूं लागली. याच आठवड्यांत हेर फॉन रिब्बेनट्रोप यांनी काउंट चियानो याना टेलिफोनवरून कळविले—

" The best possible time has already arrived. The effect of a German coup in Austria will be to scare the British to the point where they will be willing to make large concession to Italy. '

हेर फॉन रिब्नेनट्रोप यांच्या उपदेशाप्रमाणे काउंट चियानो यांनी काउंट ग्रांदी यांना ब्रिटिश सरकारापाशी ताबडतोब तहाची बोलणी सुरू करण्याचा आग्रह धरण्याचा हुकूम दिला.

या हुकुमाप्रमाणे काउंट ग्रांदी यांनी मि. चेंबरलेन यांच्यापाशी ताबडतोब तहाची बोलणी सुरू करण्याची मागणी केली व ती चेंबरलेनसाहेबांनी मान्यहि केली. पण अशी बोलणी करण्याला स्वतः परराष्ट्रमंत्री अगदी प्रतिकूल होते. मि. एडन यांच्या विरोधी वृत्तीची वार्ता काउंट ग्रांदी यांनी लगेच रोमला कळविली. त्याबरोबर ११ फेब्रुवारीच्या 'रेजिमे फाशिस्ता' पत्राच्या अकांत सि. फारिनाच्ची यांच्या सहीने मि. एडन यांनी राजीनामा द्यावा, अशी मागणी करणारा एक लेख प्रसिद्ध झाला. या लेखांत मि. मुसोलिनी यांच्या प्रेरणेने सि. फारिनाच्ची यांनी म्हटले होते—

' Our opinion will not change until London's foreign policy ceases to be directed by Mr. Eden. '

ही मागणी प्रसिद्ध झाल्यावर काउंट ग्रांदी यांनी चार-पांच दिवस तसेच जाऊं दिले आणि त्यानंतर त्यांनी एकट्या चेंबरलेनसाहेबांचीच मुलाखत मागितली. तोपर्यंतची इंग्लंडमधील वहिवाट अशी होती की, परराष्ट्रीय वकिलांनी परराष्ट्रमंत्र्यांच्याच तेवढ्या मुलाखती घ्याव्या. अगदी आणीबाणीच्या प्रसंगीसुद्धा कोणत्याहि परराष्ट्रीय वकिलाने परराष्ट्रमंत्र्यांचा अपमान करून एकट्या मुख्य प्रधानांची मुलाखत मागण्याचे साहस केले नव्हते. पण आता इंग्लंडला कठिण दिवस आले असल्याने काउंट ग्रांदीच्या साहसी मागणीला चेंबरलेनसाहेबांनी

रुकार दिला; तेव्हा मि. एडन यांनी आपला अपमान गिळून प्रधानमंत्र्यांना विनंति केली

'I request you not to commit the Government to anything specific during it.'

## एडन यांचा राजीनामा

तरीदेखील मि. एडन यांच्या सूचनेकडे दुर्लक्ष करून चेंबरलेनसाहेबांनी काउंट ग्रांदी यांना वचन नसले तरी असे आश्वासन दिले की स्पेनमधील इटालियन सैन्य काढून घेण्याचे तत्त्व इटालीच्या सरकारने मान्य केल्यास तहाची बोलणी सुरू करण्याला ब्रिटिश सरकार सिद्ध होईल. या मुलाखतीचा सारांश चेंबरलेनसाहेबांनी मि. एडन यांच्या कानांवर घातल्याबरोबर त्यांना प्रधानमंत्र्यांचा पराकाष्ठेचा राग आला व दुसरे दिवशी १९ तारखेला आपल्या अधिकाराचा त्यांनी राजीनामा देऊन टाकला. उलटपक्षी चेंबरलेनसाहेबांनी १९ तारखेला ब्रिटिश मंत्रिमंडळाची बैठक बोलावून कॅबिनेटची आपल्या धोरणाला संमति मिळविली व काउंट ग्रांदी यांना स्पेनमधील सैन्य काढून नेण्याच्या प्रश्नावर इटालियन सरकारचा अभिप्राय काय आहे याची चौकशी करण्याला सांगितले. इटालियन सरकाराने चेंबरलेनसाहेबांना हवे ते आश्वासन दिले. पण ती तार काउंट ग्रांदी यांनी एक दिवसभर तशीच दडपून ठेविली व २० तारखेला ब्रिटिश मंत्रिमंडळाने मि. एडन यांचा राजीनामा मंजूर केल्यावर दुसरे दिवशी ती चेंबरलेनसाहेबांना दाखविली.

## तहाच्या एकतर्फी अटी

मि. एडन यांची धोंड वाटेतून दूर झाल्यावर एकदाची तहाच्या बोलण्यांना सुरुवात झाली. ही बोलणी किती एकतर्फी होती, याचा एक नमुना येथे दाखविला पाहिजे. ॲबिसीनियाच्या युद्धाच्या वेळी इंग्रजांना आढळून आले कीं, आपला माल्टा येथील तळ अगदी असुरक्षित आहे. तेव्हापासून पूर्वभूमध्यसमुद्रांत नवीन आरमारी तळ बांधण्याचे ब्रिटिश सरकारच्या मनांत घोळत आहे. याच हेतूने गतवर्षी ब्रिटिश सरकाराने तुर्कस्थानाकडून एक बेट मिळविले व सायप्रस बेटावर तळ बांधण्याच्या योजनाहि तयार

केल्या. पण आंग्लो-इटालियन तहाची बोलणी सुरू होतांच इटालीने सांगितले की, पूर्वभूमध्यसमुद्रात किंवा त्याच्या शेजारच्या भागांत तुम्ही नवीन आरमारी व वैमानिक तळ बांधणार असला, तर आम्ही मुळी तहच करीत नाही. तेव्हा इंग्लंडने प्रथम उत्तर दिले की, पूर्वभूमध्यसमुद्रातील ऱ्होडस व लेरॉस येथील तळ मोडून टाकण्याला इटाली सिद्ध असेल तर आम्हींहि त्या भागांत नवीन तळ बांधणार नाही. पण इंग्लंडच्या सूचनेला इटालीने सपशेल नकार दिला आणि तहाची गरज इटालीपेक्षा इंग्लंडलाच अधिक असल्याने त्या राष्ट्राला मुकाट्याने इटालीचे म्हणणे मान्य करावे लागले.

## तहांत काय काय ठरलें ?

या तहांत इंग्लंडने एडन, सूडान, ब्रिटिश सोमालीलँड, केनिया, युगांडा, उत्तर टांगानिका इत्यादि भागांत आपण इटालीला कळविल्यावाचून सैन्याची वाढ करणार नाही किंवा तेथील राज्यव्यवस्थेतहि महत्त्वाचा फरक करणार नाही असे वचन दिले आहे. या मुलुखांच्या यादीत पॅलेस्टाइनचे नांव नाही, ही गोष्ट लक्षांत ठेवणे जरूर आहे. हिंदुस्थानांतील ब्रिटिश सैन्य कमी करून पॅलेस्टाइन हा प्रांत यापुढे आपल्या शिलकी सैन्याचे केंद्र करण्याचा ब्रिटिश सरकारचा पूर्ण निश्चय झाल्याचा हा पुरावाच आहे. पूर्वभूमध्यसमुद्र, तांबडा समुद्र व या दोन्ही समुद्रांलगतचे भाग यात इटालीच्या संमतीशिवाय नवीन आरमारी तळ न बांधण्याचेहि इंग्लंडने कबूल केले आहे. एडन प्रांतात इटालीला नवीन सवलती दिल्या आहेत. दक्षिण अरबस्थानांतील मुलुखाची, इंग्लंडच्या वर्चस्वाखालील क्षेत्र व इटालीच्या वर्चस्वाखालील क्षेत्र अशी वांटणी झाली आहे. अरबस्थानांत इंग्लंड व इटाली या दोन राष्ट्रांखेरीज इतर युरोपियन राष्ट्रांना हात घालूं देऊं नये असें ठरले आहे. या साऱ्या सवलतीच्या मोबदल्यांत इटालीने काय कबूल केलें आहे, तर आपण अरब लोकांत इंग्रजाचा द्वेष पसरविणार नाही, आफ्रिकेत नेटिव्ह लोकांचे सैन्य उभारणार नाही व लिबियांतील सैन्य क्रमाक्रमाने कमी करूं.

हिशेब करून पाहिले असतां असें दिसते की, इटालीचें जादा सैन्य लिबियांतून परत इटालीला जावयाला कमींतकमी दहा महिने लागतील. एडनजवळ

२३००० चौरस मैलांचा हाद्रामूतचा प्रांत इंग्लडने गतवर्षी खालसा केला आहे, त्या प्रांतावरील इंग्लडचें स्वामित्व इटालीने मान्य करावें व त्याच्या मोबदला अॅबिसीनियावरील इटालीच्या सत्तेला इंग्लडने राष्ट्रसंघाची मान्यता मिळवून द्यावी, अशी दरवडेखोरांमधील लुटीच्या वांटणीसारखी दिसणारी व्यवस्था या तहानें झाली आहे. इटालीने नीलनदीचें पाणी तोडूं नये व इटालीच्या इच्छेप्रमाणे अॅबिसीनियाची सरहद्द ठरवण्यासाठी, इंग्लंड, इजिप्त आणि इटाली या तीनहि राष्ट्रांच्या प्रतिनिधींची एक कमिटी नेमावी असेंहि एक कलम या तहांत आहे. सरते शेवटीं या तहाची कडू गोळी इंग्लडच्या जनतेला गिळणें सोपें जावें म्हणून इटालियन सैन्य आणि युद्धसामुग्री स्पेनमधून परत नेण्याचें एक कलम या तहांत घातलेलें आहे.

## इटालीची महत्त्वाकांक्षा अधिकच वाढेल

प्रस्तुत तहाचा कोणत्याहि दृष्टीनें विचार करून पाहिला, तरी त्यापासून इंग्लडचा फायदा होईल असें दिसत नाही. जनरल फ्रांकोच्या सरकाराबरोबर कसलाहि वाद उपस्थित न होतां गुण्यागोविंदानें इटालियन सैन्य परत गेलें तर स्पेन देश हा इटालीचा कायमचा ऋणी होऊन राहील व यापुढें जिब्राल्टरमधून इंग्रजांना हाकून लावण्यासाठी जर इटालीची पुनः एकवार मदत मागावीशी वाटली तर स्पेनला तशी मदत मागण्याचा संकोच वाटणार नाही. इटालीनें स्पॅनिश राष्ट्रीय पक्षाला लष्करी मदत करून स्पेनमध्यें जी प्रतिष्ठा मिळविली आहे, ती प्रतिष्ठा इटालीला सैन्य परत घ्यावयाला लावून आपण अगदी स्वस्तांत स्वतःला मिळवूं शकूं, ही चेंबरलेन-साहेबांची कल्पना सपशेल चूक आहे. जिब्राल्टरसारखा अति महत्त्वाचा स्पेनचा किल्ला इंग्लंडनें बळकावलेला नसता तर कदाचित् स्पेनला इंग्लंडविषयीं कृतज्ञता वाटली असती. इटालीला सवलती देऊन त्या राष्ट्राची मैत्री संपादण्याची कल्पनाहि वेडेपणाची आहे. अगदी विश्वसनीय माहि-तीवरून असें सांगतां येतें की, इटालीचे राजे व्हिक्टोर एमान्यूएल यांना इजिप्त आणि पॅलेस्टाइन हे देश आपल्या छत्राखालीं आलेले पाहण्याचा ध्यास लागला आहे आणि आपल्या भाग्यवंत सम्राटाची मनीषा पूर्ण करण्याची सि. मुसोलिनी यांना तळमळ लागून राहिलेली आहे. अशा परिस्थितींत इटालीला दिलेल्या सव-लतींनीं त्या देशाच्या राज्यकर्त्यांची महत्त्वाकांक्षा तृप्त न होतां ती अधिकच प्रदीप्त होईल.

—केसरी, ता. २६ एप्रिल, १९३८.

# रूसोजपानी युद्धाची प्रस्तावना

## जपानची कुरापत काढली

मांचूकुओच्या सरहद्दीवरील एका क्षुल्लक टेकडीच्या स्वामित्वाच्या प्रश्नावरून रशिया व जपान या उभयताच्या सीमारक्षक सैन्याची लढाई जुंपली असून त्या लढाईचे लौकरच रूसोजपानी युद्धात रूपातर होईल, अशी लक्षणे दिसत आहेत. १९३६ च्या अती जर्मनी व जपान या उभयतांनी रशियाविरुद्ध परस्परसहायाचा तह केल्यापासून जपान व रशिया यांमधील वैमनस्य सारखे वाढत चालले होते. त्यामुळे, रशियाला जपानशी लढणे कितपत शक्य आहे, याची चिकित्सा करण्यासाठी ता. ९-४-१९३७ च्या केसरीत मी एक लेखहि लिहिला होता. पण तो लेख लिहिल्यानंतर चार महिन्यांनी चिनीजपानी युद्धाला सुरुवात झाली व सायबेरियावरील स्वारीचे बेत जपानी सेनापतींना तात्पुरते तहकूब करावे लागले. जपानी सैन्य चिनीजपानी युद्धात गर्क झालेले पाहून रशियाच्या सर्वाधिकाऱ्यांनी आपली सर्व प्रकारे तयारी करून आता जपानची कुरापत काढली आहे.

रशियाकडून युद्धसामुग्री व लष्करी तज्ज्ञ याचा भरपूर पुरवठा झाल्यास चिनी सैन्य जपानी सैन्याला पुरून उरेल, अशी बोल्शेव्हिक लोकांची पहिल्यापासूनची समजूत आहे. ‘ Hitler over Russia ’ या उत्कृष्ट पुस्तकाच्या कम्युनिस्ट लेखकाने १९३५ सालीच म्हटले होते

‘ Organised militarily China will, with its inexhaustible masses, be able to trample under foot the Kwantung army and even constitute a menace to the main Japanese forces. ’

गेल्या एका वर्षातील चिनीजपानी युद्धाच्या अनुभवाने बोल्शेव्हिकांचा हा अंदाज अंशतः तरी खरा ठरला आहे व त्यामुळेच रशिया आज जपानशीं युद्ध करण्याला उत्सुक आहे.

यंदाच्या जानेवारी महिन्यांत चीनचे पहिले नेते डॉ. सुन्यत्सेन यांचे चिरंजीव मि. सुन फो हे मास्कोला गेले व तेव्हा चीनला मदत करण्याबद्दल चिनी व रशियन पुढाऱ्यांच्यामध्ये कांही तरी करारमदार झाले. मि. सुन फो यांच्याबरोबर वाटाघाटी झाल्यानंतर रशियाचे प्रधानमंत्री मो. मोलोटॉफ यांनी १९ जानेवारी रोजी एका भाषणांत असे उद्गार काढले

'I warn Japan that the Soviet Union will know how to defend its interests and end Japanese hooliganism on the Far Eastern Frontier.'

## स्टालिनची चिथावणी

या भाषणानंतर आठ दिवसांनी म्हणजे ता. २७ जानेवारी रोजी रशियाने रशिया व जपान यांच्यामधील टपालाची वाहतूक बंद करून टाकली. मि. सुन फो हे मॉस्कोमध्ये असतांनाच ता. १४ फेब्रुवारी रोजी रशियाचे सर्वाधिकारी मो. स्टालिन यांनी 'प्राव्हदा' या रशियाच्या मुखपत्रांत एक लेख लिहून असें जाहीर केलें

'As to the external relations, since we live not on an island but in a system of States, several of them hostile, we say frankly and honestly that a victory of Socialism in our country is not yet final. From this it follows that the problem of fully securing the country from the dangers of armed intervention and restoration has not yet been solved and it will have to be solved. This can be done only by joining the serious efforts of the international proletariat with the still more serious efforts of the whole Soviet people.'

## रशियाचा साम्राज्यवाद

मो. स्टालिन यांचा हा लेख म्हणजे जगांतील सर्व मजूरवर्गाला आपापलीं सरकारें उलथून पाडून सर्वत्र सोशालिस्ट सरकार स्थापन करण्याची चिथावणी होती. त्यामुळे रशियाच्या मित्रराष्ट्रांनींहि या लेखाविरुद्ध तक्रार केली व त्यांच्या समजुतीसाठी १ मार्च रोजी रशियन पत्रांनी पुढील खुलासा प्रसिद्ध केला

'Mr. Stalin's words were directed exclusively against aggressive countries and the Soviet Union only wanted peace with the others. But it was certain that an armed clash will come with Fascism which will develop into a great war in which one of the sides will be destroyed '

मो. स्टालिन याचा हा लेख अनेक दृष्टीनी महत्त्वाचा आहे. कोणत्याहि राज्यक्रांतीला कांहीसे स्थैर्य लाभले म्हणजे त्या क्रांतीच्या पुढाऱ्याच्या लष्करी महत्त्वाकांक्षा उच्छृंखल होऊ लागतात. राज्यक्रांतीच्या या अवस्थेला इतिहासकारांनी नेपोलियानिझम हे नाव दिले आहे. गतवर्षीच श्री. मानवेंद्रनाथ रॉय यांनी रशियन राज्यक्रांतीविषयी लिहिताना म्हटले होते की, रशियात नेपोलियानिझमला अनुकूल अशी परिस्थिति निर्माण झाली आहे. मो. स्टालिन याच्या या लेखावरून श्री. रॉय यांचा निष्कर्ष खरा आहे, हे सिद्ध होते. दुसरी गोष्ट अशी की, बोल्शेव्हिकाना त्यांच्या विशिष्ट तत्वज्ञानामुळे रशियाची शत्रुराष्ट्रे व मित्रराष्ट्रे याच्यामध्ये कांहीहि फरक करतां येत नाही व त्यामुळे त्यांनी आपले खरे तत्वज्ञान बोलून दाखविले की, रशियाच्या शत्रूनाच काय पण मित्रांना देखील रशियन सरकाराजवळ खुलासा मागण्याची पाळी येते. याच लेखावरून तिसरे अनुमान असे निघते की, रशियाने एखाद्या राष्ट्राविरुद्ध युद्ध पुकारले तर त्या युद्धांतील स्थित्यंतरें ही राजकीय युद्धांतील स्थित्यंतरांप्रमाणे न घडतां धार्मिक युद्धांतील स्थित्यंतरांप्रमाणें घडून येतील. रशियांतील आजची परिस्थिति अशी आहे की. रशियाच्या सर्व राष्ट्रीय गरजा रशियांतल्या रशियांत भागूं शकतात. यामुळे त्या राष्ट्राला जिवावर उदार होऊन परराष्ट्राशी लढण्याची कांहीहि गरज नाही. तेव्हा रशियाच्या राज्यकर्त्यांनी आपण होऊन जर एखादे युद्ध उपस्थित केले तर त्याला केवळ कम्युनिस्टांचाच काय तो मनापासून पाठिंबा मिळेल. सामान्य रशियन जनतेचा पाठिंबा मिळणें अवघडच आहे.

## रशियाच्या तक्रारींचा खुलासा

मो. स्टालिन यांच्या लेखाचा खुलासा १ मार्च रोजी प्रसिद्ध झाला, तर त्या महिन्याच्या अखेरीला रशियाने चायनीज ईस्टर्नरेल्वेच्या किंमतीचा शेवटचा हप्ता मांचूकुओने अद्यापि न भरल्याबद्दल जपानकडे तक्रार केली व मांचूकु-

ओच्या सरहद्दीवर सैन्याची जमवाजमव करण्याला प्रारंभ केला. लौकरच जपानला अशी वार्ता लागली की, रशियन मोंगोलिया व मांचूकुओ यांच्या सीमेवर रशियानें ५०००० पायदळ, घोडेस्वारांच्या कित्येक पलटणी, तोफा व विमानें यांची जमवाजमव केली असून उर्गा व सांबेट्स या महत्त्वाच्या शहरी अधिक सैन्याची जमवाजमव चालू आहे. ही वार्ता कानावर आल्यावर जपानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी रशियन वकिलाशी बोलणें करून रशियाला जपानशी सख्य ठेवावयाचें आहे की नाही याचा एकदाचा निकाल लावून घ्यावयाचें ठरविलें. त्याप्रमाणे २८ मार्च रोजी जपानचे तत्कालीन परराष्ट्रमंत्री बॅरन हिरोता व रशियाचे टोकियो येथील वकील मो. स्लाव्हूत्स्की या उभयतांची बोलणी झाली व त्यानंतर ता. ४ एप्रिल रोजी रशियाने आपल्या सर्व तक्रारीचा खलिता जपानला सादर केला. (१) १८ डिसेंबर १९३७ रोजी अपघातामुळे मांचूरियात उतरलेलें लष्करी विमान जपानने परत द्यावें. (२) दक्षिण साघालिन बेटांतील जपानी अधिकाऱ्यांनी अडकवून ठेवलेली रशियाची विपेल नांवाची बोट जपानने सोडून द्यावी, (३) हाकादोते बंदरांत अडकवून ठेवलेली आगबोट जपानने सोडून द्यावी. (४) अमूर नदीवर अटक झालेल्या चौघा रशियन खलाशांची जपानने सुटका करावी. (५) चायनीज ईस्टर्न रेल्वेच्या किंमतीचा शेवटचा हप्ता जपानने देऊन टाकावा.

रशियाने जपानविरुद्ध केलेल्या सर्व तक्रारी किती क्षुल्लक आहेत, हे वाचकांच्या निदर्शनास यावें, याकरिताच मो. स्लाव्हूत्स्की यांच्या सर्वच मागण्या येथे उतरून घेतल्या आहेत. या मागण्यांपैकी हाकादोते बंदरांत अडकून ठेविलेली रशियन आगबोट सोडून देण्याची मागणी जपानी सरकाराने ताबडतोब मान्य केली. मांचूकुओच्या हद्दीत अपघातामुळे उतरलेल्या लष्करी विमानाबद्दल जपानने सांगितले कीं आताशा रशियन विमानांना मांचूकुओच्या हद्दीत टेहेळणी करण्याची वाईट संवय जडली आहे. गेल्या वर्षातच एकंदर १८ रशियन विमाने अपघातामुळे मांचूकुओंत उतरली व ती आम्ही सोडूनहि दिली, पण आमच्याहि सहनशीलतेला कांही मर्यादा आहे. चायनीज ईस्टर्न रेल्वेच्या किंमतीच्या हप्तयाबद्दल जपानने असा खुलासा केला कीं, मांचूकुओच्या सरकारचे देणे द्यावयाचे रशियाने नाकारल्यामुळे मांचूकुओ सरकारला चायनीज ईस्टर्न रेल्वेच्या किंमतीचा हप्ता थांबवावा लागला; रशिया नआपले देणे दिल्यास मांचूकुओ सरकारहि आपले देणे देऊन टाकील.

बाकीच्या मागण्याबद्दल जपानने असे उत्तर दिले की, रशियाने अटकेत ठेवलेल्या ४१ जपान्यांची सुटका झाल्यास व कोरियन लोकांच्या तीन बोटी सोडून दिल्यास आम्ही त्या मागण्या मान्य करूं.

## रशियाची दंडेली

जपानची ही मागणी रशियाने मान्य केली नाही इतकेच नव्हे तर ८ जपान्यांची सुटका करण्याचा हुकूम मॉस्कोच्या सरकाराने सोडला असतांहि सायबेरियांतील अधिकाऱ्यानी तो धाब्यावर बसविला आणि खाबारोव्हस्क व ब्लागोव्हेस्चेन्स्क येथील जपानी कॉन्सल्सना ताबडतोब आपली ऑफिसे बंद करून निघून जाण्याचा हुकूम सोडला. या हुकुमाचा जपानने तीव्र निषेध केल्याने त्यावेळी त्याची अमलबजावणी तहकूब झाली. पण या ऑगस्ट महिन्याच्या प्रारंभी त्या हुकुमाची रशियाने सक्तीने बजावणी केली. याखेरीज रशियाच्या मालकीच्या उत्तर साघालिन बेटांतील जपानी कंपन्यांच्या साऱ्या सवलती तह मोडून काढून घेतल्या व त्याची कामे बंद पाडली. याच भागांतील ओखा येथील जपानी कॉन्सलच्या कचेरीभोवती रशियन सरकाराने काटेरी ताराचे कुंपण घालून जपानी अधिकाऱ्याचा रशियन नागरिकाशी कोणत्याहि प्रकार संबंध येऊं नये अशी व्यवस्था केली.

या वेळेपासून रशियन सरकारच्या वरिष्ठ अधिकाऱ्याच्या जपानविरुद्ध चळवळीला ऊत आला. २४ जानेवारी रोजी चीनमधील रशियन वकिलाने एक पत्रक काढून जाहीर केले ' Russia is fully prepared to support China in maintaining her independence. '

ता. १ मे रोजी रशियाच्या आरमारमंत्र्यांनी व्ह्लादिव्होस्तोक येथे एक अत्यंत चीड आणणारे भाषण करून जपानी सरकाराला रक्ताची तहान लागलेल्या पिसाळलेल्या कुत्र्याची उपमा दिली. जपानी वकिलाने या भाषणाबद्दल रशियाचे परराष्ट्रमंत्री मो. लिट्व्हिनॉफ यांच्याकडे तक्रार केली असतां त्यांनी उत्तर दिले की, जपानमधील मुत्सद्दीदेखील आम्हांला अशाच शिव्या देतात, तेव्हा असल्या शिव्यांकडे लक्ष द्यावयाचे कारण नाही; आमच्या मुत्सद्दीमंडळांपैकी एकानेहि जपानविरुद्ध युद्ध पुकारावे असे अजूनपर्यंत म्हटले नाही एवढ्यावरच जपानी

सरकाराने समाधान मानावे. पण हे समाधान देखील कॉमिंटेर्नच्या सेक्रेटरींनी जपानी सरकाराला फार दिवस लाभूं दिले नाही. कॉमिंटेर्नचे जगप्रसिद्ध सेक्रेटरी मो. डिमिट्रॉफ यांनी २१ जून रोजी पुढील आशयाचा एक जाहीरनामा काढला

'I call on the workers of the world especially in France, Britain and America to bring effective pressure to bear on their Governments to join Russia in destroying the existing regimes in Germany, Italy and Japan.'

## रशियाची युद्धाची तयारी

असल्या जाहीरनाम्याला युद्धाचा प्रचार म्हणावयाचे नाही तर म्हणावयाचे काय? हा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्यानंतर दहाच दिवसांनी रशियन सरकाराने युद्धाची तयारी करण्यासाठी ५०० कोटि रूबलचे नवे कर्ज काढले. या सर्व घटनांचा विचार केला असता असेच म्हणावे लागते की जपानशी युद्ध करण्याला रशिया उत्सुक झाला आहे. रशियामधून पळून येऊन जपानच्या आश्रयाला राहिलेले ओगपूचे एक वरिष्ठ अधिकारी जनरल लूश्कॉफ याचे मतहि असेच आहे. ते सांगतात की जपानशी लढण्याकरिता रशियाने बैकल सरोवराच्या पूर्वेला चार लक्ष सैन्य, दोन हजार विमाने व ९० पाणबुड्या बोटी यांची जमवाजमव केली आहे.

## अनिश्चित सरहद्द व खोटा नकाशा

आता ज्या सरहद्दीवरील मुलखाच्या स्वामित्वाबद्दल सध्याचा लढा सुरू झाला आहे त्या सरहद्दीची थोडीशी माहिती सांगितली पाहिजे. मांचूरिया व सायबेरिया या दोन प्रांतांच्या सरहद्दीवर अमूर आणि उस्सूरी या नद्या असल्याने वास्तविक पाहतां रशिया आणि मांचूकुओ यांच्यामध्ये सरहद्दीवरील प्रदेशाच्या स्वामित्वाबद्दल भांडणे होऊं नयेत. पण या नद्यांच्या पात्रातून जागोजागी बेटे आहेत व अजूनदेखील नवीन बेटे वर येत आहेत. युद्धशास्त्रदृष्ट्या ही बेटे फार महत्त्वाची असल्याने त्यांच्या मालकीविषयी वारवार भांडणे उपस्थित होतात. सरहद्दीच्या ज्या भागांवरून नद्या वहात नाहीत त्या भागांवरील सीमा चीन व

रशिया या उभयतामधील तहाने पूर्वी ठरल्या आहेत व या सीमा दर्शविणारा एक नकाशा चीनकडे आहे व दुसरा नकाशा रशियाकडे आहे. मांचूकुओचे नवीन राज्य प्रस्थापित झाल्यानंतर त्या सरकाराला चीनकडे असलेला मांचूरियाच्या सरहद्दीचा सरकारी नकाशा मिळाला नाही. याचा फायदा घेऊन रशियन सीमा-रक्षकांनी आपली सरहद्द पुढे सरकविली आहे व मांचूकुओने किंवा जपानने या अतिक्रमणाबद्दल तक्रार केली तर रशियाचे परराष्ट्रमंत्री आपल्या एकट्याच्याच ताब्यात असलेल्या नकाशाचा हवाला देतात.

मांचूरिया व मांगोलिया हे दोन्ही प्रांत तर पूर्वी चीनच्याच ताब्यातले असल्याने त्या दोन्ही प्रांतामधील सरहद्द कधीच सरकारी रीत्या ठरलेली नाही. मांचूरियाप्रमाणेच कोरिया व सायबेरिया यांच्या सरहद्दीवरील खुणाहि रशियन लोकांनी सरकविल्या आहेत किंवा अजीबात नष्ट केल्या आहेत, अशीहि जपानची तक्रार आहे. या सर्व कारणामुळे या सर्व सरहद्दीवर नेहमी काहीना काही तरी कटकटी चालू असतात. १९३७ पासून आतापर्यंत जपान व रशिया यांच्या सीमारक्षकांच्या निदान दोनशे चकमकी झाल्या आहेत. मांचूकुओ सरकारच्या स्थापनेपासून आतापर्यंत दोन हजारावर चकमकी झाल्या आहेत, असेहि आंकडेशास्त्रज्ञ सांगतात. ही कटकट कायमची मिटवावी म्हणून सरहद्द ठरविण्यासाठी रशिया, जपान व मांचूकुओ या तिन्ही सरकारांच्या प्रतिनिधींचे एक कमिशन नेमावे, अशी सूचना जपानने रशियाला यापूर्वीच केली होती. पण त्या योजनेवर रशिया व जपान यांचे एकमत होई ना, त्यामुळे ते कमिशन अस्तित्वांतच आले नाही.

—केसरी, १२ ऑगस्ट, १९३८.



# झेकोस्लोव्हाकियाचें राजकारण

## हेर हिटलेरचा निर्धार

गेल्या महायुद्धानतर दोस्त राष्ट्रांनी ऑस्ट्रियाला ज्याप्रमाणं जर्मनीशी ऐक्य करण्याला मनाई केली, त्याप्रमाणेच ऑस्ट्रियन साम्राज्यातील सुमारे ३५ लक्ष जर्मनांना त्याच्या मायदेशापासून विभक्त करून झेक लोकांचे दास्य करावयाला लाविले. पराजयाने आलेल्या दुर्बलतेमुळे इतकी वर्षे जर्मनीने हा अन्याय सोसला. पण यंदा त्या अन्यायाचे परिमार्जन करण्याचा आपला निश्चय हेर हिटलेर यांनी ता. २० फेब्रुवारी रोजी राइश्टागपुढे केलेल्या भाषणात प्रसिद्ध केला आहे. त्या भाषणांत त्यानी असे उद्गार काढले आहेत

'There are 10 million Germans in neighbouring states which, before 1866, were joined to the bulk of the German nation by a national link. They have been prevented from uniting with the Reich but there must be no doubt about one thing a political separation must not lead to a deprivation of rights i. e., the general rights of racial self-determination promised in the fourteen points as a condition for an armistice.'

या वाक्यांत उल्लेखिलेल्या एक कोटि जर्मन लोकापैकी पासष्ट लक्ष लोक ऑस्ट्रियाबरोबर परत जर्मन साम्राज्यांत सामील झाले आहेत व आता झेकोस्लो-व्हाकियांतील पस्तीस लक्ष जर्मनाचा प्रश्न सोडविण्याची खटपट सुरू आहे.

## अनेक जातींची खिचडी

झेकोस्लोव्हाकियाचा प्रदेश सुमारें पांचशें वर्षें ऑस्ट्रियन साम्राज्यांत होता. ऑस्ट्रियन सम्राटांची जर तशी इच्छाच असती तर त्या प्रदेशांतील लोक कधींच जर्मन लोकांशीं एकजीव होऊन गेले असते. पण आपल्या प्रजेमध्ये ऐक्य उत्पन्न

होणे हे साम्राज्यसत्तेला हितावह नाही, अशी ऑस्ट्रियन सम्राटांची समजूत असल्याने त्यांनी कधीच तसा प्रयत्न केला नाही. उलट कधी झेक लोकांचे तर कधी जर्मन लोकांचे पारडे वर करून त्यांनी साम्राज्यांतील दुही कायम ठेविली. पुढे एकोणिसाव्या शतकांत ऑस्ट्रियन साम्राज्यांतील निरनिराळ्या वंशांच्या प्रजेच्या मनात राष्ट्रीयत्वाच्या भावना पसरूं लागल्या व त्या सर्वांनी आपापल्या परीने ऑस्ट्रियन साम्राज्य मोडून टाकण्याच्या खटपटी आरंभल्या. या त्यांच्या खटपटीमधूनच गेले महायुद्ध उद्भवले व त्यांच्याच फंदफितुरीमुळे ऑस्ट्रियाचा त्या युद्धांत सपशेल पराभव झाला. पण युद्धसमाप्तीनंतर ऑस्ट्रियाचा मुलूख आपापल्यामध्ये वाटून घेताना या नवोदित राष्ट्रांनी आपल्याच इतिहासाकडे दुर्लक्ष करून विजातियांचे प्रांत आपल्या देशांना जोडले आणि स्वतःच्या देशांवर व जगाच्या शांततेवर नसती संकटे ओढवून घेतली. एकट्या झेकोस्लोव्हाकियाच्या सुमारे दीड कोटि प्रजेमध्ये ७४॥ लक्ष झेक, ३५ लक्ष जर्मन, २३ लक्ष स्लोव्हाक, ७। लक्ष हंगेरियन, ५॥ लक्ष रुमानियन, १ लक्ष पोल व त्याखेरीज ज्यू व इतर वंशाचे लोक आहेत. झेकोस्लोव्हाकियाचे नवीन राष्ट्र निर्माण करतांना निरनिराळ्या वंशांची खिचडी होणें स्वाभाविकच होते, असे कित्येकांना वाटते, पण वास्तविक प्रकार तसा नाही. प्रेसिडेंट विल्सनचे स्वयनिर्णयाचे तत्त्व सर्व वंशांच्या लोकाना निष्पक्षपातीपणाने लावले असते व कमालपाशापासून थोडा शहाणपणा शिकून मध्ययुरोपांतील नव्या राष्ट्रांनी आपापल्या अल्पसंख्याकांची देवघेव केली असती तर त्या प्रदेशांत बऱ्याच अंशी एकजिनसी राष्ट्रें निर्माण झाली असती.

## झेक लोकांचा हावरेपणा

उदाहरणार्थ, झेक लोकांचें स्वतंत्र राष्ट्र हे स्वयनिर्णयाच्या तत्त्वाप्रमाणें दोस्त राष्ट्रांनी अस्तित्वांत आणलें. पण मग बोहिमिया प्रांतांतील झेक व जर्मन वस्तीचे प्रदेश बहुतांशी अलग असले, तरी ऐतिहासिक काळांत ते केव्हांहि भिन्न राजकीय सत्तेखाली नसल्याच्या निमित्ताने ३५ लक्ष जर्मन लोकांना मात्र स्वयंनिर्णयाचा अधिकार न देतां त्यांस पाउणकोटि झेक लोकांचे दास बनविले. बोहिमियाचा सर्व प्रांत निदान ऑस्ट्रियन अमलाखाली तरी होता; पण तितकीहि

सबब नसतांना व खुद्द जर्मनीच्या ताब्यांतील मुलुखावर झेक लोकांना ऐतिहासिक दृष्ट्या कसलाहि हक्क सांगतां येत नसून सुद्धा केवळ लष्करी दृष्ट्या आपली सरहद्द सुरक्षित व्हावी, याकरिता झेक लोकांनी खुद्द जर्मनीचेहि तीन ठिकाणी लचके तोडले आहेत. इतकेच नव्हे तर हजार वर्षे हंगारीच्या अमलाखाली असलेले स्लोव्हाक लोक हे राजकीय दृष्ट्या व धार्मिक दृष्ट्या झेक लोकांपासून अगदी भिन्न असूनसुद्धा त्यांचा मुलुखहि झेक लोकांनी स्वतःच्या देशाला जोडला आहे आणि २३ लक्ष स्लोव्हाक लोकांबरोबरच ७॥ लक्ष मागयार लोकांनाहि पारतंत्र्यांत टाकले आहे. इतक्यानेहि या हावऱ्या लोकाची तृप्ति न होऊन त्यांनी पोलंडच्या मुलुखावर सैन्य पाठवून एक लक्ष वस्तीचा पोलंडचा मुलुखहि गिळकृत केला आहे. झेक पुढाऱ्याच्या या हावरेपणामुळे झेकोस्लोव्हाकियाला त्याच्या सरहद्दी-वर आज एकदेखील विश्वासाचा मित्र उरलेला नाही.

## अल्पसंख्याकांची गळचेपी

हावऱ्या लोकांची मनेहि कोती असतात. तेव्हा झेक लोकांनी आपल्या राज्यांतील अल्पसंख्याकाना उदारपणाने वागविले नाही, याचे नवल वाटण्याचे काहीच कारण नाही. ऑस्ट्रियाचे साम्राज्य नष्ट झाल्यानंतर झेकोस्लोव्हाकियात जी घटनासमिति बसली, त्या समितीत झेक लोकानी स्लोव्हाक लोकांखेरीज इतर कोणत्याहि अल्पसंख्याकाच्या प्रतिनिधीचा प्रवेश होऊं दिला नाही व झेकोस्लोव्हा-कियाचे राष्ट्र हे फक्त झेक आणि स्लोव्हाक यांचेच आहे अशी घोषणा केली. अशा रीतीने झेक लोकांनी भागीदारीत घेतलेले स्लोव्हाक लोक देखील लौकरच त्याना विटले व त्या स्लोव्हाक लोकानी आपल्याला आपल्या प्रातापुरती पूर्ण स्वायत्तता मिळावी अशी चळवळ सुरू केली. झेक लोकाच्या हाती सत्ता आल्याबरोबर त्यानी लगेच जर्मन लोकाच्या नोकऱ्या काढून त्या झेक लोकाना दिल्या. नवीन राष्ट्र स्थापन झाल्यापासून एका वर्षांतच लाखो जर्मनांच्या नोकऱ्या गेल्या व त्याना आणि त्यांच्या कुटुंबांतील मंडळीना पोटभर अन्न मिळणे देखील अवघड झाले. सध्या-देखील जर्मनांना त्यांच्या लोकसंख्येच्या मानाने जितक्या सरकारी नोकऱ्या मिळणे न्याय्य आहे, त्यापेक्षा पन्नास हजार नोकऱ्या कमीच मिळाल्या आहेत. केवळ लायकीप्रमाणें नेमणुका झाल्या तर जर्मन लोक झेक लोकांना केव्हाच

मागे टाकतील हे सांगायाला नकोच. सरकारी नोकऱ्यांप्रमाणेच स्थानिक स्वराज्याच्या संस्थातूनहि जर्मनांना नोकऱ्या मिळत नाहीत. या स्थानिक स्वराज्य संस्थांतून एकतृतीयांश प्रतिनिधि नेमण्याचा अधिकार सरकारने आपल्या हाती ठेवला आहे. या नेमणुका अल्पसंख्याकांच्या वांट्याला जाव्यात असा आपल्या देशांत शिरस्ता आहे; पण झेकोस्लोव्हाकियांत सरकारनियुक्तांपैकी निदान अर्ध्या जागा तरी झेक लोकांच्याच वांट्याला जातात. अल्पसंख्याकांना निरनिराळ्या धंद्यात प्रवेश मिळू नये, अशा दृष्टीने कायदे केले जात आहेत. झेक लोकातील बेकाराप्रमाणे अल्पसंख्याकामधील बेकाराना सुकरतेने पोटगी मिळत नाही किंवा त्यांना कामे मिळावीत म्हणून सरकार दुष्काळी कामेहि सुरू करीत नाही. प्रेसिडेंट बेनेश यांनी स्वतःच कबूल केले आहे

## अध्यक्ष बेनेश यांचीच कबुली

'Mistakes have been made which must not be repeated, such as, for instance, that contractors and workmen have been called from Czech, or from Czech-German districts into German districts where unemployment prevails.'

या कंत्राटाच्या बाबतीत झेकोस्लोव्हाकियामधील जर्मन लोकांचे पुढारी हेर हेनलाइन यांनी १९३५ च्या डिसेंबरमध्ये केलेल्या एका भाषणांत अशी माहिती सांगितली आहे 'Out of 396 contracts for public works in purely Sudeten-deutsche areas that have been carried out during the past three years, 332 were given to purely Czech firms.'

जागतिक मंदी व स्वतः झेकोस्लोव्हाकियांतील सरकारचे धोरण या दोनहि कारणांमुळे पांच लक्षांहून अधिक जर्मन आज सहासात वर्षे बेकार होऊन पडले आहेत. हेर हेनलाइन म्हणतात—

'Recently the Minister for Social Welfare referred to the fact that more than three hundred thousand children in the Sudeten regions are in a state of continuous undernourishment.'

उपासमारीच्या असह्य वेदना भोगीत असलेल्या या जर्मन बालकांना अशी लालूच दाखविली जाते की जर्मन शाळा सोडून तुम्ही जर झेक शाळेत शिकावयाला याल तर तुम्हाला अन्नवस्त्र फुकट मिळेल. अशा परिस्थितींत आपल्या अपत्यांना स्वभाषेंतून शिक्षण देण्याचा आग्रह धरणाऱ्या जर्मन मातापित्यांची आतडी कशी तिळतिळ तुटत असतील, याची कल्पना कोणाहि अपत्यवत्सलांना होण्याजोगी आहे. अल्पसंख्याकाना त्याच्या भाषेत व्यवहार करूं देऊं असें झेकोस्लोव्हाकियाने राष्ट्रसघाला वचन दिलेल आहे, पण या वचनाची बजावणी इतक्या कृपणपणाने करण्यात येते की चाळीसहजार जर्मन वस्ती असलेल्या प्रागसारख्या शहरांत जर्मन भाषेला कोर्टात मज्जाव आहे. १९३६ साली तर या साऱ्या अन्यायावर कळस करून झेकोस्लोव्हाकियाच्या सरकारने सर्व जर्मन मुलुखांत जवळ जवळ मार्शललॉचाच अमल सुरू केला. हेर हेनलाइन म्हणतात

'In Czechoslovakia in fact there are living more Sudetendeutsche than Danes in Denmark or Norwegians in Norway and the Sudetendeutsche area is hardly smaller than Belgium.'

इतक्या विस्तृत प्रदेशावर व इतक्या मोठ्या लोकसंख्येवर इतकी वर्षें जुलूम होत असूनसुद्धा राष्ट्रसंघाने आजपर्यंत त्या पीडित जर्मनांची कधीच दाद घेतलेली नाही. यापरता राष्ट्रसंघाच्या निष्फलतेचा पुरावा तो काय असणार! १९२६ सालापर्यंत झेकोस्लोव्हाकियांतील जर्मनांनी सुमारे वीस वेळा झेक लोकांच्या जुलमाविरुद्ध गाऱ्हाणी नेली होती. पण वारवार भग्नमनोरथ होऊन आतां त्यांनी तो मार्ग टाकून दिला आहे.

## आश्वासन दिलें पण पाळलें नाही

वास्तविक पाहतां झेकोस्लोव्हाकियांत अनेक वंशांची व भाषांची खिचडी झाली असल्यामुळे त्या देशाची राज्यघटना व परराष्ट्रीय धोरण स्विट्झर्लंड देशाप्रमाणे असणे जरूर आहे. २०-५-१९१९ रोजी डॉ. बेनेश यांनी तहपरिषदेला तसें आश्वासनहि दिलं होतें

'It is the intention of the Government to make of the Czechoslovak Republic a sort of Switzerland, taking into consideration, of course, the special condition of Bohemia.'

पण या आदर्शाप्रमाणे वागण्याचा झेकोस्लोव्हाक सरकारने कधी प्रयत्न केला नाही. नाही म्हणावयाला १९२६ साली झेकोस्लोव्हाकियाचे प्रधान-मंत्री झालेले मुत्सद्दी मि. श्वेला यांनी झेक आणि स्लोव्हाक यांच्याबरोबरीने जर्मन वंशालाहि झेकोस्लोव्हाकियांत स्थान मिळवून देण्याचा आपला मनोदय एका भाषणांत व्यक्त केला होता, पण त्या भाषणानंतर मि. श्वेला हे लौकरच आजारी पडून दिवंगत झाले व त्यांचे धोरणहि त्यांच्याबरोबर विलयाला गेले.

मि. श्वेला याच्या मृत्यूनंतर झेक लोकाच्या पुढाऱ्यांनी दोघातिघा जर्मन पुढाऱ्यांना मंत्रिमंडळांत घेण्याची वहिवाट सुरू केली पण त्यामुळे त्या पुढाऱ्यांचा व्यक्तिशः फायदा झाला तरी झेकोस्लोव्हाकियातील जर्मन लोकाचा कांहीच फायदा झाला नाही, उलट त्यांची स्थिति अधिकाधिक खालावत गेली. याचे कारण असे आहे की, जर्मन जनतेच्या विरुद्ध झेक सरकारला मदत करावयाला जे पुढारी सिद्ध होते, त्यानाच झेकोस्लोव्हाकियाच्या मंत्रिमंडळांत घेतले जाई. अशा स्वजातिद्रोही स्वार्थसाधूंच्या हातून स्वजनाचे काय कल्याण होणार! त्यांच्या हातून जर्मन लोकांमध्ये आपापसांत पक्षद्वेष माजविण्याचे काम भरपूर होत असे.

## नाझी पक्षाची संघटना

प्रधानमडळांत प्रविष्ट झालेल्या जर्मन पुढाऱ्यांचा असा अधःपात होत असलेला पाहून हेनलाइन यांनी १९३३ च्या उत्तरार्धात नाझी पक्षाच्या धर्तीवर झेकोस्लोव्हाकियांतील जर्मन लोकाची संघटना आरंभिली. ही संघटना इतकी यशस्वी झाली की, १९३५ च्या मे महिन्यांत झालेल्या सार्वत्रिक निवडणुकीत हेर हेनलाइन यांच्या पक्षाला झेकोस्लोव्हाकियांतील इतर कोणत्याहि पक्षाहून अधिक मते मिळून त्यांच्या पक्षाचे ४४ प्रतिनिधि निवडून आले. उलटपक्षी सरकारजमा अशा तीन जर्मन पक्षांचे एकंदर अवघे २२ उमेदवार यशस्वी झाले. आपल्यावर वैयक्तिक स्वार्थ साधण्याचा आरोप येऊं नये म्हणून हेर हेन-लाइन हे स्वतः या निवडणुकीला उभेहि राहिले नव्हते. या विजयानंतर हेर

हेनलाइन याच्या पक्षाने झेकोस्लोव्हाकियाच्या सरकारापुढे सहकार्याचा हात केला पण तो त्या सरकाराने झिडकारला. आणि पराजित पक्षाच्या जर्मन नेत्यांनाच परत मंत्रिपद देऊन जर्मन लोकांचा छळ सुरू केला. या छळाची सविस्तर हकीकत आम्हालाहि उपलब्ध नाही, पण ता. ७-३-१९३७ रोजी प्रसिद्ध झालेल्या पुढील बातमीवरून त्याचा काहीसा अंदाज लागतो.

'On the occasion of the 87th birthday of Dr. Masaryk, the President proclaimed an amnesty for political offenders benefiting several thousand people the majority of whom were of German race'

## नवे जुलमी कायदे

१९३६ सालापासून झेकोस्लोव्हाकियातील साऱ्या अल्पसंख्याक जातींच्या प्रांतांवर मार्शललॉसदृश कायद्याचा अमल सुरू झाला आहे. या कायद्याने हजारो जर्मन लोकांना अटक झाली, हे वर सांगितलेच आहे. त्याशिवाय, जर्मन लोकांच्या मालकीचे व मुख्यत: जर्मन कामगार नेमणारे कारखाने सक्तीने जर्मन वस्तीच्या मुलुखांतून उठवून झेकवस्तीच्या मुलुखांत नेले जात आहेत. अडचणीत सांपडलेल्या जर्मन कारखानदारांनी सरकारी बॅकेकडे कर्ज मागितले असता कारखान्यांतील जर्मन मजुरांना काढून टाकण्याची अट कबूल केल्याशिवाय त्यांना कर्ज मिळत नाही. हेर हेनलाइन याच्या पक्षाचे सभासद ज्या कारखान्यांतून कामे करीत असतील त्या कारखान्यांना सरकारी कंत्राटे मिळू नयेत, असेहि एक फर्मान झेकोस्लोव्हाकियाच्या सरकारने काढले आहे. असल्या अन्यायाचा फारच बोभाटा झाला, म्हणजे झेकोस्लोव्हाकियाचे धूर्त प्रेसिडेंट डॉ. बेनेश हे खेद व्यक्त करतात, अघळपघळ वचनेहि देतात. पण त्यांच्या कृतीत कधीहि काडीमात्र फरक पडत नाही.

झेकोस्लोव्हाकियाचे सध्याचे मुख्य प्रधान डॉ. होझा व त्यांचा झेक शेतकऱ्यांचा पक्ष कोणत्याहि अल्पसंख्याक जातीला कसलीहि सवलत देण्याच्या अगदी विरुद्ध आहे. या पक्षाने स्वदेशांतील सर्व अल्पसंख्याकांचे झेकीकरण करण्याची चळवळ अत्यंत कडवेपणाने चालविली आहे. या प्रबळ पक्षाच्या

विरोधामुळे झेकोस्लोव्हाकियाच्या सरकाराला जरी जर्मन अल्पसंख्याकांना कांही सवलती द्याव्या, असे वाटले, तरी ती इच्छा कृतीत उतरत नाही. उदाहरणार्थ ता. १८-२-१९३७ रोजी झेकोस्लोव्हाकियाच्या सरकाराने आपल्याशी सहकार्य करणाऱ्या जर्मन पक्षांना असे वचन दिले की, यापुढे सरकारी नोकरीतील शेकडा बावीस जागा जर्मन लोकांना देऊं. सध्या फक्त शेकडा १२ च जागा दिल्या आहेत. १९३७ सालाच्या प्रारंभी दिलेले हे वचन पाळण्याचा निश्चय, जर्मनीने ऑस्ट्रिया खालसा केल्यानंतर झेकोस्लोव्हाकियाच्या सरकाराने जाहीर केला आहे. ता. १९-३-३८ रोजी झेकोस्लोव्हाकियाहून पुढील तार आली आहे

'The Government decided to give effect to the provisions in the agreement of Feb. 18–1937, regarding the proportional employment in public services of members of the German minority.'

या उद्वेगजनक दीर्घसूत्रीपणामुळे झेक लोकांच्या भेदनीतीला बळी पडलेल्या जर्मनांनीदेखील आपल्या मंत्रिपदाचे राजीनामे दिले व त्याच्यापैकी दोघेजण तर आपल्या अनुयायांसह हेर हेनलाइन याच्या पक्षाला मिळाले.

## हेनलाइन यांचें ठणठणीत उत्तर

झेकोस्लोव्हाकियाच्या पार्लमेंटात हेर हेनलाइन याच्या पक्षाचे सध्या ५५ सभासद आहेत व डॉ. होझा यांच्या पक्षाचे अवघे ४५ सभासद आहेत, तरी देखील हेर हेनलाइन याच्या पक्षाच्या पुढाऱ्याना मंत्रिमंडळांत घ्यावयाला झेक पुढारी सिद्ध नाहीत. त्यांना सांगण्यांत येते की जर्मनीचा द्रोह करावयाला तुम्ही सिद्ध असाल तर आम्ही तुम्हांला मंत्रिमंडळात जागा देऊ. या अश्लाघ्य सूचनेला हेर हेनलाइन यांनी ठणठणीत उत्तर दिले

'When my party is asked openly or covertly to join the political front against Germany, I am bound to reply that we are Germans, I would sooner be hated alone with Germany than seek an advantage from the hatred of Germany.'

यापेक्षा अधिक महत्त्वाचे उद्गार झेकोस्लोव्हाकियाच्या सेनेटमध्ये एका जर्मन सभासदाने काढले आहेत. 'If the Government is prepared to remodel the internal structure of the country on the Swiss pattern and if they mould their foreign policy on the same lines as Switzerland and Belgium, then my party is willing to co-operate. But this must be done before it is too late. It is now five minutes to twelve.'

झेकोस्लोव्हाकियाचे बारा वाजण्याला पांच मिनिटेच उरली आहेत, ही सूचना स्वतः हेर हिटलर यांनी झेकोस्लोव्हाकियाच्या सरहद्दीवरील जर्मन सैन्यावर जनरल राइशेनाउ याची नेमणक करून गेल्या फेब्रुवारीच्या प्रारंभीच दिली होती. त्याच वेळी एका झेक पत्राने म्हटले होते

'The appointment by Herr Hitler of General Reichenau to the command at Leipzig meant for Czechoslovakia that the military commander on our north-western frontier is a Nazi General in other words a man with whom the will of the Nazi party might easily overcome sober strategical considerations.'

## शीर्षे सर्पः समाविष्टः

जनरल राइशेनाउ याच्या नेमणुकीपासून झेकोस्लोव्हाकियाच्या जनतेला आपल्या देशावर जर्मनीचा अचानक हल्ला होईल, अशी सारखी भीति वाटत आहे. कारण संकटाच्या वेळी झेकोस्लोव्हाकियाला साहाय्य करण्याची आश्वासने फ्रान्स व रशिया या दोन्ही देशांनी दिली असली, तरी त्या देशांतील जनतेला हे स्पष्ट दिसत आहे की 'हिमवति दिव्यौषधयः शीर्षे सर्पः समाविष्टः' अशी आंतरराष्ट्रीय राजकारणात आपल्या देशाची परिस्थिति आहे. जनतेच्या मनातील हे भय थोडे कमी करण्यासाठी २३ फेब्रुवारी रोजी झेकोस्लोव्हाकियाच्या युद्धखात्याने एक पत्रक काढून असे प्रसिद्ध केले की, शत्रूचा आपल्या देशावर अचानक हल्ला होऊं नये याकरिता देशाच्या सरहद्दीवर तटबंदी करण्याचे काम १९३६ सालापासून पद्धतशीर रीतीने चालू आहे व त्या तटबंदीच्या संरक्षणासाठी भरपूर सैन्याची

योजना केली आहे. या पत्रकाविषयी सांगण्याजोगी पहिली गोष्ट ही की फ्रान्सप्रमाणे अभेद्य तटबंदी करण्याची झेकोस्लोव्हाकियाला ऐपत नाही आणि अशी तटबंदी केली तरी तिच्या संरक्षणाला पुरेसे सैन्य ठेवणेहि झेकोस्लोव्हाकियाला शक्य नाही. झेकोस्लोव्हाकियाची सरहद्द सुमारे दोनअडीच हजार मैलाची आहे व त्या देशाचे सारे खडे सैन्य जरी तटबंदीच्या संरक्षणाच्या कामावर नेमले तरी दर-मैलाच्या संरक्षणाला शंभर लोक सुद्धा उभे करणे त्या देशाला शक्य नाही. झेकोस्लोव्हाकियाचे खडे सैन्य दोन लक्षाहून थोडे कमीच आहे व त्याच्या वैमानिक दलात सुमारे ५०० विमाने आहेत. एखाद्या युद्धप्रसंगी त्या देशाला सुमारे वीस लक्ष सैन्य सज्ज करता येईल. पण युद्धाच्या पहिल्या पंध-रवड्यातच हा देश, जर्मनी, हंगारी व पोलंड या तीन्ही राष्ट्रांच्या सैन्यानी पादा-क्रांत केला जाण्याचा संभव असल्याने इतके सैन्य सज्ज करण्याचा अवधि झेक लोकांना मिळणे अशक्य आहे. माजी ऑस्ट्रिया-हंगारीच्या साम्राज्यातील कारखान्या-पैकी ¾ कारखाने झेकोस्लोव्हाकियात असल्याने त्या देशाची आर्थिक परिस्थिति चांगली आहे व तो देश इटालीच्या तिप्पट युद्धसामुग्री आज देखील तयार करतो. पण युद्धाच्या पहिल्या दिवशीच मार्शल गोअरिंगच्या वैमानिक दलाकडून या युद्ध-सामुग्रीच्या कारखान्यांचा विध्वंस होणार ही गोष्ट निश्चित असल्याने प्रत्यक्ष लढा-ईच्या वेळी या देशाला आपल्या युद्धसामुग्रीच्या कोठारावरच अवलंबून रहावे लागेल.

## फ्रान्सचा डळमळीत आधार

अशा परिस्थितीत झेकोस्लोव्हाकियाला एकच आधार होता. तो हा की, जर्मनीने झेकोस्लोव्हाकिया देश आत्मसात् केल्यास फ्रान्सला जर्मनीची सार्वभौम सत्ता मान्य करावी लागेल, या भीतीमुळे झेकोस्लोव्हाकियाच्या संरक्षणासाठी अखेरपर्यंत लढण्याचा फ्रान्सने निश्चय केला होता. पण फ्रान्सचे राजकारण सध्या 'France proposes and England disposes' या नियमाने चालत असल्यामुळे परवाच्या आंग्लोफ्रेंच प्रधानांच्या मुलाखतीपासून झेकोस्लोव्हाकियाचा तोहि आधार डळमळीत झाला आहे. मो. दालादिए व मि. चेंबरलेन या उभयतांनी मिळून झेकोस्लोव्हाकियाला बेल्जम व स्विट्झर्लंड यांच्याप्रमाणे तटस्थ राष्ट्र बनण्याच्या अटीवर जर्मनीशी शक्य तितक्या लौकर समेट

करण्याचा सल्ला दिला आहे. इंग्लंड आणि फ्रान्स यांचा हा गुरुमंत्र येऊन पोचण्यापूर्वीच झेकोस्लोव्हाकियाचे प्रेसिडेंट डॉ. बेनेश यांनी 'गुड फ्रायडे'च्या शुभ मुहूर्तावर त्याच अर्थाचे उद्गार काढले आहेत. ते म्हणतात

'We refuse to join any ideological front and we firmly refuse to be classified as members of such fronts, no matter by whom.'

## राज्यघटना बदलावी लागेल

जर्मनीच्या इच्छेप्रमाणे झेकोस्लोव्हाकियाचे स्विट्झर्लंड बनविण्याचे कबूल करणं सोपे आहे. पण स्विट्झर्लंडप्रमाणे सर्व वंशांच्या लोकांना समानतेने वागविणे फार अवघड आहे. झेकोस्लोव्हाकियाला तर आपल्या देशांतील अल्पसंख्याकाना तशी समता द्यावयाची असल्यास प्रथम देशाची राज्यघटना बदलावी लागेल. आपली राज्यघटना बदलून झेकोस्लोव्हाकियाने अल्पसंख्याकाना समान अधिकार द्यावे असा इंग्लंडचा विशेष आग्रह आहे. उलटपक्षी झेकोस्लोव्हाकिया व फ्रान्स यांचे म्हणणे असे आहे की, हेर हेनलाइन यांना कितीहि सवलती दिल्या तरी त्यांचे समाधान व्हावयाचे नाही. झेकोस्लोव्हाकिया व फ्रान्स यांचे हे म्हणणे खोटें पाडून आपला समजूतदारपणा इंग्लंडच्या पुढाऱ्यांना पटवून देण्यासाठी हेर हेनलाइन हे नुकतेच लंडनची सफर करून आले व आता झेकोस्लोव्हाकियाच्या सरकारने त्यांच्याशी बोलणी सुरू केली आहेत. तेव्हा या प्रकरणाचा लौकरच तडजोडीने समाधानकारक रीतीने निर्णय होईल, अशी तूर्त अपेक्षा करण्यास हरकत नाही.

—केसरी, ता. २० मे, १९३८.



# मध्ययुरोपांतील कारस्थानें

सध्या मध्ययुरोपांत अत्यंत महत्त्वाची कारस्थाने चालू आहेत, ही गोष्ट सर्वांनाच माहीत आहे. या कारस्थानांचे वास्तविक स्वरूप काय आहे व त्यांचा युरोपाच्या भवितव्यतेवर काय परिणाम होणार आहे, याची चिकित्सा या लेखांत करावयाची आहे. ही चिकित्सा आमच्या कित्येक झेकोस्लोव्हाकियाच्या मित्रांना रुचणार नाही, पण त्यांनी येवढी एकच गोष्ट लक्षांत ठेवावी की 'अरोप नूव्हेल', 'न्यू स्टेट्समन अँड नेशन ', 'बुलेटिन ऑफ इंटरनॅशनल न्यूज ' इत्यादि जर्मनीविरोधी पत्रांतूनच या लेखकाने आपली बहुतेक सारी माहिती संकलित केलेली असते.

## आंतरराष्ट्रीय करार

यंदाच्या एप्रिल महिन्यात जर्मनी आणि इटाली याच्यामध्ये उभय राष्ट्रांपैकी कोणतेहि राष्ट्र युद्धात पडल्यास त्याला दुसऱ्या राष्ट्राने ससैन्य सहाय्य करावे, अशा आशयाचा तह घडवून आणण्याच्या वाटाघाटी चालू होत्या. या वाटाघाटी यशस्वी झाल्या तर जर्मनी आपल्याला अगदीच अनावर होईल, या भीतीने आंग्लोइटालियन तहाच्या वेळी इंग्लंडने इटालीला अनेक सवलती देऊन जर्मनीशी लष्करी तह करण्यापासून सि. मुसोलिनी याना परावृत्त केले. सि. मुसोलिनी हे जर्मनीबरोबर लष्करी सहायाचा तह करणार नाहीत अशी इंग्लंडच्या मुख्य प्रधानांची खात्री झाल्यावर त्यांनी या परिस्थितीचा कसा फायदा घ्यावा, याची वाटाघाट करण्यासाठी फ्रान्सच्या मुख्य प्रधानांना लंडनला बोलाविलें. या निमंत्रणाप्रमाणे २८ एप्रिल रोजी फ्रान्सचे मुख्य प्रधान व परराष्ट्रमंत्री लंडनला आले व दुसरे दिवशी उभय राष्ट्राच्या प्रमुखांच्या वाटाघाटी होऊन त्यांत असें ठरले की, इंग्लंड व फ्रान्स या दोन्ही राष्ट्रांनी ताबडतोब स्व-परदेशांतून शस्त्रास्त्रांची व युद्धोपयोगी पदार्थांची मोठ्या प्रमाणावर खरेदी करावी, दोन्ही राष्ट्रांनी आपापल्या व्यापारी पतीचा एकमेकांना फायदा द्यावा. इंग्लंडने फ्रान्सला

आरमारी व वैमानिक मदत कशी करावी याची योजना ठरवावी. याच मुलाखतींत झेकोस्लोव्हाकियावर संकट आल्यास त्याला उभय राष्ट्रांनी कशी मदत करावी हेहि ठरले.

## मध्ययुरोपांतील लष्करी हालचाली

इंग्लंडच्या या सर्व कारस्थानांची हेर हिटलेर यांना बित्तंबातमी होतीच. पण आपण सि. मुसोलिनी यांचे मन वळवून जर्मनी व इटाली यांच्यामध्ये समानशत्रुमित्रत्वाचा संधि घडवून आणू, असा त्यांना आत्मविश्वास वाटत होता. यासाठी रोमला जातांना त्यांनी या तहाचा मसुदाहि आपल्याबरोबर नेला होता. ही त्यांची अपेक्षा चुकीची ठरली व रोमहून त्यांना रिकाम्या हाताने परत यावे लागले. हेर हिटलेर हे विफलमनोरथ होऊन जर्मनीला परत गेल्याची खात्रीलायक खबर इंग्लंड, फ्रान्स व झेकोस्लोव्हाकिया यांना मेच्या १० तारखेला कळली. त्याबरोबर जर्मनीला युद्धाचे आव्हान देण्याला ही संधि बरी आहे, असा विचार करून फ्रान्सच्या जनरल स्टाफचे प्रमुख जनरल गामेलॅ यांनी रशियाच्या युद्धमंत्र्यांना आपले सर्व वैमानिक दळ पोलंडच्या सरहद्दीवर एकत्र करण्याची सूचना दिली व फ्रेंच परराष्ट्रमंत्र्यानी जर्मनीशी युद्ध उपस्थित झाल्यास आपण फ्रान्सला मदत करूं, असे पोलंडच्या परराष्ट्रमंत्र्यांकडून वचन घेतले. ही पूर्वेकडील कारस्थाने यशस्वी झाल्यानंतर झेकोस्लोव्हाकियाच्या सरकाराने जर्मनीच्या कुरापती काढण्याला सुरवात केली. वसंत ऋतूंत युरोपांतील सर्व राष्ट्रांची सैन्ये थंडीच्या दिवसांतील बराकी सोडून उन्हाळयाच्या बराकींत जात असतात, यामुळे या दिवसांत सर्वच युरोपियन राष्ट्रांच्या सैन्याच्या हालचाली चालू असतात. त्याप्रमाणे जर्मन सैन्याच्याहि यावेळी हालचाली चालू होत्या. या हालचालींमुळे झेकोस्लोव्हाकियाच्या सरकारचा गैरसमज होऊ नये म्हणून जर्मनीने आपल्या सर्व हालचालींची माहिती त्या सरकाराला आगाऊ कळविली होती. आपण होऊन आपल्या सैन्याच्या हालचालींची आगाऊ माहिती पुरविणारे सेनापति अचानक छापा घालूं शकत नाहीत, हे कोणालाहि सहज कळण्याजोगे आहे. असे असूनसुद्धां जर्मनीच्या दोनचार डिव्हिजन्सच्या हालचालींनी आपल्या स्वातंत्र्यावर घाला पडणार असल्याचे निमित्त करून झेकोस्लोव्हाकियाच्या जनरल स्टाफने आपल्या शिलकी

सैन्याला डेरेदाखल होण्याचा हुकूम सोडला. ही सर्व हकीकत हिंदुस्थानांत आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या हकीकतीपेक्षां निराळी असल्याने तिचा आधार उतरून घेणें आवश्यक आहे

The Czechoslovakian General Staff were understood to have moved troops on the German frontier. The Czech Government stated however that they had been informed of the German troop movements by the German Government and had reason to believe that they were more or less routine.

## जर्मनीला धमकी

बुलेटिन ऑफ इंटरनॅशनल न्यूज या विश्वसनीय पत्राने ही बातमी छापली आहे. याप्रमाणे ता. २० मे रोजी सैन्याची जमवाजमव केल्यानंतर दुसरे दिवशी जर्मनीला युद्धांत ओढण्याकरिता झेक अधिकाऱ्यांनी दोघा सूडेटेन जर्मनांना निष्कारण ठार मारले. या इसमांस ठार मारण्याची कांहीहि जरूरी नव्हती ही गोष्ट त्यांच्या मरणोत्तर तपासणीने सिद्ध झाली आहे. याप्रमाणे जर्मनीला लढाईला प्रवृत्त करण्याचे झेकोस्लोव्हाकियाचे प्रयत्न चालू असतांनाच फ्रान्स, इंग्लंड, पोलंड, रशिया या सर्व राष्ट्रांनी मिळून जर्मनीला धमकी दिली की जर्मन सैन्य झेकोस्लोव्हाकियात शिरल्यास आमची सैन्ये जर्मनीवर चालून येतील. त्या वेळी झेकोस्लोव्हाकियांत सैन्य घुसविण्याची जर्मनीची तयारीहि नव्हती आणि इच्छाहि नव्हती. यामुळे व विशेषतः हेर हिटलर याच्या दूरदर्शी धिम्मेपणामुळे जर्मनीने आत्मसंयमन केलं आणि सूडेटेन जर्मन लोकांवरील अत्याचाराचा निषेध करण्यापलीकडे कांहीहि करावयाचे नाही, असा निश्चय केला. यानंतर झेक सैनिकांनी जर्मनीच्या ताब्यांतील पूल उडवून देण्याचे प्रयत्न केले, झेक वैमानिकांनी जर्मनीच्या हद्दीत विमाने नेली, झेक सरकाराने काही तरी खुसपटे काढून जर्मन अधिकाऱ्यांना बडतर्फ केलं, तरी जर्मनीने आपला निश्चय ढळूं दिला नाही.

## लंडन टाइम्सचा अभिप्राय

कायसर विल्हेल्मप्रमाणे हेर हिटलेर यांना त्यांच्या मर्जीविरुद्ध युद्धांत

ओढणे शक्य नाही, हे कळून आल्यानंतर झेक, फ्रेंच, इंग्लिश व रशियन पत्रांनी जर्मनी झेकोस्लोव्हाकियाला म्याला, अशी एकच कोल्हेकुई आरंभली. एका लंडन टाइम्सने मात्र या कारस्थानाचें खरें स्वरूप प्रकट करून सांगितलें

'The British diplomatic steps in Berlin and Prague were arranged to a large extent with Daladier during his London visit' लंडन टाइम्सने हे रहस्य फोडल्यावर 'फोएल्किशेर बेओ-बाख्टेर' या जर्मनींतील सर्वांत प्रमुख पत्रानें स्वाभाविकपणेच असे उद्गार काढले 'The events of the week-end will be designated in history as a model of the most Machiavelian diplomacy, which had more to do with the restoration of the prestige of the democracies as against the authoritarian states than with preventing a war.'

लोकमताच्या दृष्टीनें जर्मनीची नाचक्की करण्याच्या व आपली प्रतिष्ठा वाढ-विण्याच्या हेतूनेंच इंग्लिश आणि फ्रेंच मुत्सद्दी मंडळींनीं हीं कारस्थानें घडवून आणलीं होतीं, हा हेर रोझेनबेर्गच्या पत्राचा अभिप्राय अक्षरशः सत्य आहे.

जर्मनीला युद्धाला प्रवृत्त करण्याचे झेकोस्लोव्हाकियाचे प्रयत्न मेच्या अखेरीपर्यंत चालूच होते. सरतेशेवटीं २९ मे रोजीं डॉ. गोएबेल्स यांनीं एक निकराचें भाषण करून परराष्ट्रांना सूचना केली 'It is now surely time to call Prague to order.' या वेळेपर्यंत जर्मनी झेकोस्लोव्हाकियावर चालून जाण्याची तयारी करीत नव्हता, ही गोष्ट इंग्लंडांतील सर्व वजनदार लोकांना कळून चुकली होती व जागतिक कलह लावण्याचे झेकोस्लोव्हाकियाचे प्रयत्न पाहून त्या राष्ट्राविषयीं त्यांचीं मतें कलुषित होऊन गेलीं होतीं. यामुळे झेकोस्लोव्हाकियाच्या वर्तनाची चौकशी करण्यासाठीं इंग्लंडने आपले खास प्रति-निधी झेकोजर्मन सरहद्दीवर पाठवावेत, या फोएल्किशेर बेओबाख्टेरच्या सूचनेला त्यांनीं पाठिंबा दिला व ही सूचना चेंबरलेनसाहेबानांहि मान्य करावी लागली. या सूचनेमधूनच लॉर्ड रन्सिमन यांच्या मध्यस्थीचा उगम झाला आहे.

## इंग्लंडचें धरसोडीचें धोरण

जर्मनीविरुद्ध ही सारी कारस्थानें चालू असतांना इटालियन सरकार व

इटालीची वर्तमानपत्रे पूर्णपणे तटस्थ राहिली होती. पण झेकोस्लोव्हाकियाला इंग्लंडचे प्रतिनिधि जाणार अशी लक्षणे दिसूं लागल्याबरोबर यापुढे जर्मनीचा अंत पाहण्याचे इंग्लंडच्या मनात नाही, अशी इटालियन सरकाराची खात्री पटली आणि इंग्लंडचे धोरण पूर्णपणे बदलण्याच्या पूर्वी, मे महिन्यातील कारस्थानांमध्ये आपण इंग्लंडला जे साहाय्य केले होते, त्याचा मोबदला मिळविला पाहिजे, असा विचार करून ता. ४ जून रोजी काउंट चियानो यांनी इंग्रजसरकारकडे आंग्लो-इटालियन तह ताबडतोब अमलांत यावा, अशी मागणी केली. अशा तऱ्हेची लालूच लॉर्ड पर्थ यानी मे महिन्यांत इटालियन सरकाराला दाखविली होती. पण जून महिन्यांत इटालीची ती मागणी मान्य करणे चेंबरलेनसाहेबांच्या जिवावर आले. कारण चेंबरलेनसाहेबांचे मध्याचे सारे राजकारण भावी निवडणुकीकडे लक्ष्य देऊन चाललें आहे आणि स्पेनमधून इटालियन सैन्य बाहेर पडण्यापूर्वी आंग्लोइटालियन तह अमलात आणण्याला संमति दिली, तर चेंबरलेनसाहेबाना निवडणूक जिंकणे फार अवघड जाणार आहे. यांतूनहि कांही तडजोडीचा मार्ग निघतो की काय, हे पाहण्यासाठी लॉर्ड पर्थ यांनी काउंट चियानो याच्या अनेक मुलाखती घेतल्या. या मुलाखतीमुळे इंग्लंड व इटाली याची तडजोड होण्याचा जेव्हा संभव दिसूं लागला, तेव्हा फ्रान्सने इंग्लडकडे अशी मागणी केली की, इटालीने फ्रान्सबरोबर नवा तह करीपर्यंत इग्लंडने आंग्लोइटालियन तह अमलात आणण्याला आपली संमति देऊ नये. फ्रान्सच्या या आग्रहाच्या मागणीला इंग्लंडच्या मुख्य प्रधानाना निरुपायाने संमति द्यावी लागली.

याप्रमाणे इंग्लंडकडून फसवणूक झाल्यावर सि. मुसोलिनी याना 'पहिल्या वरा, तूंच बरा' हा न्याय आठवला आणि त्यानी जर्मनीबरोबर लष्करी साहाय्याचा तह करण्यासाठी इटालियन जनरल स्टाफचे प्रमुख जनरल पारियानी यांना जर्मनीला पाठविले. जर्मनीच्या राज्यकर्त्यांनी त्याचे मोठे अगत्यपूर्वक स्वागत केले व हेर हिटलेर यांनी त्यांना मुलाखतहि दिली. जनरल पारियानी यांच्यामार्फत इटाली व जर्मनी याचा परस्पराना लष्करी मदत करण्याचा तह झाला आहे अशी राजकारणी लोकांची अटकळ आहे. फ्रांको-इटालियन सरहद्दीवरील फ्रेंच शेतकऱ्यांच्या जमिनी काढून घेण्याचा अगदी अलीकडे इटालियन सरकाराने हुकूम सोडला आहे त्यावरून या अंदाजाला दुजोराच मिळतो.

## फ्रान्समध्ये परकियांची वस्ती

इटाली आणि स्पेन या दोन राष्ट्रांनी जर्मनीच्या वतीने फ्रान्सविरुद्ध शस्त्र उचलले तर लष्करीदृष्ट्या फ्रान्सची परिस्थिति अगदी अनुकंपनीय होईल इतकेच नव्हे तर खुद्द फ्रेंच राष्ट्राची शकले पडल्यावांचून राहणार नाहीत. आमच्या माहितीप्रमाणे फ्रान्समध्ये फ्रेंच राष्ट्राशी समरस न झालेले इटालियन सुमारे दहा लक्ष व स्पॅनिश सुमारे सहा लक्ष आहेत. यापेक्षा अधिक महत्त्वाची गोष्ट ही की, दक्षिण फ्रान्समधील फ्रेंच नागरिकांमध्ये देखील स्पॅनिश आणि इटालियन वसाहतवाल्यांच्या संततीची संख्या फ्रेंच वंशियांच्या संख्येपेक्षा अनेक पटींनी अधिक आहे. उदाहरणार्थ, मार्सेईसारख्या साडेसहा लक्ष वस्तीच्या बंदरात अस्सल फ्रेंच वंशाच्या लोकांची संख्या अर्धा लक्ष सुद्धा भरणार नाही. दक्षिण फ्रान्समधील मार्सेई, नीस, नार्बोन, लिओं, ऱ्होन, इत्यादि परगण्यांतून इटालियन लोकवस्ती अतिशय आहे व तुलज, मोंतोबान, ओश, आजेन इकडेहि ती पसरत चालली आहे. बेयोन, बोर्दो, तुरो, पेर्पिन्यान इत्यादि भागात स्पॅनिश लोकवस्ती झपाट्याने वाढत आहे. दक्षिण फ्रान्सचा सर्वच भाग असुरक्षित असल्याने अचानक हल्ला करून तो प्रदेश जिंकून घेणे अगदी सोपे आहे. यामुळे इटालीचे नवे धोरण फ्रान्सला अत्यंत घातक होणार आहे.

आपल्या कठोर लष्करी यंत्राच्या प्रभावाने जर्मनीने इटालीला वश करून घेतले असले तरी महेंद्रानेच वापरण्याला योग्य अशा सुकुमार प्रहरणाच्या प्रभावाने इंग्लंडला वश करून घेण्याचा हेर हिटलेर याचा उद्देश आहे. इंग्लंडचे जबाबदार लोकमत जर्मनीला अनुकूल करून घेण्याचा कार्यभार प्रिन्सेस होहेनलोहे यांनी आपल्या कोमल शिरावर घेतला आहे. या प्रिन्सेस होहेनलोहे पूर्वी फ्रान्समध्ये राहून जर्मनीची कामगिरी बजावीत असत. त्यांचे तेथील वास्तव्य फ्रेंच सरकारा-ला असह्य झाल्यामुळे फ्रेंच पोलिसांनी त्यांना आपल्या हद्दीबाहेर नेऊन सोडले व पोलिसखात्याच्या हाती लागलेला त्यांचा सर्व पत्रव्यवहार वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध केला. प्रिन्सेस होहेनलोहे व लंडनच्या डेली मेलचे मालक लॉर्ड रॉदरमियर यांची मैत्री इंग्लंडमध्ये सुप्रसिद्धच आहे. कदाचित् याच मैत्रीला उद्देशून मि. विकहॅम स्टीड यांनी १८ जुलै रोजी लॉर्ड रॉदरमियर यांना लिहिलेल्या पत्रांत पुढील उद्गार काढले आहेत

'Why you should wish to weaken the defence of this country by encouraging Germany to attack and if possible to obliterate Czechoslovakia is a mystery to me.'

## लॉर्ड रॉदरमियर यांची स्पष्टोक्ति

लॉर्ड रॉदरमियर यांनी किती निकराने सध्या जर्मनीच्या वर्ताने झेकोस्लोव्हाकियाविरुद्ध मोहीम चालविली आहे, हे मि. विकहॅम स्टीड याना त्यानी दिलेल्या उत्तरातील पुढील एकदोन वाक्यावरून देखील चागले कळून येईल

'The more the truth about this monstrosity of a country becomes known, the less chance there is that the British people will allow their Government to associate itself directly or indirectly in its affairs. From the day Czechoslovakia came into existence, it has oppressed the German, Hungarian Slovak and Polish minorities. It has done so without protest, because the League of Nations until lately was entirely controlled by France with her allies including Czechoslovakia.'

लॉर्ड रॉदरमियर यानी झेकोस्लोव्हाकियाविषयी वापरलेले शब्द झेकोस्लोव्हाकियाच्या कित्येक मित्रांना रुचणार नाहीत. पण त्यांनी ही गोष्ट लक्षांत घ्यावी की अल्पसंख्याकांच्या प्रश्नाचा ज्यांनी साद्यंत अभ्यास केला आहे असे ब्रिटिश तज्ज्ञ मि. मॅकार्टने याच्या 'Hungary and Her Successors' या ग्रंथाच्या वाचनाने कोणाहि निःपक्षपाती माणसाचे लॉर्ड रॉदरमियर यांच्याप्रमाणेच मत होईल.

लॉर्ड रॉदरमियर याच्या झेकोस्लोव्हाकियावरील मोहिमेला इंग्लंडचे तह-परिषदेच्या वेळचे मुख्य प्रधान मि. लॉइड जॉर्ज यांनीहि अनपेक्षितपणे पाठिंबा दिला आहे. मि. लॉइड जॉर्ज यांनी लंडनच्या ईव्हिनिंग स्टँडर्ड या पत्राला एका मुलाखतीत असे सांगितले की, भावी झेकोस्लोव्हाकियांत केवळ पंधरा लक्ष जर्मन लोकांचा समावेश होणार आहे, अशी माझी समजूत करून देऊन डॉ. बेनेश यांनी झेकोस्लोव्हाकियाचे राष्ट्र बनविण्याला माझी समति मिळविली. मि. लॉइड जॉर्ज यांची ही तक्रार खरी असावी, असे झेकोस्लोव्हाकियाच्या निर्मा-

त्यांच्या वर्तनावरून वाटतें. झेकोस्लोव्हाकियाचे संस्थापक व पहिले प्रेसिडेंट मासारिक यांनीहि स्लोव्हाक लोकांना त्यांच्या प्रांतापुरते पूर्ण स्वातंत्र्य देण्याचें वचन देऊन त्यांना झेक लोकांच्या कारस्थानांच्या खोड्यांत अडकविलें व मग प्रांतिक स्वातंत्र्य देण्याऐवजी हंगारीच्या राज्यांत त्यांना जे अधिकार होते ते अधिकारहि काढून घेतले. मग झेक लोकांनी स्लोव्हाक लोकाशी जित राष्ट्राप्रमाणे वागण्याला सुरुवात केली. झेक लोकांच्या कारस्थान-पटुत्वाची असली अनेक उदाहरणे सांगता येतील. पण तो प्रस्तुत लेखाचा विषय नव्हे.

लॉर्ड रॉदरमियर व मि. लॉइड जॉर्ज याच्या मोहिमेचा ब्रिटिश लोकमता-वर चांगलाच परिणाम होत आहे हे पाहून हेर हिटलेर यांनी प्रिन्सेस होहेनलोहे यांचे मित्र व आपले ए. डी. सी. कॅप्टन व्हीडेमान यांना ब्रिटिश प्रधानमंडळा-च्या मनोवृत्तीत कितपत फरक पडला आहे, याची चांचणी करावयाला पाठविले. कॅ. व्हीडेमान यांनी ता. १९ जुलै रोजी लॉर्ड हॅलिफाक्स यांची मुलाखत घेतली. या मुलाखतीत कॅप्टनसाहेबाच्या उमद्या स्वभावाची लॉर्डसाहेबांवर चांगलीच छाप पडली. पण झेकोस्लोव्हाकियाचा प्रश्न सुटेपर्यंत इंग्लंड जर्मनीशी कसलाहि तह करावयाला तयार नाही असेच जर्मनीच्या खास प्रतिनिधींना कळून आलें.

## रशियनांचा बनावट लेख

यापूर्वी इंग्लंडच लोकमत दिवसानुदिवस जर्मनीला अधिकाधिक अनुकूल होत असलेले पाहून रशियाच्या गुप्त पोलिसांनी लंडनच्या न्यूज क्रॉनिकलचे पर-राष्ट्रीय राजकारणावरील लेखक मि. व्हर्नान बार्टलेट याच्या करवी सुप्रसिद्ध नाझी सेनापति जनरल फॉन राइशेनाउ यांच्या स्पेनवरील एका व्याख्यानाचा बनावट रिपोर्ट न्यूज क्रॉनिकलमध्ये प्रसिद्ध करविला. या बनावट व्याख्यानात ज. फ्रांकोचे-मार्फत स्पेनमध्ये ज्याप्रमाणे जर्मनीचे वर्चस्व प्रस्थापित झाले आहे,तसेच ते पोर्तुगाल-वरहि प्रस्थापित करण्याची इच्छा व्यक्त केली असल्याने इंग्लंडचे लोकमत एकाएकी जर्मनीवर अत्यंत प्रक्षुब्ध झाले. हे व्याख्यान अथपासून इतिपर्यंत बनावट होते ही गोष्ट आता न्यू स्टेट्समन अँड नेशनसारख्या मजूर पक्षाच्या पत्रालाहि मान्य करावी लागली आहे. पण रशियाने पुरविलेल्या या बनावट रिपोर्टाचा जो दुष्प-रिणाम व्हावयाचा तो पूर्वीच होऊन गेला आहे.

गेल्या मे महिन्यात जर्मनीविरुद्ध एकत्र झालेल्या राष्ट्रांतून इंग्लंडला फोडण्यांत जर्मनीच्या नेत्याना अद्यापि यश आलें नसले तरी रशियाचा शेजारी पोलंड हा मात्र त्या कटातून पूर्णपणे फुटून निघाला आहे. मे महिन्यांत देखील इटालीच्या लष्करी मदतीच्या अभावीं जर्मनी एकाकी पडलेला पाहूनच पोलंडचे कर्नल बेक यांनी फ्रान्सच्या राजकारणाला पाठिंबा दिला होता. पण गेल्या महिन्यांत जनरल पारियानी यांच्यामार्फत जर्मनी व इटाली यांच्यामध्ये परस्परांना लष्करी साहाय्य करण्याचा तह झाल्याबरोबर कर्नल बेक यानींहि फ्रान्सचा पक्ष सोडून परत जर्मनीचा पक्ष उचलून धरला आहे. वास्तविक पाहता आतापर्यंत पोलंडला फ्रान्सची अतिशय मदत झाली आहे व पोलंड आणि फ्रान्स यांच्यामध्ये परस्परांना लष्करी साहाय्य करण्याचा तहहि झालेला आहे. पण या तहांतून कर्नल बेक यांनी अशी शक्कल काढली आहे की फ्रान्सवर जर्मनीनें स्वारी केली तर फ्रान्सला मदत करावयाला पोलंड बांधलेला आहे, फ्रान्सच्या एखाद्या दोस्त राष्ट्रावर जर्मनीनें स्वारी केली व त्यामुळें जर जर्मनी आणि फ्रान्स यांचें युद्ध जुंपलें तर फ्रान्सला मदत करण्याला पोलंड बांधलेला नाही.

## तोंडी वचनावर विश्वास

कर्नल बेक यांनी केलेला करक फ्रेंच मुत्सद्दी मंडळींनाहि तत्वतः मान्य आहे व यामुळे पोलंडला झेकोस्लोव्हाकियाच्या विरुद्ध जर्मनीला मिळण्याची संधि मिळू नये म्हणून १९३६ च्या सप्टेंबर महिन्यांत फ्रान्सच्या तत्कालीन मंत्र्यांनी पोलंडला २६० कोटि फ्रॅंकांचें कर्ज देऊन पोलंडकडून असें अभिवचन घेतलें होतें की, झेकोस्लोव्हाकियाविरुद्ध पोलंड जर्मनीला मदत करणार नाही; इतकेंच नव्हे तर रशियाच्या वैमानिक दलाला पोलंडच्या हद्दीतून झेकोस्लोव्हाकियाच्या मदतीला जाऊं देईल. अशा आशयाचें तोंडी अभिवचन पोलंडच्या वतीनें मार्शल रिड्झस्मिग्ली यांनी फ्रेंच सेनापति जनरल गामेलँ यांना दिलें होतें आणि फ्रान्सचे अजागळ मुत्सद्दी या तोंडी वचनावर आतापर्यंत विसंबून राहिले होते. कर्नल बेक यांनी वर सांगितलेली शक्कल काढल्यानंतर फ्रेंच वकिलांनी मार्शल रिड्झस्मिग्ली यांना त्यांच्या अभिवचनाची आठवण देण्याचा प्रयत्न केला. तेव्हा दुर्वासशापामुळे शकुंतलेची आठवण विसरलेल्या दुष्यंताचा

अवतार आणून मार्शलसाहेबांनी फ्रेंच वकिलांना सांगितलें की, म्हातारपणच्या अभिशापानें माझी आता स्मरणशक्ति नष्ट झाली आहे, तेव्हा असलें कांहीं वचन दिल्याचा माझा लेख दाखविलात तरच त्या खुणेच्या कागदाकडे पाहून मला परत पूर्वीचें स्मरण होईल. मो. ब्लम यांच्या पहिल्या प्रधानमंडळाच्या अजागळ-पणाचा हा सर्वोत्कृष्ट नमुना आहे.

## पूर्वीच्या लेखांतील उतारा

या ठिकाणीं मला माझ्या स्वतःच्याच लेखाचा एक उतारा देण्याचा मोह आवरत नाहीं. फ्रान्सनें पोलंडला कर्ज दिल्यानंतर ५-१०-१९३६ च्या केसरींत मी लिहिलें होतें ' फ्रान्सचे बहुतेक मित्र हे फ्रान्सकडून मिळणाऱ्या कर्जासाठींच त्याचे मित्र झाले आहेत, त्यामुळें आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांचा फ्रान्सला कितपत उपयोग होईल याची शंकाच आहे. उदाहरणार्थ, यंदा सप्टेंबरमध्यें पोलंडच्या नव्या सर्वाधिकाऱ्यांनीं फ्रान्सबरोबर नवा तह केला व फ्रान्सकडून भलें मोठें कर्ज काढलें. आधीच असलीं कर्जें फिटण्याची आशा थोडीच असते, त्यांतून फ्रान्सला आपल्या ऋणकोबरोबर सलोख्यानें वागण्याची इंग्रजी विद्या अवगत झालेली नाहीं; यामुळें कर्जफेडीचे तगादे सुरू झाले की, फ्रान्सचे आजचे मित्र त्याच्या शत्रूशीं सख्य करण्याला उत्सुक होतात; अशा रीतीनें फ्रान्सचें राजकीय व आर्थिक अशा दोनहि दृष्टींनीं नुकसान होतें. ' दोन वर्षांपूर्वीचा हा अंदाज आज तंतोतंत खरा ठरला आहे. असो, जर्मनीच्या कह्यांत गेल्यामुळें पोलंडनें राष्ट्रसंघाच्या कौन्सिलावरची आपली जागा सोडून दिली आहे. झेकोस्लो-व्हाकियानें रशियाकडून विकत घेतलेलीं विमानें देखील पोलंडनें आपल्या हद्दीतून त्या देशाला जाऊं दिलीं नाहींत. इतकेंच नव्हे तर तीं विमानें रुमानियातून झेको-स्लोव्हाकियाला गेलीं असतां पोलंड व रुमानिया यांमधील तहाचा त्यामुळें भंग झाला अशी तक्रार कर्नल बेक यांनीं रुमानियाच्या राजेसाहेबांकडे केली.

## हंगारी कोणत्या बाजूला मिळणार ?

पोलंड देश जर्मनीच्या बाजूला गेला असला तरी हंगारी देश आता जर्मनीच्या विरुद्ध पक्षाला मिळाला आहे अशी कित्येकांची समजूत झाली आहे. या समजुतीला आधार काय तर हंगारीनें झेकोस्लो-

व्हाकिया, रुमानिया व युगोस्लाव्हिया या तीन राष्ट्रांशी गेल्या महिन्यांत केलेला अनाक्रमणाचा तह. हंगारीच्या आजपर्यंतच्या धोरणाचा विचार केला असतां अनभिज्ञ लोकांची अशी गैरसमजूत होणे स्वाभाविक आहे. वास्तविक प्रकार असा आहे कीं १५-११-१९३६ रोजी हेर आल्फ्रेड रोझेनबेर्ग यांनी आपल्या सहीने फोएल्किशेर बेओबाख्टेरमध्ये एक लेख लिहून हंगारीच्या राज्यकर्त्यांना असा सल्ला दिला आहे

'It has only been possible to speak of a National-Socialist policy of treaty revision in relation to definite demands not as a policy to be pursued for its own sake in all places and in every direction. This attitude, which has meant a great deal of renunciation on our part, has also governed our relationship to other suffering nations.'

या लेखाचे तात्पर्य असे होतें की 'समस्तांशि भांडेल तोचि करंटा' हें तत्त्व लक्षांत ठेवून हंगारीने एका वेळी एकाच राष्ट्राची कुरापत काढावी व हंगारीला हे धोरण पटत असेल तरच हंगारीचा गेल्या युद्धामुळे गेलेला मुलूख परत मिळवून देण्याला जर्मनी मदत करील.

हा लेख प्रसिद्ध झाल्यानंतर कांही दिवसांनी कांही रुमानियन प्रवाशांबरोबर बोलतांना हेर हिटलेर यांनी असे सांगितले की, माझ्या सांगण्यावरूनच हेर रोझेनबेर्ग यांनी तो लेख लिहिला होता. हंगारीच्या राज्यकर्त्यांना हा सल्ला तेव्हा रुचला नव्हता. पण यंदा जर्मनी व ऑस्ट्रिया यांची एकी झाल्यामुळे जर्मनीची सरहद्द हंगारीला भिडली, तेव्हा जर्मनीशी सख्य करण्याची हंगारीच्या राज्यकर्त्यांना अतिशय जरूरी भासू लागली व हेर हिटलेर यांच्या इच्छेला मान देऊन त्यांनी शेजारच्या राष्ट्रांबरोबर अनाक्रमणाचा तह करून टाकला आहे. युगोस्लाव्हिया, रुमानिया व झेकोस्लोव्हाकिया या तीनहि देशांतून हंगेरियन वंशाच्या लोकांची संख्या बरीच मोठी आहे. या हंगेरियन लोकांच्या हक्काचें संरक्षण करण्यासंबंधीचे करार हंगारी प्रत्येक देशाबरोबर वेगवेगळे करणार आहे, असे जर्मन वर्तमानपत्रे सांगतात. ही गोष्ट खरी असल्यास या छोट्या त्रिराष्ट्रसंधीची शकले होण्याची वेळ जवळ आली आहे, असाच अंदाज करावा लागतो. महायुद्धापूर्वी हंगारी ऑस्ट्रियन साम्राज्यांतील एक भागीदार होता. त्याप्रमाणेंच हंगारीने नव्या जर्मन साम्राज्यांतील एक भागीदार व्हावे, अशी हेर हिटलेर यांची इच्छा आहे व त्या दृष्टीने जर्मनीची हंगारीच्या राज्यकर्त्यांशी बोलणी चालू आहेत. या कारस्थानांची समग्र माहिती अद्यापि बाहेर आली नाही. —केसरी, ता. १३ सप्टेंबर, १९३८.

# युरोपांत सध्या चाललेलीं कारस्थानें

मागील लेख प्रसिद्ध झाल्यानंतर हंगारीच्या नेत्यांनी बर्लिन येथे केलेल्या भाषणाचा सारांश उपलब्ध झाला आहे. या भाषणांत ॲडमिरल हॉर्टी म्हणतात

'When we cross the frontiers of the Reich, we never feel that we are travelling in a foreign country.'

जर्मनीत प्रवास करीत असतांना हंगारीच्या नेत्यांना परक्या देशांत प्रवास करीत असल्यासारखे कधींहि वाटत नाही. तेव्हा ते जर्मनीशी पूर्णपणे सहकार्य करण्याला सिद्ध आहेत, हे वेगळे सांगावयाला नकोच. या बाबतीत ॲडमिरल हॉर्टी व हेर हिटलेर यांनी परस्पराना साहाय्य करण्याच्या शपथा वाहिल्या आहेत व हे साहाय्य कसे करावयाचे यासंबंधी त्याचे करारहि झाले आहेत.

## रुमानियांत रशियाचें वाढतें वजन

याप्रमाणे हंगारी देश जर्मनीच्या पक्षाला मिळाला असला तर त्याच्या शेजारचा रुमानिया देश पूर्णपणे रशियाच्या पक्षाला मिळाला आहे. गेल्या वर्षाच्या अखेरीला रुमानियात मो. गोगा यांचे फॅसिस्ट मंत्रिमंडळ अस्तित्वांत आले. हे मंत्रिमडळ अस्तित्वात आल्यावर पांच आठवड्यानी बुखारेस्ट येथील रशियन वकिलातीचे प्रमुख मो. बुटेंको हे एकाएकी बेपत्ता झाले. तेव्हा रुमानियांतील फॅसिस्ट पक्षाने त्याचा खून केला असला पाहिजे अशा समजुतीने रशियाने रुमानियाच्या राजेसाहेबाना आपले मंत्रिमंडळ बदलावयाला लावून रशियाला अनुकूल असलेल्या पक्षाचे मंत्रिमंडळ अस्तित्वांत आणले. या वेळेपासून रुमानियाच्या राज्यकारभारांत रशियाचे वजन एकसारखे वाढत चालले आहे. रशियाच्या आग्रहामुळे रुमानियाच्या राजांनी आपल्या देशांतील 'आयर्नगार्ड' ही फॅसिस्ट संस्था मोडून टाकून तिच्या पुढाऱ्यांना जबरदस्त शिक्षा ठोठावल्या. त्यानंतर रशियाच्या विमानांना रुमानियामधून झेकोस्लोव्हाकियांत जाण्याची

परवानगी दिली व अगदी अलीकडे रशियन सैन्यालाहि रुमानियांतून वाट देण्याचें कबूल केलें आहे.

रुमानियात रशियाचे प्रस्थ वाढत चाललेलें पाहून इंग्लंडनेहि त्या देशांत आपला एक वैमानिक तळ स्थापण्याचें ठरविलें असल्याचें वृत्त मध्यंतरी प्रसिद्ध झालें होतें. पण त्या कारस्थानाची अधिक माहिती अद्यापि बाहेर आली नाहीं. इंग्लंडच्या परराष्ट्रीय राजकारणाच्या खात्यांतील बाल्कन राष्ट्रांच्या राजकारणाचे तज्ज्ञ मि. स्ट्रँग हे गेल्या वसंतांत बाल्कन प्रदेशात गेले होते व तेथील सर्व राष्ट्रांना इंग्लंडच्या जाळ्यांत ओढण्याचे त्यांनी यशस्वी प्रयत्न केले आहेत. मि. स्ट्रँग यांच्या सल्ल्यावरून बाल्कन राष्ट्राना कर्ज देणें व त्यांचा माल विकत घेणें ही कामें करण्यासाठी इंग्लंडच्या व्यापारी खात्यानें एक डिपार्टमेंटल कमिटी नेमली आहे. ही कमिटी नेमण्यापूर्वीच इंग्लंडनें तुर्कस्थानाला १ कोटि ६० लक्ष पौंडांचे कर्ज दिलें होतें. या कर्जाच्या ओझ्याखाली वाकून गेल्यामुळे २१ जुलै रोजी न्यूयॉर्क टाईम्सला दिलेल्या मुलाखतींत तुर्कस्थानचे परराष्ट्रमंत्री डॉ. तवफिक रुस्तू आरास यांनी म्हटलें आहे,

'No matter what happens, never will we be found in a camp opposing Britain. Yet I do not admit an actual alliance with Britain. I do not like the word alliance.'

'आम्ही ब्रिटनच्याविरुद्ध कधीहि लढणार नाहीं पण ब्रिटनबरोबर संधिहि केलेला नाहीं,' या दोन वाक्यांपैकीं सिद्धांतवाक्य कोणतें व अर्थवादात्मक वाक्य कोणतें हे मागील लेखांतील पोलंडच्या उदाहरणावरून वाचकांना कळून येईलच. तूर्त कर्जाची सारी रक्कम पदरी पडेपर्यंत तुर्कस्थान इंग्रजांच्या बाजूचा आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे.

## बाल्कन राष्ट्रांना दिलेल्या कर्जाचा हेतु

भावी महायुद्धांत रशिया व इंग्लंड हे एका पक्षाला असले तर तुर्कस्थानाच्या सामुद्रधुन्यांतूनच रशियाला इंग्लंडची मदत होऊं शकेल. यामुळे बास्फोरस व दार्दानेलिस या सामुद्रधुन्यांचे तुर्कस्थानाला इटालीच्या आकस्मिक

हल्ल्यापासून संरक्षण करतां यावें, याकरितां इंग्लंडने तुर्कस्थानाला कर्ज दिले आहे व याच हेतूने इतर बाल्कनराष्ट्रांना आपल्या जाळ्यांत ओढण्याचीं कारस्थानें चालविली आहेत. ही कारस्थाने अर्थातच दार्दानेलिसवरील तटबंदीच्या सामर्थ्यावर अवलंबून असल्यामुळे तीन महिन्यापूर्वी रुमानियाचे राजे कारोल यांनी स्मर्नापर्यंत येऊन या तटबंदीची सूक्ष्म पाहणी केली. रुमानियाला अजून इंग्लंडने कर्ज दिल्याचे ऐकिवांत नाही, पण फ्रान्सने मात्र रुमानियाला व बल्गेरियाला प्रत्येकी ३० कोटि फ्रँकांची कर्जें दिली आहेत. डान्यूब नदीवरील दळणवळणावर एका आंतरराष्ट्रीय कमिशनची देखरेख असे. त्या कमिशनचे सर्व अधिकार इंग्लंड व फ्रान्स यांनी रुमानियाला देऊन टाकून त्या राष्ट्रावर आणखी एका उपकाराचे ओझे लादले आहे. इंग्लंड व फ्रान्स यांनी बाल्कनप्रदेशांतून युद्धोपयोगी कच्चा माल व अन्नसामुग्री खरेदी करण्याचा सपाटा चालविला आहे. यांत सांगण्याजोगी मौज ही की, बाल्कनराष्ट्रांच्या साहाय्याची आवश्यकता असल्याने इंग्लंड त्यांच्या मालाची खरेदी करीत आहे, तर उलटपक्षी या राष्ट्रांच्या मदतीविषयी निराश होऊन जर्मनीने कानडा, न्यूझीलंड वगैरे ब्रिटिश वसाहतीतून आपली खरेदी चालविली आहे.

इंग्लंड, फ्रान्स व रशिया यांच्या संयुक्त प्रयत्नांमुळे बाल्कनराष्ट्रांचा गट आज जर्मनी व इटाली यांच्याविरुद्ध गेला आहे, तर पोलंडच्या प्रयत्नाने बाल्टिक राष्ट्रांचा गट रशियाच्याविरुद्ध जाण्याची लक्षणे दिसत आहेत. झेकोस्लोव्हाकियाच्या प्रकरणांत आपण जर्मनीचेच अनुकरण करणार असल्याचें पोलंडने नुकतेच जाहीर केले आहे. यामुळे १९ जुलै रोजी रशियाच्या प्राव्हदा पत्राने पोलंडचे परराष्ट्रमंत्री कर्नल बेक यांच्यावर केलेल्या टीकेतील कांही वाक्ये उतरून घेणें जरूर आहे.

‘The block of neutral States extending from the Black Sea to the Arctic Ocean which Col. Beck was trying to create, was really a Fascist organization which would be wielded in good time as an instrument against Russia. Col. Beck's intention was to create a military base for German Fascism in the Baltic from which an attack on Soviet terri-

tory might be launched and Estonia had already fallen a victim to the schemes of Hitler's tool.'

## मुसोलिनींची घोषणा

आता हेर हिटलेर यांचे दुसरे समानशील मित्र सि. मुसोलिनी याच्या कारस्थानाकडे थोडे लक्ष पुरविलें पाहिजे. जर्मनी व इटाली यांच्यामध्ये परस्पर-सहायाचा तह झाल्याची वार्ता मागील लेखांत दिलीच होती. त्यानंतर ता. १८ सप्टेंबर रोजीं सि. मुसोलिनी यांनीं स्वतःच एका जाहीर भाषणांत सांगितलें

'We hope that if peace is not possible the eventual conflict will be limited and circumscribed. But if this does not happen and it ends in ranging forces of a universal character for or against Prague, let it be known that Italy's position has already been chosen.'

या घोषणेमुळे इटाली जर्मनीला साहाय्य करील कीं नाहीं, याविषयीं कसलाहि संशय उरलेला नाहीं. सि. मुसोलिनी यांचा जर्मनीला साहाय्य करण्याचा संकल्प, ऑगस्टच्या दुसऱ्या आठवड्यांत मार्शल बाल्बो व हेर हिटलेर या उभयतांची मुलाखत झाली, तेव्हापासूनच प्रकट होऊं लागला होता. कारण ता. २१ ऑगस्ट रोजीं रोम येथील ब्रिटिश वकिलातीचे मुख्याधिकारी सर नोएल चार्लेस यांनीं काउंट चियानो याची मुलाखत घेऊन स्पेनमधील राष्ट्रीय सरकाराला इटालीकडून वाढत्या प्रमाणावर मदत जात असल्याबद्दल तक्रार केली. तेव्हा काउंट चियानो यांनीं ब्रिटिश राजदूताला उत्तर दिलें कीं, अशीच वाढत्या प्रमाणावर मदत करण्याचें इटालियन सरकारानें ठरविलें आहे. याच्या मागील आठवड्यांत ता. १५ ऑगस्ट रोजीं स्पेनच्या राष्ट्रीय सरकारानें इटालियन सरकारच्या सांगण्यावरून आपल्या मुलुखांतील विदेशी सैन्य परत पाठविण्याची ब्रिटिश सरकाराची योजना झिडकारिली होती. त्यानंतर ता. १८ रोजीं सि. मुसोलिनी यांनीं पांतेल्लारिया या अत्यंत महत्त्वाच्या बेटाच्या तटबंदीची तपासणी केली. पांतेल्लारियाच्या तपासणीपूर्वी काउंट चियानो यांनीं सर नोएल चार्लेस यांना इटालियन सरकार बालेआरिक बेटें सोडण्याला तयार नाहीं असें सांगितलें होते.

पण या संवादाची नक्की तारीख सांगतां येत नाही. ता. १४ ऑगस्टची अशी एक बातमी आहे

'A semi-official despatch describing Italian air-attacks on Spanish Republican territory referred for the first time to the 'Legionary Aviation of the Balearics.'

या बातमीवरून असे दिसते की, याच सुमाराला वरील संवाद घडला असावा. इटालीच्या या धमकीमुळे इटाली व इंग्लंड या उभयतांमध्ये एखादा संकटप्रसंगच उद्भवायचा, पण त्या वेळी जर्मनीच्या लष्करी हालचालींनी चेंबरलेन साहेबांचे मन अत्यंत व्यग्र झाले असल्याने त्यांनी काउंट चियानोच्या उद्गारांकडे दुर्लक्ष केले.

गेल्या मे महिन्यात इटालीला जर्मनीपासून फोडून इंग्लंड, फ्रान्स, झेकोस्लोव्हाकिया वगैरे राष्ट्रांनी जर्मनीच्या राज्यकर्त्यांना कशी तंबी दिली, याची हकीकत मागील लेखात आलीच आहे. या कारस्थानांचा जर्मनीच्या मनावर काय परिणाम झाला हे हेर हिटलेर यांनी १२ सप्टेंबरच्या भाषणात सांगितले आहे

'A great Power cannot swallow such an impudent incident again. Consequently I adopted grave measures on May 28 and increased the strength of the army.'

## जर्मनीच्या लष्करी सामर्थ्याची वाढ

जर्मनीचे लष्करी सामर्थ्य वाढविण्यासाठी जून महिन्यापासून हेर हिटलेर यांनी कोणत्या योजना अंमलांत आणल्या, याची आता थोडी माहिती दिली पाहिजे. जर्मनीचे युद्धसामर्थ्य तातडतोब वाढविण्यासाठी हेर हिटलेर यांनी यंदाच्या वर्षारंभी राजकीय मतभेदामुळे राजीनामे देऊन सेवानिवृत्त झालेल्या सेनापतीपैकी सर्वांत प्रसिद्ध सेनापति बॅरन फॉन फ्रिट्श यांना नवा अधिकार देऊन १५ जूनपासून परत कामावर घेतले. बॅरन फॉन फ्रिट्श हे परत अधिकारावर आल्यामुळे जर्मन लष्करांतील मतभेद बऱ्याच अंशांनी मिटले आहेत, असें पाहून २१ जून रोजी डॉ. गोएबेल्स यांनी एका भाषणांत झेकोस्लोव्हाकियाला धमकी दिली

'We will not look on much longer while $3\frac{1}{2}$ million Germans are maltreated. We saw in Austria that one race cannot be separated in two countries and we shall soon see it somewhere else.'

यानंतर ता. २३ जून रोजी एक जाहीरनामा काढून जर्मनीतील कोणाहि स्त्री–पुरुषाला राष्ट्राला जरूर असलेल्या कामावर पाठविण्याचा अधिकार मार्शल फॉन गोएरिंग यांनी आपल्याकडे घेतला. १९३३ साली नाझीपक्ष अधिकारारूढ झाला, त्या वेळी जर्मनीत साठ लक्षांहून अधिक लोक बेकार होते. तेव्हापासून आतापर्यंत जर्मनीच्या उद्योगधंद्यांच्या व लष्कराच्या वाढीमुळे हे सर्व बेकार कामास लागले आहेत. इतकेच नव्हे तर १९३३ च्या प्रारंभी बेकारांच्या यादीत नसलेल्या नवीन २५ लक्ष लोकांना जर्मनीने काम पुरविले आहे. यंदाच्या वर्षारंभी तर नव्या मजुरांच्या तुटवड्यामुळे जर्मनीची औद्योगिक प्रगति खुंटते की काय, अशी परिस्थिति उत्पन्न झाली होती. पण लौकरच ऑस्ट्रिया देश जर्मनीत सामील झाल्याने त्या देशांतील सुमारे सात लक्ष बेकार मजुरांचे नवे घबाड जर्मनीला लाभले. पण तेवढ्यानेहि जर्मनीच्या लष्करी व औद्योगिक यंत्रांची भूक भागली नाही. केवळ जर्मनीत आता दोन कोटीवर लोक कामावर असून प्रकृतीने धड असलेला एकहि इसम बेकार नाही. ऑस्ट्रियांतील बेकारांची संख्या जुलैच्या प्रारंभी २॥ लक्ष होती व आता ती शून्याच्या जवळच आली आहे. यामुळे लष्करी महत्त्वाच्या कामांना मजुरांचा अतिशय तुटवडा पडूं लागल्याने राष्ट्रीय महत्त्वाच्या कामांवर कोणाहि स्त्रीपुरुषाला पाठविण्याचा नवा कायदा करावा लागला. या कायद्याची अंमलबजावणी करतांना मार्शल फॉन गोएरिंग यांच्या हाताखालील अधिकाऱ्यांनी बराच विवेक दाखविलेला दिसतो. कारण या कायद्याप्रमाणें सामान्यतः अविवाहित लोकांनाच वेठीला धरून ऱ्हाईन नदीतीरावरील तटबंदीची कामें पुरी करावयाला पाठविले आहे. ही तटबंदी येत्या नाताळाच्या पूर्वी पुरी व्हावयाची आहे. यानंतर १८ जुलैला राष्ट्राच्या गरजेसाठी कोणाहि व्यक्तीची मालमत्ता सक्तीने उसनी घेण्याचा अधिकार जर्मन सरकाराने आपल्याकडे घेतला. ता. ९ ऑगस्ट रोजी या कायद्याची अंमलबजावणी करून जर्मन सरकाराने साऱ्या देशांतील दोन टन व त्याहून अधिक माल वाहून नेणाऱ्या साऱ्या

लॉन्या वेठीस धरून पश्चिम सरहद्दीवर नेल्या. याच सुमाराला परदेशी नागरिकांना ऱ्हाईनलॅंडमधील भागांतून प्रवास करण्याला मनाई झाली.

## युद्धसामुग्रीची खरेदी

आस्ट्रिया देश जर्मनीत समाविष्ट झाल्यानंतर ऑस्ट्रियाच्या खजिन्यांतील सुमारे सात कोटि पौंड जर्मनीला मिळाले. हे सारे द्रव्य खर्चून जर्मनीने युद्धोपयोगी द्रव्ये व अन्नसामुग्री यांचा देशांत प्रचंड सांठा करून ठेवला आहे. एकट्या कानडांतूनच मका व गहू यांनी भरलेल्या २५ आगबोटी या उन्हाळ्यांत जर्मनीला आल्या. खुद्द जर्मनीचे गव्हाचे पीकदेखील यंदा फार चांगले आले आहे. त्यामुळे मार्शल फॉन गोएरिंग यांनी देशभर गव्हाची पेवे भरून ठेवण्याचा हुकूम सोडला आहे. जर्मनीच्या सुदैवाने यंदाच मेक्सिकोतील पेट्रोलच्या खाणीच्या मालकीवरून इंग्लंड व अमेरिका यांचे मेक्सिकोशी भांडण झाले व त्यामुळे या दोन्ही देशांनी मेक्सिकोच्या तेलावर बहिष्कार टाकला. या भांडणाची संधि साधून जर्मनीने जर्मनी, इटाली व स्वीडन या तीन राष्ट्रांच्या वतीने अगदी स्वस्त दरांत मेक्सिकोकडून एक कोटि डॉलर किंमतीचे पेट्रोल खरेदी केले. जर्मनीने हा डाव साधल्यामुळे इंग्लंडचा किती जळफळाट झाला, हे लंडन टाईम्सच्या लेखांवरून ठळक रीतीने दिसून येते. पेट्रोलप्रमाणेच लाकडाच्या रांध्याचीहि जर्मनीने मोठ्या प्रमाणावर खरेदी चालविली आहे. ही कदाचित् प्रचारयुद्धाची तयारी असेल. लवकर नष्ट होणाऱ्या वस्तू न नासतां साठवून ठेवतां याव्यात म्हणून जर्मनीने अगदी अलीकडे ४५ प्रचंड थंडी कोठारे बांधली आहेत. ही सारी कोठारे आता अंडी, मांस, लोणी व भाज्या यांनी भरून गेली आहेत. ऑस्ट्रियाचे द्रव्य खर्चून मिळविलेल्या सामुग्रीवरच युद्धामध्ये जर्मनीचा नऊ महिने निर्वाह होऊं शकेल, असा विशेषज्ञांचा अंदाज आहे.

## सरहद्दीवरील तटबंदी

आता जर्मनीच्या नव्या तटबंदीची थोडी माहिती सांगितली पाहिजे. फ्रेंच सरहद्दीवरील नवी जर्मन तटबंदी सुमारें १२० मैल लांबीची आहे. या तटबंदीवरील तोफांनी, अल्सेस प्रांतांतील स्ट्रासबुर्ग व कोल्मार ही औद्योगिक केंद्रें व त्या सर्व प्रांताला विद्युच्छक्तीचा पुरवठा करणारे केंद्र केम्स यांचा लढाईच्या

पहिल्या दिवशीच विध्वंस करतां येईल. त्याचप्रमाणे स्ट्रासबुर्गहून निघणाऱ्या तीन महत्त्वाच्या रेल्वेहि या तटबंदीवरील तोफांच्या माऱ्यांत सापडतात. ही तटबंदी बांधतांना प्रत्येक पाऊण फर्लांग अंतरावर यांत्रिक तोफांची मारगिरी करण्यासाठी अभेद्य बुरूज बांधले आहेत. या बुरुजाच्या आश्रयाने तीस हजार सैन्याला आपल्या दसपट सैन्याचा हल्ला परतवितां येईल अशी जर्मनीची अपेक्षा आहे. जर्मनीची ही नवी तटबंदी अतिशय घाईने बांधल्यामुळे ती व्हावी तशी भक्कम झाली नाही हे जर्मन सेनापतींना माहीत आहे. पण फ्रेंच सैन्याला थोपवून धरण्याला ती पुरेशी आहे असा त्यांचा अंदाज आहे. फ्रेंच सरहद्दीप्रमाणेच ऑस्ट्रिया व झेकोस्लोव्हाकिया यांच्या सरहद्दीवरदेखील नवी तटबंदी बांधण्याचे काम चालू आहे व ही तटबंदी ओलांडून झेकोस्लोव्हाकियाचे सैन्य ऑस्ट्रियांत शिरू नये, याविषयी जर्मनीचे सेनापति अत्यंत काळजी घेत आहेत. याकरिता व्हिएन्नाच्या उत्तरेची तीस ऑस्ट्रियन खेडी जमीनदोस्त करून त्यांच्याजागी जर्मनीने अत्यंत उत्कृष्ट अशी तटबंदी उभारली आहे. याच्या उलट जर्मनी व झेकोस्लोव्हाकिया यांच्या सरहद्दीवर जर्मनीच्या लष्करीखात्याने जी कामे केली आहेत, ती अगदी जुजबी स्वरूपाची आहेत. या तटबंदीच्या कामावर चार लक्षांहून अधिक जर्मन जवान खपत असून लष्करी हालचालीसाठी सुमारे २५ लक्ष लढवय्ये छावणीत दाखल झाले आहेत.

## जर्मनीबाहेरील जर्मनांची परिषद

लष्करी तयारी इतकेच लोकांच्या मानसिक सिद्धतेकडेहि नव्या जर्मनीच्या नेत्यांचे लक्ष असते. १९३७ साली ऑस्ट्रिया देश जर्मनीत समाविष्ट करण्याची कारस्थाने चालू असतां जर्मनीच्या नेत्यांनी जुलैच्या अखेरीला ब्रेस्लाउ शहरी अखिल जर्मनांच्या संगीतपरिषदेच्या निमित्ताने वीस हजारांहून अधिक ऑस्ट्रियन प्रतिनिधि जमवून जर्मनीविषयी व जर्मनीच्या नेत्याविषयीं त्यांना किती प्रेम वाटते, याची चांचणी करून पाहिली होती. त्याचप्रमाणे यंदादेखील जुलै महिन्याच्या अखेरीला त्याच ब्रेस्लाउ शहरी जर्मनीबाहेरील जर्मनांची परिषद भरवून त्या परिषदेला जर्मनीच्या नेत्यांनी झेकोस्लोव्हाकियांतील जर्मनांचे वीस हजारांहून अधिक प्रतिनिधि जमविले होते. यावेळी जर्मनीबाहेरील

प्रत्येक देशांतील जर्मन प्रतिनिधींनी आपल्या देशांतील निशाणासह मिरवत येऊन हेर हिटलेर यांना सलामी दिली. या सलामीच्या प्रसंगी हेर हेनलाइन हे हेर हिटलेर यांच्या शेजारीच उभे राहिले होते. या मिरवणुकीत झेकोस्लोव्हाकियांतील जर्मन जेव्हा झेक राष्ट्राच्या निशाणासह या दोघा नेत्यासमोर आले तेव्हा त्या उभयतांनी एकमेकांशी संभाषणांत गर्क झाल्याचे मिष करून त्या निशाणवाहकांच्या सलामीकडे दुर्लक्ष केलं व ते निशाण निघून गेल्यानंतर पुनः मिरवणुकीकडे लक्ष वळवून हेर हिटलेर यांनी झेकोस्लोव्हाकियातील जर्मन प्रतिनिधीशी हस्तांदोलन करण्याला सुरुवात केली. या क्षुल्लक गोष्टीवरून त्या प्रतिनिधींना सुडेटेन जर्मनांना शक्य तितक्या लवकर स्वतंत्र करण्याचा हेर हिटलेर यांचा संकल्प कळून आला व त्याबरोबर हर्षातिरेकामुळे नेहमीची जर्मन शिस्त सारी विसरून त्या वीस हजार प्रतिनिधींनी हेर हिटलेर यांच्यापुढे गर्दी करून दीड तासपर्यंत त्यांचा प्रचंड जयघोष केला या जयघोषाविषयी सुप्रसिद्ध फ्रेंच लेखक पेर्तिनाक्स यांनी म्हटले आहे

'Such an ovation was never received by any emperor or king on the part of men who were not their subjects.'

जर्मन राज्यकर्त्यांचा प्रचाराच्या उपयुक्ततेवर अतिशय विश्वास असला तरी युद्ध उपस्थित झाल्यावर देशांतील सर्व वर्तमानपत्रे बंद करण्याचा त्यांचा संकल्प झाला आहे. वर्तमानपत्रे बंद झाल्यावर रेडियोच्या द्वाराने सर्व माहिती जनतेस कळावी, याकरितां जर्मनीने ३५ मार्क किंमतीचे अति स्वस्त रेडियोचे सेट तयार केले असून रोख पाच मार्क व दर महिन्याला अडीच मार्क याप्रमाणे १५ महिन्यांत पूर्ण किंमतीची भरपाई करण्याच्या अटीवर ते विकले जात आहेत.

## सरहद्दीची पहाणी

जर्मनीची लष्करी तयारी पूर्ण होत आल्यावर जर्मन सेनापतींनी बव्हेरिया, सायलेशिया व ऑस्ट्रिया या तीनहि बाजूंनी झेकोस्लोव्हाकियाच्या सरहद्दीवर सैन्य एकत्र करण्याला सुरुवात केली. सायलेशियांतील राटिबोर या एका गांवाशेजारीच ५० हजारावर सैन्य एकत्रित केले होतें. बव्हेरियांतील सर्व मोठ्या शहरांतील पोलिसांना सरहद्दीवर पाठवून त्यांची कामे स्वयंसेवकांच्याकडे सोपविली. झेक

लोक अवसानघातकी आहेत, आणीबाणीच्या प्रसंगी प्राण वांचविण्यासाठी ते काय वाटेल ते करतील, असा प्रो. बान्से, जनरल फॉन राइशेनाउ इत्यादि नाझी-युद्धशास्त्रज्ञांचा ग्रह असल्यामुळे त्यांना झेक सैन्याची यत्किंचित्‌देखील धास्ती वाटत नव्हती. फ्रेंच सरहद्दीवर मात्र कोणत्या घडामोडी होतील कोण जाणे, अशी त्यांना सारखी धाकधूक वाटत होती. याकरिता खुद्द हेर हिटलेर यांनी आठ सेनापतींसमवेत स्विट्झर्लंडपासून हॉलंडपर्यंतच्या सर्व जर्मन सरहद्दीची सूक्ष्म पाहणी करून झेकोस्लोव्हाकियाचा निकाल लागेपर्यंत जर्मन सरहद्द अभेद्य राहील, अशी आपली खात्री करून घेतली. जर्मनीची ही सारी लष्करी तयारी पाहून झेकोस्लोव्हाकियांतील लष्करी अधिकाऱ्यांचे रक्त गोठायला लागले होते, असे मो. फ्रान्स्वा ग्रुप्रे या फ्रेंच बातमीदाराच्या ऑगस्ट महिन्यांतील लेखांवरून दिसते.

## कामाचे नियमित तास व कामाची हरकत

जर्मनीची ही सारी तयारी चालू असतां फ्रान्स व इंग्लंड ही राष्ट्रे काय करीत होती, याचा आता विचार केला पाहिजे. फ्रान्सपुरते बोलावयाचे म्हणजे मो. ब्लम यांच्या ४० तासांच्या आठवड्यामुळे फ्रान्सचे लष्करी यंत्र पूर्णपणे पंगू झाले आहे. या चाळीस तासांच्या आठवड्याचा फ्रान्सच्या लष्करी सामर्थ्यावर किती वाईट परिणाम झाला आहे याची चर्चा करण्याचा हा प्रसंग नव्हे; तरीदेखील या कायद्याच्या दुष्परिणामांची एक दोन ठळक उदाहरणे येथे सांगणे जरूर आहे. जर्मनीत एका महिन्यांत जितकी विमाने तयार होतात, तितकी विमाने फ्रान्समध्ये सबंध १९३७ सालांत देखील तयार झाली नाहीत. विमानांची जी कहाणी तीच कहाणी आरमारी जहाजांचीहि आहे. १९३५ पासून आतां पर्यंतच्या ३॥ वर्षांत जर्मनीने तीन लक्षांहून अधिक टनांचे आरमार बांधले आहे. पण फ्रान्सला चार वर्षांत दोन लक्ष टनांची जहाजे देखील बांधतां येत नाहीत. गेल्या ऑगस्ट महिन्याच्या प्रारंभी फ्रान्सचे आरमारमंत्री मो. कांपिन्शी यांनी एका जाहीर भाषणांत सांगितले की, जर्मनीतील शेकडा ३२ कामगार आठवड्याला ४५ तास काम करतात, शेकडा २२ कामगार आठवड्याला ४८ तास काम करतात व शेकडा ४० कामगार आठवड्याला ६० तास काम

करतात, अशा परिस्थितीत फ्रान्समधील कामाचे तास वाढविल्याशिवाय फ्रान्सचा जर्मनीविरुद्ध टिकाव लागणार नाही. फ्रान्समधील ही सारी परिस्थिति जर्मनीच्या राजकर्त्यांना फार चांगली माहीत असल्याने फ्रान्सच्या धमक्यांना ते काडीमात्र भीक घालीत नाहीत.

### इंग्लंड व फ्रान्स यांचे संबंध

एकट्या फ्रान्सला जर्मनी भीक घालीत नाही, हे ओळखून फ्रेंच राज्यकर्त्यांनी फ्रान्स व इंग्लंड यांच्या मैत्रीचे साऱ्या जगापुढे प्रदर्शन करून जर्मनीला दहशत घालण्याचा प्रयत्न गेल्या जुलै महिन्यात केला. हा प्रयत्न म्हणजे इंग्लंडच्या राजाचा पारिस येथे फ्रेंच राज्यकर्त्यांनी केलेला सत्कार होय. इंग्लंडच्या राजाच्या पारिस येथील सत्कारामुळे जर्मनीला वचक बसून निदान चार महिने तरी जर्मनी, इंग्लंड व फ्रान्स यांची कुरापत काढणार नाही, अशी आपली आशा फ्रेंच मुत्सद्दी मंडळींनी त्या वेळी बोलूनहि दाखविली होती. पण या सत्काराचा जर्मनीतील मुत्सद्दी मंडळींच्या मनावर अगदी उलटा परिणाम झाला. त्यांनी या सत्काराचा अर्थ असा केला की, फ्रान्स हे आतां इंग्लंडचे मांडलिक राष्ट्र बनले आहे व यापुढे फ्रान्सचे परराष्ट्रीय राजकारण पूर्णपणे इंग्लंडच्या तंत्राने चालणार. यामुळे मध्य-युरोपांतील भानगडींत इंग्लंडला तटस्थ रहावयाला भाग पाडणे हे त्यांनी आपले ध्येय ठरविले. यासाठी त्यांनी कोणती कारस्थाने केली, ही हकीकत पुढील लेखावरच सोपविली पाहिजे.

—केसरी, ता. २७ सप्टेंबर, १९३८.



# जर्मनीचा नवा अभूतपूर्व विजय

## लेखांक पहिला

### कम्युनिस्टांचा भ्रमनिरास

झेकोस्लोव्हाकियाच्या प्रकरणांत इंग्लंडने तटस्थ रहावे, याकरिता जर्मनीने कोणती कारस्थाने केली व त्या कारस्थानांना कां यश आले, याची चर्चा करण्यापूर्वी आमच्या कम्यूनिस्ट मित्रांच्या एका भ्रमाचा निरास करणे जरूर आहे. कम्यूनिस्टांची अशी समजूत आहे की भावी युद्धांत जर्मनीचा पराजय झाला, तर जर्मनीत फॅसिस्टांच्या ऐवजी कम्यूनिस्टांची सत्ता प्रस्थापित होईल आणि जर्मनीत कम्यूनिस्टांचे राज्य प्रस्थापित झाले म्हणजे इंग्लंडांतदेखील क्रांति होऊन ब्रिटिश भांडवलवाल्या वर्गाचा नायनाट होईल, या भीतीमुळे इंग्लंडांतील भांडवलवाले कोणत्याहि परिस्थितीत जर्मनीशी लढावयाला सिद्ध होणे अशक्य आहे. ही सारी अनुमाने काढतांना कम्यूनिस्टांनी एक गोष्ट गृहीत धरली आहे; ती ही की भावी महायुद्धांतून कम्यूनिस्ट राज्यक्रांति उद्भवणे अनिवार्य आहे. पण ही त्यांची समजूत अगदी निराधार आहे, कारण अर्वाचीन काळांतील अतिप्रचंड शहरांतून केंद्रीभूत झालेल्या अतिप्रचंड कारखान्यांतील संघटित मजूरवर्गच कम्यूनिस्ट राज्यक्रांति घडवून आणूं शकतो आणि भावी महायुद्धाच्या प्रारंभीच निरनिराळ्या राष्ट्रांच्या वैमानिक दळाकडून कम्यूनिस्ट क्रांतीला अत्यावश्यक असलेल्या प्रचंड शहरांचा, त्या शहरांतील प्रचंड कारखान्यांचा व त्या कारखान्यांतील मजूरवर्गाचा विध्वंस होणार असल्याने युद्धसमाप्तीनंतर सर्व राष्ट्रांतून मजूरवर्गाऐवजी शेतकरीवर्गाचे प्राबल्य होण्याचा संभव अधिक आहे. आणि शेतकरीवर्गाला कम्यूनिस्ट बनविणे अतिशय अवघड आहे, असा रशियाचा अनुभव आहे. ही परिस्थिति केवळ इंग्लंडांतीलच नव्हे, तर साऱ्या जगांतील भांडवलवाल्यांना चांगली माहीत आहे. तेव्हा कम्यूनिस्टांच्या भीतीने भांडवलवाला वर्ग तटस्थ

राहण्याऐवजी युद्धाला प्रवृत्त होण्याचा संभवच अधिक आहे, ही गोष्ट आमच्या कम्यूनिस्ट मित्रांनी विसरूं नये. इंग्लंडचे राज्यकर्ते आज जर्मनीशी युद्ध करीत नसले, तर ते केवळ आपल्या राष्ट्राच्या हिताहिताचा आणि यशापयशाचा विचार करून युद्ध करीत नाहीत, हीच गोष्ट सत्य आहे.

## लोकसंख्येची वाढ

कोणत्याहि राष्ट्राच्या हिताहिताचा विचार करतांना लोकसंख्येच्या प्रश्नाला प्राधान्य देणे आवश्यक असते. विसाव्या शतकाच्या आरंभी युरोपची लोकसंख्या सुमारे ४० कोटि होती. १९३१ च्या खानेसुमारीत ती ५१ कोटि भरली व १९६१ साली ती ६० कोटीवर जाईल, असा लोकसंख्याकोविदांचा अंदाज आहे. या तीस वर्षांतील नऊ कोटीच्या वाढीपैकी रशियांत सुमार पांच कोटीची वाढ होईल, पोलंड व बाल्कन प्रदेशांतील राष्ट्रे यांच्या लोकसंख्येत सुमारे अडीच कोटीची भर पडेल व पश्चिम युरोपांतील राष्ट्रांची संख्या अवघ्या दीड कोटीने वाढेल, असे तज्ज्ञांचे मत आहे. १९३१ साली एकंदर युरोपांतील लोकसंख्येपैकी शेकडा ३३ टक्के लोक रशियन होते, तर १९६१ साली युरोपच्या लोकसंख्येत रशियन लोकांचे प्रमाण शेकडा ४० होईल. याच मुदतींत पोलंडचे प्रमाण ८ा वरून दहावर जाईल पण याच मुदतीत जर्मनीचे प्रमाण १७ा वरून १६ वर येईल, इंग्लंडचे प्रमाण शेकडा १२ वरून ९ वर येईल. फ्रेंच लोकांचे प्रमाणहि इंग्लंड इतकेच कमी होईल, असें आंकडेशास्त्रावरून समजते. इंग्लंड आणि फ्रान्स या राष्ट्रांचे महत्त्व युरोपांत कसे कमी होत चालले आहे, हे या आंकड्यांवरून स्पष्ट दिसून येते. अशा परिस्थितीत या दोन्ही राष्ट्रांनी जर्मनीसारख्या बलाढ्य राष्ट्राशी युद्धाला प्रवृत्त होणे म्हणजे आत्महत्येला प्रवृत्त होण्याइतकेच अविचाराचे ठरेल. हा लोकसंख्येचा प्रश्न लक्षांत घेतला म्हणजे हेर हिटलेर व मि. चेबरलेन यांनी जर्मनी व इंग्लंड परस्परांशी कधीहि लढणार नाहीत, अशा अर्थाच्या करारनाम्यावर कां सह्या केल्या व पश्चिम युरोपांतील राष्ट्रें रशियाविरुद्ध कां संघटित होत आहेत, याचें रहस्य वाचकांना समजून येईल.

वास्तविक पाहता विसाव्या शतकाच्या प्रारंभीच चॅटर्टनसारख्या सुप्रसिद्ध

समाजशास्त्रज्ञांनी, आंग्लो-जर्मन वंशाच्या लोकांनी आपापसांत लढू नये; कारण त्यांच्या आपापसांतील यादवीमुळे स्लाव्ह वंशाचे जुन्या जगावर अधिराज्य स्थापन होईल, असा सल्ला दिला होता. पण इंग्लंडचे सारे राजकीय तत्त्वज्ञान वंशशास्त्राला विरोधी असल्याने इग्लंडने आतापर्यंत या सल्ल्याकडे दुर्लक्षच केले आहे. उलटपक्षी जर्मनीने मात्र गेल्या युद्धाच्या अनुभवाने शहाणपणा शिकून आपण होऊन इग्लंडशी केव्हाहि युद्ध करावयाचे नाही, असा संकल्प केला आहे. मि. चेंबरलेन यांनी परवा केलेला करार जर इग्लंडला मनापासून पसंत असेल, तर जर्मनीशी युद्ध न करण्याच्या धोरणाला अनुकूल असलेले वंशशास्त्राचें तत्त्वज्ञान इंग्लंडात हळीहळू फैलावेल व त्या तत्त्वज्ञानाला अनुकूल अशी इंग्लंडच्या समाजाची पुनर्रचना होईल. पण हे समाजशास्त्राचे प्रश्न जोशीबुवांच्यासाठी राखून ठेवून आपण आपल्या राजकीय कारस्थानांच्या इतिहासाकडे वळावे, हे बरे.

## राजकारस्थानांचा इतिहास

राजकीय कारस्थानाच्या इतिहासाच्या उपयुक्ततेविषयी पुष्कळांना शंका येते. पण या इतिहासाच्या अभ्यासाच्या अभावी गेल्या महिन्यात कित्येक हिंदी वर्तमानपत्रांनी जे तारे तोडले आहेत, ते पाहून त्यांनी आपल्या शंकेचे निरसन करून घ्यावे. ता. ३० सप्टेंबर रोजी 'फ्री प्रेस'च्या संपादकांनी म्हटले आहे

'It is a sad confession to make, but it is true, that there has been a good deal of wild guessing in regard to the basic facts of the European crisis. But it was inevitable.'

युरोपांतील युद्धसंकटाविषयी लिहितांना आपण वाटेल तसे तारे तोडले, ही गोष्ट या संपादक महाशयांना मान्य आहे. पण ते म्हणतात की, ही गोष्ट टाळणें अशक्य होते. आपल्या पत्राच्या कीर्तीला काळिमा लागूं नये, याकरिता विश्वसनीय माहिती कोणती व अविश्वसनीय माहिती कोणती याची थोडीशी चिकित्सा करून मग मजकूर छापला म्हणजे सहसा अशी पश्चात्ताप करण्याची पाळी येत नाही. पण ही साधी गोष्ट साध्य होण्याला जो अभ्यासीपणा व निःपक्षपातीपणा लागतो तो हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रांच्या कचेऱ्यांतून अत्यंत दुर्मिळ झाला आहे, इतकेच खरे.

## निष्कारण डिवचून जागे केलें

आपली युद्धाची तयारी नसतांना शांतताप्रिय राष्ट्रांनी एखाद्या बलाढ्य, बुभुक्षित आणि युद्धप्रिय राष्ट्राला युद्धाची धमकी दिली असतां तिचे परिणाम काय होतात, हें जर कोणाला समजून घ्यावयाचें असेल तर त्यांनी गेल्या चार महिन्यांतील युरोपियन राजकारणाचे सूक्ष्म निरीक्षण करणे जरूर आहे. गेल्या मे महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यांत इंग्लंड, फ्रान्स, झेकोस्लोव्हाकिया व रशिया या सर्वांनी मिळून जर्मन सैन्य झेकोस्लोव्हाकियांत शिरल्यास आमची सैन्यें जर्मनीवर चालून येतील, अशी हेर हिटलेर यांना धमकी दिली. झेकोस्लोव्हाकियांत सैन्य घुसविण्याचा जर्मनीचा तेव्हा बेत नव्हता व वरील चौकडीबरोबर तावडतोब युद्ध पुकारण्याची जर्मनीची तयारीहि नव्हती. यामुळे हेर हिटलेर यांना त्या वेळी आपला अपमान सोसून स्वस्थ बसावे लागले. या अपमानामुळे जर्मनीच्या नेत्यांना पराकाष्ठेचा क्रोध आला व त्यांच्या या क्रोधाचा जर्मनीचे परराष्ट्रमंत्री हेर फॉन रिब्बेनट्रोप यांना सर्वांत अधिक अनुभव घ्यावा लागला. पण हेर फॉन रिब्बेनट्रोप यांच्या अलौकिक मुत्सद्देगिरीचा पुरावा हाच की, त्यांनी केवळ हेर हिटलेर याच्या क्रोधाचा अत्यंत कुशलपणाने उपयोग करून इंग्लंडच्या प्रधानमंत्र्यांना हेर हिटलेर याची आराधना करण्याला भाग पाडले.

ता. २१ मेच्या प्रकरणानंतर इंग्लड व फ्रान्स या दोन्ही देशांतील मंडळींची अशी समजूत झाली होती की, आता यापुढे सहा महिनेपर्यंत तरी जर्मनी झेकोस्लोव्हाकियाच्या वाटेस जाणार नाही. इंग्लंडचे सर्वांत मुरब्बी मुत्सद्दी सर रॉबर्ट वान्सिटार्ट यांना मात्र असला भ्रम झाला नव्हता. पण सध्याचे इंग्लंडचें मंत्रिमंडळ सर रॉबर्ट वान्सिटार्ट यांच्या मताला कांहीच किंमत देत नसल्यामुळे त्यांच्या दूरदर्शी सल्लामसलतीचा चेंबरलेनमंत्रिमंडळाला कांहीच उपयोग झाला नाही. ता. २१ मेच्या प्रकरणांत झालेल्या अपमानाचा हेर हिटलेर हे सूड घेतल्यावांचून राहणार नाहीत, हे इंग्लंडच्या मंत्रिमंडळाला उघडच दिसत होते, पण तावडतोब हा सूड घेण्याचा प्रयत्न हेर हिटलेर करतील, अशी त्या मंत्रिमंडळाची कल्पना झाली नाही. यामुळे सुमारें दोन महिनेपर्यंत ब्रिटिश मुत्सद्दी जवळजवळ झोप काढीत होते, असें म्हण-

ण्यास हरकत नाही. नाही म्हणावयाला ब्रिटिश मंत्रिमंडळांतील जर्मनीला अनुकूल असलेल्या पक्षाने गेल्या जून महिन्यांत झेकोस्लोव्हाकियांतील अल्पसंख्याकांचा प्रश्न सोडविण्यासाठी जर्मनीसकट सर्व राष्ट्रांचे एक आतरराष्ट्रीय कमिशन नेमावे व झेकोस्लोव्हाकियाने या कमिशनचा निर्णय मान्य केल्यास सर्व राष्ट्रांनी त्याच्या सुरक्षिततेची हमी घ्यावी अशी सूचना फ्रेंच व झेक मंत्रिमंडळाना केली होती. पण त्या दोन्ही मंत्रिमंडळानी, ती विचार न करताच, फेटाळून लाविली.

## जर्मनीच्या मागण्या

त्यानंतर ता. २२ जुलै रोजी जर्मनीचे लंडन येथील वकील हेर फॉन डिर्क्सेन यांनी चेंबरलेन याची मुलाखत घेऊन झेकोस्लोव्हाकियाचा प्रश्न सोडविण्याबद्दलच्या जर्मनीच्या सूचना किंवा मागण्या त्यांच्यापुढे मांडल्या. (१) लंडन येथे इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी व इटाली या चार राष्ट्रांची परिषद भरवून सुडेटेन जर्मनांच्या प्रश्नाचा विचार व्हावा. (२) हा प्रश्न कसा सोडवावा, या तत्त्वावर परिषदेचे एकमत झाले म्हणजे त्या तत्त्वाची अंमलबजावणी कशी करावी याची वाटाघाट करण्यासाठी झेकोस्लोव्हाकियाला त्या परिषदेला आपला प्रतिनिधि पाठविण्याला सांगावे. (३) परिषदेच्या निर्णयाला झेकोस्लोव्हाकियाने मान्यता दिली म्हणजे जर्मनीने त्या राष्ट्राशी पांच वर्षे मुदतीचा अनाक्रमणाचा तह करावा. (४) झेकोस्लोव्हाकियाचा प्रश्न सुटल्यानंतर इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी व इटाली या चारी राष्ट्रांमधील सर्व वादग्रस्त प्रश्नांचा निकाल लावून चार राष्ट्रांचा तह घडवून आणावा व जर्मनीच्या वसाहती जर्मनीला परत मिळाव्या. या साऱ्या मागण्या आजच्या परिस्थितीत मान्य करणें अशक्य आहे, असे चेंबरलेनसाहेबांनी जर्मनीच्या वकिलांना सांगितले. तरी देखील या साऱ्या मागण्यांच्या अनुरोधाने झेकोस्लोव्हाकियातील परिस्थितीचा विचार करून ब्रिटिश सरकारला सल्ला देण्यासाठी त्यांनी लॉर्ड रन्सिमन यांचे मिशन झेकोस्लोव्हाकियाला जाणार असल्याचे २६ जुलै रोजी पार्लमेंटांत जाहीर केलें. लॉर्ड रन्सिमन यांच्या मिशनला जर्मनीची मान्यता मिळवून त्यालाच आंतरराष्ट्रीय कमिशनचा दर्जा मिळवून द्यावा, अशी ब्रिटिश सरकाराची इच्छा होती. पण जर्मनीने त्या मिशनला मान्यता देण्याचें नाकारलें.

तेव्हा लॉर्ड हॅलिफाक्स यांनी २८ जुलै रोजी हेर फॉन रिब्बेनट्रोप यांना एक वैयक्तिक पत्र लिहून अशी विनंति केली की, लॉर्ड रन्सिमन यांच्या मिशनला जर्मनीने मान्यता नाकारिली असली तरीहि झेकोस्लोव्हाकिया व सुडेटेन जर्मन यांच्यामध्ये समेट घडवून आणण्याच्या कार्यात त्याना जर्मन सरकारने मदत करावी. या विनंतीलाहि हेर फॉन रिब्बेनट्रोप यानी संमति दिली नाही. लॉर्ड हॅलिफाक्स याच्या प्रस्तुत पत्राचा मि. चेंबरलेन यानी आपल्या पार्लमेंटातील भाषणांत उल्लेख केला आहे. पण त्याच्यापूर्वी हेर फॉन डिर्क्सेन यानी केलेल्या महत्त्वाच्या मागण्याचा त्याच्या भाषणात कोठेहि निर्देश नाही ही लपवाछपवी येथे नमूद करणे जरूर आहे.

## जर्मनीला पोकळ धमकी

ऑगस्ट महिन्यात जर्मनीच्या लष्करी तयारीचे वास्तविक स्वरूप अधिकाधिक उघड व्हावयाला लागले. तेव्हा ता. १२ ऑगस्ट रोजी ब्रिटिश सरकाराने आपले बार्लिन येथील वकील सर नेव्हिल हेंडर्सन यांच्यामार्फत जर्मन सरकाराला कळविले की, जर्मनीच्या लष्करी हालचालीचा युरोपातील राजकीय परिस्थितीवर अतिशय वाईट परिणाम होत आहे. त्यामुळे झेकोस्लोव्हाकियाला आपल्या सरक्षणासाठी शिलकी सैन्याला बराकीत दाखल होण्याचा हुकूम सोडावा लागेल व तसा हुकूम सुटल्यास लॉर्ड रन्सिमन यांच्यामार्फत जी तडजोडीची बोलणी चालली आहेत, ती बद पडतील. या खलित्याला हेर फॉन रिब्बेनट्रोप यांनी असे उत्तर दिले की जर्मनीच्या लष्करी हालचालीच्या बाबतीत चौकशी करण्याचा इग्लंडाला कांहीहि अधिकार नाही आणि या हालचालीचे निमित्त करून इंग्लंड जर लॉर्ड रन्सिमन याना परत बोलावणार असले तर इग्लडचे जर्मनीवर उपकारच होतील, कारण इंग्लंडच्या मध्यस्थीमुळे झेकोस्लोव्हाकियाचा हटवादीपणा मात्र वाढत चालला आहे. जर्मनीच्या परराष्ट्रमंत्र्यांचे हे बेपर्वाईचे उत्तर पाहून इंग्लंडचे परराष्ट्रमंत्री अगदी चिडून गेले व त्यांनी जर्मन सरकाराला सक्त ताकीद देण्यासाठी एक जाहीर भाषण करावयाचें ठरविले. पण असें भाषण करण्याच्या तत्त्वाला मि. चेंबरलेन यांची संमति मिळाली तरी त्या भाषणांतील तपशिलाला त्यांची संमति मिळेना. मि. चेंबरलेन यांच्या

सेन्सॉरशिपमुळे लॉर्ड हॅलिफाक्स यांनी भाषण करण्याचा आपला बेतच रद्द केला. तेव्हा चेंबरलेनसाहेबांनी ब्रिटिश जनतेच्या समाधानासाठी माजी परराष्ट्रमंत्री सर जॉन सायमन यांना एक शब्दावडंबरपूर्ण पण पूर्णपणे निस्सत्त्व असें भाषण करावयाला सांगितले. सर जॉन सायमन यांचे हे भाषण ता. २७ ऑगस्ट रोजी झाले. या भाषणांत मि. चेंबरलेन यांच्या मार्च महिन्यांतील भाषणाचीच पुनरुक्ति असलेली पाहून हेर फॉन रिब्बेनट्रोप यांनी असा निष्कर्ष काढला की, सध्याच्या आणीबाणीच्या प्रसंगी काय करावें हे ब्रिटिश मुत्सद्दी मंडळींना सुचत नसल्यामुळे मुख्य प्रधानांच्या एका जुन्या भाषणाचें बुजगावणें पुढे करून ते जर्मनीला भीति दाखविण्याचा प्रयत्न करीत आहेत. या भाषणाच्या दुसऱ्या दिवशीच ब्रिटिश सरकाराने आपल्या बर्लिन येथील वकिलाना निकडीच्या कामाकरितां लंडनला बोलाविलें.

सर नेव्हिल हेंडर्सन हे लंडनला जात आहेत, असे कळल्याबरोबर हेर फॉन रिब्बेनट्रोप यांनी त्यांना भेटीला बोलावून जर्मनीतील वास्तविक परिस्थितीची जाणीव दिली. या मुलाखतीत सर नेव्हिल हेंडर्सन याना असे सांगण्यांत आले की, सर जॉन सायमन यांच्या भाषणाप्रमाणे पुनः जर कोणी इंग्लंडांत भाषण करील किंवा ब्रिटिश सरकार आपल्या वकिलामार्फत जर जर्मनीला धमक्या देईल तर जर्मनीचें सैन्य ताबडतोब झेकोस्लोव्हाकियांत घुसेल व जर्मनीची विमानें लंडनवर हल्ला करतील. जर्मनीची ही निर्वाणीची सूचना सर नेव्हिल हेंडर्सन यांच्यामार्फत ब्रिटिश मंत्रिमंडळाला कळतांच ब्रिटिश मंत्रिमंडळ अगदी गोंधळून गेलें व या अडचणीतून मार्ग कसा काढावा, हे कांही त्यांना सुचेना. अखेरीला परराष्ट्रीय खात्यांतील सल्लागारांनी अशी क्लृप्ति काढली की सर नेव्हिल हेंडर्सन यांच्यामार्फत जर्मनीला खलिताहि पाठवूं नये किंवा यापुढे मंत्रिमंडळापैकी कोणीहि परराष्ट्रीय राजकारणावर भाषणेंहि करूं नयेत; सर नेव्हिल यांना लंडनला बोलावलेंच आहे, तेव्हा त्यांनी मंत्रिमंडळाच्या खास बैठकीला हजर रहावें व या मंत्रिमंडळाच्या चर्चेचा सारांश त्यांनी आपल्या स्वतःच्या जबाबदारीवर जर्मनीच्या मुख्य मुख्य पुढाऱ्यांना सांगावा. अशा रीतीने सर नेव्हिल हेंडर्सन हे हात हालवीत बर्लिनला परत आल्यावर त्यांनी हेर फॉन रिब्बेनट्रोप यांची मुलाखत घेतली व मंत्रिमंडळाच्या चर्चेत ऐकलेल्या धमक्या त्यांच्या कानावर घातल्या.

तेव्हां जर्मनीचे साहसी परराष्ट्रमंत्री ब्रिटिश वकिलाला म्हणाले, 'You are bluffing and you know it and we know it and they know it.'

## सुडेटेन जर्मनांशीं कारस्थान

या वेळेपर्यंत झेकोस्लोव्हाकियामध्ये लॉर्ड रन्सिमन यांच्यामार्फत जी समेटाचीं बोलणी चालू होती, ती बंद पडण्याजोगी परिस्थिति उत्पन्न झाली होती, कारण रोजच्या रोज जर्मनीतून सुडेटेन जर्मनांच्या पुढाऱ्यांना असे संदेश येत होते की हेर हेनलाइन याच्या आठ मागण्या झेकोस्लोव्हाकियाचे सरकार तावडतोब मान्य करीत नसल्यामुळे त्या सरकाराशी इतःपर तडजोडीची बोलणी चालूं ठेवणे शक्य नाही असे तुम्ही जाहीर करा. तेव्हा लॉर्ड रन्सिमन यानी हेर हेनलाइन यांना खुद्द हेर हिटलेर याच्याकडे जाऊन तडजोडीची बोलणी पुढे चालू ठेवण्याची परवानगी मागण्यास सांगितले. त्याप्रमाणे ता. २ सप्टेंबर रोजी हेर हेनलाइन यानी बेर्टेसगाडेन येथे हेर हिटलेर याची मुलाखत घेतली. या मुलाखतीच्या वेळी हेर हिटलेर यांना लॉर्ड रन्सिमन यांनी हेर हेनलाइन यांच्यामार्फत पाठविलेल्या पत्रात असे स्पष्ट म्हटले होते की, झेक सरकाराने देऊ केलेल्या सवलती पुरेशा आहेत असे ब्रिटिश सरकाराला वाटते, तेव्हा जर्मन सरकाराने सुडेटेन जर्मनाना त्या अटीवर झेकोस्लोव्हाकियाशी समेट करण्याला परवानगी द्यावी. पण मुलाखतीच्या पूर्वीच हेर फॉन रिब्बेनट्रोप यांनी हेर हिटलेर यांची मुलाखत घेऊन झेकोस्लोव्हाकियाच्या संरक्षणासाठी इंग्लंड केव्हांहि लढणार नाही अशी त्यांची खात्री पटवून दिली होती. त्यामुळे हेर हिटलेर यांनी हेर हेनलाइन यांना स्पष्टच सांगितले की, इंग्लंडला कोणत्या सवलती पुरेशा वाटतात व कोणत्या सवलती फाजील वाटतात, इकडे जर्मनीला लक्ष द्यावयाचे कारण नाही, आज ज्या सवलती इंग्लंडला फाजील वाटतात त्या उद्या आपोआप पटावयाला लागतील, तेव्हा लॉर्ड रन्सिमन यांच्या सूचनांना तुम्ही खुशाल नकार द्या. या मुलाखतीची वार्ता लॉर्ड रन्सिमन यांच्यामार्फत इंग्लंडांत पोचल्यावर हेर हिटलेर यांच्या अपेक्षेप्रमाणे ब्रिटिश सरकाराने झेक सरकाराला सुडेटेन जर्मनांना आणखी नवीन सवलती देण्याचा सल्ला दिला व त्या सवलती तावडतोब प्रसिद्ध करण्याची सूचना केली. झेक सरकाराच्या या शेव-

टच्या उदार सवलती प्रसिद्ध झाल्यानंतर सुडेटेन जर्मन पक्षांत फाटाफूट होईल अशी ब्रिटिश सरकाराची अपेक्षा होती. या सूचनेप्रमाणें झेक सरकाराने ता. ६ सप्टेंबर रोजी आपल्या सवलती प्रसिद्ध केल्या. पण याच वेळीं सुडेटेन जर्मनांना अधिकाअधिक सवलती देण्याचे धोरण पसंत नसलेल्या झेक अधिकाऱ्यांनी हेर हेनलाइन यांच्या अनुयायांवर अनेक अत्याचार केल्याची उदाहरणे घडली. या प्रकरणामुळे सुडेटेन जर्मनांमध्ये फाटाफूट होण्याऐवजी झेक राष्ट्राचा पूर्णपणे कांटा काढण्याचा त्यांचा निश्चय मात्र दृढतर झाला.

## हेंडर्सन यांना इषारा

या वेळेपर्यंत न्युरेंबेर्ग येथील नाझी पक्षाच्या परिषदेला सुरुवात झाली होती. या परिषदेत हेर हिटलेर यांचे निर्वाणीचे भाषण होणार असा सर्वांचा अंदाज असल्यामुळे ते भाषण होण्यापूर्वी हेर हिटलेर यांना, झेकोस्लोव्हाकियांत जर्मन सैन्य शिरल्यास इंग्लंडला झेकोस्लोव्हाकियाच्या बाजूने लढावे लागेल, असा इषारा देणें अवश्य आहे, असे ब्रिटिश सरकाराचे मत झाले होते. यासाठी एकंदर परिस्थितीचा रागरंग पाहून सर नेव्हिल हेंडर्सन यांनी इष्ट असल्यास हेर हिटलेर यांची स्वतःच मुलाखत घेऊन ब्रिटिश सरकारचे धोरण त्यांना समजावून द्यावे, अशी त्यांना लंडनहून सूचना आली. ही वार्ता हेर फॉन रिब्बेनट्रॉप यांना समजताच त्यांनी सर नेव्हिल हेंडर्सन यांना मुलाखतीला बोलावून सांगितले 'इंग्लंड झेकोस्लोव्हाकियाला मदत करील अशा आशयाची धमकी यापूर्वी मे महिन्यांत इंग्लंडने दिली होती व तेव्हापासून हेर हिटलेर हे अत्यंत संतप्त होऊन गेले आहेत तेव्हा असली धमकी आपण फिरून एकवार त्यांच्यासमोर उच्चारली, तर ते हटकून आपल्याला 'न भूतो न भविष्यति' असे टाकून बोलतील व आपला आणि ब्रिटिश सरकाराचाहि पराकाष्ठेचा अपमान करतील. दुर्दैवाने असला अनिष्ट प्रकार घडून आला, तर ब्रिटिश सरकाराला ताबडतोब जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारावे लागेल. तेव्हा युद्ध टळावें अशी जर आपली इच्छा असेल, तर आपण माझ्यावर सारा विश्वास टाका. आपल म्हणणें मी यापूर्वी हेर हिटलेर यांना सांगितले आहे व यापुढेहि सांगेन. पण तें कसे सांगावयाचे ते माझ्याकडे सोपवा.'

## हेंडर्सनचें आश्वासन

हेर फॉन रिब्बेनट्रॉप यांच्या या निर्वाणीच्या भाषणामुळे सर नेव्हिल हेंड-

र्सन यांनी हेर हिटलेर यांची मुलाखत घेण्याचा विचार रहित केला व मार्शल फॉन गोएरिंग, हेर हेस इत्यादि दुय्यम पुढाऱ्यांच्या मुलाखती घेऊन ब्रिटिश सरकाराच्या धमक्या त्यांच्या कानांवर घातल्या. मार्शल फॉन गोएरिंग यांनी या धमक्यांची टवाळीच केली आणि सर नेव्हिल हेडर्सन यांना विचारलें 'झेकोस्लोव्हाकियासाठी जर्मनीशी लढण्याच्या धमक्या आपण देतां. पण याच वेळी झेकोस्लोव्हाकियांतील जर्मन वस्तीचा मुलूख जर्मनीला देऊन टाका, असे लंडन टाइम्स लिहीत आहे, याची संगति कशी लावावयाची?' तेव्हा सर नेव्हिल हेडर्सन यांनी उत्तर दिले 'हेर हिटलेर यांनी आपल्या भाषणात कोणत्याहि निर्वाणीच्या घोषणा केल्या नाहीत आणि सैन्याच्या हालचाली करण्याचे हुकूम सोडले नाहीत, तर शांततेच्या मार्गाने जर्मनीची इच्छा पूर्ण करण्याचा प्रयत्न ग्रेटब्रिटनचे सरकार करील.' सर नेव्हिल हेडर्सन याच्या या आश्वासनाला अनुसरून हेर हिटलेर यांच्या भाषणाची रूपरेषा ठरविली गेली व सर नेव्हिल यानी कृतकृत्य होऊन बर्लिनला प्रयाण केले. या साऱ्या वाटाघाटींनंतर मार्शल फॉन गोएरिंग हे इतके निर्धास्त झाले की, त्यांनी ता. १० सप्टेंबर रोजी न्यूरेंबेर्ग येथे केलेल्या भाषणात जर्मनीतील अन्नखरेदीवरील निर्बंध १ ता. आक्टोबरपासून रद्द होतील असे जाहीर केले.

## लंडन टाइम्सची सूचना

याच ठिकाणी लंडन टाइम्समधील वर उल्लेखिलेल्या लेखाची थोडी माहिती सांगितली पाहिजे. मध्ययुरोपातील सर्व प्रश्न शांततेच्या मार्गाने सोडविण्यास जर्मनीला पूर्ण स्वातंत्र्य द्यावे, असे प्रतिपादन लंडन टाइम्सचे संपादक गतवर्षापासून करीत आहेत. पण असे मत प्रतिपादण्यात आणि झेकोस्लोव्हाकियाने जर्मन वस्तीचा मुलूख जर्मनीला देऊन टाकावा असे लिहिण्यांत बरेंच अंतर आहे यामुळे अशी उघड सूचना करण्याचे धाडस लंडन टाइम्सच्या चालकांनी यंदाच्या सप्टेंबरपर्यंत केले नव्हते. सप्टेंबरच्या प्रारंभापासून लॉर्ड लोदियन आणि लंडन टाइम्सचे संपादक मि. डॉसन या दोघांनाहि असें वाटूं लागलें की, झेकोस्लोव्हाकियांतील जर्मन लोकांना सामोपचाराने स्वातंत्र्य मिळाले नाही तर जर्मन सैन्य झेकोस्लोव्हाकियांत नक्की शिरणार आणि युरोपखंडावर

महायुद्धाची आपत्ति ओढवणार; तेव्हा आपण अप्रियता पतकरूनसुद्धा उघडपणें जर्मनीची बाजू उचलून धरली पाहिजे त्याशिवाय हे युद्ध टळणार नाही. असा विचार करून ता. ७ सप्टेंबर रोजी लंडन टाइम्सने जर्मन वस्तीचा मुलूख जर्मनीला देऊन टाकावा, अशा आशयाचा अग्रलेख प्रसिद्ध केला. हा अग्रलेख, प्रसिद्ध करण्यापूर्वी लंडनमधील जर्मनीच्या वकिलांना दाखवून टाइम्सकारांनी त्यांची त्या लेखाला संमतीहि मिळविली होती. हा अग्रलेख प्रसिद्ध झाल्याबरोबर सर्व इंग्लंडभर टाइम्सविरुद्ध मोठे काहूर झाले वास्तविक पाहता टाइम्सच्याहि पूर्वी न्यू स्टेट्समन अँड नेशन या मजूरपक्षीय पत्रानेंहि झेकोस्लोव्हाकियाला हीच सूचना केली होती. पण मजूर पक्षांतील पत्रांनी जी सूचना केली असतां त्यांच्यावर कोणीहि आक्षेप घेतला नाही, तीच सूचना टाइम्ससारख्या भांडवलवाल्यांच्या पत्राने केल्यावर तिला लगेच मित्रद्रोह, राष्ट्रद्रोह, मानवजातीचा द्रोह इत्यादि पापाचा वास येऊं लागला. आपल्या पत्रावरील असल्या ढोंगी टीकांना टाइम्सकारांनी सप्रमाण उत्तरें दिली व टीकाकारांचे दांत त्यांच्या घशांत घातले.

## इटालीचा विरोध

या वेळी टाइम्सवर झालेल्या टीकांमध्ये एका टीकेचा विशेष उल्लेख करणे आवश्यक आहे. लंडन टाइम्सच्या या लेखाची वार्ता रोम येथे पोचल्याबरोबर इटालीच्या परराष्ट्रीय खात्याचे मुखपत्र 'Informazione Diplomatica' या पत्राने टाइम्सच्या अग्रलेखावर टीका करून असे प्रसिद्ध केले की, रोम-बर्लिन कराराप्रमाणें हेर हेनलाइन यांच्या आठहि मागण्यांना इटालीचा पूर्ण पाठिंबा आहे, पण जर्मन वस्तीचा मुलूख जर्मनीला देऊन टाकण्याच्या सूचनेला इटालीची संमति नाही. सुडेटेन जर्मनांना स्वतंत्र करण्याच्या प्रयत्नात हेर हिटलेर यांना केवळ शत्रुपक्षाच्याच नव्हे, तर आपल्या मित्रराष्ट्रांच्या विरोधालाहि कसे तोंड द्यावें लागत होते ही गोष्ट या लेखावरून सिद्ध होते. या लेखाबद्दल हेर फॉन रिबेनट्रॉप यांनी इटालियन परराष्ट्रखात्याची चांगलीच हजेरी घेतली. तरी देखील ता. १३ सप्टेंबरपर्यंत सुडेटेन प्रांत जर्मनीत सामील करावा, या जर्मनीच्या मागणीला इटालियन परराष्ट्रखात्याची संमति मिळाली नव्हती.

## लष्करी कायदा पुकारल्याचा परिणाम

अशा परिस्थितीतच, ता १२ सप्टेंबर रोजी हेर हिटलेर यांनी न्यूरेंबर्ग येथे

भाषण करून सुडेटेन जर्मनांना स्वयंनिर्णयाचा अधिकार मिळाला पाहिजे अशी मागणी केली. हेर हिटलेर यांच्या भाषणाने निर्भय होऊन सुडेटेन जर्मनांनी सर्वत्र मिरवणुकी काढून आपला आनंद प्रकट करण्याला सुरुवात केली. या मिरवणुकींना जागोजागी झेक अधिकाऱ्यांनी अडथळे केल्यामुळे त्या प्रांतांत सर्वत्र दंगे झाले. दंग्यांचे शमन करण्यासाठी ता. १३ सप्टेंबर रोजी झेक सरकारानें सुडेटेन जर्मनांच्या मुलुखात लष्करी कायदा पुकारला! हा कायदा किती भयकर होता याची हिंदुस्थानांत कोणालाहि कल्पना नाही. या कायद्याखाली अपराधी ठरलेल्या आरोपींना फाशीचीच शिक्षा दिली पाहिजे, असे त्या कायद्यांत सांगितले आहे. इतकेच नव्हे तर त्या शिक्षेची अमलबजावणीहि शिक्षा सांगितल्यापासून तीन तासांच्या आंत झालीच पाहिजे, असेहि त्या कायद्यांत नमूद केले आहे. यामुळे हा कायदा अंमलांत आणण्याचा जाहीरनामा लागताच सुडेटेन जर्मनांच्या पुढाऱ्यांनी तो सहा तासांच्या आंत परत घ्यावा अशी झेक सरकाराकडे मागणी केली. ही मागणी त्या सरकाराने नाकारली, तेव्हा हेर फॉन रिब्बेनट्रॉप यांनी झेक सरकाराला कळविले कीं, या कायद्याखाली जितक्या जर्मनांना पकडून तुम्ही फांशी द्याल, तितक्या झेक लोकांना आम्हीहि तावडतोब फासावर चढवूं. हेर फॉन रिब्बेनट्रॉप यांची ही धमकी झेक सरकारानें मि. चेंबरलेन यांच्या कानावर घातली व त्याच वेळी सुडेटेन प्रांत जर्मनीत सामील करण्याला इटालीची संमति मिळाल्याची तारहि त्यांच्या हाती आली. तेव्हा 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः' या न्यायाने हेर हिटलेर यांच्याबरोबर तडजोड करण्याचा अंतिम प्रयत्न करण्याचे त्यांनी ठरविले व 'मी बेर्स्टेसगाडेन येथे आपल्याला भेटावयाला येतों' अशी तार त्यांनी हेर हिटलेर यांना पाठविली. ही तार पाठविण्यापूर्वी फ्रान्सच्या प्रधानमंत्र्यांनीहि त्यांना युद्ध टाळण्याचा प्रयत्न करण्यासाठीं विनाविलें होते, ही गोष्ट येथे नमूद केली पाहिजे.

—केसरी, ता. १४ आक्टोबर, १९३८.

---

## लेखांक दुसरा

### फ्रेंच लष्करी तज्ज्ञांचा सल्ला

मि. चेंबरलेन हे जर्मनीला जावयाला निघाले, त्या वेळी फ्रान्सची मनोवृत्ति काय होती, याची आता थोडी माहिती करून घेतली पाहिजे. सप्टेंबरच्या प्रारंभी जर्मनीशी खरोखरीच युद्ध जुपण्याचा संभव आहे, असे जेव्हा मो. दालादिए यांना दिसूं लागले, तेव्हा फ्रेंच सैन्याची तयारी कितपत आहे, याची त्यांनी मुख्य सेनापति जनरल गामेल यांच्याजवळ चौकशी केली. त्या वेळी जनरल गामेलँ यांनी मुख्य प्रधानांना उत्तर दिले 'चिलखती गाड्यांच्या बाबतीत फ्रेंच सैन्य साऱ्या जगांत श्रेष्ठ आहे. त्याचप्रमाणे चिलखती गाड्यांचा नाश करणाऱ्या फ्रेंच तोफाहि सर्वोत्कृष्ट आहेत. अवजड तोफांच्या बाबतीत जर्मनी फ्रान्सच्या फार मागे आहे. फ्रान्सचा बॉबगोळयांचा व दारुगोळयाचा साठाहि अतिशय मोठा आहे. विमानांच्या बाबतीत मात्र फ्रान्स जर्मनीच्या मानाने मागसलेला आहे. त्यामुळे वैमानिक हल्ले झाले असता फ्रान्सच्या बिनलढाऊ लोकसंख्येची फार मोठी कत्तल होईल ही गोष्ट खरी आहे. पण केवळ वैमानिक हल्ल्यांनी कांही फ्रान्सचा तात्काळ पराजय होणार नाही आणि पहिल्या सहामाहीत जर आपला पराजय झाला नाही, तर हे युद्ध आपण खास जिंकूं.' जनरल गामेलँ यांचे हे उत्तर मो. दालादिए यांना कांही फारसे समाधानकारक वाटले नाही, म्हणून त्यांनी आपल्या वैमानिक दळाचे मुख्याधिकारी जनरल व्हिलमॅं यांचा सल्ला घेतला. जनरल व्हिलमॅं हे गेल्या ऑगस्ट महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यांत मार्शल फॉन गोएरिंग यांचे पाहुणे होऊन बर्लिनमध्ये पांच दिवस राहिले होते व तेथे त्यांची आणि हेर हिटलेर यांची मुलाखतहि झाली होती. या मुक्कामांत त्यांना जर्मनीच्या प्रचंड वैमानिक दळाची यथार्थ कल्पना आली होती. शिवाय एकट्या वैमानिक दळाच्या जोरावर शत्रुराष्ट्राला शरण आणतां येतें की नाही याविषयीच्या त्यांच्या कल्पना जनरल गामेलँ यांच्या कल्पनाहून अगदी भिन्न होत्या. या सर्व कारणामुळे त्यांनी मुख्य प्रधानांना युद्ध टाळण्याचा सल्ला दिला.

### स्पेनमधील अनुभव

जनरल व्हिलमॅं यांचा सल्ला फ्रान्सच्या सरकाराला व जनतेला पटावयाला

याखेळी एक अवांतर कारण झाले. स्पेनमधील शहरांवर होणाऱ्या वैमानिक हल्ल्यांची चौकशी करण्यासाठी एक ब्रिटिश कमिशन बसले होते. त्या कमिशनने ४६ वैमानिक हल्ल्याची चौकशी करून आपल्या रिपोर्टाचा पहिला हप्ता 1 सप्टेंबर रोजी प्रसिद्ध केला. या रिपोर्टातून वैमानिक हल्ल्याच्या अघोर परिणामांचे जे वर्णन आलं होते, ते फ्रान्समधील बहुतेक साऱ्या प्रमुख पत्रांनी प्रसिद्ध केले. हे साधार वर्णन वाचून फ्रेंच जनतेला वैमानिक हल्ल्याची दहशत बसली असल्यास नवल नाही. फ्रेंच जनतेला हे वर्णन वाचून विशेष दहशत बसावयाला तितकेंच महत्त्वाचे कारण होतं. ते हे की फ्रान्समध्ये वैमानिक स्वारीपासून जनतेचा बचाव करण्याची तरतूद आतापर्यंत मुळीच झालेली नाही अशा परिस्थितीत फ्रेंच सरकारानें लढाई पुकारली असती तर तें सरकार पहिल्या पराजयाबरोबर जनतेच्या क्रोधाला बळी पडले असतं. या साऱ्या परिस्थितीचा विचार करून मो. ब्लम यानी देखील ता. १४ सप्टेंबर रोजी युद्धमंत्र्याच्या कचेरीत झालेल्या चर्चेनंतर मो. दालादिए याना युद्ध टाळण्याचाच सल्ला दिला.

## सैन्यभरतीचा हुकूम कोणी द्यावा ?

हाच सल्ला फ्रान्सचे एक माजी प्रधानमंत्री मो. फ्लांदँ यांनी २१ मेच्या प्रकरणानंतर दिला होता. पण त्यावेळी म्हणजे गेल्या जून महिन्यात साऱ्या फ्रेंच वर्तमानपत्रांनी त्याची टेवडी उडविली होती आणि आता मो दालादिए यांनी तोच सल्ला अंमलांत आणल्यानंतर साऱ्या फ्रान्समधील अवघ्या तीनच वजनदार पत्रकर्त्यांनी मो. दालादिए यांचा तीव्र निषेध केला आहे. परवाच्या आणीबाणीच्या वेळी फ्रान्सची किती गाळण उडाली होती, याचा हा एक उत्कृष्ट पुरावा आहे. यापेक्षांहि एक विलक्षण प्रसंग सांगावयाचा म्हणजे न्युरेंबर्ग येथील हेर हिटलेर यांच्या भाषणानंतर सार्वत्रिक सैन्यभरतीचा हुकूम काढावा की नाही या प्रश्नाचा विचार करण्यासाठी फ्रेंच मंत्रिमंडळाची बैठक बसली असता मंत्रिमंडळाला. सार्वत्रिक सैन्यभरतीचा हुकूम विधिमंडळाच्या संमतीशिवाय काढतां येतो की नाही, हेच त्या मंत्रिमंडळाला ठरवितां येईना. कारण चेंबर ऑफ डेप्युटीज व सेनेट या दोन्ही सभांची आगाऊ संमति घेतल्याशिवाय फ्रेंच मंत्रिमंडळाला युद्ध पुकारण्याचा अधिकार नाही आणि सार्वत्रिक सैन्यभरती व युद्ध यांच्यामध्ये अंतर आहे, असें

आता कोणी मानीत नाही. अर्थात् एखादे निश्चित धोरण असलेले मंत्रिमंडळ कांही असल्या कायद्याच्या शब्दाकरिता नडून बसलें नसते. पण फ्रेंच मंत्रिमंडळाला कांही धोरण आहे, असा आरोप फ्रान्सचे कट्टे शत्रूदेखील करूं शकत नाहीत !

अलीकडे पांचसहा महिन्यांपासून फ्रान्सचे परराष्ट्रीय धोरण कोणते असावे या प्रश्नाची फ्रान्समध्ये वाटाघाट चालू आहे. या साऱ्या वाटाघाटींचा निष्कर्ष मो. फ्लांदॅं यांनी असा काढला की, फ्रान्सचे परराष्ट्रीय धोरण इंग्लंडच्या परराष्ट्रीय धोरणासारखे असावे. हा निष्कर्ष फ्रान्समधील सर्व पक्षांना मान्य झाला. पण पुढे प्रश्न असा उद्‌भवला की, इंग्लंडचे परराष्ट्रीय धोरण कोणते आहे ? या प्रश्नाचे साधार उत्तर फ्रान्समध्ये कोणीच देऊं शकत नव्हते यामुळे फ्रान्सचे परराष्ट्रीय धोरण काय आहे, हे फ्रान्सच्या राज्यकर्त्यांना देखील माहीत नाही अशी विचित्र परिस्थिति त्या देशाची झाली होती. असल्या विचित्र परिस्थितीने किंकर्तव्यतामूढ होऊन गेल्यामुळे फ्रान्सचे प्रधानमंत्री मो. दालदिए यांना इंग्लडच्या प्रधानमंत्र्यांना शरण जावे लागले.

## गांधीजींना अटक झाली असती !

या प्रश्नावर इंग्लंडांत दुमत नव्हते असें नाही. इंग्लंडचे परराष्ट्रमंत्री लॉर्ड हॅलिफाक्स यांचे मत युद्ध टळणे अशक्य आहे असेच होते. सुप्रसिद्ध फ्रेंच लेखक पेर्तिनाक्स म्हणतात

" According to Lord Halifax, war was inevitable. He was saying that it was necessary to throw Gandhi in prison once again. '

ता. २४ सप्टेंबर रोजी पेर्तिनाक्सने प्रसिद्ध केलेली ही अत्यंत महत्त्वाची बातमी लंडनमधील कोणाहि हिंदी बातमीदाराने हिंदुस्थानाला कळविली नाही, याचे नवल वाटतें. इंग्लंड एखाद्या महायुद्धांत पडल्यास हिंदुस्थानाला तात्काळ किती तीव्र दडपशाहीला तोंड द्यावें लागेल, याची जाणीव हिंदी जनतेला असावी, एवढ्याचकरितां आज या बातमीचा उल्लेख केला आहे. असो, परराष्ट्रमंत्र्यांचें किंवा परराष्ट्रीय खात्यांतील अधिकाऱ्यांचें मत कांहीहि

असले तरी आज इंग्लंडचे राजकारण कांही त्यांच्या मताप्रमाणे चालत नाही. इंग्लंडचें परराष्ट्रीय राजकारण सध्या मि. चेंबरलेन यांच्या मताप्रमाणेच चालते. मि. चेंबरलेन यांच्या मनावर वंशशास्त्राच्या तत्वज्ञानाचा बराच संस्कार झाला आहे. वंशशास्त्रावरील एक प्रसिद्ध लेखक व जर्मनवंशाच्या श्रेष्ठत्वाचे पुरस्कर्ते मि. हौस्टन चेंबरलेन हे इंग्लंडच्या मुख्य प्रधानांच्या चुलतघराण्यांतलेच होत. यामुळे स्लाव्ह वंशाचे वर्चस्व वाढेल, अशा सर्व धोरणांना ते पूर्णपणे प्रतिकूल आहेत. फ्रान्स आणि रशिया या उभयतांमधील परस्परसहायाचा तह याच कारणासाठी त्यांना शल्यासारखा खुपत होता याकरिताच फ्रेंच प्रधानमंत्र्यांनी युद्ध टाळण्यासाठी शक्य ते सर्व उपाय योजण्याची मि. चेंबरलेन यांना विनंति केल्याबरोबर त्यांनी युरोपियन राजकारणांतून रशियाला बहिष्कृत करण्याची संधि साधली.

## रशियाहि युद्धाला नाकबूल

अलीकडे अर्ल विंटरटनसारख्या दुय्यम मंत्र्यांनी, स्वतः रशियालाच मुळीं युरोपांतील भानगडीच्या निमित्ताने युद्धांत पडण्याची इच्छा नव्हती, असा आरोप केला आहे. या आरोपाचा रशियाने इनकार केला आहे. तरी देखील यांत कितपत तथ्य आहे, याचा इथे थोडासा विचार केला पाहिजे. सप्टेंबरच्या ११ तारखेला मो. लिट्‌विहनॉफ यानी जिनीव्हा येथे फ्रेंच परराष्ट्रमंत्री मो. जोर्जे बोन्ने यांना सांगितले ' फ्रान्सच्या पाठोपाठ जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारण्याची रशियाची तयारी आहे, मात्र जर्मनीची सरहद्द रशियाला भिडलेली नसल्यामुळे आम्हांला प्रत्यक्ष जर्मनीवर हल्ला करतां येत नाही; आणि झेकोस्लोव्हाकियाची सरहद्दहि रशियाला भिडलेली नसल्याने झेक लोकांच्या मदतीला रशियन सैन्य न्यावयाचे असल्यास ते पोलंड किंवा रुमानिया या दोन देशांतूनच नेले पाहिजे. या देशांतून रशियन सैन्य नेण्याला परवानगी मिळण्याकरिता राष्ट्रसंघाने जर्मनीवर युद्धाची जबाबदारी टाकण्याचा ठराव करणें जरूर आहे. राष्ट्रसंघाचा असा ठराव झाला तरच रुमानियाच्या मुलुखांतून रशियन सैन्याला वाट मिळेल, असे रुमानियन सरकाराचें म्हणणे आहे व असा ठराव झाल्यास पोलंडचें सरकारहि बहुधा वाट नाकारण्याचें धाडस करणार नाही.'

मो. लिट्व्हिनॉफ यांच्या या सकृद्दर्शनी सरळ दिसणाऱ्या सूचनेमुळे किती भानगडी उपस्थित होतात हें थोड्या विचारांती कोणालाहि कळून येईल. एकतर आपल्या देशांतून कोणाच्याहि सैन्याला वाट द्यावयाची नाही, असा पोलंडचा निर्धार असल्याने रशियाच्या सरकाराने पोलंडांतून वाट मागितल्यास त्या दोन देशांची लढाई जुंपणें अनिवार्य आहे व अशा रीतीने पोलंड व रशिया याचे युद्ध जुंपणे फ्रान्सला अगदी अनिष्ट आहे. दुसरी गोष्ट अशी की जर्मनीवर युद्धाचा दोष लादण्याचा ठराव प्रस्तुत परिस्थितीत राष्ट्रसंघात मंजूर होणे, अतिशय अवघड आहे. कारण या ठरावाला संमति देणाऱ्या राष्ट्रांना शत्रु लेखून जर्मनी त्यांच्यावर तात्काळ हल्ला करील, अशी साऱ्या तटस्थ राष्ट्रांना धास्ती आहे. तिसरी गोष्ट अशी की रशियाच्या या सूचनेने झेकोस्लोव्हाकियाला रशियाची मदत मिळण्यांत बरीच दिरगाई होण्याचा संभव आहे व आधुनिक युद्धाचा पहिला आठवडा अत्यंत महत्त्वाचा असल्यामुळे रशियाची तात्काळ मदत न मिळाल्यास फ्रान्स व झेकोस्लोव्हाकिया या दोघांचीहि त्या अवधीत चटणी होण्याचा संभव आहे. या सर्व गोष्टींचा नीट विचार केला म्हणजे असे वाटते की अर्ल विंटरटन याच्या म्हणण्यात बरेंच तथ्य असावे. स्वतः रशिया राष्ट्रसंघाचा सभासद असून त्यानेहि वरील आशयाचा ठराव राष्ट्रसंघापुढे आणला नाही, यावरून असे दिसते की मो. लिट्व्हिनॉफ यानी फ्रेंच परराष्ट्रमंत्र्याना केलेली सूचना अव्यवहार्य आहे, हे त्यांचे त्यांनाहि कळत होतें व केवळ फ्रांकोरशियनसंधि मोडल्याचा अपवाद आपल्यावर येऊं नये, याकरिता त्यांनी ही सूचना केली होती.

## एडनचें मतांतर कसें झालें ?

गेल्या महायुद्धाच्या वेळी युद्ध पुकारण्यांत रशियाने पुढाकार घेतला होता व युद्धारंभाबरोबर पूर्वप्रशियांत शिरून जर्मनीच्या फ्रान्सवरील स्वारीला चांगलाच पायबंद लाविला होता. तरी देखील त्या युद्धाचा पहिला महिना फ्रान्सला अत्यंत अवघड गेला. यामुळे सध्यांच्या युद्धसंकटांत रशियाची प्रारंभापासून मदत मिळणे शक्य नाही व इंग्लंडच्या सैन्याची मदत तर अजीबात व्हावयाची नाही, अशा परिस्थितीत झेकोस्लोव्हाकियाचा बळी देऊन फ्रान्सचा बचाव करण्याचें धोरण फ्रान्सच्या प्रधानमंत्र्यांना पटलें, यांत कांही नवल नाही. हेच धोरण फ्रान्सचें मंत्रिमंडळ

स्वीकारील, अशा आशयाचा खलिता पारिस येथील ब्रिटिश वकील सर एरिक फिप्स यांनी सप्टेंबरच्या ९ तारखेला लंडनला पाठविला. हा खलिता हाती पडल्यावर लॉर्ड हॅलिफाक्स यांचे युद्धाच्या अनिवार्यतेसंबंधीचे मत बदलले व त्यांनी माजी परराष्ट्रमंत्री मि. एडन यांना आपल्या भेटीला बोलाविले. यावेळी मि. एडन हे चेंबरलेनसाहेबांच्या धोरणाविरुद्ध परराष्ट्रीय खात्याच्या धोरणाला ब्रिटिश जनतेचा पाठिंबा मिळावा, याकरिता खटपट करीत होते व इंग्लंडने फ्रान्सच्या मदतीला धावून जावे, अशा आशयाचे एक पत्र लंडन टाइम्समध्ये छापण्यासाठी त्यांनी तयार करून ठेवले होते. या मुलाखतीत लॉर्ड हॅलिफाक्स यांनी फ्रान्समधील वस्तुस्थिति मि. एडन यांना समजावून सांगितली व त्यांच्या पहिल्या पत्राऐवजी चेंबरलेनसाहेबांच्या धोरणाला पाठिंबा देणारे दुसरे पत्र त्यांच्याकडून लिहून घेतले. हे पत्र लंडन टाइम्समध्ये १५ तारखेला छापले गेले. याच दिवशी मि. चेंबरलेन व हेर हिटलेर यांची पहिली मुलाखत झाली.

## जर्मनींतील दोन पक्षांत वाग्युद्ध

या मुलाखतीच्यापूर्वी जर्मनीमध्ये युद्धशास्त्रज्ञ व राजनीतिशास्त्रज्ञ यांच्यामध्ये निकराचे वादयुद्ध सुरू झाले होते. युद्धशास्त्रज्ञांचे म्हणणे असे होतें की चतुर्वार्षिक कार्यक्रम अद्यापि पूर्ण झालेला नाही व जर्मनीचें लष्करी यंत्र अद्यापि पूर्णतेला गेलेले नाही; अशा परिस्थितीत सर्व शत्रूंच्या विरुद्ध लढून जर्मनीला विजय मिळविणे तर शक्य नाहीच उलट जर्मनीचा सर्वनाश होण्याचा संभवच अधिक आहे. याला राजनीतिशास्त्रज्ञांचे उत्तर असे होते की, स्वपरपक्षांच्या बलाबलाची आम्हांला पूर्ण कल्पना आहे, या बलाबलाच्या अनुरोधानेच आम्ही आमचे राजकारण चालवीत आहोत, लष्करी अधिकाऱ्यांनी मात्र त्यांच्या तंत्राने देशाचे परराष्ट्रीय राजकारण चालविण्याने एकवार देशाचा सर्वनाश झाला आहे ही गोष्ट लक्षांत ठेवावी व आपल्याला न कळणाऱ्या प्रश्नावर न बोलता मुकाट्याने तोंडाला खीळ घालून घ्यावी. या वाग्युद्धांत जर्मनीची सामान्य जनता मुळीच भाग घेत नव्हती. आपल्या नेत्यांना सहसा अपयश येत नाही, ही गोष्ट जर्मन जनतेला आता कळून चुकली आहे. यामुळे सामान्य लोक बोलत असत कीं, आपला विजय होण्याची ९० टक्के खात्री

असल्याशिवाय हेर हिटलेर हे कोणत्याहि कार्याला हात घालणार नाहीत. त्यांनी ज्या अर्थी सुडेटेन जर्मनांना दास्यमुक्त करण्याचा संकल्प केला आहे, त्या अर्थी जर्मनीला नक्की विजय मिळणार. आपल्या राजकारणी पुढाऱ्यांवरील जर्मन जनतेचा विश्वास अनाठायी नाही. जर्मनीच्या राजकारणाचे सूत्रधार सर्व घडामोडींचा किती सावधगिरीने विचार करतात, याचे एक उदाहरण येथे सांगण्याजोगे आहे. सुडेटेन जर्मनांचा प्रांत जर्मनीला देऊन टाकावा, अशी सूचना लंडन टाइम्सने केल्यावर 'बेर्लिनेर टागेब्लाट' या पत्राने लिहिले होते

"It is possible that there are people in England who are genuinely convinced that by this method alone the question can be really settled. On the other hand it may well be that this *Times* article is merely a trial balloon which has been sent up in order to produce certain re-actions in Germany and if possible to provide a new glacis for a deplomatic offensive.'

टाइम्सच्या अग्रलेखाने हुरळून जाऊन आपली महत्त्वाकांक्षा अवेळी जाहीर केली तर जर्मनीच्या शत्रूंचे चांगलेच फावेल, या भीतीने सुडेटेन जर्मनांचा मुलूख जर्मनीत सामील करण्याचा आपला मनोदय मि. चेंबरलेन जर्मनीला यावयाला निघेपर्यंत जर्मनीच्या राज्यकर्त्यांनी जाहीर केला नव्हता.

## मुसोलिनीनेहि मोर्चा बदलला

मि. चेंबरलेन हे जर्मनीला चाललेले पाहून जगाचे लक्ष्य केवळ हेर हिटलेर यांच्याकडेच लागून राहूं नये याकरिताच की काय कोण जाणे, सि. मुसोलिनी यांनी १५ सप्टेंबरच्या पोपोलो दितालियाच्या अंकांत लॉर्ड रन्सिमन यांना उद्देशून एक अनावृत पत्र लिहिले. या पत्रांत सि. मुसोलिनी यांनी झेकोस्लोव्हाकियांतील सर्वच अल्पसंख्यांकांना स्वयंनिर्णयाचा अधिकार देण्याची सूचना केली होती. ज्या सि. मुसोलिनींचा सप्टेंबरच्या ८ तारखेपर्यंत सुडेटेन जर्मनांच्या स्वातंत्र्याला विरोध होता, तेच १५ तारखेला लिहावयाला लागले की केवळ सुडेटेन जर्मनांनाच नव्हे, तर झेकोस्लोव्हाकियांतील पोलिश, हंगेरियन व इतर अल्पसं-

व्याक यांनाहि तावडतोब स्वयंनिर्णयाचा अधिकार देणे आवश्यक आहे. या पत्रांत सि. मुसोलिनी यांनी केलेली सरहद्दीची मीमांसा मात्र हिंदुस्थानाने नेहमी लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ते म्हणतात

'Frontiers traced with ink upon other ink can be modified. It is another thing when frontiers have been traced by the hand of God and the blood of men.'

हे पत्र लिहिण्यांत सि. मुसोलिनी यांचा उद्देश इतकाच होता की पोलंड व हंगारी या दोन राष्ट्रांना कृतज्ञतेच्या बंधनाने इटालीशी बांधून ठेवावें. पण राजकारणांत कृतज्ञतेला कांहीच किंमत नसल्याने त्यांचा हा हेतु सिद्धीस गेला नाही. यांचे पत्र प्रसिद्ध झाल्यापासून दुर्दैवी झेकोस्कोव्हाकियाच्या चीरफाडीला मात्र सुरुवात झाली. सि. मुसोलिनी यांचे पत्र प्रसिद्ध झाल्यावर डॉ. सिलेक्स या सुप्रसिद्ध जर्मन लेखकाने लिहिले

'The end of Czechoslovakia in her present form is accepted as a plain matter of course. Conrad Henlein's proclamation, Mussolini's open letter to Runciman, Chamberlain's courageous decision and Daladier's declared willingness—these are all facts which were bound to arise from the unalterable firmness of the German will.'

डॉ. सिलेक्स यांचे हे विधान अक्षरशः खरे आहे, असे जर्मनीच्या कट्टया शत्रूंना देखील मान्य करावे लागेल.

## समाचार घेण्याची सिद्धता

सारे जर्मन राष्ट्र याप्रमाणे विजयानंदांत मग्न झाले असता हेर हिटलेर व मि चेंबरलेन यांची पहिली भेट घडून आली. या मुलाखतींत हेर हिटलेर यांनी इंग्लंडच्या मुख्य प्रधानांना स्पष्ट सांगितले की, स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाप्रमाणे सुडेटेन जर्मनांना जर्मनीत सामील होण्याचा अधिकार मिळालाच पाहिजे, आपल्या सामर्थ्याने त्यांना हा अधिकार मिळवितां येत नसला तर जर्मनीचे सैन्य त्यांना तो अधिकार मिळवून देईल;

जर्मन सैन्याच्या या कृतीने पुन्हा महायुद्ध सुरू होणार असले तरी त्याला तोंड देण्याची आमची तयारी आहे. महायुद्धाविषयीं बोलतांना हेर हिटलेर म्हणाले "गेल्या मे महिन्यांत सर्व राष्ट्रांनी मिळून जर्मनीला युद्धाची धमकी दिली, पण तेव्हा आमची तयारी नव्हती. आता मात्र जे कोणी आमच्या मार्गांत आडवे येतील, त्यांचा समाचार घेण्याला आम्ही सिद्ध आहोत." याला मि. चेंबरलेन यांनी उत्तर दिलें 'मे महिन्यांत आम्ही फक्त सावधगिरीची सूचना दिली होती. अशी सूचना व धमकी यांच्यामध्ये आपण फरक करणे अवश्य आहे, शिवाय कोणत्याहि परिस्थितींत इंग्लंड जर्मनीशी लढणार नाही, अशी जर मी आपली समजूत करून दिली तर आपल्याला फसविल्याचा आरोप आपणच माझ्यावर कराल; कारण कांही कांही परिस्थितीत इंग्लंड व जर्मनी यांच्यामध्ये युद्ध उपस्थित होणे शक्य आहे.'

## वाटाघाटीचा निष्कर्ष

युद्धाच्या शक्याशक्यतेच्या या गोष्टी बोलत असताना चेंबरलेनसाहेबांना असें स्पष्ट दिसून आलें की आपल्या बोलण्याचा हेर हिटलेर यांच्या मनावर कांहीहि परिणाम होत नाही आणि झेकोस्लोव्हाकियावर ताबडतोब सैन्य पाठविण्याचा त्यांचा निर्धार झाला आहे. तेव्हा मि. चेंबरलेन उद्गारले, "आपला जर झेकोस्लोव्हाकियावर सैन्य पाठविण्याचा निर्धार झाला आहे, तर मग मला म्हातारपणीं इतका दूरचा प्रवास करण्याची तसदी कां दिली ?" याला हेर हिटलेर यांनी उत्तर दिलें 'सुडेटेन जर्मनांचा स्वयंनिर्णयाचा अधिकार जर आपण मान्य करीत असाल तर तो अधिकार त्यांनी कशा रीतीने बजावावा, यासंबंधी वाटाघाटी करण्याची जर्मनीची तयारी आहे. पण ब्रिटिश सरकार स्वयंनिर्णयाचा अधिकार मान्य करूं शकत नाही असे जर आपले म्हणणे असले, तर आपली वाटाघाट पुढे चालविण्यांत कांही हशील नाही.'

सुडेटेन जर्मनांचा स्वयंनिर्णयाचा अधिकार ताबडतोब मान्य करण्याची ब्रिटनच्या मुख्य प्रधानांची तयारी नव्हती, त्यामुळे त्यांनी सांगितलें की हा प्रश्न ब्रिटिश, फ्रेंच आणि झेक या सरकारापुढे मांडून त्यांची संमति मिळविण्याचा मी प्रयत्न करीन, तोंपर्यंत आपण झेकोस्लोव्हाकियावर स्वारी मात्र करूं नका. चेंबरलेन

साहेबांच्या या सूचनेला हेर हिटलेर यांनी उत्तर दिले 'झेक सरकाराने सुडेटेन जर्मनांवर नवीन कांही जुलूम केला नाही व सार्वत्रिक सैन्यभरतीचा हुकूम सोडला नाही, तर मी जर्मन सैन्याला चालून जाण्याचा हुकूम देणार नाही.' हे सशर्त आश्वासन मिळवून मि. चेंबरलेन लंडनला परत आले.

## नव्या भानगडी निघाल्या

मि. चेंबरलेन जर्मनीला गेले, त्या वेळी पुष्कळांना असे वाटलें होतें की आता मि. चेंबरलेन व हेर हिटलेर यांचे कडाक्याचे भांडण होईल, कारण जर्मनीच्या राज्यकर्त्यांशी झालेल्या मुलाखती कधीच यशस्वी होत नाहीत असा राजकारणाच्या इतिहासाचा आजपर्यंतचा दाखला आहे. पण हा अंदाज खोटा ठरला. जर्मन वंशाला स्वतंत्र करण्याविषयी हेर हिटलेर यांच्या अंतःकरणाला जी तळमळ लागली आहे, त्या तळमळीची मि. चेंबरलेन यांना पहिल्या मुलाखतीनच यथार्थ कल्पना आल्यामुळे त्यांना दिसून आले की, हेर हिटलेर यांचें बोलणं निर्वाणीच्या खलित्यासारखे दिसत असले तरी तें केवळ पराकाष्ठेच्या तत्वनिष्ठेमुळे व प्रामाणिकपणामुळे तसें दिसतें. एकदां त्यांचें तत्त्व मान्य झालें की, ते तडजोडीला केव्हाहि तयार होतील. याकरिता लॉर्ड रन्सिमन यांच्या रिपोर्टाच्या आधारावर त्यांनी हेर हिटलेर यांचे तत्त्व ब्रिटिश, फ्रेंच व झेक या सरकारांकडून मान्य करून घेतले. हे तत्त्व मान्य झाल्याबरोबर मध्ययुरोपांत ज्या नवीन भानगडी उपस्थित झाल्या, त्यांची हकीकत आता पुढील लेखांकावरच सोपविली पाहिजे.

—केसरी, ता. २१ ऑक्टोबर, १९३८.

---

## लेखांक तिसरा

### कराराच्या मार्गातील अडचणी

इंग्लंड व फ्रान्स यांच्या मुख्य प्रधानांनी झेकोस्लोव्हाकियाच्या फाळणीला आपली संमति दिल्यावर त्यांच्यापुढे तीन नवीन अडचणी उपस्थित झाल्या.

त्यांतली पहिली अडचण ही की, जर्मन वस्तीचा मुलूख जर्मनीला मिळणार असे कळतांच हंगारी व पोलंड या देशांच्या सरकारांनी झेकोस्लोव्हाकियांतील हंगेरियन व पोलिश लोकवस्तीचा मुलूख जर्मन मुलुखाबरोबर आपल्याला परत मिळावा अशी मागणी केली. दुसरी अडचण ही की, इग्लंड, फ्रान्स व झेकोस्लोव्हाकिया यांची शरणचिठ्ठी जर्मन सरकाराला मिळाल्याबरोबर जर्मनीच्या राज्यकर्त्यांनी आतांपर्यंत मनांतल्या मनांत गुप्त ठेवलेल्या महत्त्वाकांक्षा हळहळू प्रकट करण्यास प्रारंभ केला. यामुळे इंग्लंड व फ्रान्स या देशांतील जर्मनीविरोधी पक्षांनी आपापल्या सरकारांविरुद्ध एवढे मोठे काहूर माजविले की, तीन वर्षांपूर्वी होअर व लाव्हाल यांचा करार जसा या राष्ट्रांना मागे घ्यावा लागला, तसा झेकोस्लोव्हाकियाच्या फाळणीचा करारहि त्यांना मागे घ्यावा लागतो की काय अशी सर्वांना शंका येऊं लागली. ही या कराराच्या मार्गांतील तिसरी अडचण होती.

२१ सप्टेंबर रोजी सुडेटेन जर्मनांचा मुलूख जर्मनीला देण्याचे झेकोस्लोव्हाकियाने कबूल केल्याबरोबर हंगारी व पोलंड यांच्या लंडन व पारिस येथील वकिलांनी ब्रिटिश आणि फ्रेंच सरकारांना आपापल्या मागण्यांचा खलिता दिला; पण या दोन्ही सरकारांनी त्या खलित्यांचा विचार करण्याचें नाकारले. या पूर्वीच हंगारीचे प्रधानमंत्री व परराष्ट्रमंत्री हे बेरेटशगाडेन येथे हेर हिटलेर यांना भेटावयास गेले होते. हंगारीचे सर्वाधिकारी ॲडमिरल हॉर्टी हे तर १७ सप्टेंबरपासून पूर्व प्रशियांत मार्शल फॉन गोएरिंग यांचा पाहुणचार घेत होते. यापैकी हंगारीचे परराष्ट्रमंत्री व प्रधानमंत्री यांची हेर हिटलेर यांजबरोबर झालेली मुलाखत फारशी यशस्वी झाली नाही. कारण झेकोस्लोव्हाकियांतील हंगेरियन वस्तीचा मलूख हंगारीला द्यावयाला हेर हिटलेर यांची हरकत नसली तरी स्लोव्हाकिया व रुथेनिया हे दोन्ही प्रांत हंगारीला देऊन टाकावयाला ते कबूल होईनात. ॲडमिरल हॉर्टी व मार्शल फॉन गोएरिंग या उभयतांच्या मुलाखतीत मुख्यतः झेकोस्लोव्हाकियाबरोबर युद्ध करावें लागल्यास हंगारीने जर्मनीला कशी मदत करावी या प्रश्नाची चर्चा झाली. या चर्चेत त्या दोघांचे एकमत झालें व युद्धाच्या प्रसंगीं जर्मन सैन्याला व वैमानिक दलाला हंगारीच्या मुलुखांतून मार्ग देण्याच्या योजनाहि त्यांनी निश्चित केल्या.

## पोलंड व रशिया

हंगारीच्या मानानें पाहतां पोलंड हें पुष्कळच बलाढ्य राष्ट्र असल्याने थील सरकाराने जर्मनीची आराधना न करतां सरळ झेकोस्लोव्हाकियाच्या रहद्दीवर आपले सैन्य जमविण्याला सुरुवात केली व हंगारी देश आपल्याला नुकूल करून घेण्यासाठी स्लोव्हाकिया प्रांत हंगारीत सामील करणें हेंच त्या ांताच्या हिताचे होईल, अशा आशयाचे लेख पोलिश वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध ाले. पोलंडच्या या हालचाली पाहून रशियन सरकाराने पोलिश सरहद्दीवर सुमारे ३॥ लक्ष सैन्य, ३००० विमाने व २००० चिलखती गाड्या यांची जमवाजमव केली व २३ सप्टेंबर रोजी पोलंडला अशी सूचना दिली कीं, पोलंडचे सैन्य झेकोस्लोव्हाकियांत घुसल्यास पोलंडशी झालेला अनाक्रमणाचा तह रशियन सरकार ताबडतोब रद्द करील. रशियाने ही सूचना दिल्यावर पोलंडचे बर्लिन येथील वकील मो. लिप्स्की यांनी जर्मनीच्या परराष्ट्रीय खात्याकडे धाव घेतली, पण जर्मनीला त्यावेळी आपल्या पूर्वसीमेवरील भानगडी वाढवावयाच्या नसल्याने जर्मन परराष्ट्रीय खात्याने पोलंडच्या वकिलांना रशियाशी जपून वागण्याचा सल्ला दिला.

## सैन्यभरतीचा हुकूम !

या वेळी आंतरराष्ट्रीय परिस्थिति अनपेक्षित रीतीनें पुनः बिघडत चालली होती. झेकोस्लोव्हाकियाच्या फाळणीला संमति दिल्याबद्दल झेक जनतेने डॉ. होझा यांच्या मंत्रिमंडळाला राजीनामा द्यावयाला लावल्याने जनरल सिरोव्ही हे प्रधानमंत्री झाले होते. जनरल सिरोव्ही हे रशियावर अवलंबून राहणाऱ्या पक्षाचे अग्रणी असल्याचा लोकप्रवाद होता. प्रधानमंत्र्याचें पद मिळाल्याबरोबर त्यांनी सार्वत्रिक सैन्यभरतीचा हुकूम काढला व होझामंत्रिमंडळाच्या अखेरच्या दिवसांत सुडेटेन जर्मनांनी आपल्या कबजांत घेतलेला मुलूख पुनः व्यापण्याला सुरुवात केली. हा सार्वत्रिक सैन्यभरतीचा हुकूम काढण्यापूर्वी आपण इंग्लंड व फ्रान्स यांची संमति मिळविली होती, असे झेकोस्लोव्हाकियाच्या सरकाराने एका पत्रकांत प्रसिद्ध केले आहे, पण ही गोष्ट सपशेल खोटी आहे. हा हुकूम निघाला त्यावेळीं गोडेसबर्ग येथे हेर हिटलेर व मि. चेंबरलेन या उभयतांची मुलाखत चालली होती. ही मुलाखत चालू असतांना जेव्हा झेकोस्लोव्हाकियांतील सार्वत्रिक सैन्यभरतीची

बातमी त्यांना कळली तेव्हा मि. चेंबरलेन यांना आश्चर्य वाटलें व रागहि आला. कारण डॉ. बेनेश यांच्या वचनावर विश्वास ठेवणें अशक्य आहे, या हेर हिटलेर यांच्या विधानाला वरील बातमीने अनपेक्षितरीत्या दुजोरा मिळत होता.

## फ्रेंचांचें हृद्गत

झेकोस्लोव्हाकियांत असा कांही तरी प्रकार घडणार, असा हेर हिटलेर यांचा अंदाज होताच व त्याच अपेक्षेने त्यांची सारी कारस्थानें चालली होती. डॉ. गोएबेल्स यांनी तर असाच प्रचार चालविला होता की, केवळ सुडेटेन जर्मनांचा प्रांत मिळाल्याने जर्मनीचें समाधान होणार नसून फ्रान्स व रशिया यांच्याबरोबर झालेले तह रद्द करून झेकोस्लोव्हाकियाचें सरकार सर्वस्वी जर्मनीच्या तंत्राने चालू लागेल तेव्हाच जर्मनीचें समाधान होईल. केवळ महत्त्वाकांक्षेने प्रेरित होऊन जर्मनीचे राज्यकर्ते असा आग्रह धरीत होते, असें मात्र नव्हे. बेल्जम व फ्रान्स यांची मैत्री इंग्लंडच्या सुरक्षिततेला जितकी आवश्यक आहे, तितकीच झेकोस्लोव्हाकियाची मैत्री जर्मनीच्या सुरक्षिततेला आवश्यक आहे. कांही आठवड्यापूर्वी फ्रान्सचे माजी विमानमंत्री मो. कोत् यांनी स्पष्टच बोलून दाखविले होते

'We need Czechoslovakia because German economy and German industry can best be destroyed by bombs from this State.'

जर्मनीचा विध्वंस करावयाला झेकोस्लोव्हाकियाचा अतिशय उपयोग होणार आहे, असें जर्मनीच्या शत्रूंनी स्पष्ट बोलून दाखविल्यानंतर जर्मनीच्या राज्यकर्त्यांना दुसरें कोणतेंहि धोरण स्वीकारणें अशक्यच होतें. यामुळेच मि. चेंबरलेन हे दुसऱ्यांदा जर्मनीशी वाटाघाटी करावयाला आले असतां हेर हिटलेर यांनी आपला निर्वाणीचा खलिता त्यांच्या हाती दिला.

त्या वेळच्या एकंदर परिस्थितीचा विचार केला असतां जर्मनीच्या निर्वाणीच्या खलित्यांतील अटी फार कडक होत्या असें म्हणतां येत नाही. सुडेटेन जर्मनांना देऊ केलेले स्वातंत्र्य ताबडतोब त्यांच्या पदरीं न पडल्यास सुडेटेन जर्मन व झेक या दोघांचीहि मनें परस्परांविषयी अत्यंत कलुषित होऊन गेलीं असल्याने कोणत्याहि क्षणीं अगदी क्षुल्लक कारणावरून देखील जागतिक महा-

युद्धाचा वणवा पेटण्याचा संभव होता. या खलित्यांतील अटीने जर्मनीने वाजवी-पेक्षा अधिक मुलूख मागितला होता, असेंहि नाही. त्या खलित्यांत मागितलेल्या मुलुखापेक्षा अधिक मुलुख म्यूनिच येथील कराराने जर्मनीला मिळाला आहे. झेकोस्लोव्हाकिया व जर्मनी या उभयतांमधील प्रश्न त्यांनी आपापसांतच मिटवावेत अशी एक अट या खलित्यांत होती व त्या अटीला झेकोस्लोव्हाकियाचे दिखाऊ मित्र इंग्लंड व फ्रान्स यांचा तीव्र विरोध होता. ही अट त्यांनी म्युनिच-करारांत बदलूनहि घेतली. पण या फेरबदलामुळे झेकोस्लोव्हाकियाचा कांहीहि फायदा झाला नाही. कारण म्यूनिचकरारापुरती वरील अट रद्द झाली असली तरी प्रत्यक्ष व्यवहारांत जर्मनी व झेकोस्लोव्हाकिया हे दोन्ही देश आपापसांत विचार-विनिमय करूनच सर्व प्रश्नांचा निकाल लावीत आहेत. या साऱ्या अनुभवावरून असेंच वाटतें की, जर्मनीच्या निर्वाणीच्या खलित्याविरुद्ध उठविण्यांत आलेलें काहूर सर्वस्वीं अप्रमाणिकपणाचे होते.

## चेंबरलेनसाहेबांची बतावणी

ही गोष्ट मात्र खरी आहे की, चेंबरलेनसाहेबांच्या राजकारणाला या अप्रामाणिकपणाची त्यावेळी अतिशय गरज होती. आपणच जर्मनीच्या निर्वाणीच्या खलित्याविरुद्ध वावटळ उठवून ती आपल्याच कह्यांत ठेवण्याचें अपूर्व राजकारण-चातुर्य जर या वेळी त्यांनी प्रकट केले नसते तर सर सॅम्यूएल होअर यांच्या-प्रमाणे त्याना अधिकारसंन्यास करण्याचीच पाळी आली असती. याकरिता गोडेस-बेर्ग येथून परत आल्यावर ता.२६सप्टेंबर रोजी त्यांनी लंडनमधील सर्व वर्तमान-पत्रांच्या प्रतिनिधींना बोलावून सांगितले की, जर्मनीच्या विरुद्ध फ्रान्सला मदत करावयाला इंग्लंड एका पायावर तयार आहे. इतकेंच नव्हे तर दुसरे दिवशीं मि. चेंबरलेन यांनी स्वतः रेडियोवर भाषण करून ब्रिटिश जनतेला सांगितलें

'I am myself a man of peace to the depths of my soul. Armed conflict between nations is a night-mare to me; but if I were convinced that any nation had made up its mind to dominate the world by the fear of it's force, I should feel that it must be resisted.'

मि. चेंबरलेन यांनी वरील वाक्यांतून व्यक्त केलेल्या भावना स्तुत्य आहेत यांत कांहीं संशय नाहीं. पण सांगण्याजोगी मौज ही की, या भाषणाचा जो सारांश ब्रिटिश सरकारानें फ्रेंचमध्ये फ्रान्सच्या सरकारी रेडियो कंपन्यांच्या स्टेशनावरून प्रसिद्ध केला त्यांत या भावनांचा मागमूसहि नव्हता. उलट युद्धविरोधी भावनांवरच त्या सारांशात अधिक जोर दिला होता.

'How horrible, fantastic, incredible it is that we should be digging trenches and trying on gas-masks here because of a quarrel in a far away country between people of whom we know nothing. It seems still more impossible that a quarrel which has already been settled in principle should be the subject of war.'

## खरा अभिप्राय कोणता ?

चेंबरलेनसाहेबांच्या या भाषणाचा खरा अर्थ लावावयाचा तो, त्याच्या भाषणाचा ब्रिटिश सरकाराकडून फ्रेंचमध्ये जो सारांश सांगितला गेला, त्यावरूनच लाविला पाहिजे. मि. रॉबर्ट डेल या नामांकित ब्रिटिश तज्ज्ञांनीहि म्हटले आहे

'The British and French military preparations were an extremely expensive stage-set with the twofold purpose of frightening the British and French peoples into capitulating to the Godesberg ultimatium and of enabling Chamberlain, Daladier and Bonnet to pose as the men who saved Europe from war.'

मि. चेंबरलेन यांच्या या दुटप्पी हालचाली चालू असतांना जर्मनीत हेर हिटलेर हे सार्वत्रिक सैन्यभरतीचा हुकूम सोडण्याची तयारी करीत होते. झेकोस्लोव्हाकियानें सार्वत्रिक सैन्यभरतीचा हुकूम अंमलांत आणल्यानंतर जर्मनीनें देखील तसाच हुकूम सोडणें २१ मेच्या प्रकरणामुळे अपरिहार्य झालेच होतें. पण त्याशिवाय २२ सप्टेंबर रोजी मि. चेंबरलेन यांनी दिलेल्या आश्वासनाचाहि त्या हुकुमामुळे भंग झाला असल्यानें झेकोस्लोव्हाकियाच्या नव्या सरकाराला त्याचें प्रायश्चित्त देणें अगदी जरूर झाले होते. या आश्वासनाविषयी मि. चेंबरलेन यांनी पार्लमेंटांत याप्रमाणे खुलासा केला आहे

'I first obtained the renewal of Herr Hitler's assurance that he would not move his troops pending the result of negotiations and I undertook on my side, to see that the Czech Government would avoid any action which would provoke incidents.'

चेंबरलेनसाहेबांनी इतकें स्पष्ट आश्वासन दिलें असूनसुद्धा त्यांची आणि हेर हिटलेर यांची बोलणी चालू असतांनाच झेकोस्लोव्हाकियाने सार्वत्रिक सैन्य-भरतीचा हुकूम सोडून त्या आश्वासनाचा भंग केला होता व हेर हिटलेर यांना एक प्रकारचे आव्हान केले होते. या आव्हानाला उत्तर देण्यापूर्वी सार्वत्रिक सैन्यभरतीला जर्मनीतील लोकमत पूर्णपणे अनुकूल करून घेण्यासाठी हेर हिटलेर यांनी २६ सप्टेंबर रोजी बर्लिन येथे एक अत्यंत भावनाप्रधान भाषण केलें. हे भाषण जर्मनीतील प्रत्येक नागरिकाने ऐकलें आहे व प्रत्येकाच्या मनावर त्याचा चिरस्थायी ठसा उमटला आहे.

## हिटलेरचा संताप

या महत्त्वाच्या भाषणांत झेकोस्लोव्हाकियांतील सार्वत्रिक सैन्यभरतीवर हेर हिटलेर यांनी अत्यंत तीव्र टीका केली आहे. ते म्हणतात

'And now a shameless action began. Herr Benes stood up and demanded from the Sudeten Germans 'When I make war on Germany you have to shoot at the Germans. If you refuse to do it you are traitors and I will have you shot.' He demanded the same from the Hungarians, the Poles and the Slovaks. That was the greatest piece of shamelessness that could be thought of. I can assure you that as we occupied Austria my first order was 'No Czech need even dare serve in the German army. I will not place him before a conflict of conscience.'

स्वदेशाच्या सरहद्दीपलीकडील राष्ट्राशी लागेबांधे असलेल्या अल्पसंख्या-कांची आपल्या देशाच्या सैन्यांत भरती करण्याच्या धोरणावरील हेर हिटलेर

यांची ही विदारक टीका प्रत्येक स्वदेशभक्ताने स्वतःच्या हृदयावर कोरून ठेवण्याच्या योग्यतेची आहे. हिंदुस्थान देश स्वतंत्र व्हावा व रहावा अशी जर कोणाची इच्छा असेल तर हिंदुत्वनिष्ठ राष्ट्रीयत्वाचा पुरस्कार करणें कसें अपरिहार्य आहे, हे हेर हिटलेर यांच्या वरील सूक्तीवरून समजून येईल.

## उलटसुलट धमक्या

२६ तारखेला हेर हिटलेर यांचें झेकोस्लोव्हाकियाच्या प्रकरणावर भाषण होणार आहे, ही बातमी चेंबरलेनसाहेबांना कळतांच त्यांनी परराष्ट्रीय खात्यांतील त्यांच्या विश्वासांतील अधिकारी सर होरेस विल्सन यांना तातडीने बर्लिनला पाठवून हेर हिटलेर यांना अशी सूचना केली कीं, झेकोस्लोव्हाकिया व जर्मनी या राष्ट्रांच्या प्रतिनिधींनी ब्रिटिश प्रतिनिधींच्या समक्ष चर्चा करून हे प्रकरण समेटाने मिटविण्याचा प्रयत्न करावा. पण ही सूचना हेर हिटलेर यांनी झिडकारून टाकली. पुढे रात्री हेर हिटलेर यांचे भाषण झाल्याबरोबर चेंबरलेनसाहेबांनी एक पत्रक प्रसिद्ध करून जर्मनीला असें आश्वासन दिलें कीं, सुडेटेन जर्मनांचा मुलूख झेकोस्लोव्हाकियाकडून जर्मनीला मिळवून देण्याची हमी घ्यावयाला इंग्लंड व फ्रान्स हे दोघेहि सिद्ध आहेत. पण शेजाऱ्यांच्या पायांनी स्वर्गांत जाण्याची कल्पना हेर हिटलेर यांना रुचत नसल्यामुळे त्यांनी त्या पत्रकाकडे दुर्लक्षच केलें. तेव्हा २७ तारखेच्या सकाळीं सर होरेस विल्सन यांनी फिरून एकवार हेर हिटलेर यांची मुलाखत घेऊन त्यांना सांगितले की, जर्मन सैन्य झेकोस्लोव्हाकियांत शिरल्यास फ्रान्सने जर्मनीवर स्वारी करावी व इंग्लंडने फ्रान्सला पूर्ण साहाय्य करावें असे २६ तारखेला फ्रान्स व इंग्लंड या देशांच्या मुख्य प्रधानांची जी बैठक झाली, त्या बैठकीत ठरलें आहे. या साऱ्या पोकळ धमक्यांना भीक न घालतां हेर हिटलेर यांनी चेंबरलेनसाहेबांच्या खास प्रतिनिधीला उत्तर दिलें कीं, २८ तारखेला दुपारीं २ वाजता मी सार्वत्रिक सैन्यभरतीचा जाहीरनामा काढणार आहे व झेकोस्लोव्हाकियाचा प्रश्न माझ्या मनाप्रमाणें सोडवून घेणार आहे. यावेळीं जर्मनीला जे कोणी विरोध करतील त्यांची गति झेकोस्लोव्हाकियासारखीच होईल, हें मी त्यांना आधींच बजावून ठेवतो.

## मुसोलिनीची पायधरणी

सर होरेस विल्सन यांनी ही बातमी लगेच लंडनला कळविली व ब्रिटिश परराष्ट्रीय खात्याने ती पारिसला पाठविली. फ्रान्सच्या परराष्ट्रमंत्र्यांना ही बातमी कळतांच त्यांनी बार्लीन येथील फ्रेंच वकिलामार्फत हेर हिटलेर यांना कळविले की ऑक्टोबरच्या पहिल्या तारखेला सुडेटेन जर्मनांचा सर्व मुलूख जर्मनीला मिळावा, या अटीला फ्रान्सची संमति आहे, आपण कृपा करून सार्वत्रिक सैन्यभरतीचा हुकूम काढूं नका. ही तार बार्लीनला पाठविल्यावर मो. जोर्ज बोन्ने यांनी चेंबरलेन-साहेबांना कळविले कीं, आपल्या शिष्टाईला हेर हिटलेर कांहींच किंमत देत नाहीत तर या वेळीं सि. मुसोलिनी यांना आपल्या वतीने मध्यस्थी करण्याची विनंति करावी, या प्रसंगी झाला तर त्यांच्याच मध्यस्थीचा उपयोग होईल. फ्रेंच परराष्ट्रमंत्र्यांच्या सूचनेप्रमाणे चेंबरलेनसाहेबांनी मंगळवारीं रात्रीं दोन वाजतां सि. मुसोलिनी यांना जगावरील युद्धसंकट टाळण्यासाठी तावडतोब हेर हिटलेर यांच्याकडे मध्यस्थी कर-ण्याची विनंति केली. सि. मुसोलिनी यांच्या शब्दाला मान देऊन हेर हिटलेर यांनी सार्वत्रिक सैन्यभरतीचा हुकूम काढण्याचा आपला संकल्प २४ तास पुढे ढकलला व फ्रान्स, इंग्लंड व इटाली या देशांच्या मुख्य प्रधानांना आपल्याशी वाटाघाट करावयाला निमंत्रणे पाठविलीं.

निमंत्रणाप्रमाणे सि. मुसोलिनी हे जर्मनीला आले, तेव्हा जर्मनीच्या सर-हद्दीवर जाऊन हेर हिटलेर यांनी त्यांचे स्वागत केले व तेथून उभयता मिळूनच म्यूनिचला आले. वाटेंत हेर हिटलेर व सि. मुसोलिनी या उभयतांनी मिळून आंग्लो-फ्रेंच मुत्सद्दीमंडळीपुढे मांडावयाचा समेटाचा मसुदा तयार केला. हा मसुदा इटालियन वर्तमानपत्रांनी प्रसिद्ध केला आहे. यावरून असें दिसते की म्यूनिच-परिषदेंत मि. चेंबरलेन व मो. दालादिए या उभयतांनी फक्त किरकोळ फरक करून तो मसुदा मान्य केला. यामुळे त्या परिषदेचे काम इतक्या लौकर संपले. या परिषदेच्या वेळी हेर हिटलेर यांनी आपल्या दुभाष्यामार्फत मो. दालादिए यांच्याजवळ असे सांगितले की, मला पारिस शहर बघण्याची फार उत्सुकता आहे. पण ही उत्सुकता दोन वेळां प्रकट करूनसुद्धा मो. दालादिए यांनी कांहींच उत्तर दिलें नाही. मार्शल फॉन गोएरिंग यांनीहि हीच इच्छा फ्रान्सच्या मुख्य

प्रधानांजवळ बोलून दाखविली, पण त्यांनाहि मो. दालादिए यांनी निराश केले आहे ! यावरून परस्परांविषयी परस्परांची मनें किती साशंक आहेत तें दिसून येतें.

## इंग्लंडचा जर्मनीशीं गुप्त करार

अशा परिस्थितीत मि. चेंबरलेन यांनी फ्रान्सला वगळून हेर हिटलेर यांच्याबरोबर स्वतंत्र करार करणें सर्वस्वी अयोग्य होतें. म्यूनिचपरिषदेचें काम संपवून मो. दालादिए हे पॅरिसला परत गेल्यानंतर मि. चेंबरलेन यांनी फ्रान्स-सारख्या दोस्त राष्ट्राच्या प्रधानांनाच नव्हे, तर स्वतःच्या मंत्रिमंडळाला व विशेषतः ब्रिटिश परराष्ट्रीय खात्यालाहि आपल्या कारस्थानांची गंधवार्ता लागू न देता हेर हिटलेर यांच्याबरोबर चिरंतन शांततेचा एक करार केला आहे. या करार-नाम्यांत मि. चेम्बरलेन व हेर हिटलेर यांनी म्हटले आहे

'We regard the agreement signed last night and the Anglo-German Naval Agreement as symbolic of the desire of our two peoples, never to go to war with one another again.'

या वाक्यांत उल्लेखिलेला आंग्लो-जर्मन आरमारी तह हा इंग्लंडने फ्रान्सला न विचारतां केला व तो फ्रान्सच्या हिताला अत्यंत विघातक आहे ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे ३० सप्टेंबरच्या करारासंबंधी खुलासा करतांना मि. चेंबरलेन यांनी मो. दालादिए यांना लिहिलेल्या खालील वाक्यांत किती जहर भरलें आहे याची वाचकांना कल्पना येईल.

'Closely united as are the hearts of our peoples, I know that these sentiments are true of your country no less than of my own.'

## या कराराचा कायदेशीरपणा

सध्याच्या आणीबाणीच्या प्रसंगी फ्रान्सला वगळून इंग्लंडने जर्मनीशी स्वतंत्र करार करणें म्हणजे जर्मनीला व इटालीला फ्रान्सचे शत्रुत्व करावयाला उत्तेजन देण्यासारखें आहे. चेंबरलेनसाहेबांच्या या अप्रत्यक्ष उत्तेजनामुळेच ऑक्टोबरच्या

प्रारंभी इटालियन वर्तमानपत्रांतून, इटाली फ्रान्सशी लढावयाला तयार आहे; अशा आशयाचे लेख येत होते. इटालीच्या अबिसीनियावरील स्वामित्वाला फ्रान्सने मान्यता दिल्यानंतर हे लेख थांबले. पण इटालियन लोकांत या मान्यतेमुळे फ्रान्सविषयी स्नेहभाव कांही उत्पन्न झालेला नाही. ते लोक म्हणतात की, चेंबरलेन-साहेबांच्या सांगण्यावरूनच फ्रान्सने इटालीच्या साम्राज्याला मान्यता दिली आहे. चेंबरलेनसाहेबाच्या उतावळया करारामुळे केवळ फ्रान्स आणि इंग्लंड याच्या-मधील अंतर अधिकाधिक वाढत चालले आहे इतकेच नव्हे तर खुद्द ब्रिटिश साम्राज्यांत देखील त्या कराराच्या सनदशीरपणासंबंधी वाद उपस्थित झाले आहेत. हा करार करण्यापूर्वी चेंबरलेनसाहेबांनी स्वतःच्या मंत्रिमंडळाचा देखील सल्ला घेतला नव्हता, तेव्हा वसाहतींचा सल्ला घेतला नव्हता, हे वेगळे सांगावयाला नकोच. यामुळे वसाहतींच्या अधिकाराचे अतिक्रमण होत असल्यामुळे इतःपर इंग्लंडच्या प्रधानमंत्र्यांनी असे अधिकारातिक्रमण करूं नये याबद्दल काय उपाय योजावेत, या प्रश्नाची सध्या वसाहतींतून वाटाघाट सुरू आहे. इंग्लंडांतील अंतर्गत राजकारणांत देखील या कराराच्या गैरसनदशीरपणामुळे खळबळ उडाली असून मंत्रिमंडळांतील बारभाईच्या ऐवजी एकट्या पंतप्रधानांची हुकमत यापुढे इंग्लंडांत सुरू होणार की काय असा इंग्लंडच्या नेत्यांनाहि प्रश्न पडला आहे. वरून अगदी सोज्वल दिसणाऱ्या या करारनाम्यावर मि. चेंबरलेन यांची सही घेऊन हेर हिटलेर यांनी इंग्लंडवर केवढा जय मिळविला आहे हें पाहिलें म्हणजे त्यांच्या कारस्थानपटुत्वाचे कौतुक करावेसं वाटतें

## पोलंडला जपानची चिथावणी

म्यूनिचकरारावर सह्या झाल्याचे कळतांच पोलंडने पोलिश वस्तीचा मुलूख ताबडतोब आपल्या ताब्यांत देण्याबद्दल झेकोस्लोव्हाकियाला निर्वाणीचा खलिता पाठविला. तेव्हा वार्सा येथील इंग्लिश आणि फ्रेंच वकिलांनी झेकोस्लोव्हाकिया-च्या वतीने पोलंडच्या परराष्ट्रमंत्र्यापाशी मध्यस्थी करण्याचा प्रयत्न केला. पण म्यूनिचकरारामुळे या लोकसत्ताक राष्ट्रांची इतकी बेअब्रू झाली आहे की, त्यांच्या वकिलांची भेट घ्यावयाचे सुद्धा कर्नल बेक यांनी नाकारलें. या दोन्ही राष्ट्रापासून पोलंडला कसलीच भीति नव्हती. पोलंडला येऊन जाऊन

रशियाचे भय वाटत होतें. पण त्या बाबतींत जपानी वकिलातीने कर्नल बेक यांना पूर्वीच आश्वासन दिले होतें की, सायबेरियाच्या सरहद्दीवर जपानी सैन्य सज्ज आहे, तोंपर्यंत रशिया पश्चिमेंत कसलीहि भानगड उपस्थित करणार नाही. जपानी वकिलातीने कर्नल बेक यांना असेंहि सांगितले कीं, झेकोस्लोव्हाकिया देश लौकरच जर्मनीशी जकातखातें एक करण्याचा तह करील व तो तह अंमलांत आला म्हणजे मग झेकोस्लोव्हाकियांतील पोलिश वस्तीचा मुलूख पोलंडला देऊन टाकायला कदाचित् जर्मनीचाहि विरोध होईल, तेव्हा काळ अनुकूल आहे तोंपर्यंत पोलंडने आपला मुलूख आपल्या कबजांत घ्यावा. जपानच्या या उपदेशाला इटालीनेहि पूर्ण पाठिंबा दिला आणि पोलंडच्या राज्यकर्त्यांनी इंग्लंड व फ्रान्स यांच्या निर्बळ निषेधाला भीक न घालता टेशेन प्रांत बळकाविला. जपान व इटाली यांची या प्रकरणांत पोलंडला जी मदत झाली त्या मदतीबद्दल पोलंडच्या सरकारी पत्रांनी त्या दोन राष्ट्रांच्या वकिलांचे जाहीर रीतीने आभार मानले आहेत.

—केसरी, तां. ८ नोव्हेंबर, १९३८.



# जर्मनीच्या विजयाचे प्रत्यक्ष व परोक्ष परिणाम

## बर्लिन राजधानी सुरक्षित झाली

जर्मनीच्या नव्या विजयाचे परिणाम काय होणार आहेत, याचा विचार करतांना या विजयामुळे जर्मनीच्या लष्करी परिस्थितींत कोणते फरक घडून आले आहेत, याचा विचार केला पाहिजे. या दृष्टीने विचार केला असता पहिल्या प्रथम ही गोष्ट लक्ष्यांत येते की, लंडन आणि पारिस या दोन राजधान्यांच्या मानानें बर्लिन राजधानी आता अधिक सुरक्षित झाली आहे. दोन महिन्यांपूर्वी झेकोस्लोव्हाकियासारख्या शत्रुराष्ट्राच्या सरहद्दीपासून बर्लिन नगरी अवघी ११० मैलांच्या अंतरावर असल्याने ती अतिशय असुरक्षित होती. झेकोस्लोव्हाकिया देश जर्मनीचा मांडलिक बनल्यामुळे बर्लिन नगरीला वैमानिक आक्रमणाची आता पूर्वीइतकी दहशत राहिलेली नाही. जर्मनीच्या वैमानिक केंद्रापासून पारिस शहर सुमारे १८० मैलांच्या अंतरावर आहे व लंडन सुमारे २२५ मैलांच्या अंतरावर आहे. उलटपक्षी फ्रेंच सरहद्दीपासून बर्लिन नगरी सुमारे ४२५ मैल दूर आहे. केवळ या मैलांचा हिशोब केला, तर पारिस शहर बर्लिनच्या निम्यानेहि सुरक्षित नाही. पारिसच्या मानाने लंडन शहर अधिक दूर असल्याने अधिक सुरक्षित आहे, असे कित्येकांना वाटेल; पण वास्तविक स्थिति तशी नाही. कारण शत्रूंच्या विमानांनी जमिनीवरील सरहद्द ओलांडल्याबरोबर राजधानीच्या शहरी लगेच शत्रूंच्या आक्रमणाची वार्ता कळते व ही वार्ता कळल्यापासून अर्ध्या तासाच्या आंत राजधानींतील वैमानिक दळ शत्रूंच्या प्रतिकाराला सज्ज होऊं शकतें. पण जर्मन वैमानिक उत्तरसमुद्रावरून येत असतांना त्यांच्या आगमनाची वार्ता इंग्लंडला कळूं शकत नाही, कारण समुद्रावर शत्रूंच्या वैमानिकांवर नजर ठेवण्याचीं कायमचीं केंद्रे स्थापन करणें अशक्य आहे. यामुळे जर्मन विमानें इंग्लंडच्या हद्दीत आल्यानंतर लंडनच्या वैमानिक दळाला सिद्ध होण्याला पारिसच्या वैमानिक दळाइतका-

हि अवकाश मिळूं शकणार नाही. आता पोलंडची सरहद्दहि बर्लिनपासून १०० मैलांवरच आहे ही गोष्ट खरी. पण पोलंड आणि रशिया या उभयतांचें वैमनस्य असेपर्यंत बर्लिनला पोलंडचें भय बाळगावयाला नको.

## फ्रेंच तटबंदीचें बिंग कळलें

वैमानिक आक्रमणाचा प्रश्न बाजूला ठेवून केवळ जार्मनीवरील लढाईच्या दृष्टीने पाहिले तर असे दिसतें की युद्धाच्या सुरुवातीला झेकोस्लोव्हाकियावर हल्ला करण्यासाठी जे पांच-सहा लक्ष उत्कृष्ट जर्मन सैन्य जर्मनीच्या पूर्व सरहद्दीवर अडकून पडलें असतें तें आता शत्रूच्या मुलुखावर चढाई करावयाला मोकळें झालें आहे; इतकेंच नव्हे, तर यापुढे पश्चिमयुरोपांतील राष्ट्राविरुद्ध जर्मनीने युद्ध पुकारल्यास नव्या झेकोस्लोव्हाकियाचें जर्मनीला मनःपूर्वक साहाय्य होण्याचाहि संभव आहे. कारण परवाच्या विश्वासघातापासून झेक लोक इंग्लंड आणि फ्रान्स या दोन्ही राष्ट्रांविरुद्ध अतिशय खवळून गेले आहेत. झेक वर्तमानपत्रें आता स्पष्टच लिहीत आहेत 'We have finished with the Western Powers.' झेक लोकांच्या प्रत्यक्ष साहाय्यापेक्षा त्यांची अभेद्य तटबंदी आता जर्मनीच्या ताब्यांत आली आहे, ही गोष्ट अधिक महत्त्वाची आहे. झेक लोकांची तटबंदी फ्रेंचांच्या ऱ्हाईननदीवरील तटबंदीप्रमाणेच बांधलेली असल्यामुळें फ्रेंच तटबंदीचीं सारीं रहस्यें आता जर्मनीच्या हस्तगत झाल्यासारखीं आहेत. यापूर्वी जर्मन हेरांनी त्या तटबंदीची सारी माहिती मिळविली होती खरी; पण कांही हेरांना व तज्ज्ञ अधिकाऱ्यांना ही माहिती कळणें व साऱ्या सैन्याला त्या तटबंदीचा प्रत्यक्ष परिचय होणें यामध्यें महदंतर असतें. तेव्हा झेक तटबंदी जर्मनीच्या हाती आल्यामुळें त्याच नमुन्याची फ्रेंच तटबंदी आता अरक्षणीय झाली आहे, असें म्हणावें लागतें.

## पूर्वेकडे प्रस्थ वाढत चाललें

जर्मनीच्या विजयाचा आणखी एक महत्त्वाचा लष्करी परिणाम झाला आहे. तो थोडा अप्रत्यक्ष असल्याने सहसा कोणाच्या लक्ष्यांत येण्यासारखा नाही; तथापि तोहि तितकाच खरा आहे. जर्मनीच्या लष्करी सामर्थ्याचें पुनरुज्जीवन झाल्यापासून तुर्कस्थानांतील राज्यकारभारांत जर्मनीला पूर्वी जो अग्रपूजेचा मान

होता, तो मान पुनः मिळविण्याचा प्रयत्न जर्मन मुत्सद्दी गेल्या तीन वर्षांपासून तरी करीत आहेत. पण इतके दिवस तुर्कस्थानच्या राज्यकर्त्यांनी आपल्या देशांत हातपाय पसरण्याला जर्मनीला अवसर दिला नव्हता तुर्कस्थानच्या राज्यकर्त्यांनी आतापर्यंत जर्मनीची स्वस्त कन्त्राटे नाकारली होती, शस्त्रास्त्रे नाकारली होती, फार काय कर्जेसुद्धां नाकारली होती. गेल्या महायुद्धांत इंग्रजांनी गॅलिपोलीवर हल्ला केला व त्या नाक्याच्या मुलुखाचे संरक्षण करण्याला जर्मनांनी तुर्कांना मदत केली. पण हा सारा इतिहास विसरून जाऊन गॅलिपोलीची नवी तटबंदी बांधण्याचे काम तुर्की सरकारने इंग्रजांनाच दिले आहे. तुर्कांच्या राजकारणांतील हा सारा इंग्रजां-विषयीचा पक्षपात व जर्मनांचा द्वेष म्यूनिचकरारामुळे एका क्षणांत विलयाला गेला आहे. जर्मनीचे फडणीस हेर फुंक यांनी ऑक्टोबरच्या दुसऱ्या आठवड्यांत अंगोऱ्याला भेट दिल्यापासून तुर्कस्थानात पूर्वीप्रमाणे जर्मनीचे वर्चस्व प्रस्थापित झाले आहे.

अशा रीतीने तुर्कस्थान जर्मनीच्या पंखाखाली आल्याने जर्मनीला रशिया-च्या पेट्रोलच्या खाणीचा विध्वंस करणे अगदी सुकर होणार आहे. कारण रशि-यांतील खाणींतून निघणाऱ्या पेट्रोलपैकी शेकडा ९० टक्के पेट्रोल कॉकेशस प्रांतांतील खाणीतून निघते व हा प्रांत तुर्कस्थानाच्या सरहद्दीला लागलेला असल्याने जर्मन वैमानिकांना तुर्कस्थानांतून कॉकेशसमधील कार्स, बाटुम इत्यादि पेट्रोलच्या धंद्याच्या केंद्राचा सहज विध्वंस करतां येईल आणि या एकाच आघा-ताने मोटारी, विमाने व चिलखती गाड्या यांच्या उपयोगांत इतर सैन्यांपेक्षा पुढे गेलेले रशियन सैन्य एकदम अचल बनविता येईल. या कारणाकरिता तुर्कस्थान देश एकट्या जर्मनीच्याच कह्यांत रहावा, अशा दृष्टीने जर्मनीचे सध्या प्रयत्न चालू आहेत. मार्शल फॉन गोएरिंग यांच्या मुखपत्राने नुकतेच लिहिले होते 'There is no justification now for the British credits to Turkey in Anglo-Turkish trade relations.' जर्मनीचे हे धोरण यशस्वी झाल्यास इंग्लंडवर तुर्कस्थानाला नुकत्याच दिलेल्या १ कोटि ६० लक्ष पौंडांच्या कर्जावर पाणी सोडण्याची पाळी येईल.

### मंत्री नेमतांनाहि जर्मनीकडे नजर

अशा प्रकारे इंग्लडचे कर्ज बुडाले, तर त्याचे कोणाला फारसे नवल वाटा-

वयाला नको. कारण इंग्लंडचे सरकार क्रमाक्रमाने जर्मनीच्या आहारीं जात चालले आहे. ही केवळ वर्तमानपत्री अतिशयोक्ति नव्हे. स्वतःचे आधिकारी व मंत्री निवडण्याचे निर्विवाद स्वातंत्र्य असणे, ही कोणत्याहि राष्ट्राच्या स्वतंत्रतेची सर्वमान्य कसोटी आहे. ही कसोटी इंग्लंडच्या सध्याच्या सरकारला लाविली, तर ते सरकार स्वतंत्र नाही असेच म्हणावे लागेल ! मि. ब्रेल्सफोर्ड यांच्यासारख्या जबाबदार लेखकांनी लिहिले आहे—

'Mr. Eden was deposed from the Foreign Office by the Duce. Mr. Churchill and Mr. Duff Cooper are declared ineligible for office. If ever Mr. Attlee or Sir Archibald Sinclair were visibly nearing Downing Street, assuredly the Dictator would utter his veto.'

अमक्या लोकांना मंत्रिपदावर नेमूं नये, असे मत प्रदर्शित करण्याचा जर्मनीचा अधिकार एकदा मान्य केला, म्हणजे प्रत्येक नव्या नेमणुकीच्या प्रसंगी जर्मनीचा सल्ला घेण्याचा प्रघात पडणारच. असा प्रघात आता सध्यादेखील पडत चालला आहे. म्यूनिच-करारांतील शरणागतीचा संताप येऊन आरमारमंत्री मि. डफ कूपर यांनी राजीनामा दिल्यावर नवीन आरमारमंत्री कोण नेमावा या बाबतीत मि. चेंबरलेन यांनी हेर हिटलेर यांचा सल्ला घेतला होता, अशी बातमी जर्मन वर्तमानपत्रांनी प्रसिद्ध केली आहे व इंग्लिश वर्तमानपत्रांनी तिचा इनकार करण्याऐवजी अनुवादच केला आहे. उदाहरणार्थ, मुंबईच्या टाईम्सचा लष्करी बातमीदार म्हणतो—

'Pleasure is expressed in some of the German papers over the delay in appointing a successor at the Admiralty to Mr. Duff Cooper. Some names have been submitted for Hitler's approval, it is said, but in agreement with Premier they have been turned down.'

चेंबरलेनसाहेबांना हीच वहिवाट जर पुढे चालू ठेवावयाची असेल, तर झेकोस्लोव्हाकियाच्या स्वातंत्र्याबरोबरच इंग्लिश राष्ट्राचेंहि स्वातंत्र्य नष्ट झालें असें म्हणावें लागेल !

## व्यापारी क्षेत्रांतहि पिछेहाट

अलीकडे इंग्लंडला जर्मनीबरोबर रणांगणावर ज्याप्रमाणें टक्कर देतां येत नाही, त्याप्रमाणें व्यापारी क्षेत्रांतहि टक्कर देतां येत नाही. गेल्या सातआठ महिन्यांत इंग्लंड व फ्रान्स यांनी बाल्कन प्रदेशांत आर्थिक वर्चस्व स्थापण्यासाठी किती अटोकाट प्रयत्न केले, हे वाचकांना माहीत आहेच. पण इंग्लंड व फ्रान्स यांचे हे सारे प्रयत्न जर्मनीचे अर्थमंत्री डॉ. फुंक यांच्या ऑक्टोबरच्या पहिल्या पंधरवड्यातील एका दौऱ्याने पूर्णपणे निष्फल झाले आहेत. ऑक्टोबरच्या पहिल्या पंधरवड्यात डॉ. फुंक यांनी युगोस्लाव्हिया, बल्गेरिया व तुर्कस्थान या तीन देशांच्या राजधान्यांना भेट दिली व तीनहि देशांच्या सरकारांबरोबर नवीन व्यापारी तह केले. या तहांनी जर्मनीने वरील तीन्ही देशांतील धान्यसामुग्री व उद्योगधंद्यांना लागणारा कच्चा माल खूप महाग दराने विकत घ्यावयाचे कबूल केले आहे. आपल्या निर्यात मालाबद्दल ही भरमसाट किंमत वरील देशांना केवळ एकाच वर्षापुरती मिळणार नसून प्रतिवर्षी याच किमतीला त्यांचा सर्व माल विकत घेण्याचे अभिवचन दिले आहे व या तीन्ही देशांना औद्योगिक द्रव्यांचे उत्पादन सपाटून वाढविण्याला उत्तेजन दिले आहे. जर्मनीच्या नव्या आर्थिक पद्धतीचे वैशिष्ट्य हेच आहे की, सकृद्दर्शनी इतके महाग दिसणारे दीर्घकालीन करार करूनसुद्धा जर्मनीला फायदाच होतो आणि मंदीचे अत्यंत घातुक परिणाम अनुभविलेल्या बाल्कन राष्ट्रांना आपल्या जनतेची आर्थिक परिस्थिति सुधारण्याची अमूल्य संधि मिळते. जर्मनीखेरीज इतर कोणतेहि राष्ट्र परराष्ट्रांबरोबर इतके उभयपक्षी फायदेशीर करार करूं शकत नाही. याच नमुन्याचे करार रुमानिया व ग्रीस या दोन देशांबरोबर लौकरच व्हावयाचे आहेत.

## मोटारीचे नवे रस्ते

या व्यापारी करारांच्या पाठोपाठ लौकरच राजकीय करारहि व्हावयाचे आहेत. डॉ. फुंक यानी स्वतःच सांगितलें आहे ‘Economic policy cannot be separated from general political policy.’ प्राचीन काळीं रोमचे राजकारण हे रोमच्या रस्त्यांवर अवलंबून रहात असे, त्याचप्रमाणे जर्मनीचे राजकारणहि जर्मनीच्या रस्त्यांवर अवलंबून असते. पुढील वर्षी झेकोस्लोव्हाकिया,

युगोस्लाव्हिया व बल्गेरिया या सान्या जर्मनीच्या अंकित राष्ट्रांतून जर्मनीतील सर्वोत्कृष्ट मोटाररस्त्यांच्या तोडीचे शेकडो मैल लांबीचे मोटारीचे रस्ते बांधण्याचे काम सुरू व्हावयाचे आहे. एकट्या झेकोस्लोव्हाकियातच ६०० मैल लांबीचा नवा रस्ता बांधावयाचा असल्यामुळे १ लक्ष मजुराना पांच वर्षेपर्यंत काम मिळेल, असा अंदाज आहे. हे सर्व रस्ते जर्मनीच्या इच्छेप्रमाणे पूर्ण झाल्यास मध्य आणि दक्षिण युरोपावर जर्मनीचे वर्चस्व पूर्णपणे प्रस्थापित होईल.

## लहान राष्ट्रांचा विश्वास उडाला

म्यूनिचच्या तहाने प्राप्त झालेल्या संधीचा फायदा घेऊन जर्मनीने पांच वर्षांच्या अवधीत आपले साम्राज्य सुसंघटित केले तर, तेवढ्याच अवधीत ब्रिटिश साम्राज्याचा डोलारा तितकाच डळमळीत होणार, ही गोष्ट हिंदवासियांनी आता निश्चित समजावी. युरोप खंडामध्ये लहान राष्ट्रांचे प्राबल्य असण्यावर ब्रिटिश साम्राज्याचे अस्तित्व अवलंबून आहे या एकाच कारणासाठी चौदाव्या लुईपासून कायसर व्हिल्हेल्मपर्यंत युरोप खंडांत जे जे सम्राट् उदयास आले त्या सर्वांविरुद्ध युरोपांतील लहान राष्ट्रांचे संघ उभे करून इंग्लंडने प्राणांतिक युद्धे केली व त्या सम्राटांचा सपशेल पराजय करून त्यांना तडफडत मरायला लाविले. गेल्या महायुद्धानंतर अस्तित्वांत आणलेला राष्ट्रसंघ-देखील ब्रिटिश राजकारणाच्या या पूर्वपरंपरेला साजेल असाच आहे. १९३५ सालापासून या राष्ट्रसंघाची जी विटंबना चालली आहे, ती वास्तविक पाहता ब्रिटिश साम्राज्याचीच विटंबना आहे, ही गोष्ट कोणीहि विसरू नये. आजपर्यंत राष्ट्रसंघांतील सान्या लहान राष्ट्रांना असा विश्वास वाटत होता की, इंग्लंडच्या आश्रयाने आपण आपल्या स्वातंत्र्याचे संरक्षण करूं. पण म्यूनिचकरारापासून त्यांचा हा विश्वास पूर्णपणे नष्ट झाला आहे.

## चीनवर घडलेला परिणाम

जर्मनीच्या विजयामुळे ब्रिटिश साम्राज्याला कशी उतरती कळा लागली आहे, याचे एक ठळक उदाहरण येथे सांगितले पाहिजे. १९३७ च्या जुलै महिन्यांत चिनी-जपानी युद्धाला सुरुवात झाली, तेव्हापासून जपानी आरमार दक्षिण चीनमधील कँटन बंदरावर हल्ला करण्याला उत्सुक झालें होते. तरी देखील हाँग-

कॉंगच्या शेजारी युद्ध उपस्थित झाल्यास ब्रिटिशांच्या चीनमधील हितसंबंधांना फार मोठा धक्का बसणार असल्याने जपानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी १९३८ च्या ऑक्टोबरपर्यंत आरमारखात्याच्या या हालचालीला मान्यता दिली नव्हती. पण सप्टेंबरच्या अखेरीला इंग्लंड जर्मनीच्या आहारी गेल्याचे कळताच जपानी आरमाराने आपले परराष्ट्रमंत्री जनरल उगाकी यांना राजीनामा देण्यास भाग पाडले व ऑक्टोबरच्या १२ तारखेला कॅंटन प्रांतावर हल्ला केला. 'साहसे श्रीः प्रतिवसति' हा न्याय येथेहि खरा ठरून जपानला अगदी अल्पावधीत कॅंटन बंदर काबीज करतां आले व त्यामुळे हँकौचाहि पाडाव होऊन चीनच्या राष्ट्रसूत्रधारांना ५०० मैल दूर पळून जावे लागले, हे सर्वांना माहीत आहेच. या एकाच गोष्टीवरून म्यूनिचच्या कराराने जर्मनीने जो विजय मिळविला त्याचे अप्रत्यक्ष परिणाम किती दूरवर घडत आहेत, याची वाचकांस कल्पना येईल.

—केसरी, ता. २२ नोव्हेंबर, १९३८.



# पश्चिमयुरोपांतील राजकारण

## लेखांक पहिला

झेकोस्लोव्हाकियाच्या प्रकरणाचा मनाप्रमाणे निकाल लागल्यानंतर हेर हिटलेर हे पूर्वयुरोपांत जर्मन साम्राज्याचा विस्तार करण्याकडे लक्ष्य पुरवितात कीं जर्मनीचा कट्टा शत्रु जो फ्रान्स त्याला पूर्णपणे हतप्रभ करण्याकरिता सि. मुसोलिनीच्या कारस्थानांना जर्मनीचा पाठिंबा देतात या प्रश्नाचे उत्तर निश्चितपणे मिळेपर्यंत पश्चिमयुरोपांत सध्या चालू असलेल्या कारस्थानाचे सूत्र उलगडणेंच अशक्य झाले होते. ता. ३० जानेवारी रोजी हेर हिटलेर यांनी केलेल्या भाषणाने ही अनिश्चितता बऱ्याच अंशी नष्ट झाली आहे. यामुळे आता फ्रान्स देशाचे व फ्रेंच साम्राज्याचे लचके तोडण्यासाठी सि मुसोलिनी व हेर हिटलेर या दोघां विजिगीषूंनी कोणती कारस्थाने चालविली आहेत, या प्रकरणाची प्रस्तावना करणे युक्त होईल.

### फ्रान्सची हलाखी

सध्या फ्रान्सची परिस्थिति किती अवघड झाली आहे, याची हिंदुस्थानांतील लोकांना कांहीच कल्पना नाही. गेल्या आठ वर्षांत फ्रान्सची पक्क्या मालाची निर्यात निम्म्याने कमी झाली आहे. फ्रेंच रेल्वेच्या वॅगन्सपैकी $\frac{1}{3}$ वॅगन्स आज बेकार होऊन पडल्या आहेत. मोठमोठ्या कारखानदारांचे शेकडा ८० टक्के भांडवल गेल्या आठ वर्षांत नष्ट झाले आहे. गेल्या महायुद्धानंतर जर्मनीच्या लोखंडाच्या खाणीपैकी $\frac{1}{3}$ खाणी फ्रान्सला मिळाल्या व त्यामुळे १९३३ च्या अखेरीपर्यंत फ्रान्समधील लोखंडाची पैदास जर्मनीतील लोखंडाच्या पैदासीपेक्षा पुष्कळच अधिक होती. पण तेव्हापासून जर्मनीने विश्वप्रयत्न करून आपली लोखंडाची पैदास वाढविल्यामुळे व फ्रान्समधील मजुरांनी काम करून पैसे मिळविण्याऐवजी संप करून पैसे मिळविण्याचे नवें धोरण अंमलांत आणल्यामुळे १९३८ साली जर्मनीची लोखंडाची पैदास फ्रान्सच्या चौपट झाली. इतर धंद्यांतूनहि फ्रान्सची अशीच पुच्छप्रगति

होत आहे. जर्मनीला एक पाणबुडी बोट बांधण्याला आठ महिने लागतात, तर फ्रान्सला तसलीच पाणबुडी बांधण्याला अठरा महिने लागतात. जर्मनीचा रासायनिक पदार्थ तयार करण्याचा धंदा फ्रान्सच्या दसपटीने मोठा झाला आहे व जर्मनीची जननसंख्या फ्रान्सच्या तिप्पट झाली आहे. गेल्या दोन वर्षांतच फ्रान्सचे उत्पादन १५ टक्क्यांनी कमी झाले आहे, पण फ्रेंच सरकाराची उधळपट्टी अजून सारखी वाढतच आहे. गेल्या दोन वर्षात फ्रान्समधील, सरकारकडून पगार घेणाऱ्यांच्या संख्येत २४०००० इतकी नवीन भर पडली. तरी देखील गतवर्षापेक्षा यंदा फ्रान्समध्ये ५०००० बेकार अधिकच झाले आहेत. तीन वर्षात फ्रेंच सरकारचा खर्च ३२०० कोटि फ्रॅकांनी वाढला असून प्रतिवर्षी राष्ट्रीय कर्जांत १८०० कोटींची भर पडत आहे. राष्ट्रीय मालकीच्या शस्त्रास्त्रांच्या कारखान्यांतून यंत्रांच्या उत्पादनशक्तीच्या ४० टक्केच काम केले जाते व खाजगी मालकीच्या कारखान्यांपेक्षा एका वर्षात ते २३ दिवस सुट्टी मात्र अधिक घेतात. या साऱ्या बजबजपुरीचा एक परिणाम असा झाला आहे की परराष्ट्रांना फितूर होण्याला तत्पर असलेल्या फ्रेंच लोकांची संख्या झपाट्याने वाढत आहे. अमेरिकेचे पारिस येथील वकील मि. बुलिट यांचा अंदाज असा आहे की, गेल्या मार्चपासून सप्टेंबरपर्यंतच्या सहामाहीत फ्रेंच नियतकालिकांना जर्मनीकडून २० लक्ष पौंडांहून अधिक रकमेची भेट मिळाली असावी. यावरून इतर देशांनी फ्रेंच लोकांना फितूर करून घेण्यासाठी किती रक्कम खर्चली असावी, याची किंचित् कल्पना येईल.

## मार्क्सपंथी गटांचा आत्मघातकीपणा

फ्रान्समधील या साऱ्या आर्थिक अदाधुंदीला आळा घालण्यासाठी गेल्या नोव्हेंबरच्या पहिल्या तारखेला फ्रान्सच्या मुख्य प्रधानांनी मो. रेनो या अर्थशास्त्रज्ञांला आर्थिक मंत्र्याची जागा दिली. तेव्हा फ्रान्समधील अंदाधुंदीपासून ज्यांचा फायदा होत होता, अशा मार्क्सपंथी गटांनी त्यांना पहिल्या दिवसापासूनच विरोध करावयाला सुरुवात केली. पुढे १४ तारखेला सरकारी खर्चात काटकसर करण्याचीं व नवीन कर बसविण्याची सरकारी फर्माने मो. रेनो यांनी प्रसिद्ध करतांच मार्क्सपंथी गटांनी नोव्हेंबरच्या अखेरच्या तारखेला सर्व फ्रान्स देशांत सार्वत्रिक संप घडवून आणण्याचा आपला निश्चय जाहीर केला.

देशामध्ये यादवी माजवितांना त्या यादवीचा फायदा शेजारची शत्रुराष्ट्रे घेतील, या गोष्टीकडे मार्क्सपंथी लोक पुष्कळदा दुर्लक्ष करतात; कारण त्यांच्या तत्वज्ञानांत राष्ट्रधर्माला मुळी स्थानच नाही. फ्रान्स देशाची परिस्थिति सध्या इतकी अवघड झाली आहे की, त्या देशातील मजुरांना अतिशय हाल भोगावे लागत असले तरी त्यांना 'फारच बरी निरयगति परवशता शतगुणे करी जाच' असाच उपदेश करणे योग्य होईल. पण इतकी अक्कल मार्क्सपंथी पुढाऱ्याना नसली तरी बऱ्याचशा फ्रेंच मजुरांना व इतर फ्रेंच जनतेला असल्यामुळे नोव्हेंबर अखेरीचा सार्वत्रिक संप बहुतांशी अयशस्वी झाला.

## जर्मनी व इटाली यांची सिद्धसाधकता

हा संप यशस्वी होईल अशा समजुतीने फ्रान्सचा मुलूख मागण्याचा आपला मनोदय या दिवशीच व्यक्त करावयाचे इटालीचे नेते सि. मुसोलिनी यांनी ठरविले होते. गेल्या वर्षात जर्मनीने ऑस्ट्रिया व झेकोस्लोव्हाकिया या देशांच्या शिकारी साधल्या. या दोन्ही प्रसंगी जर्मनीला इटालीच्या मैत्रीचा अतिशय उपयोग झाला. त्याच्या मोबदला जर्मनांच्या मदतीचा उपयोग करून आपण फ्रान्सचा मुलूख मिळवावयाचा, असा संकल्प सि. मुसोलिनी यांनी केला व त्या संकल्पाला जर्मनीचा पूर्ण पाठिंबाहि मिळाला. ता. २७ नोव्हेंबर रोजी, फ्रांकफुर्टेर झायटुंग' च्या मुख्य संपादकाने आपल्या पत्रांत, अर्थात जर्मन सरकाराच्या संमतीनेच, जाहीर केले होते

'It must be recognized that the great partner of our country, the fascist Italy, is predestined to become the dominant power in the Mediterranean. The English pretensions of dominating the Mediterranean, the Red Sea and the Indian Ocean must be limited by the natural rights of a strong Italy. Finally France, whose communications with North Africa will require protection only if they will be compromised by her irrational politics, must recognize that the Italian position in the Mediterranean will not be overthrown by alliances.'

प्रस्तुत उतान्यांतील हिंदी महासागरावरील ब्रिटिशांच्या आधिपत्याला हरताळ फासण्याचा इटालीचा मनोदय हिंदी जनतेने लक्षांत ठेवावा. असो, हा लेख प्रसिद्ध झाल्यानंतर तीन दिवसांनी इटालीच्या पार्लमेंटात काउण्ट चियानो हे इटालियन जनतेच्या नैसर्गिक आकांक्षांविषयी बोलत असतांना सान्या सभासदांनी उभे राहून ' दूचे, तूनिसिया, कोर्सिका ' असा घोष आरंभिला. त्याबरोबर गॅलरींतील प्रेक्षकांनीहि त्या घोषणेत नीस, सॅव्हॉय, जीबुती या नांवांची भर टाकून आपणहि ओरडण्याला सुरुवात केली. इटालीला फ्रान्सच्या मुलुखाची मागणी करावयाला जर्मनीने उत्तेजन दिले होते. पण ती मागणी अशा रीतीने व इतक्या लौकर होईल अशी जर्मनीची अपेक्षा नव्हती. यामुळे डिसेंबरच्या प्रारंभीं जर्मनीने इटालियन सरकारला इतकी घाई न करण्याची विनंति करून पाहिली. पण सि. मुसोलिनी हे आता वाट पाहण्याच्या मनःस्थितीत नव्हते. नोव्हेंबरच्या २७ तारखेलाच मार्शल दे बोनो व जनरल तेराझ्झी यांच्याजवळ बोलतांना त्यांनी असे उद्गार काढले

' At Munich I have saved England and France from war. They ought to pay for it. If they do not wish to pay, I will pay myself. '

जर्मनीच्याविषयीं रागावून बोलणें सि. मुसोलिनी यांना सध्या शक्य नाही. पण ऐतिहासिक सत्य असें आहे की १८८७ सालीच जर्मनीने इटालीला नुसतें उत्तरआफ्रिकाच नव्हे, तर नीस आणि सॅव्हॉय हे प्रांतहि मिळवून देण्याचें अभिवचन दिले होते. पण त्या वचनाची पूर्ति १९१४ सालापर्यंत झाली नाही. तशी फसगत पुन्हा होऊं नये, याकरिता इटालीच्या नेत्यांनी त्वरा करणें आवश्यक आहे.

## चियानोंच्या भाषणाने उडालेली खळबळ

इटालियन पार्लमेंटांतील या प्रकारामुळे फ्रान्सपेक्षाहि इंग्लंडांत अधिक खळबळ उडाली. टाइम्स, डेली टेलिग्रॅफ व न्यूज क्रॉनिकल या तीनहि पत्रांनी या प्रकरणावर कडक लेख लिहून नुकताच अंमलांत आलेला आंग्लो-इटालियन करार इटालियन सरकाराला पाळावयाचा आहे कीं नाही अशी पृच्छा केली.

कारण करार करणाऱ्या राष्ट्रांनी भूमध्यसमुद्रांतील सध्याच्या परिस्थितीत कोणताहि बदल घडवून आणू नये, असे एक कलम त्या करारांत आहे. पण असल्या करारांचा अर्थ करण्यांत प्रवीण असलेल्या मि. गायदांनी इंग्लिश पत्रकर्त्यांना उत्तर दिलें की, टयूनिसमधील इटालियन नागरिकांवर फ्रेंच नागरिक बनण्याचा जुलूम करून फ्रान्सच असलेल्या परिस्थितीत बदल घडवून आणीत आहे. इंग्लंडच्या रोम येथील वकिलांनीहि काउंट चियानोची मुलाखत घेऊन वरील प्रकार इटालियन सरकाराच्या संमतीने घडला आहे की काय याचा खुलासा मागितला. तेव्हा काउंट चियानोनी त्यांना उत्तर दिले 'माझ्या भाषणात तशा आशयाचा कांहीहि मजकूर नव्हता, तेव्हा घडलेल्या प्रकाराची जबाबदारी इटालियन सरकारावर पडत नाही.' ता. ५ डिसेंबर रोजी इटालीच्या या नवीन मागण्यांमुळे आंग्लो-इटालियन कराराचा भंग होतो की नाही याविषयी ब्रिटिश पार्लमेंटच्या सभासदांनी चेंबरलेनसाहेबांना प्रश्न विचारले. तेव्हा चेंबरलेनसाहेबांनी उत्तर दिले की, अशा कांही मागण्या केल्या तर आंग्लो-इटालियन कराराचा भंग होतो; पण असल्या मागण्यांना इटालियन सरकारचा पाठिंबा मिळाला नसल्याने मला माझी रोमची भेट लांबणीवर टाकण्याचे कांही कारण नाही.

## चेंबरलेनचें उलटसुलट भाष्य

पुढे १२ तारखेला मि. मॉर्गन या मजूर सभासदांनी विचारले 'फ्रान्सवर जर कोणी स्वारी केली तर फ्रान्सच्या मदतीला धावून जाण्याला इंग्लंड तहाने बांधले गेले आहे काय?' त्याबरोबर चेंबरलेन साहेबांनी उत्तर दिले 'फ्रान्स आणि इंग्लंड यांच्यामध्ये अशा अर्थाचा कोणताहि करार किंवा तह झालेला नाही.' या उत्तरामुळे इंग्लंड व फ्रान्स या दोन्ही देशांत मोठी खळबळ उडाली. फ्रेंच परराष्ट्रमंत्र्यांनी दुसऱ्या दिवशी ब्रिटनच्या पारिस येथील वकिलांना भेटीला बोलावून त्यांची कानउघाडणी केली. तेव्हा १३ तारखेच्या संध्याकाळी चेंबरलेनसाहेबांनी जाहीर केले की, फ्रान्स व ग्रेट ब्रिटन हे दोन्ही देश आता इतके एकजीव झाले आले आहेत की, त्यांच्यामध्ये मुळींच भेदभाव उरलेला नाही, त्यामुळे एकावरील संकट तें दुसऱ्यावरील संकट अशा बुद्धीनेच यापुढे आम्हांला वागणें जरूर आहे. पण 'मी तुला कधींहि अंतर देणार नाही' असें तोंडी वचन देऊन एखाद्या स्त्रीशी संबंध

ठेवणे व तिच्याशीं कायदेशीर लग्न करून स्वतःला बांधून घेणे, यांत जो फरक असतो, तोच फरक इंग्लंड व फ्रान्स यांच्या मैत्रीत आणि जर्मनी व इटाली यांच्या मैत्रींत आहे, अशी या सारवासारवीची इटालियन मुत्सद्दी मंडळीनी टवाळी केली. त्यांच्या या टवाळीला तितकेंच सबळ कारण होतें. चेंबरलेनसाहेबांनी सि. मुसोलिनी यांच्या भेटीला जाऊ नये असे फ्रान्सचे मत असूनसुद्धा चेंबरलेनसाहेबांनी रोमला जाण्याचा बेत कांहीं बदलला नव्हता.

ब्रिटिश प्रधानमंत्र्यांच्या आगमनानें इटालीचा फायदा झाला व पाहिजे, अशी इटालींतील मुत्सद्दी मंडळीना खात्री वाटत होती. ता. १३ डिसेंबरला 'गाझेत्ता देल् पोपोलो' या इटालियन पत्राने लिहिलें

'England and France have to pay for the peace. England must give a colonial empire to Germany and France must satisfy the natural aspirations of Italy. The last word in French politics is always pronounced in London. Rhineland, Austria, Czechoslovakia, in each case France had said 'never' but England was of a different opinion. Today if England asks France to pay in Spain and in Africa, France will pay.'

याच भरंवशावर १७ तारखेला इटालीच्या परराष्ट्रमंत्र्यांनी फ्रान्सला कळविलें की, ७-१-१९३५ रोजी सि. मुसोलिनी व मो. लाव्हाल या उभयतांमध्ये झालेला व फ्रान्सने अद्यापि अमलांत न आणलेला करार यापुढे रद्द समजावा व नव्या कराराच्या वाटाघाटी सुरू करण्यासंबंधीच्या सूचना आपल्याकडून लौकरच येतील अशी आशा आहे.

## लंडट टाइम्सची आगाऊ सूचना

याच्या आदल्या दिवशीच 'लडन टाइम्सने' आपल्या अग्रलेखांत फ्रान्सला इटालीच्या महत्त्वाकांक्षांचे अंशतः तरी समाधान करण्याची सूचना केली होती; विशेषतः जीबुतींचें बंदर, जीबुतीहून आदिसअबाबाला जाणारी आगगाडी व सुएझ कालव्याची व्यवस्था यांत फ्रान्सने इटालीला नवीन सवलती द्याव्या, अशी टाइम्सची सूचना होती. १७ तारखेला पोर्तिनाक्स या प्रसिद्ध फ्रेंच

लेखकाने लिहिले की, मि. चेंबरलेन ब्रिटिश सोमालीलॅंडची वसाहत इटालीला देऊन टाकण्याचा विचार करीत आहेत, याच्या जोडीला फ्रेंचांनीहि फ्रेंच सोमालीलॅंड देऊन टाकली तर इटालीचे समाधान करतां येईल, असे चेंबरलेनसाहेबांचें म्हणणें आहे. ही बातमी सपशेल खोटी आहे असे ब्रिटिश सरकारने जाहीर केलें; पण लोकांच्या मनातील संशय गेला नाहीच. हा संशय दृढ होण्याला एक कारणहि झाले आहे. १९ तारखेला फ्रेंच चेंबरमध्ये मो. जोर्ज बोने यानी इटालीच्या मागण्यांना उत्तर देतांना म्हटले 'France will never agree to yield an inch of her territory to Italy' या विधानाविषयी आपल्या एका मंत्र्याजवळ चर्चा करीत असता चेंबरलेनसाहेब म्हणाले 'When a country like France has once lost her virginity, she is ready to accept any dirty proposal in the world.' स्वतः सि. मुसोलिनीचे देखील फ्रान्सविषयीचे मत याहून अधिक वाईट असू शकणार नाही.

## आफ्रिकेंत इटालियन सैन्य

याच सुमारास फ्रेंच सोमालीलॅंडच्या सरहद्दीवर ९१००० इटालियन व दीड लक्ष काळें सैन्य जमल्याच्या बातम्या फ्रान्समध्ये प्रसिद्ध झाल्या. त्याबरोबर फ्रेंच सरकारने घाईघाईने कांही काळ्या पलटणी जीबुतीला रवाना केल्या. कित्येकांना तर असेंच वाटूं लागले की मि. चेंबरलेन हे इटालीला जाण्यापूर्वीच इटालियन लष्कर जीबुतीचा कबजा घेईल व युद्धाचा वणवा सर्व युरोपभर भडकूं नये याकरितां मि. चेंबरलेन हे मध्यस्थी करून फ्रान्सला विटेवरील विठोबा बनवितील. पण हा अंदाज चुकीचा होता. फ्रेंच सोमालीलॅंडमध्ये इटालीचे सैन्य घुसल्यास फ्रान्स कांहीहि करूं शकत नाही, हे सि. मुसोलिनीना १९३८ च्या प्रारंभापासून माहीत झाले आहे. कारण १९३८ च्या जानेवारीत अबिसिनीयांतील इटालियन सैन्याच्या सहा तुकड्या फ्रेंच सोमालीलॅंडच्या सरहद्दीत सुमारें २५ मैल घुसल्या व तेव्हापासून त्या तेथेच तळ देऊन राहिल्या आहेत, तरी त्यांना तेथून हाकून देण्याचे साहस अद्यापि फ्रेंच सरकारच्या हातून होत नाही! पण इटालियन सरकारची महत्त्वाकांक्षा केवळ फ्रेंच सोमालीलॅंडच्या प्राप्तीने तृप्त होण्याजोगी नसल्याने सि. मुसोलिनीनी आपल्या सैन्याला जीबुतीवर चालून जाण्याचा हुकूम दिलेला नाही. सि. मुसोलिनी यांचा हिशोब असा आहे

की, जर्मनी व स्पेन या दोन्ही देशांच्या सरकारांच्या साहाय्याविना इटालीच्या आकांक्षा परिपूर्ण व्हावयाच्या नाहीत. यासाठी त्यांनी Informazione Diplomatica या सरकारी पत्राच्या १५ जानेवारीच्या अंकात, असं स्पष्टच सांगितलें आहे की, ज. फ्रांकोचें सरकार माद्रिदमध्ये सुप्रतिष्ठित झाल्यावर मगच इटालियन सरकार आपल्या मागण्या फ्रेंच सरकाराला सादर करील.

इटालीच्या मागण्यांना जर्मनीने पाठिंबा देऊं नये, यासाठी नोव्हेंबरच्या अखेरीला फ्रान्सने फ्रेंको-जर्मन करारावर सही केली. त्यानंतर फ्रेंच परराष्ट्र मंत्र्यांनी चेंबर ऑफ डेप्युटीजपुढे बोलतांना असें विधान केलें 'The Franko–German declaration comprehends the solemn recognition of our frontiers.' वास्तविक पाहतां त्या करारांत अशा अर्थाचा एकहि शब्द नाही. त्या करारांत इतकेंच म्हटलें आहे की फ्रान्स व जर्मनी या दोन देशांमधील सध्याची सरहद्द हीच कायमची समजावी व ती बदलण्याचा प्रयत्न दोन्ही राष्ट्रांनी करूं नये. तरी देखील फ्रेंच परराष्ट्र-मंत्र्यांना अशी आशा वाटत होती की, या कराराने जर्मनीला पूर्वयुरोपात आपलें वर्चस्व वाढविण्याला पूर्ण मुभा मिळाली आहे, तेव्हा जर्मनी आता इटालीच्या समाधानासाठी फ्रेंचांशी भांडत बसणार नाही. पण मो. बोन्ने यांचा हा अंदाज चुकीचा ठरला. फ्रेंको-जर्मन करारावर सह्या झाल्यानंतर जर्मनांनी युक्रेनचा प्रश्न उपस्थित करून पूर्व व दक्षिण युरोपांतील सर्व राष्ट्रांच्या पोटात भीति उत्पन्न केली. तेव्हा ती सारीं राष्ट्रे जर्मनीला स्वाभाविकपणेच विचारूं लागली की गप्प बसायला काय घेशील ? अशा रीतीने त्यांच्याकडून मिळतील त्या सवलती उकळून जर्मनीने पुनश्च फ्रान्सकडे तोंड वळविलें आहे.

## चेंबरलेन यांना फ्रान्सचा इषारा

जर्मनीच्या लष्करी सामर्थ्याच्या दहशतीचा फ्रान्सविरुद्ध उपयोग करून घेण्यापूर्वी चेंबरलेनसाहेबांच्या मध्यस्थीचा कांही उपयोग होतो की काय, याची एकवार सि. मुसोलिनी यांनी परीक्षा करून पाहिली. पण झेकोस्लोव्हाकियाच्या प्रकरणापासून फ्रेंचांच्या मनांत चेंबरलेनसाहेबांच्या मध्यस्थीची विलक्षण दहशत बसली आहे. यामुळे रोमला जातांना मि. चेंबरलेन व लॉर्ड हॅलिफाक्स हे पारिस

येथे उतरले असतां मो. दालादिए व मो. बोन्ने यांनी त्यांना सांगितले कीं, मेहेरबानी करून आपण फ्रान्स व इटली याच्यांत मध्यस्थी करण्याच्या फंदांत पडूं नका, फ्रान्सच्या मुलुखावर जर इटालीचे राज्यकर्ते आपला हक्क सांगू लागले तर इटालीच्या या नव्या मागण्यांनी आंग्लो-इटालियन कराराचा भंग होतो असें त्यांना उत्तर द्या. फ्रेंच मंत्र्यांच्या या विनंतीप्रमाणे चेंबरलेनसाहेबांनी मध्यस्थी करण्याचे प्रयत्न केले नाहीत, तरी देखील सि. मुसोलिनी यांनी ट्यूनिस, जीबुती आणि सुएझ कालवा यांवर आपला हक्क सांगितला असतांना त्यांना चापण्याचे धाडस चेंबरलेनसाहेबांच्या हातून झाले नाहीच. यावरून त्या तीन ठिकाणी इटालीला सवलती देण्याला मि. चेंबरलेन हे प्रतिकूल नाहीत, असे अनुमान सि. मुसोलिनी यांनी काढणे स्वाभाविकच आहे.

ता. १० जानेवारीला इटाली आणि फ्रान्स यांच्या भांडणांत इंग्लंडसारख्या मित्रराष्ट्राच्या मुख्यप्रधानांनी मध्यस्थी करूं नये, असे प्रतिपादणाऱ्या फ्रेंच मंत्र्यांनी ता. २३ जानेवारीला जर्मनीचे पारिस येथील वकील काउंट फॉन व्हेल्झेक यांना सांगितले

'Very soon we shall have to face very grave problems in the Mediterranean. They ought to be discussed between Paris and Berlin according to the letter and spirit of the Franko-German declaration.'

याचा सरळ अर्थ असा होतो कीं, इटाली व फ्रान्स यांच्या भांडणांत जर्मनीने मध्यस्थी करावी, अशी फ्रान्सची इच्छा आहे. फ्रेंच परराष्ट्रमंत्र्यांच्या या इच्छेला लगेच नकार देणे जर्मनीच्या वकिलांना थोडे अवघड वाटल्यामुळे मो. बोन्ने यांना त्यांनी त्या वेळी काहीच उत्तर दिले नाही. पुढे चौथ्या दिवशी फ्रांकफुर्टेर झायटुंगने फ्रेंच परराष्ट्रमंत्र्यांना बजाविलें की, फ्रान्सची सूचना रोमबार्लीनमैत्रीशी विसंगत असल्यामुळे जर्मनीला मान्य नाही.

यावेळी बार्सेलोना शहर लौकरच इटालियन सैन्याच्या हातीं पडणार, अशी लक्षणें दिसूं लागल्यामुळे फ्रान्सची अगदी तारांबळ उडाली होती. स्पेनमधील इटालियन सैन्य सि. मुसोलिनी यांनी परत बोलाविले नाही तर काय

करावयाचें, या प्रश्नाची फ्रेंच मुत्सद्दी एकसारखी चर्चा करीत होते. या चर्चेचा निष्कर्ष ' ल तॉ ' या निमसरकारी पत्राने असा काढला

'If in the case of a final Nationalist victory, it appears that in spite of the engagements both of Signor Mussolini and General Franco, foreign organizitions remain in Spain it would be the imperious duty of France to make sure of compensating positions. One can see several which it would not be difficult to occupy.'

## इटालीची आफ्रिकेंतील तयारी

फ्रेंच लोकांनी स्पॅनिश मुलुखापैकी कोणता मुलूख व्यापणे इष्ट होईल, या प्रश्नाची चर्चा करून पेर्तिनाक्सने असा निर्णय दिला की, लष्करी दृष्टया स्पॅनिश मोरोक्को व्यापणे फ्रान्सला सर्वात अधिक फायदेशीर होईल. फ्रान्सच्या निमसरकारी पत्रांतून प्रसिद्ध झालेल्या या धमक्यांचा प्रतिकार करण्यासाठी इटालीने २५ तारखेला १९०१ मध्ये जन्मलेल्या ६०००० सैनिकांना ताबडतोब सैन्यांत दाखल होण्याचा हुकूम सोडला. असला हुकूम सोडण्याचे प्रयोजन काय, असा प्रश्न ब्रिटिश वकील लॉर्ड पर्थ यांनी दुसरे दिवशी इटालियन परराष्ट्रमंत्र्याना विचारला. पण त्याना केवळ मामुली उत्तरावर सतुष्ट व्हावे लागले. या वेळेपासून इटालीच्या लष्करी तयारीला जारीने सुरुवात झाली. फेब्रुवारीत एक आर्मी कोर व ३०० डॉक्टर याची त्रिपोलीत रवानगी झाली. जिनोआ, कादिझ, माजोर्का वगैरे ठिकाणी इटालियन लष्करी अधिकारी एकत्र होऊं लागले. आल्प्स पर्वताच्या बाजूला युद्धसामुग्रीची जमवाजमव होऊ लागली. जपानबरोबर लष्करी साहाय्याचा तह करण्याची बोलणी सुरू झाली. आफ्रिकेत युद्ध सुरू झाल्यास इटालीला तिथे कितपत मदत करणे जर्मनीला शक्य आहे याची तपासणी करण्याकरिता स्टॉर्मट्रूप्सचे मुख्य सेनापति जनरल लुट्झे हे उत्तर आफ्रिकेत गेले. वाळवंटांतील युद्धाला लागणाऱ्या साधनसामुग्रीनिशी दोन जर्मन डिव्हिजन्सची ऑस्ट्रियांत रवानगी झाली. जर्मनीने सुमारें ३ लक्ष स्टॉर्मट्रूप्सची जमवाजमव केली. मार्चच्या तिसऱ्या तारखेला तर सि. मुसोलिनी यांनी एकाच वेळीं आठ लक्षांहून अधिक तरुण इटालियनांना ताबडतोब सैन्यांत दाखल होण्याचा हुकूम सोडला.

आता सध्या इटालीचे खडे सैन्य नेहमीच्या खड्या सैन्यापेक्षा १० लक्षांनी अधिक आहे.

— केसरी, ता. १७ मार्च, १९३९.

---

## लेखांक दुसरा

### अमेरिकेचा फ्रान्सला पाठिंबा

जानेवारीत इटालियन लष्कराची जमवाजमव सुरू होतांच फ्रेंच परराष्ट्र-मंत्र्यांचा धीर सुटला २८जानेवारीला वर्तमानपत्रांच्या बातमीदारांजवळ बोलतांना त्यांनी फ्रेंच वर्तमानपत्रातून इटालीला प्रतिकूल असे लेख न छापण्याची सूचना केली. लंडनटाइम्सचा बातमीदार म्हणतो 'M. Bonnet told them that Italy had in the past been very badly treated in the matter of her colonial claims both by the allies at Versailles and more recently by Laval.' या विधानांवरून असा अर्थ निघत होता कीं, फ्रान्सने आता इटालीला मुलख दिला तर केवळ जुन्या अन्यायाचें परिमार्जन होईल. या मुलाखतीचा सारांश टाइम्समध्ये प्रसिद्ध होतांच फ्रेंच परराष्ट्रीय खात्याने तिचा इनकार केला. पण एका टाइम्सनेच नव्हे तर, फ्रेंच वर्तमानपत्रांच्या बातमी-दारांनीहि या अप्रामाणिक इनकाराचा निषेध केला. फ्रेंच परराष्ट्रमंत्र्याची ही प्रवा-हपतितासारखी गति झालेली पाहून त्यांना आधार देण्याचा एक प्रयत्न यावेळीं प्रे. रूझव्हेल्ट यांनी केला. इटालीच्या राजकारणाचा नवा रंग पाहून जानेवारी महि-न्यांत फ्रान्सने अमेरिकेच्या विमानांच्या कारखान्यांना सुमारें ८०० विमानांची एक अतिशय निकडीची ऑर्डर दिली. ही ऑर्डर आपण पत्करावी की नाही, या-विषयी विमानांच्या कारखानदारांनी अमेरिकन सरकारकडे विचारपूस केली. तेव्हा अमेरिकेची सरहद्द ऱ्हाईन नदीवर असल्याचे सांगून प्रे. रूझव्हेल्ट यांनी ऑर्डर पत्करण्याचा सल्ला दिला. प्रे. रूझव्हेल्ट यांच्या या खाजगी बैठकीतील भाषणामुळे साऱ्या जगभर अत्यंत खळबळ उडाली. याचा अगदी पहिला परिणाम हा झाला

कीं, ४ फेब्रुवारीला सि. मुसोलिनी यांचे जे जाहीर भाषण व्हावयाचे होते ते तह-कूब ठेवण्याचा त्यांना हेर हिटलेर यांच्याकडून सल्ला मिळाला.

फ्रान्सने अमेरिकेत विमानांची खरेदी चालविली आहे ही गोष्ट एका अप-घातामुळे उघडकीस आली. ता. २४ जानेवारीला लोस आंजेल्स येथे एका लष्करी विमानाला अपघात होऊन त्या विमानाचा चालक तत्काळ ठार झाला व त्यांतील एका उतारूला जबरदस्त जखमा झाल्यामुळे इस्पितळांत न्यावे लागले. त्याने आपले नांव मि. स्मिथिन असे सांगितले, पण बातमीदारांच्या प्रश्नांना त्याने फक्त फ्रेंचमधूनच उत्तरे दिली. यावरून बातमीदारांना संशय येऊन त्यांनी या वैमानिक अपघाताची कसून चौकशी केली. तेव्हा त्याना कळून आले की, जखमी झालेल्या इसमाचे खरें नांव मो. पोल शोमिल्दें असे असून त्याला फ्रान्सच्या विमानमंत्र्यांनी अमेरिकेतील सर्वोत्कृष्ट अशा लढाऊ विमानांची खरेदी करण्यासाठी अमेरिकेला पाठविले आहे व अमेरिकेचे युद्धखाते त्याला आपली सर्व गुप्त रहस्ये सागत आहे. त्या बातमीदारांना असेंहि कळले की, अपघाताच्या दिवशीच अमेरिकेच्या युद्ध-खात्याने त्याला आपली सर्वोत्कृष्ट कर्टिस-हॉक ही विमानेहि दाखविली व त्यांपैकी एक विमान तर ताशी ५८५ मैल या गतीने चालले.

## शब्द परत घेतले

ही सारी हकीकत प्रसिद्ध होतांच, आपली लष्करी रहस्यें परराष्ट्राच्या अधिकाऱ्यांना दाखविल्याबद्दल अमेरिकन जनतेने युद्धखात्याविरुद्ध गिल्ला आरं-भिला. तेव्हा युद्धखात्याचे समर्थन करण्यासाठी अमेरिकेच्या प्रेसिडेटानी सेनेट-च्या लष्करी कमिशनच्या सभासदांना मुलाखतीला बोलावून त्यांना आपलें पर-राष्ट्रांसंबंधीचें धोरण सविस्तर समजावून सांगितले. ही मुलाखत जरी गुप्त होती तरी मुलाखतीला आलेल्या सेनेटरांनी प्रेसिडेट रूझव्हेल्ट यांच्या भाषणाचा सारांश वर्तमानपत्रांच्या बातमीदारांना सांगितलाच. हा सारांश प्रसिद्ध झाल्यावर पर-देशांतील जर्मनी व इटाली यांच्या शत्रूंना फार बरे वाटले; पण प्रत्यक्ष अमेरिकेतील युद्धविरोधी पक्षाने, प्रे. विल्सनप्रमाणे प्रेसिडेंट रूझव्हेल्ट देखील अमेरिकेला महायुद्धाच्या ज्वालामुखीत लोटणार आहेत, असे काहूर करण्याला सुरुवात केली. या काहुराला भिऊन प्रेसिडेंटसाहेबांनी आपल्या मुलाखतीतील बहुतेक सारी मह-

त्याची विधाने परत घेतली. 'अमेरिकेची सरहद्द ऱ्हाईननदीवर आहे, असे आपण म्हणालात काय ?' या प्रश्नाला त्यांनी उत्तर दिलें 'The attribution of such a phrase to me is a deliberate lie'. पण निःपक्षपाती बातमीदारांचे म्हणणे असेच आहे की ते विधान शब्दशः नसलें तरी भावशः खरेंच आहे. प्रेसिडेंट रूझव्हेल्ट यांच्या या उलटसुलट कोलांट्यांचा पश्चिमयुरोपातील राजकारणावर फार महत्त्वाचा परिणाम झाला आहे.

## इंग्लंडची फ्रांकोला अनुकूलता

अमेरिकेतील लोकमत युरोपांतील राजकारणांत हात घालण्याच्या धोरणाला अद्यापि फार प्रतिकूल आहे, हे समजून आल्यावर चेंबरलेनसाहेबांनी स्पेनमधील लोकसत्ताक सरकारासंबंधीचे आपले धोरण पूर्णपणे बदलून टाकले. इतके दिवस अमेरिकन सरकाराचा आपल्यावर घुस्सा होऊं नये, एवढ्याकरितांच चेंबरलेन-साहेबांनी जनरल फ्रांको यांच्या सरकाराला मान्यता दिली नव्हती. अमेरिकन सरकाराची सहानुभूति आपल्या बाजूला असूनहि तिचा तादृश फायदा होत नाही, असे कळून आल्यावर स्पेनमध्ये पुन्हा एकवार बुर्बोन राजघराण्याची स्थापना करण्याचा चेंबरलेनसाहेब विचार करूं लागले. स्पेनच्या माजी राजेसाहेबांचे द्वितीय चिरंजीव डॉन जुआन हे सध्यां ब्रिटिश सैन्यांत कॅडेट आहेत व त्याना स्पेनची गादी मिळवून देण्याची खटपट आता इंग्लंडांतील सरदारवर्गाने आरंभिली आहे. याकरितांच लोकसत्ताक सरकारच्या हातांतील मुलूख ज. फ्रांकोला मिळवून देण्याची खटपट ब्रिटिश सरकार करीत आहे. मिनोर्का बेट ज. फ्रांकोच्या लष्कराच्या हाती देण्यांत ब्रिटिशांचा दुसरा एक हेतु होता. तो हा की, आरमारी दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचे असे ते बेट इटालीच्या हाती लागूं नये. ब्रिटिशांचा हा डाव साधल्यामुळे सि. मुसोलिनी यांचा जो जळफळाट झाला, त्यावरून या दुसऱ्या हेतूचे महत्त्व कळून येते.

## जपानने शिकार साधली

मिनोर्का बेट जनरल फ्रांकोला मिळवून देण्याच्या खटपटीत इंग्लंड आहे, ही वार्ता जपानच्या कानांवर येतांच जपाननेहि याच वेळीं चिनी समुद्रांतील हैनान बेट व्यापण्याचा विचार केला व त्याप्रमाणें ८ फेब्रुवारीला

मिनोर्का बेट फ्रांकोच्या हाती गेल्याची तार येतांच जपानने हैनान बेटाकडे आपलें आरमार पाठविले. या आरमारी काफिल्याचे मुख्याधिकारी ॲड्मिरल कोंदो यानी ९ तारखेला हैनान बेटांत सैन्य उतरवून ते बेट व्यापण्याला सुरुवात केली. हे बेट जपानच्या ताब्यांत गेल्याने हांगकॉंगचे लष्करी महत्त्व पूर्णपणे नष्ट झाले आहे. त्यापेक्षाहि अधिक महत्त्वाची गोष्ट ही की आज फ्रान्स आपल्या पूर्वेकडील साम्राज्याचे संरक्षण करण्याला अगदी असमर्थ आहे, हे इटालीच्या सर्वाधिकाऱ्याच्या दृष्टोत्पत्तीस आले. कारण हैनान बेट हे फ्रेंचाच्या इंडो-चायना या अत्यंत समृद्ध वसाहतीच्या शेजारी असल्याने तें आपल्या वर्चस्वाच्या क्षेत्रांत येते असे त्यांचे म्हणणे होते. इंग्लड व फ्रान्स या उभयतांनी ते बेट न व्यापण्याबद्दल जपानला वारंवार बजावलेहि होते. यामुळे इटालीच्या 'मेस्साजेरो' या पत्राने म्हटले आहे—The occupation of Hainan proves that the Berlin-Rome-Tokyo triangle is functioning and that it can function even better in the future.

'मेस्साजेरो'च्या या उताऱ्यात भविष्यकाळाविषयी जी गर्भित धमकी व्यक्त झालेली आहे, तिच्याविषयी थोडा खुलासा करणे जरूर आहे. जर्मनी, जपान, इटाली या त्रिकूटात कोमिंटेर्नविरोधी करार झाल्यापासून हा करार घडवून आणण्यामध्ये ज्यांनी पुढाकार घेतला होता, ते जपानी मुत्सद्दी या त्रिराष्ट्राचा लष्करी तह घडवून आणण्याच्या खटपटीत आहेत. हा करार घडवून आणण्यात मि. शिरातोरी व जनरल ओशिमा यांनी जपानच्या वतीने पुढाकार घेतला होता. यांपैकी जनरल ओशिमा हे जपानचे बर्लिन येथील वकील आहेत व मि. शिरातोरी यांना अलीकडेच रोम येथील वकिलाची जागा मिळाली आहे. टोकियोहून रोमला आल्यानंतर लौकरच म्हणजे यदाच्या जानेवारीच्या प्रारंभी मि. शिरातोरी यांनी सान रेमो येथे जनरल ओशिमा यांची गांठ घेतली व त्यांच्याबरोबर हा लष्करी तह घडवून आणण्याच्या प्रश्नाची चर्चा केली. या चर्चेनंतर असे ठरले की २७ जानेवारीला पारिस येथे रोम, बर्लिन, लंडन, ब्रुसेल्स, बर्न व बुर्गोस येथील जपानी वकिलांनी एकत्र जमून या प्रश्नाची पुन्हा एकवार चर्चा करावी. त्याप्रमाणे २७ जानेवारीला ही बैठक झाली. पण त्या वेळी जनरल ओशिमा हे आजारामुळे बर्लिनहून येऊं शकले नाहीत. त्यामुळे त्या बैठकीला

थोडे वैगुण्य आले. तरी देखील त्या बैठकीत फार महत्त्वाचे बेत झाले असावेत, हे ' मेस्साजेरो 'च्या वरील उताऱ्यावरून दिसून येते.

## इटालीला वश करण्याची फ्रेंचांची धडपड

आता पुन्हा एकवार फ्रेंच परराष्ट्रमंत्र्यांच्या कारस्थानांकडे वळले पाहिजे. जपानी वकिलाची पारिस येथील बैठक संपल्याच्या दुसऱ्या दिवशीच मो. बोन्ने यांनी पारिस येथील बातमीदाराना इटालीला न दुखविण्याचा सल्ला दिला, ही गोष्ट पूर्वीच आली आहे. त्यानंतर फेब्रुवारीच्या प्रारंभी त्यानी काउंट चियानो व हेर फॉन रिब्बेनट्रॉप या उभयतांकडे दोघे बिनसरकारी दूत पाठवून समेटाची बोलणी सुरू केली. आतापर्यंत बाहेर फुटलेल्या माहितीवरून असे कळते की इंडो-चायना बँकेचे मॅनेजर मो. बोदुअँ हे मो. बोन्ने यांच्या वतीने काउंट चियानोनाः भेटावयाला गेले होते. आदिसअबाबा-जीबुती रेल्वेचे पुष्कळसे शेअर इटालीला देणे व इटालीच्या प्रतिनिधीना डायरेक्टरबोर्डात घेणे, त्याचप्रमाणे सुएझ कॅनालचे शेअर इटालीला देणे व इटालीच्या प्रतिनिधीना त्या कालव्याच्या डायरेक्टरबोर्डात घेणे, जीबुती बंदरात इटालीच्या व्यवहाराकरिता स्वतंत्र व फुकट जागा देणे किंवा ते सारे बंदरच तांजीरप्रमाणे आंतरराष्ट्रीय मालकीचे करणे, ट्यूनिसमधील इटालियनाना सध्या असलेल्या सवलती केव्हांहि काढून न घेण्याचे वचन देणे, अशा सवलती फ्रान्सच्या वतीने मो. बोन्ने यांनी इटालीला देऊ केल्या आहेत,असे अगदी विश्वसनीय माहितीवरून समजते. याशिवाय कॉर्सिका बेटाचे निःशस्त्रीकरण, त्रिपोलीच्या शेजारचा तिबेस्ती प्रांत इटालीला देणे वगैरे इतरहि सवलती देऊ केल्या आहेत अशी वदंता आहे, पण त्याविषयी खात्रीने बोलता येत नाही. फ्रेंच परराष्ट्रमंत्र्यांनी मो. बोदुअँ यांच्या मार्फत इटालीला देऊ केलेल्या सवलतीची माहिती जर्मनीच्या बोएर्सेन झायटुंग या पत्राने प्रथम छापली. तेव्हा बर्लिन येथील फ्रेंच वकिलातीने ६ फेब्रुवारीला त्या बातमीचा इनकार केला. त्यानंतर फ्रेंच वकील मो. कूलोंद्र हे हेर फॉन रिब्बेनट्रॉप यांना भेटावयाला गेले असता जर्मनीच्या परराष्ट्रमंत्र्यांनी त्यांना विचारले ' बिचाऱ्या बोएर्सेन झायटुंगला तुम्ही कां विनाकारण दोष देता ? तुमच्या परराष्ट्रमंत्र्यांचे खास प्रतिनिधी मो. द ब्रिनों हे नुकतेच मला भेटून गेले. त्यांनी देखील बोएर्सेन-झायटुंग-

मधील माहितीसारखीच माहिती मला सांगितली.' ही बातमी ऐकून मो. कूलोंद्र हे चकित होऊन गेले. कारण मो. द ब्रिनो यांच्या या कारस्थानाची त्यांना स्वतःला गंधवार्ताहि नव्हती. मो. द ब्रिनो हे हेर फॉन रिब्बेनट्रोप यांना फ्रान्स आणि इटाली यांच्या भांडणांत मध्यस्थी करण्याविषयी विनंति करावयाला आले होते. पण त्यांनी सांगितलेल्या माहितीचा दुरुपयोग करून फ्रान्सचे बर्लिन येथील वकील व फ्रेंच परराष्ट्रमंत्री यांचे जर्मन परराष्ट्रमंत्र्यांनी भांडण लावून दिले. या प्रकरणाचा खुलासा मागण्यासाठी मो. कूलोंद्र मध्यंतरी पारिसला जाऊन आले.

मो. कूलोंद्र व हेर फॉन रिब्बेनट्रोप यांच्या मुलाखतींतील सर्वांत महत्त्वाची गोष्ट सांगावयाची राहिलीच. फ्रान्सच्या वतीने जर्मनीने इटालीकडे मध्यस्थी करावी, अशी या मुलाखतीत मो. कूलोंद्र यांनी जर्मन परराष्ट्रमंत्र्याजवळ विनंति केली. तेव्हा हेर फॉन रिब्बेनट्रोप यांनी उत्तर दिले की, फ्रान्सने रशिया व पोलंड यांच्याबरोबर केलेले परस्परसहायाचे करार रद्द करावेत म्हणजे जर्मनी फ्रान्सच्या वतीने मध्यस्थी करावयाला सिद्ध होईल. पण जर्मनीने आधी मध्यस्थी करावयाची का फ्रान्सने आधी पूर्वयुरोपांतील राष्ट्रांबरोबर केलेले करार रद्द करावयाचे या प्रश्नांवर उभयतांचा मतभेद झाल्यामुळे जर्मनीने मध्यस्थी करण्याचा प्रश्न तसाच राहून गेला. याच प्रश्नावर ता. ७ फेब्रुवारीला मो. बोन्ने यांनी फ्रेंच सेनेटमध्ये बोलतांना सांगितले

'France is linked with certain countries by pacts concluded with a view to European peace. This precious heritage will never be renounced' या भाषणाला उत्तर देताना हाबुर्गेर फ्रेडेनब्लाट या जर्मन पत्राने ९ फेब्रुवारी रोजी लिहिले 'The militant tones now heard in London speeches, the emphasis laid by M. Bonnet on French interests in Eastern Europe, the Polish-press discussions regarding obsolete military plans with France, all were explained, by the hopes President Roosevelt had awakened.'

या वाक्यांत उल्लेखिलेल्या घडामोडीकडे वळण्यापूर्वी इटालीच्या फ्रान्सवरील राजकीय चढाईला यावेळी एक आकस्मिक ब्रेक लागला. त्याची थोडी माहिती करून घेतली पाहिजे.

## इटालीचा दुबळेपणा उघडकीस आला

फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यांत इटालीच्या लष्करी परिस्थितीतील एक महत्त्वाची उणीव जगाच्या निदर्शनाला आली. रेव्ह्यू दे द मोंदच्या १ फेब्रुवारीच्या अंकांत जनरल आर्मेंगो यांनी एक लेख लिहून असे जाहीर केले कीं उत्तर आफ्रिकेत इटालीला ट्यूनिस जिंकणे अगदी अशक्य आहे; हे केवळ माझें एकट्याचे मत नसून त्रिपोलीचे इटालियन गव्हर्नर मार्शल बाल्बो यांचेहि मत असेच आहे, हे मला त्यांच्याशी वारंवार चर्चा केल्याने समजून आले आहे. याच लेखांत त्यांनी असेहि म्हटले होते की इंग्लंड व फ्रान्स या दोघांनी एकाच वेळी हल्ला केल्यास इटालीच्या त्रिपोलीतील सैन्याची ताबडतोब चटणी होऊन जाईल. जनरल आर्मेंगो यांचा हा लेख प्रसिद्ध होतांच इटालीच्या मुत्सद्दी मंडळींची बरीच धांदल झाली. सि. मुसोलिनी यांनी या लेखांतील विधानांविषयीं मार्शल बाल्बो यांच्याकडे लगेच खुलासा मागितला.तेव्हा मार्शल बाल्बोनी 'ती सारी विधानें खरीं आहेत' असे, निर्भीडपणाने उत्तर दिले. त्यावरून ता. ४ फेब्रुवारीला भरलेल्या ग्रॅंड कॉंसिस्ट कौन्सिलच्या बैठकीत मार्शल बाल्बो व काउंट चियानो या उभयतांचे भांडणहि झाले. सरते शेवटी या प्रश्नाचा निर्णय लावण्याकरिता इटालीचे सर्वांत नामांकित सेनापति मार्शल बादोग्लिओ यांना उत्तर आफ्रिकेतील लष्करी परिस्थितीची पाहणी करण्यासाठी पाठविण्याचे सि. मुसोलिनी यांनी ठरविलें. त्याशिवाय त्रिपोलीतील सैन्य शक्य तितक्या लौकर दीड लक्षावर नेण्याचा संकल्प सुटला.

इटालीचे हे वैगुण्य दृष्टोत्पत्तीस आल्याबरोबर जर्मनीने फिरून एकवार पूर्वेकडील कारस्थानांकडे लक्ष देण्याला सुरुवात केली. हेर फॉन रिब्बेनट्रोप यांना थोड्याच दिवसापूर्वी भेटलेले मो. द ब्रिनो यांनी १४ तारखेला फ्रेंच बातमीदारांना सांगितले

'I believe for Germany the coming months will be taken up with the immense tasks of organization in Central and Eastern Europe.'

## इंग्लंडचीं पाताळयंत्री कारस्थानें

या वेळी पूर्वयुरोपांत जर्मनीच्या परराष्ट्रमंत्र्यांनी स्वतः लक्ष देण्याइतकीं

महत्त्वाचीं कारस्थाने सुरू होतीं. २० फेब्रुवारीला बुखारेस्ट येथे बाल्कनकरारांत सामील असलेल्या राष्ट्रांची परिषद भरली. या वेळी इंग्लंडचे एक ॲडमिरल मि. उस्बोर्न हे बाल्कन राष्ट्रांतून लष्करी प्रश्नांवर व्याख्याने देत फिरत होते व परराष्ट्रीय खात्यांतील संस्कृतितज्ज्ञ मि. जॉन्सन हेहि याच वेळी तेथे आपली कारस्थानें चालवीत होते. या २० तारखेलाच रशियाचे लंडन येथील वकील कॉ. माइस्की यांनी लॉर्ड हॅलिफाक्स यांना थाटाची मेजवानी दिली व या मेजवानीला बोल्शेव्हिकांचे कट्टे शत्रू मि. चर्चिल हेहि हजर राहिले. या मेजवानीच्या आदल्या दिवशीच रशिया व पोलंड यांच्यामध्ये व्यापारी तह झाला होता. इंग्लंडच्या व्यापारखात्याचे सेक्रेटरी मि. हडसन हे लौकरच मॉस्कोला जाणार असल्याचेहि जाहीर झाले होते. पोलंडचे परराष्ट्रमंत्री कर्नल बेक यांना ब्रिटिश सरकारने लंडनला बोलाविले होते. कर्नल बेक यांनी कांही दिवसापूर्वीच लंडन व पारिस येथील सरकारांना कळविले होते कीं, Poland will be ready to take her stand on the Colonial issue on the side of the Colonial Powers-particularly France-in the event of the Colonial Powers being prepared immediately to strengthen publicly their links with Poland and particularly in the event of public re-affirmation and private rediscussion of Franco-Polish military relations.'

ही बातमी जर्मनीत कळल्याबरोबर जर्मन सेनापतींनी आपल्या सरकारला सल्ला दिला की पोलंडच्या तटस्थतेची पूर्ण खात्री करून घेतल्याशिवाय पश्चिमयुरोपांत चढाईचे धोरण स्वीकारणे अत्यंत धोक्याचे आहे. या विषयीची बर्लिनची बातमीच अशी आहे.

The Generals are particularly insistent on the desirability of adequate preparations being made to neutralize Poland even at the risk of a loss of several weeks-before the big push in the west is risked.

या उताऱ्यावरून पश्चिमयुरोपांतील कारस्थानांच्या सोयीसाठी जर्मनीला पूर्वेकडे कां वळावें लागले, हे स्पष्ट कळून येते.

## झेकोस्लोव्हाकियावर वक्रदृष्टि

पोलंडला तटस्थ रहावयाला भाग पाडण्यासाठी जर्मनीने समग्र झेकोस्लोव्हाकिया देशच खावयाचे ठरविले. जर्मनीचा हा निश्चय १७ फेब्रुवारीपूर्वी झाला असला पाहिजे, कारण १७ तारखेला झेकोस्लोव्हाकियांतील जर्मनांचे पुढारी हेर कुंट एका जाहीर भाषणांत म्हणाले

'We are going to live as free Germans in the spirit of National-Socialism according to Nazi-laws. The decision must come soon. History does not wait and we are marching with the history of modern times led by Adolf Hitler.'

गेल्या जानेवारी महिन्यांतच जर्मनीने झेकोस्लोव्हाकियाच्या सरकाराला रशियाशीं केलेला करार रद्द करून कोमिंटेर्नविरोधी करारावर सही करण्याची सूचना केली होती. पण आपल्या मुलुखाच्या सुरक्षिततेची हमी मिळेपर्यंत झेक सरकारने तसे करण्याचे नाकारले. जानेवारीच्या अखेरीला झेकोस्लोव्हाकियांतील फ्रेंच लष्करी अधिकारी फ्रान्सला परत गेले व जर्मनीच्या वाटेतील एक कांटा दूर झाला. याच दिवशी जर्मन सैन्याला वाटेल तेव्हा झेकोस्लोव्हाकियांतून प्रवास करण्याची परवानगी झेक सरकारने दिली. त्यानंतर लवकरच सील केलेल्या गाड्यांतून वाटेल ती युद्धसामुग्री देशांत वाटेल तिकडे नेण्याची परवानगी जर्मनीने मिळविली. फेब्रुवारीच्या १८ तारखेला झेक सैन्याच्या जनरल स्टाफचे प्रमुख जनरल क्रेयसी यांना राजीनामा द्यावा लागला. गतवर्षी जर्मनीविरुद्ध दोन वेळा झेक सैन्याची जमवाजमव झाली, त्यावेळी या सेनापतींचे कर्तृत्व जर्मनीच्या नजरेला आलें होते व त्यामुळे त्यांना अधिकारावरून काढण्याचा जर्मनीने आग्रह चालविला होता. यानंतर झेक सैन्य ५० हजारांनी कमी करण्याची जर्मनीने झेक सरकारला सूचना केली व ती त्या सरकारने अंमलांतहि आणली. या साऱ्या हकीकतीवरून गेल्या महिन्यांतच झेकोस्लोव्हाकियाचे पाश कसे अधिकाधिक आवळले जात होते हें वाचकांना कळून येईल.

—केसरी, ता. २१ मार्च, १९३९.

## लेखांक तिसरा

### पोलंडला वळविण्याचा प्रयत्न

जर्मनी व पोलंड यांचे वितुष्ट येत चाललेले पाहून इटालीच्या परराष्ट्र-मंत्र्यांनी पोलंडची समजूत करण्याचा प्रयत्न केला. हा प्रयत्न पूर्णपणें अयशस्वी होणार, अशी जर्मनीच्या नेत्यांची खात्रीच होती. कारण जानेवारीच्या प्रारंभी हेर हिटलेर व कर्नल बेक या उभयतांची मुलाखत झाली होती व त्याच महिन्याच्या अखेरीला हेर फॉन रिब्बेनट्रोप यांनी स्वतः वार्साला जाऊन कर्नल बेक यांच्या-बरोबर तडजोडीचा प्रयत्न केला होता. या उभयतां मुरब्बी मुत्सद्द्यांची जिथे डाळ शिजली नाही, तिथे सि. मुसोलिनीचे जावई काय दिवे लावणार, ते उघडच दिसत होते. याकरिता काउंट चियानोच्या मध्यस्थीला जर्मनीची संमति अस-ल्याचा भ्रम पोलंडला होऊं नये म्हणून यावेळी नाझी पक्षांतील पुढारी मंडळींनी इटालीच्या परराष्ट्रमंत्र्यांची पोलंडला जातांना किंवा पोलडहून परत येतांना नुसती औपचारिक भेट देखील घेतली नाही. यामुळे काउंट चियानोंना परराष्ट्रमंत्र्यांच्या जागेवरून काढून टाकावे, अशी मागणी जर्मनीने इटालीकडे केली असल्याच्या वदंता पसरल्या आहेत, पण त्यांत कांही फारसे तथ्य दिसत नाही. काउंट चियानो हे फेब्रुवारीच्या शेवटच्या आठवड्यांत वार्साला गेले. त्यावेळी पोलिश जनतेने पोलडमधील जर्मन अल्पसंख्याकां-विरुद्ध दंगे आरंभिले होते. ठिकठिकाणी जर्मन लोकांची दुकाने, कारखाने व संस्था यांच्यावर हल्ले होत होते. पोलिश विद्यार्थ्यांनी डांझिगमधील जर्मनीच्या जुलुमाच्या निषेधाप्रीत्यर्थ सभा व मिरवणुकी यांचा धूमधडाका चालविला होता. पोलंडमधील जर्मनांच्या पुढाऱ्यांना व त्यांच्या सुमारे ४० अनुयायांना राज-द्रोहाच्या आरोपावरून अटक झाली होती. सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही की, ज्या कर्नलांच्या कंपूच्या हातांत पोलंडची सर्व सत्ता आहे त्यांपैकी कर्नल तोमास्झेस्की यांनी एका भाषणांत असे प्रतिपादिले की, पोलिश राष्ट्राला डांझिग नांवाचे एक गळूं झाले आहे व त्यावर शक्य तितक्या लौकर शस्त्रक्रिया करणे अवश्य आहे. सामान्य जनतेने तर त्याच्याहि पुढे जाऊन पूर्वप्रशियाचा मुलूख ताबडतोब पोलंडमध्ये सामील केला पाहिजे, अशी मागणी करण्याला सुरुवात केली.

## पोलंडची वसाहतींची मागणी

अशा वातावरणांत झालेल्या वाटाघाटीत जर्मनीशी सख्य करण्याचा प्रश्न उपस्थित करणेदेखील काउंट चियानोना अशक्य झाले. तेव्हा त्यांनी पोलंडच्या मुत्सद्द्यांना वसाहतीची मागणी करण्याला उत्तेजन दिले. त्याप्रमाणें पोलंडमधील सरकारी पक्ष जो ओझोन, त्याने एक १८ कलमी ठराव करून पोलिश जनतेची वसाहतींची मागणी वसाहतवाल्या राष्ट्रांपुढे मांडली. या ठरावांत म्हटले आहे

'Poland shall have access to colonies, as other Great Powers have. There is still land enough, especially in Africa.'

अशा रीतीने पोलंडला वसाहतीची मागणी करण्याला उत्तेजन देऊन काउंट चियानोनी त्या राष्ट्राला इंग्रजांच्या जाळ्यांत अडकविण्याला न कळत मदत केली. कारण पोलंडची वसाहतीची मागणी प्रसिद्ध होतांच लंडन टाइम्सने लिहिले

'Greater facilities for access to the products of the tropics is a legitimate demand. It will always be sympathetically considered by the Colonial Powers; especially, when put forward in a conciliatory manner.'

या लेखाच्या पाठोपाठ चेंबरलेनसाहेबानी कर्नल बेक यांना लंडनला बोलाविले असल्याचे पार्लमेंटात जाहीर केले.

## करून सवरून कानांवर हात

पोलंडमधील जर्मनीविरोधी दंग्यांमुळे जर्मनीच्या सर्व शत्रूंना अत्यानंद झाला. लंडन टाइम्सने नक्राश्रू ढाळीत लिहिले आहे

'Even during the visit of Count Ciano disturbances in Danzig had spread over most of Poland. It would be optimistic to suppose that the episode will never be followed by others.'

ज्याना या दंग्यांमुळे इतका आनंद होत आहे, त्यांनी हे दंगे चेतविण्यामध्ये भाग घेतला असला पाहिजे, ही गोष्ट उघड आहे. काउंट चियानोंनी

इटालींत स्पष्टच सांगितले की इंग्लंडच्या कारस्थानांमुळे माझे पोलंडमधील राजकारण फसलें. तरीदेखील लंडन टाइम्सने लिहिलेच आहे

'In all these phenomena the tendency in Germany has been to put the blame on Great Britain and France. They have of course not the smallest direct responsibility for any of these or other instances of a slight Anti-Nazi reaction in some of the Eastern European countries.'

## उस्बोर्न यांचीं कारस्थानें

टाइम्सकारांनी इतके निक्षून लिहिल्यानंतरसुद्धा त्यांच्या शब्दावर आमचा विश्वास बसत नाही; त्याला आमचा नाइलाज आहे. मागील लेखांकांत आलेच आहे कीं, फेब्रुवारी महिन्यांत ॲडमिरल उस्बोर्न हे बाल्कन राष्ट्रांत लष्करी प्रश्नांवर व्याख्याने देत फिरत होते. या उस्बोर्नसाहेबांच्या उद्योगांचा अल्पपरिचय करून दिल्यास टाइम्सकाराच्या शब्दांवर आमचा विश्वास कां बसत नाही, हे वाचकांना कळून येईल. अडमिरल उस्बोर्न हे इंग्लंडच्या नेव्हल इंटेलिजन्स डिपार्टमेंटचे प्रमुख आहेत. गेल्या महायुद्धांत ब्रिटिश आरमाराने दार्दानेलिसच्या सामुद्रधुनीवर जो हल्ला केला होता, त्या हल्ल्यांत त्यांनी भाग घेतला होता. युद्धसमाप्तीनतर ते डॅन्यूब नदीवरील आरमारी काफिल्याचे मुख्य होते. त्यांना बाल्कन प्रदेशांतील लष्करी परिस्थितीचे अत्यंत सूक्ष्म ज्ञान आहे व त्या प्रदेशांत त्यांच्या ओळखीहि पुष्कळ असल्याने त्या प्रदेशांतील कोणतीहि महत्त्वाची घडामोड त्यांना कळल्यावांचून रहात नाही. बाल्कन राष्ट्रांतून ते ब्रिटिश साम्राज्याच्या संरक्षणाच्या प्रश्नावर व्याख्याने देत फिरत होते. आपल्या व्याख्यानांतील सर्व विधानाना ब्रिटिश सरकाराची पूर्ण मान्यता असल्याचे त्यांनी बेलग्राड येथील "पोलिटिका" या पत्राला दिलेल्या मुलाखतीत सांगितलें आहे.

## काळ्या समुद्रांत आरमारी तळ

२० फेब्रुवारीला बुखारेस्ट येथे बाल्कन राष्ट्रांची परिषद भरली होती, त्या परिषदेच्या वेळी उस्बोर्न तेथे होते. त्या परिषदेनंतर युगोस्लाव्हिया, ग्रीस आणि तुर्कस्थान यांच्या वकिलांच्या बरोबरीने उस्बोर्न यांचा कारोल राजांनी सन्मान

केला. उस्बोर्न यांच्या सर्व कारस्थानांची सविस्तर माहिती जर्मन पत्रांतून आली आहे. जर्मन पत्रकर्त्यांचे म्हणणे असे आहे की, गतवर्षी इंग्लंडने तुर्कस्थानाकडून स्मर्ना बदराशेजारचे एक बेट मिळवून तेथे जसा नवा आरमारी तळ केला आहे तसाच दुसरा एक तळ काळ्या समुद्रांतील रुमानियाच्या बंदरांत करावयाची बोलणी इंग्लंड आणि रुमानिया या उभयतांमध्ये सुरू आहेत. गेल्या उन्हाळ्यांत रुमानियाचे प्रधान तातारेस्कू हे इंग्लंडला गेले होते व त्यानंतर १५ नोव्हेंबरच्या सुमाराला स्वतः कारोल राजे जॉर्ज बादशहांच्या भेटीला गेले होते. तेव्हापासूनच हीं बोलणीं सुरू आहेत व आता त्या बंदराची निवड व आरमारी तळाची योजना इत्यादि बाबतीचा निर्णय लावण्यासाठी उस्बोर्न हे बुखारेस्टला गेले होते. कारोल राजे लंडनला गेले, त्यावेळीं हिंदुस्थानची सरहद्द कार्पेथियन पर्वतावर आहे, असें रुमानियांतील एका प्रमुख पत्राने लिहिले होते, या गोष्टीचाहि येथे उल्लेख करणे आवश्यक आहे. रुमानिया जर्मनीच्या घशांत गेला तर हिंदुस्थान जाण्यालाहि फारसा कालावधि लागणार नाही, अशी ब्रिटिश मुत्सद्द्यांचीहि सध्या समजूत झाली आहे. रुमानियांत एक वैमानिक तळ स्थापण्याचे ब्रिटिशांनी ठरविलें असल्याचे वर्तमान गतवर्षीच प्रसिद्ध झाले होते.

## हंगारी जर्मनीला मिळाला

वास्तविक पाहतां रुमानियाचे व जर्मनीचे १९३८ च्या प्रारंभापर्यंत सख्यच होतें. १९-११-१९३६ च्या फोएल्किशेर बेओबाख्टेरच्या अंकांत हेर रोझेनबेर्ग यांनी स्वतःच्या सहीने एक लेख लिहून रुमानियाकडून आपला मुलूख परत मिळविण्याच्या हंगारीच्या प्रयत्नांना जर्मनीचा पाठिंबा नसल्याचें सूचित केलें होते. रुमानियाचे कवि मो. गोगा यांना त्या अर्थाचे स्पष्ट अभिवचनहि मिळाले होते. असे असूनसुद्धा १९३८ च्या प्रारंभापासून रुमानियाच्या राजांनी उघडपणे जर्मनीच्या शत्रूंचा पक्ष उचलला. त्यामुळे २०-१२-१९३८ रोजी काउंट चियानो हे बुडापेस्ट येथे गेले असतां त्यांच्या मध्यस्थीने जर्मनीचा व हंगारीचा असा करार ठरला कीं जर्मनीने झेकोस्लोव्हाकियापैकी रुथेनियाचा मुलूख हंगारीला द्यावा व रुमानियाकडून ट्रान्सिल्व्हानिया प्रांत परत मिळविण्याला मदत करावी; उलटपक्षीं हंगारीने आपल्या मुलुखांतून जर्मन सैन्याला युक्रेनकडे जाण्याला वाट

द्यावी. या कराराची बातमी फ्रेंच पत्रांनी बाहेर फोडली व ती विश्वसनीय असावी असें मार्चमधील घटनांवरून वाटते. हा करार झाल्यानंतर १३ जानेवारीला हंगारीने कोमिंटर्नविरोधी करारावर सही केली.

हंगारीच्या या कारस्थानाना पायबंद लावण्यासाठी कारोल राजांनी २० फेब्रुवारीला बुखारेस्ट येथे बाल्कन राष्ट्रांची परिषद बोलाविली. ही परिषद २२ तारखेला संपली. परिषदसमाप्तीनंतर काढलेल्या पत्रकावरून असे दिसते की बाल्कन प्रदेशांतील सर्व राष्ट्रांचे सहकार्य घडवून आणण्याची शक्यता आता फारशी राहिलेली नाही. या परिषदेतील चर्चेमुळे बल्गेरियाची अत्यंत तीव्र निराशा झाली. या निराशेमुळे बल्गेरियाने गेल्या महायुद्धातल्याप्रमाणे जर्मनीचा पक्ष स्वीकारूं नये, अशासाठी युगोस्लाव्हियाचे रीजंट प्रिन्स पॉल यांनी बोरिस राजांचे बेलग्राड येथे स्वागत करून त्यांची समजूत करण्याचा प्रयत्न केला, पण तो अयशस्वी झाला. आता रुमानियाचे स्वातंत्र्य केवळ इंग्लंडच्या साहाय्यावर अवलंबून आहे.

## इंग्लंडचें लष्करी सामर्थ्य

आता इंग्लंडच्या अंगी कोणाला साहाय्य करण्याचे सामर्थ्य आहे की नाही, या प्रश्नाचा इंग्लंडच्या नव्या बजेटाच्या आधारे थोडा विचार केला पाहिजे. इंग्लंडच्या यंदाच्या बजेटासंबंधाने सांगण्याजोगी पहिली गोष्ट ही की यंदा आरमारापेक्षा लष्करावर इंग्लंड एक कोटि पौंड अधिक खर्च करणार आहे. गेल्या वीस वर्षांत एकवार देखील इंग्लंडच्या लष्कराचा खर्च आरमारी खर्चाइतकासुद्धा नव्हता ही गोष्ट लक्ष्यांत घेतली म्हणजे इंग्लंडला आत्मसंरक्षणाची किती घोर विवंचना लागली आहे, याची कल्पना येते. याच वर्षी चीनमधील युद्धाचा बोजा शिरावर असूनसुद्धा जपानी आरमारमंत्र्यांनी जगांतील सर्वांत श्रेष्ठ आरमाराच्या तोडीचें आरमार बांधण्याचा जपानचा संकल्प जाहीर केला आहे; हे पाहिले म्हणजे आरमारी सामर्थ्यांतदेखील इंग्लंड कसें मागे पडत चालले आहे हे चांगले कळून येते. लष्करासाठी १६ कोटि पौंडांची रक्कम मागतांना युद्धमंत्री मि. होअर बेलिशा यांनी पार्लमेंटाला सांगितले की युद्धारंभाबरोबर फ्रान्समध्ये १९ डिव्हिजन सैन्य पाठविण्याची व्यवस्था ब्रिटिश सरकार करीत आहे. वास्तविक प्रकार असा आहे की गेल्या महायुद्धाच्या प्रारंभी इंग्लंडने फ्रान्समध्ये ४

डिव्हिजन सैन्य पाठविले होते, तितकेसुद्धा पाठविण्याची तयारी यंदा नाही, इतकेच नव्हे तर ती कधी काळी होईल, असे आज तरी आम्हांला वाटत नाही; असे उद्गार मार्चच्या आरंभी प्रसिद्ध झालेल्या अकांत 'राउंडटेबल' या जबाबदार त्रैमासिकाच्या संपादकांनी काढले आहेत. युद्धमंत्र्यांनी मोठ्या अभिमानाने सांगितले आहे की, गतवर्षीपेक्षा यंदा आमचे सैन्य १५॥ हजारांनी अधिक आहे. हे विधान सत्य असले, तरी हे संपूर्ण सत्य नव्हे. सैन्यांतील डिव्हिजन्सच्या हिशेबाप्रमाणे जितके सैनिक व अधिकारी असावे लागतात, त्यापेक्षा ब्रिटिश सैन्यात सुमारे १६००० सैनिक व ९०० अधिकारी अजून कमीच आहेत. यंदाच्या वर्षी ४०००० नवे रिक्रूट मिळतील, अशी युद्धखात्याला आशा आहे. ब्रिटिश युद्धखात्याच्या या कर्तबगारीची जर्मन मुत्सद्दी निवळ कुचेष्टा करीत आहेत. कारण गेल्या एकाच वर्षांत जर्मनीच्या सैन्यांत चार लक्षांहून अधिक सैनिकांची भर पडली आहे. फ्रेंच मुत्सद्द्याची स्वाभाविकपणेच निराशा झाली आहे व ती निराशा पेर्तिनाक्स यांनी व्यक्तहि केली आहे. यंदा आरमाराच्या वांट्याला १५ कोटि पौंड आले असले तर वैमानिक दलाच्या वांट्याला २० कोटीहून अधिक पौंड आले आहेत.

## आरमारमंत्र्यांच्या थापा

इंग्लंडच्या वैमानिक दलाची वाढ मात्र जारीने सुरू आहे, तरीदेखील अजून सुद्धा जर्मनीच्या विमानांच्या कारखान्यांतून प्रत्येक महिन्याला इंग्लंडपेक्षा निदान सहाशे विमाने अधिक बाहेर पडतात पण विमानमंत्र्यांनी पार्लमेंटांत निदान भरमसाट थापा तरी मारलेल्या नाहीत. पार्लमेंटात थापेबाजीचा विक्रम यंदा आरमारमंत्र्यांनी केला आहे. त्यांनी पार्लमेंटांत खुशाल सांगितले की यंदा आम्ही ९ ड्रेडनॉट जहाजे बांधावयाला घेतली आहेत व ती १९४३ च्या अखेरीस पुरी होतील. ही बातमी पाठवितांना रायटरलाच शंका वाटून त्यांनी खुलाशासाठी टीप जोडली. ती अशी—

'Reuter learns, of the nine battleships in the course of construction this year, only one has hitherto been definitely laid down. The others have not yet been laid down and hence will not be completed by the end of 1943.'

वास्तविक प्रकार असा आहे की जर्मनी व इटाली यांच्या नव्या ड्रेडनॉट जहाजांशी टक्कर देऊ शकेल, असे एकहि जहाज आज इंग्लंडजवळ नाही. यामुळे इंग्लंडबरोबर केलेला आरमारी करार रद्द करण्याचा विचार जर्मनीच्या मनांत येऊ लागला आहे. जपानच्या आक्रमणामुळे भीतिग्रस्त झालेल्या ब्रिटिश वसाहती तर सिंगापूरला अधिकाधिक जहाजे पाठविण्याबद्दल इंग्लंडची एकसारखी विनवणी करीत आहेत. या प्रश्नाचा विचार करण्यासाठी सिंगापूर येथे वसाहती व इंग्लंड यांची लौकरच परिषदहि भरणार आहे. त्या परिषदेत इंग्लंडचे पूर्वेकडील कारस्थानांचे धोरण काय ठरते आणि तोपर्यंत पश्चिमेकडे कोणत्या नव्या घडामोडी होतात त्यांचा विचार पुढील लेखांत करू.

—केसरी, ता. २८ मार्च, १९३९.

---

## लेखांक चवथा

मागील लेखांत ब्रिटिश युद्धमंत्र्यांच्या पार्लमेंटांतील भाषणाचा पोकळपणा व्यक्त केलाच होता. त्याच विषयाची प्रस्तुत लेखांकाच्या प्रारंभी थोडी अधिक चर्चा करणे आवश्यक आहे.

### फुकट बढाई

मि. होअर—बेलिशा यांनी पार्लमेंटाला असे आश्वासन दिले आहे की, युद्धारंभाबरोबर फ्रान्समध्ये १९ डिव्हिजन्स पाठविण्याची तरतूद मी येत्या सहा महिन्यांत करून दाखवीन. इंग्लंडने जोपर्यंत सक्तीच्या लष्करी नोकरीचा कायदा अंमलांत आणला नाही, तोपर्यंत वरील आश्वासन खरे करून दाखविणे, कोणाहि युद्धमंत्र्याला शक्य नाही. एकतर इंग्लडच्या सैन्यांतून जितके सैनिक प्रतिवर्षी सेवानिवृत्त होतात, तितक्यांची जागा भरून काढण्याइतकेहि नवे सैनिक इंग्लंडच्या युद्धखात्याला मिळत नाहीत. महायुद्धापूर्वी आयर्लंडांतून इंग्लंडला हवे तितके नवे सैनिक मिळत असत, पण तो झरा आता आटला आहे. सैनिक व अधिकारी मिळून ब्रिटिश सैन्यांत आधीच १७ हजारांची उणीव आहे व यंदाच्या

वर्षापासून डिव्हिजनमधील सैनिकांची संख्या वाढविल्यामुळे असलेल्या डिव्हिजन्समधील सैनिकांची संख्या पुरी करण्याला नवीन १५००० सैनिकांची जरूर आहे. यंदाच्या वर्षी फार तर ४०००० नवे रिक्रूट मिळतील, असा युद्धखात्याचा अंदाज आहे. हा अंदाज खरा ठरला तर खड्या सैन्यांतील डिव्हिजन्समधील सैनिकांची उणीव भरून येईल, इतकेच; त्यांतून कांही नवीन डिव्हिजन्स उभारता येणार नाहीत. तेव्हा फ्रान्समध्ये १९ डिव्हिजन सैन्य पाठविण्याच्या योजनेचा भार बहुतांशी टेरिटेरियल आर्मीवरच पडणार. टेरिटोरियल आर्मीच्या १३ डिव्हिजन्स, युद्धारंभी रणांगणावर पाठविण्यासाठी मि. होअर-बेलिशा हे सज्ज करीत आहेत पण लष्करी दृष्ट्या त्यांची ही योजना अत्यंत धोक्याची आहे. १९ मार्चच्या संडे टाईम्सच्या अंकात प्रस्तुत योजनेवर टीका करताना लेफ्टेनंट कर्नल बेयर्ड-स्मिथ यांनी म्हटले आहे

'Under its present constitution, no part of the Territorial Army, is ready for war and as for the 'field force' months of intensive training, which cannot be had in peace time under a voluntary system would be necsssary to make it so.'

युद्धशिक्षणाच्या दृष्टीने टेरिटोरियल आर्मी ही जर्मनीच्या खड्या सैन्याला तोंड देण्याला किती नालायक आहे, हे वरील वाक्यावरून स्पष्ट दिसून येते. आता मि. होअर-बेलिशा यांच्या योजनेप्रमाणे टेरिटोरियल आर्मीच्या तेरा डिव्हिजन्स परदेशी पाठविण्याला सज्ज करतां येतील की नाही, याचा विचार केला पाहिजे. १९३९ च्या प्रारंभी टेरिटोरियल आर्मीची संख्या २०४००० होती. या दोन लक्षांपैकी ७७ हजार सैनिक हे गतवर्षीच सैन्यांत दाखल झाले असल्याने अगदीच नवशिके आहेत. शिवाय टेरिटोरियल आर्मीपैकी ७० हजार सैनिक हे इंग्लंडच्या किनाऱ्यांचे संरक्षण व वैमानिक स्वारीपासून संरक्षण या महत्त्वाच्या कामगिरीसाठी राखून ठेवलेले असतात. याप्रमाणे स्वदेशसंरक्षणासाठी राखून ठेवलेले सैनिक हे स्वाभाविकपणेच अधिक अनुभवी असावे लागतात. या अनुभवी सैनिकांच्या अभावी नवशिक्या सैनिकांच्या तुकड्या शत्रूला तोंड देण्याला लायक होत नाहीत. या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे जर्मन

सैन्याला तोंड देण्याला लायक अशा १३ डिव्हिजन्स टेरिटोरियल आर्मीमधून उभ्या करणे किती अवघड आहे, याची यथार्थ कल्पना येते.

## शस्त्रसामुग्रीचा तुटवडा

आता ब्रिटिश सैन्याच्या युद्धसिद्धतेची थोडीशी कल्पना दिली पाहिजे. १९३६ सालीच जर्मनीजवळ ७००० हून अधिक विमानविनाशक तोफा होत्या. इंग्लंडजवळ आज देखील १००० सुद्धा विमानविनाशक तोफा नाहीत. अर्वाचीन सैन्यामध्ये यांत्रिक डिव्हिजन्सचे महत्त्व किती असते हे सांगावयाला नकोच. एका यांत्रिक डिव्हिजनमध्ये निदान ७०० चिलखती गाड्या असाव्या लागतात; पण मि. विन्स्टन चर्चिलनी भर पार्लमेंटांत युद्धमंत्र्यांना प्रश्न विचारला होता की ब्रिटिश सैन्यांतील यांत्रिक डिव्हिजन्समध्ये ७०० चिलखती गाड्यांच्या $\frac{१}{१०}$, निदान $\frac{१}{२०}$ तरी गाड्या आहेत, असे आपण आश्वासन देऊं शकाल काय ? या प्रश्नाला उत्तर देण्याचे साहस युद्धमंत्र्यांनी केले नाही, यावरून वास्तविक परिस्थितीची वाचकांना कल्पना येईलच. मि. चर्चिल म्हणतात 'आमच्या यांत्रिक डिव्हिजनमधील कित्येक बटॅलियन्समध्ये अशी परिस्थिति आहे की त्यांचे घोडे तेवढे काढून घेतले आहेत, पण त्याना चिलखती गाड्या अद्यापि मिळाल्या नाहीत. या बटॅलियन्सना प्रत्येकी ५३ यांत्रिक तोफा व प्रत्येकी २४ टॅंकविनाशक तोफा देणें आवश्यक असते. याच्या $\frac{१}{३}$ देखील तोफा त्याना अद्यापि मिळालेल्या नाहीत.' ब्रिटिश सैन्यांतील सर्वांत महत्त्वाच्या डिव्हिजन्सची जर अशी शोचनीय अवस्था असली तर सर्वांत कमी महत्त्वाच्या टेरिटोरियल डिव्हिजन्सची काय अवस्था असेल तें सांगावयाला नकोच. ही अंदाधुंदी काही तात्कालिक कारणामुळे उद्भवलेली नाही. तिचें बीज इंग्लंडच्या बनिया मनोवृत्तीतच आहे. एक अत्यंत नामांकित जर्मन लेखक म्हणतो

'England is today the shameless representative of comercial barbarism in International Law. Her power was created in the olden time when the world's wars were decided by naval battles and by hired mercenaries and when it was considered good policy to rob well-situated fortresses and naval ports without any regard to their ownership

and history. In this century of national states and armed nations a cosmopolitan trading Power such as England can no longer maintain itself for any length of time. The day will come and must come when Gibraltar will belong to the Spaniards, Malta to the Italians and the Mediterranean to the nations who live on the Mediterranean.'

इंग्लंडने आपली ही बनिया मनोवृत्ति बदलून देशात सक्तीची लष्करी नौकरी अस्तित्वांत आणली, तरच इंग्लंडच्या अधोगतीला काही तरी आळा बसेल असे जर्मनीतीलच नव्हे तर सर्व युरोपखंडांतील प्रत्येक जाणत्या व्यक्तीचे मत आहे. पण देशाचे युद्धसामर्थ्य वाढविण्याच्या या खऱ्या मार्गाचा अवलंब न करतां इंग्लंडने आपल्या रिक्रूटांची वयोमर्यादा कमी करून ती १७॥ वर्षांवर आणून बसविली आहे. इतर कोणत्याहि देशामध्ये ही वयोमर्यादा १९ वर्षांपेक्षा कमी नाही, ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे या बनिया लोकाच्या सरकाराला रिक्रूट मिळविण्यासाठी कशा क्लृप्त्या योजाव्या लागत आहेत, हे कळून येईल.

## ऑस्ट्रियन साम्राज्याचा वारसा

इंग्लंडच्या या साऱ्या लष्करी दौर्बल्याचा उल्लेख करून १२ मार्च रोजी जर्मनीच्या मजूरखात्याचे प्रमुख डॉ. ले यांनी एका प्रचंड जाहीर सभेत उद्गार काढले की चार कोटि लोकसंख्येच्या दुबळ्या इंग्लंडने ४७ कोटि लोकांवर सत्ता गाजवावी व आठ कोटि लोकसंख्येच्या बलिष्ठ जर्मनीला मात्र कांहीहि साम्राज्य असूं नये, ही अत्यंत लाजिरवाणी गोष्ट आहे. केवळ जर्मनवंशाच्या लोकांची मुक्तता करून व त्यांचे एकराष्ट्र बनवून जर्मनीच्या राज्यकर्त्यांचे समाधान होणार नाही, ही गोष्ट प्रस्तुत लेखकाला पूर्वीपासूनच दिसत होती. ४-९-३६ च्या 'केसरी'त मी स्पष्टच लिहिले होते 'माजी ऑस्ट्रियन साम्राज्याचे सर्वच विभाग आपल्या वर्चस्वाखाली यावेत, यासाठी जर्मनीतील मुत्सद्द्यांचे सध्या निकराचे प्रयत्न चालू आहेत व त्यामुळे हा ऑस्ट्रियन साम्राज्याच्या वारसाचा प्रश्न उद्‌भवला आहे.' मात्र जर्मनीची ही साम्राज्यतृष्णा झेकोस्लोव्हाकियावरील स्वारीच्या आधी तीन दिवस, डॉ. ले यांनी ज्याप्रमाणे अधिकृत रीत्या व्यक्त करून दाखविली; त्याप्रमाणे इतर कोणी यापूर्वी अकाली व्यक्त केली नव्हती व

यामुळे Mein Kampf मधील क्षुण्ण विचारसरणीपासून हेर हिटलेर यांचे राजकारण रेसभर देखील ढळणार नाही, अशी ज्यांनी आपली समजूत करून घेतली होती, त्या मुत्सद्द्यांना आपल्या नव्या राजकारणाचा मागमूस देखील लागू न देतां जर्मनीच्या राज्यकर्त्यांना झेकोस्लोव्हाकिया देश खाता आला.

## यद्देशहितमत्यंतं तत्सत्यमिति धारणा

वास्तविक पाहता समग्र झेकोस्लोव्हाकिया देश खावयाचा जर्मनीचा निश्चय १७ फेब्रुवारीपूर्वीच झाला असला पाहिजे असे २१ मार्चच्या अंकांतील लेखांत लिहिलेच आहे. त्यानतर हाती आलेल्या १९ मार्चच्या लंडनच्या 'सडे टाईम्सच्या' अकांत त्या पत्राच्या बर्लिन येथील बातमीदाराने म्हटले आहे

'Since February 17, well-informed Nazis have been telling their foreign friends that Germany would occupy Prague by March 20 at the latest. Well-versed deplomats who were told about this, shook their heads and said that Hitler himself had promised, there would be no more surprises, besides there is no evidence of mobilisation !'

बर्लिनमधील परराष्ट्रीय मुत्सद्द्याच्या या उद्गारांवरून त्यांना जर्मनीचे अंतरग कितपत कळते, हे स्पष्ट दिसून येते ! वचने पाळणाऱ्या मुत्सद्द्यापेक्ष वचने मोडणारे मुत्सद्दी नैतिक दृष्ट्या अधिक थोर, असे जर्मनीतील मुत्सद्दी मंडळीचे मत आहे. ही केवळ कुचेष्टा नव्हे, हे सिद्ध करण्याकरिता फिरून एकवार अवतरणाचा आश्रय करणे आवश्यक आहे. जर्मनीच्या वैभवाचा पाया घालणारे राजे फ्रेडरिक दि ग्रेट यांनी म्हटले आहे

'If the ruler is obliged to sacrifice his own person for the welfare of his subjects, he is all the more obliged to sacrifice engagements, the continuation of which would be harmful to his country. The word of a sovereign involves, and may mean misery for, whole nations. Is it better that a nation should perish or that a sovereign should break his treaty ?'

वचन मोडणे हा देशासाठी देशनायकाने करावयाच्या आत्मयज्ञाचाच एक भाग आहे, अशा भूमिकेवरून विचार करणाऱ्यांच्या वचनांवर विश्वास ठेवणाऱ्या परराष्ट्रीय वकिलांची कीव करावी तितकी थोडीच आहे.

## हिटलेरची अजब युक्ति

असो, अमेरिकेची सरहद्द ऱ्हाईन नदीवर आहे, अशा आशयाचे विधान प्रे. रूझवेल्ट यांनी केल्यापासून जर्मनीच्या परराष्ट्रीय राजकारणाची सूत्रे स्वतः हेर हिटलेर यांनी आपल्या हाती घेतली होती. पण या गोष्टीकडे सर्व लोकांचें दुर्लक्ष्य व्हावें, याकरिता त्यांनी एक अजब युक्ति योजली. फेब्रुवारीच्या प्रारंभापासून झेकोस्लोव्हाकिया देश खालसा करीपर्यंतच्या सहा आठवड्यात हेर हिटलेर हे चारदा ' रंगेल विधवा ' नावाचा ऑपेरा पहावयाला गेले व प्रत्येक खेपेला या ऑपेरांत नायिकेचे काम करणाऱ्या अमेरिकन नटीला मुद्दाम परदेशांहून जर्मनीला बोलावून आणले. या अमेरिकन नटीला हेर हिटलेर यांनी एक पुष्पगुच्छ, एक स्कार्फ व २५० पौंड दिले. जर्मनीचे ब्रह्मचारी नेते हे कधीहि प्रणयाच्या फंदांत पडत नसल्यामुळे पांचट प्रणयकथांवर उपजीविका करणाऱ्या वर्तमानपत्रांना ही एक अपूर्व पर्वणीच वाटली व अमेरिकेच्या मीनाक्षीने जर्मनीच्या ब्रह्मचारी नेत्यावर पसरलेल्या मोहजालाची कथा पश्चिमयुरोपातील व अमेरिकेतील बहुतेक साऱ्या पत्रांतून प्रसिद्ध झाली. याप्रमाणे प्रणयाची माया पसरून हेर हिटलेर यांनी आपल्या राजकारणाचे सत्यस्वरूप कुतूहलप्रिय जनतेपासून लपवून ठेविले, तर फील्डमार्शल गोएरिंग हे औषधोपचाराचे निमित्त करून इटालींत जाऊन राहिले होते. याचवेळी जर्मनीचे प्राग येथील वकीलहि रजेवर गेले होते. या सर्व कारणांमुळे जर्मनीत या वेळी एक साहसी राजकारण शिजत असल्याचा वासहि परदेशीय मुत्सद्दी मंडळींना लागला नाही.

## प्रागमधील कारस्थानें

मार्चच्या पहिल्या आठवड्यांत झेकोस्लोव्हाकियाच्या संयुक्त सरकाराला अशी खबर कळली की, मार्च १५ च्या सुमाराला स्लोव्हाकिया प्रांतांत संयुक्त सरकाराच्या विरुद्ध बंड होणार आहे. तेव्हा प्रागच्या सरकाराने जर्मन वकिलातीचा सल्ला घेतला. जर्मन वकिलातीने बर्लिन येथील वरिष्ठांचा सल्ला घेऊन

झेकोस्लोव्हाकियाच्या सरकाराला सांगितले की, झेकोस्लोव्हाकियांत एकच बलिष्ठ सरकार असणे हें जर्मनीच्या हिताचे आहे, या देशांत प्रांतागणिक सरकारें प्रस्थापित होऊं लागली तर मध्ययुरोपात बाल्कन द्वीपकल्पासारखी अंदाधुंदी माजेल. या उपदेशानुसार प्राग येथील सरकारानें स्लोव्हाकियाचे मुख्य प्रधान डॉ. टिसो व त्याचे कित्येक मत्री यांना पदच्युत केले व त्या प्रांतांत झेक सैन्य पाठवून तो सर्व प्रांत आपल्या हाती घेतला आणि संयुक्त सरकाराचे दुय्यम प्रधानमंत्रि डॉ. सिडोर याना स्लोव्हाकियाचे प्रधानमंत्रि नेमले. त्याबरोबर स्लोव्हाकियाच्या स्वयंसेवक दलाने व तेथील जर्मन लोकांनी झेकसरकाराविरुद्ध दंगे करण्याला सुरुवात केली. हा सर्व प्रकार १० मार्चला घडला. या घडामोडीची वार्ता जर्मनीत कळतांच त्याच दिवशी संध्याकाळी हेर हिटलेर यांनी हेर फॉन रिब्बेनट्रॉप यांची मुलाखत घेतली व आपला पुढील बेत आखला. स्लोव्हाकसरकाराला पदच्युत केल्यावर बर्लिन येथील झेक वकिलाने हेर फॉन रिब्बेनट्रॉप याची मुलाखत मागितली, पण त्याला तीन दिवसपर्यंत मुळी मुलाखतच मिळाली नाही. आपण पुढे काय करावे, याविषयी प्राग येथील सरकाराने जर्मन वकिलातीचाहि सल्ला विचारला. पण जर्मन वकिलातीलाहि बर्लिनहून कसल्याच सूचना येईनात. उलटपक्षी ऑस्ट्रियाचे राज्य खालसा करण्यापूर्वी व्हिएन्ना येथे पाठविलेले हेर हिटलेर यांचे खास सल्लागार हेर केप्लेर हे शनिवारी स्लोव्हाकियाची राजधानी ब्राटिस्लाव्हा येथे गेले व त्यानी डॉ. सिडोर याना सांगितले की, स्लोव्हाकिया प्रांत प्रागपासून फुटून निघण्याला तुम्ही मदत करण्यास कबूल असला तर स्वतंत्र स्लोव्हाकियाचे पहिले प्रेसिडेंट तुम्हाला करण्याला हेर हिटलेर सिद्ध आहेत.

## हंगारीला रुथेनिया का दिला ?

डॉ. सिडोर यांनी हे आमिष नाकारले; तरीदेखील स्लोव्हाकियांतील इतर सर्व पुढाऱ्यांनी हेर केप्लेर यांच्या कारस्थानांना पाठिंबा दिला. पुढे सोमवारी १३ तारखेला हेर हिटलेर यांनी स्लोव्हाकियाचे पदच्युत प्रधानमंत्रि डॉ. टिसो यांची मुलाखत घेतली. या मुलाखतीत डॉ. टिसो यांनी हेर हिटलेर यांना सांगितलें की, स्लोव्हाकियाच्या स्वातंत्र्याला जर्मनी प्रतिकूल आहे, अशी झेकसरकारानें आमची

समजूत करून दिली, म्हणून आम्ही झेक सैन्याला विरोध केला नाही. हेर हिटलेर यांनी उत्तर दिले 'स्लोव्हाकियाच्या स्वातंत्र्याला आमचा विरोध नाही. पण संयुक्त सरकारांतील स्लोव्हाक मंत्री डॉ. सिडोर यांनी हंगारीच्या सरकाराबरोबर बोलणीं सुरू केली आहेत व प्रस्तुत प्रसंगी आपसातील किरकोळ भांडणे विसरून हंगारीने प्रागसरकाराला मदत केली तरच दोन्ही देशांचा तरणोपाय आहे असे त्यांनी हंगारीचे काउंट एस्टेरहाझी यांना सांगितलें आहे. ही माहिती खरी असल्यास जर्मनीला या कारस्थानाविरुद्ध कडक उपाय योजावे लागतील.' तेव्हा डॉ. टिसो यांनी जर्मनीच्या नेत्यांना सांगितले की या कारस्थानात काही तथ्य नाही, डॉ. सिडोर हे जर्मनीच्या इच्छेप्रमाणे वागतील अशी मी हमी घेतो. त्यानंतर हेर हिटलेर यांनी डॉ. टिसो यांना आश्वासन दिले की, हंगारी व पोलंड या दोन राष्ट्रांनी संगनमत करून रुथेनिया प्रांत खाऊन टाकण्याचे मनात आणल्यास तसे न करण्याबद्दल बर्लिनचे सरकार त्यांना सक्त ताकीद देईल व या ताकिदीला त्यांनी न जुमानल्यास अधिक कडक उपाय अमलांत आणले जातील. डॉ. टिसो यांनी स्लोव्हाकियाच्या पार्लमेंटात सांगितलेल्या या हकीकतीवरून असे दिसते की, शेवटच्या आणीबाणीच्या दिवसात प्राग सरकाराने हंगारी व पोलंड यांचे साहाय्य मिळविण्याचा प्रयत्न केला, पण तो जर्मनीच्या दहशतीमुळे फसला व या वेळी हंगारीला प्राग आणि वार्सा येथील सरकारापासून फोडण्याकरिता आपल्या इच्छेविरुद्ध हेर हिटलेर यांनी रुथेनिया प्रांत हंगारीला देऊन टाकला.

## डॉ. हाशा यांस कसें चकविलें ?

डॉ. टिसो व हेर हिटलेर यांच्या मुलाखतीनंतर लगेच डॉ. टिसो यांच्या मंत्रिमंडळांतील एक पदच्युत मंत्रि मो. डुर्खान्स्की यांनी व्हिएन्नाच्या रेडियोवरून स्लोव्हाक भाषेत भाषण करून प्रागसरकारावर टीका केली. या भाषणामुळे प्रागसरकाराला स्पष्ट कळून आले की, जर्मनसरकारचा स्लोव्हाकियाच्या पदच्युत मंत्र्यांना पूर्ण पाठिंबा आहे. तेव्हा प्रागसरकाराचे प्रेसिडेंट डॉ. हाशा व त्यांचे परराष्ट्रमंत्रि डॉ. श्वाल्कोव्स्की यांनी आपण स्वतः बर्लिनला जाऊन हेर हिटलेर यांच्यापुढे आपली बाजू मांडावयाचें ठरविले. 'What arguments

**were used** to induce Hacha to go to Berlin ? ' असा प्रश्न सध्या **इंग्लंडचे मुत्सद्दी एकमेकां**ना विचारीत असतात. या प्रश्नाचे त्यांना कोडें कां पडावें, **हें समजत** नाहीं. ज्या कारणाकरिता चेंबरलेनसाहेब बेर्स्टेसगाडेनला **गेले,** त्याच कारणाकरिता डॉ. हाशा हे बर्लिनला गेले. या प्रसंगी डॉ. हाशा यांना जर्मनीच्या पुढाऱ्यांनी कशा प्रकारे वागविले, हे डेली टलिग्राफच्या वर्णनावरून आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या अभ्यासकांना समजलेच आहे. स्वतः जर्मन लोकदेखील त्या वर्णनाची सत्यता नाकारीत नाहीत. त्यांचे म्हणणे इतकेच आहे की, झेकोस्लोव्हाकियाच्या मृत्युपत्रावर डॉ. हाशा यांनी सही केल्यावर मग त्यांना जर्मन डॉक्टरांनी इंजेक्शने दिली, आधी इंजेक्शने दिली व मग सही घेतली, ही गोष्ट खोटी आहे.

## झोपेच्या गुंगींत शांततेचीं सुखस्वप्नें

झेकोस्लोव्हाकिया देश जर्मनीला समर्पण करण्याच्या पत्रकावर डॉ. हाशा यांची सही ता. १५ मार्चच्या पहाटेला बुधवारी झाली. या वेळेपर्यंत जर्मन सैन्याच्या सुमारे वीस डिव्हिजन्स झेकोस्लोव्हाकियाच्या सरहद्दीवर एकत्र झाल्या होत्या. या सैन्याने एका दिवसांतच बोहिमिया व मोराव्हिया हे दोन्ही प्रांत व्यापून टाकले व बुधवारी सध्याकाळी स्वतः हेर हिटलेर यांनी प्राग शहरांत प्रवेश करून ते दोन्ही प्रांत जर्मनीला जोडून टाकल्याचा जाहीरनामा काढला. त्यानतर दुसरेच दिवशी स्लोव्हाकिया प्रांतहि जर्मनीला जोडून टाकल्याचा जाहीरनामा बाहेर पडला. झेकोस्लोव्हाकिया देश अशा रीतीने जर्मन अजगराच्या उदरात जात असतां ब्रिटिश सरकार काय करीत होते, याची आता थोडी माहिती सांगितली पाहिजे. अगदी थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे या वेळी ब्रिटिश सरकार झोपीं गेले होते. या वेळी जर्मन व्यापाऱ्यांचें एक शिष्टमंडळ इंग्लंडला आले होते व इंग्रज व्यापाऱ्यांचे एक शिष्टमंडळ जर्मनीला गेले होते. इंग्लंडच्या आरमाराचा एक मोठा काफिला जनरल फ्रांकोच्या सरकारला तंबी देण्यासाठी नुकताच स्पेनकडे गेला होता. हा काफिला स्पेनकडे गेला त्याच दिवशीं म्हणजे ९ मार्च रोजी स्वतः चेंबरलेनसाहेबांनी वर्तमानपत्रांच्या बातमीदारांना सांगितले की, आंतरराष्ट्रीय परिस्थिति इतकी सुधारलेली मी फार

दिवसांत पाहिली नव्हती! याच्या दुसऱ्याच दिवशी सर सॅम्युएल होअर यांनीहि सार्वत्रिक शांततेचे सुवर्णयुग जवळ आले असल्याचें एका भाषणांत जाहीर केले. त्यानंतर दोन दिवसांनी म्हणजे १२ मार्चला लंडनच्या 'सडे डिस्पॅच'ने असे प्रसिद्ध केले की, आंतरराष्ट्रीय राजकारणांतील सर्व भानगडींच्या प्रश्नाचा कायमचा निर्णय लावण्याकरिता चेंबरलेनसाहेब लौकरच एक जागतिक शांततापरिषद बोलावणार आहेत व ही परिषद यशस्वी झाली म्हणजे लगेच निःशस्त्रीकरणपरिषद भरावयाची आहे आणि या परिषदेला प्रेसिडेंट रूझव्हेल्ट यांचा पूर्ण पाठिंबा आहे. लंडनचे मुत्सद्दी याप्रमाणे शांततेच्या सुखस्वप्नांत मग्न झाले असता हेर हिटलेर यांनी अकस्मात् तरवारीचा खणखणाट करून त्यांच्या तंद्रीचा भंग केला. या आकस्मिक खणखणाटामुळे जागृत झालेल्या ब्रिटिश मुत्सद्दयांनी आत्मसंरक्षणासाठी कोणती कारस्थाने आरंभिली आहेत, याचा पुढील लेखांकांत विचार करूं.

—केसरी, तारीख १८ एप्रिल, १९३९.

---

## लेखांक पांचवा

## रशियावर अविश्वास

जर्मनीने झेकोस्लोव्हाकिया देश खाऊन टाकल्यानंतर इंग्लंडच्या सर्व प्रमुख पत्रांनी अशी ओरड करण्याला सुरुवात केली कीं इतःपर जर्मन साम्राज्याच्या वाढीला ताबडतोब आळा घातला नाही तर लौकरच पश्चिमयुरोपांतील सर्व राष्ट्रांना जर्मनीचे मांडलिक बनावे लागेल. जर्मनीच्या विस्ताराला आळा घालावयाचा तर तो पूर्वयुरोपांत घालणे जरूर आहे. पूर्वयुरोपांत जर्मनीला विरोध करावयाचा असल्यास रशियाच्या मदतीवांचून तो यशस्वी होणार नाही हे सर्वांना स्पष्ट दिसत आहे. असे असून सुद्धा रुमानिया व पोलंड या राष्ट्रांच्या संरक्षणाच्या कार्यांत रशियाची मदत घ्यावयाला ब्रिटिश मुत्सद्दी अद्यापि फारसे उत्सुक दिसत नाहीत. पण या बाबतीत ब्रिटिश मुत्सद्यांना दोष देतां येत

नाही. कारण खुद्द रुमानिया व पोलंड या देशातील राज्यकर्त्यांनाच असे वाटत की राशियाची मदत घेऊन आपले स्वातंत्र्य टिकविण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा आपण जर्मनीचे मांडलिक बनणे अधिक श्रेयस्कर आहे. रशियन सैन्य एकदा आपल्या मुलखांत शिरले की मुलखाचे लचके तोडल्याशिवाय रहात नाही, असा या दोन्ही देशांना अनुभव आलेला आहे. उदाहरणार्थ, १८७८ च्या रुसोटर्किश युद्धांत उस्मानपाशांच्या पराक्रमाने रशियाचा पूर्ण पराजय होण्याची वेळ आली असता रुमानियाच्या सैनिकांनी ऐनवेळी रशियाला मदत करून तुर्कांवर पूर्ण विजय मिळवून दिला. पुढे युद्ध सपल्यानंतर रुमानियाचा बेसारेबिया हा प्रांत बळकावून रशियाच्या राज्यकर्त्यांनी आपल्या मित्रराष्ट्राचे उपकार फेडले! ‘Russia acted with base ingratitude towards her Latin ally’ असे या प्रकरणावर लिहितांना केंब्रिज मॉडर्न हिस्ट्रीच्या लेखकांनी उद्गार काढले आहेत. रशियांत बोल्शेव्हिकांची राज्यक्रांति झाल्याची संधि साधून रुमानियाने महायुद्धानंतर तो प्रांत परत घेतला. पण रशियांतील बोल्शेव्हिक सरकाराने अद्यापि रुमानियाच्या बेसारेबियावरील स्वामित्वाला संमति दिलेली नाही. अशा परिस्थितीत रशियन सैन्य आपल्या घरांत घेण्याला रुमानियाचे सरकार कसे कबूल होईल!

## उस्बोर्न यांची योजना

या प्रश्नाला एक उत्तर असे सुचते की, रुमानियाला मोठ्या प्रमाणावर ब्रिटिश सैन्याची मदत मिळाल्यास आपल्या घरांत रशियन सैन्य घेण्याला रुमानियाचे सरकार कबूल होईल. कारण मग रशियन सैन्य रुमानियांतून बाहेर काढण्याला इंग्लंडचीहि मदत होईल. या दृष्टीने विचार करून ब्रिटिश साम्राज्याच्या संरक्षणाच्या प्रश्नांवर बाल्कन प्रदेशांत व्याख्याने देऊन आलेल्या ॲडमिरल उस्बोर्नसाहेबांनी बादशहांच्या मेहुण्यांच्या वर्तमानपत्रांतून अशी सूचना केली आहे की, इंग्लंडने रुमानियाला ताबडतोब कर्ज, तोफा, दारूगोळा, लढाऊ जहाजे, लष्करी व वैमानिक अधिकारी इतकेच नव्हे तर प्रत्यक्ष ब्रिटिश सैन्याची देखील मदत करावी. या सूचनेवर पहिला आक्षेप असा घेतां येईल की, रुमानियांत ब्रिटिशांची युद्धसामुग्री व सैन्य उतरून तो देश लढाईला पूर्णपणे सज्ज होईपर्यंत वाट पाहण्याइतके कांही जर्मनीचे

राज्यकर्ते वेडे नाहीत. हेर हिटलेर यांनी अलीकडे एका भाषणांत बोलून दाखविले आहे 'The mistake of the Hohenzollerns was in not striking against the encirclement of Germany quickly enough.' जर्मनीला वेढा घालण्यात सामील होणाऱ्या राष्ट्रांवर हेर हिटलेर यांनी तडकाफडकी हल्ला करू नये, याकरिता चेंबरलेनसाहेब त्या राष्ट्रांना इंग्लंड आणि फ्रान्स यांच्या संरक्षणाची हमी देत आहेत. पण त्या हमीवर विसंबून रुमानियासारख्या राष्ट्राने इंग्लंडची युद्धसामुग्री व सेना आपल्या किनाऱ्यावर उतरू दिली तर काही जर्मनी हात जोडून स्वस्थ बसणार नाही. बहुधा याच गोष्टीची जाणीव देण्यासाठी सध्या रुमानियाच्या परराष्ट्रमंत्र्याना हेर हिटलेर यांनी आपल्या भेटीला बोलाविले आहे.

## कोणती कल्पना संभवनीय ?

रुमानियांत ब्रिटिश सैन्य व युद्धसामुग्री उतरविण्याच्या प्रश्नाची आणखी थोडी चिकित्सा करणे जरूर आहे. अॅडमिरल उस्बोर्न याना त्यांच्या बाल्कन प्रदेशांतील दौऱ्यांत असे आढळून आले की, युद्धकालीन परिस्थितीत इंग्लंड व फ्रान्स यांच्याकडून आपल्याला कांही मदत होईल, असा विश्वास बाल्कन राष्ट्रांना वाटत नाही; कारण इटालीच्या पाणबुड्या व विमाने यांच्या तावडीतून भूमध्य समुद्रातील कोणतीहि जहाजे सुटणे त्यांना अशक्यप्राय वाटते. असे असूनसुद्धा चेंबरलेनसाहेब रुमानिया, ग्रीस, तुर्कस्थान इत्यादि राष्ट्रांना इंग्लंड व फ्रान्स यांच्या साहाय्याची आश्वासने देत आहेत, याचा अर्थ काय! या प्रश्नाचा विचार केला असता अशी शंका येते की, एक तर भावी महायुद्धांत इटाली देश आपल्याविरुद्ध लढणारच नाही, अशी चेंबरलेनसाहेबांची समजूत आहे किंवा इटालीच्या बेटांवर एकदम हल्ला करून इटालीच्या आरमारी व वैमानिक तळांचा आपल्याला विध्वंस करता येईल व मग भूमध्यसमुद्राचा मार्ग आपल्याला मोकळा राहील, असे त्यांना वाटते किंवा तुर्कस्थानाशेजारच्या सायप्रस बेटांत आधीपासून सैन्य व युद्धसामुग्री यांची जमवाजमव करून मग युद्धारंभाबरोबर त्यांची ग्रीसमध्ये आणि रुमानियांत रवानगी करण्याचा त्यांचा विचार आहे. प्रस्तुत लेखकाला ही शेवटची कल्पनाच अधिक संभवनीय वाटते.

## युद्धसामुग्रीचा पुरवठा

ब्रिटिश जहाजांना भूमध्य समुद्रातून निर्भयपणे प्रवास करतां येईल, असे गृहीत धरलं तरी बाल्कन राष्ट्रांना इंग्लंड व फ्रान्स याच्याकडून युद्धसामुग्रीची कितपत मदत होणे शक्य आहे, याचा आता विचार करू. जर्मनीच्या शत्रूंच्या इच्छेप्रमाणे पोलंड, रुमानिया, युगोस्लाव्हिया व ग्रीस या सर्व राष्ट्रांनी जर्मनी-विरुद्ध युद्धांत भाग घेतला तर सर्व राष्ट्राचे मिळून सुमारे दहा लक्ष सैन्य रणांगणावर उभे राहील. एवढ्या सैन्याला निकराच्या लढाईच्या वेळीं रोज निदान ५०००० टन दारूगोळा लागेल. याशिवाय इतर युद्धसामुग्री लागेल ती वेगळीच. या सर्व राष्ट्रांनी जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारण्याचे साहस केल्यास जर्मनीचे त्यांच्यावर अत्यंत निकराचे हल्ले होतील हे सागावयाला नकोच. अशा हल्ल्याना निदान सहा महिने तोंड द्यावयाचे म्हणजे या सर्व राष्ट्रांजवळ मिळून निदान ९० लक्ष टन दारूगोळा पाहिजे. इतका दारूगोळा या राष्ट्राजवळ नाही व रशियाकडूनहि त्यांना दारूगोळ्याची इतक्या मोठ्या प्रमाणावर मदत होऊं शकणार नाही. ग्रीसच्या सालोनिका बंदरांत एका दिवसामध्ये फक्त ५००० टन माल उतरविण्याची सोय आहे व सालोनिकाहून युगोस्लाव्हिया व रुमानिया या देशांकडे जाणाऱ्या आगगाडीतून तर एका दिवसात ४००० टनाहून अधिक माल जाऊ शकत नाही. यावरून रुमानियाच्या बंदराची व तेथील आगगाडीची अवस्था काय असेल, याची कल्पना करता येईल. अशा परिस्थितीत इंग्लंड आणि फ्रान्स यांच्या दारूगोळ्याच्या मदतीच्या आश्वासनावर विसंबून राहून या राष्ट्रानी जर्मनी-विरुद्ध युद्ध पुकारणे अत्यत धोक्याचे आहे. युद्धशास्त्राच्या बाबतीत सर्वस्वी अनभिज्ञ असलेल्या वाचकांना दारूगोळ्याच्या टनांचे वरील आंकडे उगीच फुगविलेले वाटतील. पण वास्तविक प्रकार तसा नाही. गेल्या युद्धात मेस्सिनच्या लढाईत १२०००० इंग्रज सैन्याने १९ दिवसांत १२८००० टन दारूगोळा खर्चला होता. तेव्हापेक्षा दारूगोळ्याच्या व्ययाचे प्रमाण आता अधिक वाढले आहे. तरी देखील केवळ कमीत कमी गरजेचा विचार करून वरील अदाज केला आहे.

हा दारूगोळ्याच्या पुरवठ्यापुरता विचार झाला. आतां ज्या सीमेवर युगोस्लाव्हिया व रुमानिया याच्यासारख्या दुबळ्या राष्ट्रांना जर्मनीचे सैन्य थोपवून धरतां येईल असें सांगितले जात आहे, त्या सीमेचा युद्धशास्त्रदृष्ट्या थोडा विचार

केला पाहिजे. अॅडमिरल उस्बोर्न यांनी बाल्कन राष्ट्रांना जर्मनीविरुद्ध लढण्याची चिथावणी देताना या सीमेचा उल्लेख केला आहे

'Broadly speaking this line extends from the Carinthian foot-hills along the Drava and the Danube protecting Yugoslavia, to the Carpathians which cover Rumania.'

या वाक्यांत उल्लेखिलेली कारिंथियन टेकड्यांची रांग ही युगोस्लाव्हिया व माजी ऑस्ट्रिया देश यांच्या सीमेवर आहे. या डोंगराळ प्रदेशांत युगोस्लाव्हियाने जर्मनीला प्रतिरोध करावयाचे ठरविल्यास युगोस्लाव्हियाच्या सैन्याच्या पिछाडीवर इटालीचा हल्ला होईल व दोन बलिष्ठ सैन्यांच्या तावडीत सांपडून त्या सैन्याचा सर्वनाश होईल. शिवाय या डोंगराळ मुलुखांत स्लाव्ह लोकांपेक्षा जर्मन लोकांची वस्ती अधिक आहे, ही गोष्टहि युगोस्लाव्हियाला प्रतिकूल आहे. ड्राव्हा नदी ही युगोस्लाव्हिया व हंगारी यांच्या सरहद्दीवर आहे. नदी रुंद असली व तिच्यावर फारसे पूल नसले म्हणजे शत्रूच्या चढाईचा प्रतिकार करण्याला तिचा चांगला उपयोग होतो. नदीतीरावरच्या प्रदेशांत सर्वत्र दलदल असली तर ती देशाच्या आरोग्याला अहितकारक असली तरी देशाच्या संरक्षणाला फार उपयुक्त ठरते. या सर्व कारणांकरिता ड्राव्हाडॅन्यूबतीरांवर जर्मनीचा प्रतिकार करण्याची कल्पना चांगली आहे.

## या योजनेंतील दोष

पण या योजनेत पहिला असा दोष आहे की हंगारीच्या पश्चिमेच्या राब नदीच्या खोऱ्यांतून व हंगारीच्या पूर्वेकडील टिसा नदीच्या खोऱ्यांतून युगोस्लाव्हियावर चढाई करणे फार सोपे आहे. दुसरा दोष असा की जर्मन सैन्य शत्रूच्या भडिमाराला न जुमानता कसल्याहि अवघड नद्या ओलांडू शकते असा गेल्या महायुद्धाचा अनुभव आहे. गेल्या महायुद्धांत सर्व्हियन सैन्याच्या माऱ्याला न जुमानतां फील्डमार्शल माकेन्सेनच्या हाताखालील जर्मन व ऑस्ट्रियन सैन्याने साव्हा, ड्रिना, डॅन्यूब या साऱ्या नद्या ओलांडल्या होत्या. जर्मनीच्या यांत्रिक आणि यंत्रचालित डिव्हिजन्स मात्र पायदळाबरोबर अशा लढाईत नदी ओलांडू शकत नाहीत, एवढी गोष्ट बचावाला

अनुकूल आहे. एकदा या नद्या ओलांडून जर्मनी व हंगारी यांच्या सैन्यांनी युगोस्लाव्हियाच्या सैन्याचा पाठलाग सुरू केला म्हणजे युगोस्लाव्हियाचे सैन्य मूळच्या सर्व्हियाच्या प्रांतात शिरून आपला बचाव करून घेण्याचा प्रयत्न करील व तेथेहि निभाव न लागल्यास गेल्या युद्धातल्याप्रमाणे अल्बानियाच्या डोंगराळ प्रदेशांत शिरेल व तेथून ग्रीसच्या कॉर्फ्यू बेटात आसरा घेईल, असा रोम व बर्लिन येथील युद्धशास्त्रज्ञांचा अदाज होता. यासाठीच ॲडमिरल उस्बोर्न यांच्या बाल्कन प्रदेशांतील कारस्थानांची वार्ता कानावर आल्याबरोबर सि. मुसोलिनी यांनी अल्बानिया प्रांतच काबीज करून युगोस्लाव्हियाच्या पिछाडीवर हल्ला करण्याची तयारी करून ठेविली आहे.

## रुमानियाला धोका

ॲडमिरल उस्बोर्न यांच्या योजनेतील कार्पेथियन पर्वताचा तेवढा विचार करावयाचे शिल्लक राहिले आहे. उस्बोर्नसाहेबांनी रुमानियाचे संरक्षण करणारा कार्पेथियन पर्वत असा उल्लेख केला असला तरी त्या पर्वताने केवळ युद्धापूर्वीच्या रुमानियाचे संरक्षण होते. रुमानियाची नवी सरहद्द शत्रूच्या चढाईचा प्रतिकार करण्याच्या दृष्टीने अगदी निरुपयोगी आहे. पण राजकीय कारणाकरिता रुमानियाला गेल्या युद्धांत जिंकलेले बॅनाट, ट्रान्सिल्व्हानिया इत्यादि प्रांत सोडून देऊन पर्वतांच्या मागे दडून राहणे फायदेशीर होणार नाही. कारण बॅनाट व ट्रान्सिल्व्हानिया प्रांत हंगारीच्या सैन्याने व्यापल्याबरोबर रुमानियावर दक्षिणेकडून बल्गेरियाची स्वारी होईल. दुसऱ्या बाल्कन युद्धाच्या वेळी अगदी कांहीहि कारण नसता रुमानियाने बल्गेरियावर स्वारी करून त्याचा डोब्रुजा प्रांत बळकावला आहे. हे उसने फेडण्याची बल्गेरिया वाटच पहात आहे. इटालीने अल्बानिया प्रांत खाल्ल्यापासून बल्गेरिया देश हा इटाली-जर्मनीच्या पक्षाला मिळणार, हे निश्चित झाले आहे. बल्गेरियाची राणी ही इटालीची राजकन्या आहे, ही गोष्टहि बल्गेरियाच्या धोरणाचा विचार करतांना लक्षांत ठेवणे जरूर आहे. ट्रान्सिल्व्हानियन आल्प्स व कार्पेथियन पर्वत ही सीमा बचावाला फार सुरक्षित आहे. पण या दोन पर्वतांच्या अतिविस्तृत रांगा संभाळण्याइतके सैन्य रुमानियाजवळ नाही व रुमानियाचे सैनिकहि जर्मन सैनिकांच्या तोडीचे नाहीत.

तेव्हा गेल्या महायुद्धांतल्याप्रमाणे दक्षिणेला डॅन्यूब ओलांडून व पश्चिमेला हेर्मा-न्स्टाट व क्रोन्स्टाट या शहरांच्या रोखाने रुमानियाच्या सर्व शत्रूंनी एकाच वेळी चढाई केली तर तेव्हाप्रमाणेच रुमानियाचा महिन्याभरांत निकाल लागेल. अशा परिस्थितीत रुमानियाला कसेंहि करून जर्मनीच्या विरुद्ध लढावयाला प्रवृत्त करण्यांत इग्लंडचा हेतु काय आहे, याचा आता थोडासा खुलासा केला पाहिजे.

## रुमानियांतील तेलाच्या खाणी

ॲडमिरल उस्बोर्न यांनी बाल्कन राष्ट्राना जर्मनीविरुद्ध उठविण्याची आपली योजना ब्रिटिश जनतेपुढे माडतांना म्हटले आहे

'In the event of war we must never allow Germany access to Rumanian oil' हा हेतु रुमानिया तटस्थ राहिला तर सिद्धीला जाणार नाही. रुमानियातील पेट्रोलच्या खाणीची परिस्थिति अशी आहे की, कोणत्याहि पक्षाच्या वतीने तो देश युद्धात पडला तरी विरुद्ध पक्षाच्या वैमानिक दळाला युद्धारंभाच्या दिवशीच त्या खाणी निकामी करून टाकता येतील व त्या एकाच दिवसात झालेल्या मोडतोडीची दुरुस्ती करून पुन्हा तेल काढावयाला सहा महिन्यांहून कमी काळ पुरणार नाही. रुमानिया तटस्थ राहिला तर मात्र त्या खाणीचा उपयोग जर्मनीला होऊ शकेल. या एकाच कारणाकरिता रुमानियाच्या स्वातंत्र्याला व तटस्थतेला बाध येईल अशा तऱ्हेची कोणतीहि कारस्थाने जर्मनी सध्या करीत नाही. रुमानिया देश जर्मनीविरुद्ध युद्धात पडला तरी देखील जर्मनी त्या देशातील पेट्रोलच्या खाणीची मोडतोड करणार नाही. ते काम मित्रत्वाच्या नात्याने रुमानियात शिरलेल्या इंग्रजांच्या हातूनच होईल ! या कारणाकरिता रुमानियाची मैत्री संपादण्याची इंग्रजानी सध्या खटपट चालविली आहे. —केसरी, ता. २५ एप्रिल, १९३९.

---

## लेखांक सहावा

## मनुष्यबलाची तुलना

पोलंड आणि इंग्लंड या उभयतांमध्ये परस्परसहायाचा करार झाल्यापासून इंग्रजी पत्रातून पोलंडच्या लष्करी सामर्थ्याची स्तुति करणारे जे लेख प्रसिद्ध

झाले आहेत, त्यांमध्ये डेली टेलिग्राफने छापलेला मि. बर्नार्ड न्यूमन याचा लेख विशेष उल्लेखनीय आहे. मि. न्यूमन म्हणतात पोलंडची लोकसंख्या अवघी ३॥ कोटि असली तरी त्या लोकसंख्येपैकी शेकडा ६६ लोक तीस वर्षांच्या आंतील आहेत व त्यामुळे पोलंडमध्ये लष्करी नोकरीला लायक अशा तरुणाचा भरणा फार मोठा आहे. जर्मनीची लोकसंख्या पोलंडच्या दुप्पट असूनसुद्धा त्या दोन्ही देशांतील जननसंख्येत फारसा फरक नाही. गेल्या दहा वर्षांमध्ये जर्मनीत दरवर्षी सरासरी ६ लक्ष मुलगे जन्मले तर पोलंडमध्ये समारे ५। लक्ष मुलगे जन्मले. राजकारणामध्ये राष्ट्रांच्या बलाबलाचा विचार करतांना समाजशास्त्राकडे अगदीच दुर्लक्ष करून चालत नाही, ही जाणीव मि. न्यूमन याच्या लेखात दिसून येते. याच विचारसरणीचा उपयोग करून इंग्लंड व फ्रान्स याच्या मनुष्यबलाची जर्मनी व इटाली यांच्या मनुष्यबलाशी थोडी तुलना करून पाहिली पाहिजे.

सध्या इंग्लंड आणि फ्रान्स यांची लोकसंख्या सुमारे ९ कोटि आहे व इटाली आणि जर्मनी यांची लोकसंख्या १२ कोटीहून थोडी अधिक आहे. इटाली व जर्मनी यांची वार्षिक जननसंख्या २४ लक्ष आहे. तर इंग्लड आणि फ्रान्स याची वार्षिक जननसंख्या अवघी १३ लक्ष आहे. देशांतील वीस ते चाळीस वर्षे वयाच्या तरुणांची संख्या इटालीजर्मनीत सुमारे २॥। कोटि आहे, तर इंग्लड-फ्रान्समध्ये ती अवघी १॥ कोटि आहे. फ्रान्सच्या एकंदर लोकसंख्येशी २५ वर्षांच्या तरुणांचे जे प्रमाण पडते, त्याच्या दुप्पट इटाली व जर्मनी यांच्या एकंदर लोकसंख्येशी त्यांच्या देशातील २५ वर्षांच्या आतील तरुणाचे प्रमाण आहे. उलटपक्षी, इटाली-जर्मनीच्या एकंदर लोकसंख्येशी ६० वर्षांवरील वृद्धांचे जे प्रमाण पडते, त्याच्या दुप्पट, फ्रान्सच्या लोकसंख्येत वृद्धांचे प्रमाण आहे; इतकेच नव्हे तर त्या देशांत १९८५ च्या सुमाराला मुलांच्या सहापट वृद्धांची संख्या होईल असा आंकडेशास्त्रज्ञाचा अदाज आहे. १९३५ पासून १९३७ अखेरपर्यंतच्या तीन वर्षांची फ्रान्सची जननसंख्या मृत्युसंख्येपेक्षा ४२ हजारांनी कमी होती. उलटपक्षी त्याच मुदतीत जर्मनीची जननसंख्या १४॥ लक्षानी व इटालीची जननसंख्या ११॥ लक्षांनी अधिक होती.

## फ्रान्सांत परक्या लोकांची भरती

इंग्लंड आणि फ्रान्स याचे इटाली आणि जर्मनी याच्याबरोबर युद्ध जुंप-

ल्यास ते फ्रान्सच्या मुलुखांतच लढले जाणार, ही गोष्ट निश्चित असल्याने फ्रान्सच्या लोकसंख्येची आणखी थोडी चिकित्सा केली पाहिजे. फ्रान्सच्या सुमारे ४१ कोटि लोकसंख्येमध्ये ४० लक्ष विदेशी आहेत. या विदेशी लोकांपैकीं सर्वांनाच कौटुंबिक बंधने असतात, असे नाही आणि सामाजिक बंधने तर बहुधा नसतातच. यामुळे त्या लोकांत गुन्हेगारांचे प्रमाण फार असते. फ्रान्सच्या लोकसंख्येच्या मानाने त्या देशांतील गुन्हेगाराचे प्रमाण इतर देशांतील गुन्हेगारांच्या प्रमाणापेक्षा शेकडा ३३ टक्के अधिक आहे. जर्मनीत वंशसंचारी रोग असणाऱ्या व्यक्तीवर संततिप्रतिबंधाची शस्त्रक्रिया करण्याचा कायदा अंमलात आल्यापासून त्या देशांतील क्षय, उन्माद, गरमी, परमा इत्यादि रोगाने पछाडलेले सहस्रावधि लोक फ्रान्समध्ये पळून आले आहेत व ते सारे आपापल्या रोगाचा प्रसार फ्रान्समध्ये करीत आहेत. फ्रेंच सरहद्दीवरील कितीतरी परगण्यांतून परक्या लोकांची संख्या शेकडा ३३ पेक्षा अधिक आहे. १५० कॉम्यूनमध्ये तर परकीय लोकच बहुसंख्य आहेत. दक्षिण फ्रान्समधील मार्सेईसारख्या बंदरांचे सारे व्यवहार इटालियन वंशाच्या जनतेच्या हाती आहेत. लोरेन प्रांतांतील लोखंडाच्या खाणीहि मुख्यत्वेकरून इटालियन मजुरांच्या जिवावरच चालल्या आहेत. थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे फ्रान्सची सध्यांची परिस्थिति इतकी परावलंबी आहे की त्या राष्ट्राला जर्मनीसारखा पराभव पचविण्याची तर राहूं द्याच, पण गेल्या युद्धांतल्यासारखा एखादा विजयसुद्धा पचविण्याची शक्ति उरलेली नाही.

## फ्रेंच परराष्ट्रमंत्र्यांची सूचक तार

सध्याचे फ्रेंच परराष्ट्रमंत्री मो. बोन्ने यांना फ्रान्सच्या या साऱ्या परिस्थितीची फार चांगली जाणीव आहे. त्यामुळे जर्मनीला न दुखविण्याच्या बाबतीत ते अत्यंत दक्ष असतात. उदाहरणार्थ, १७ मार्चच्या सुमाराला जर्मनी व रुमानिया या उभयतामधील व्यापारी तहाची बोलणी एकाएकी निकरावर आलीं व रुमानियांतील कांही उच्चपदस्थ व्यक्तींनी लंडन येथे तारा करून ब्रिटिश सरकारची मदत मागितली, त्या वेळी मो. बोन्ने यांनी पुढील आशयाची तार रुमानियाला पाठविली

' Since Great Britain and France are completely unable after the Munich settlement to intervene usefully in Central Europe they have adopted an attitude of total abstention, which is better than handing out blame or platonic advice. That is the conclusion arrived at after the Franco-British Talks, particularly between M. Bonnet and Sir Eric Philips, the British ambassador at Paris. '

ही तार रुमानियाच्या पत्रातून १८ तारखेला प्रसिद्ध झाली व त्यानंतर २३ तारखेलाच जर्मनी व रुमानिया यांच्या व्यापारी तहावर सह्या झाल्या.

## जर्मनीने काय साधलें ?

हा तह अंमलांत आल्यास रुमानियांतील पेट्रोलचा धंदा चारपांच वर्षांच्या आंत पूर्णपणे जर्मनीच्या हातांत जाईल. रुमानियांतील पेट्रोलच्या खाणी मुख्यतः रुमानिया, फ्रान्स, इंग्लंड व अमेरिका या चार देशांच्या मालकीच्या आहेत. पण त्या खाणीतून आता २॥ कोटि टनांहून अधिक पेट्रोल उरले नसावे, असा भूगर्भ-शास्त्रज्ञांचा अंदाज आहे. सध्या या खाणीतून प्रतिवर्षी ७० लक्ष टन पेट्रोल निघतें. या हिशेबाने येत्या चार वर्षांतच त्या खाणींतील पेट्रोल संपून जाईल. तेव्हा नवीन खाणी शोधून रुमानियाच्या पेट्रोलची पैदास पुढे चालू ठेवण्याचा प्रयत्न करणें आता अपरिहार्य झाले आहे. २३ तारखेच्या तहाने नवीन खाणी शोधून पेट्रोलची पैदास वाढविण्याचा मक्ताच जर्मनी व रुमानिया यांच्या एका संयुक्त कंपनीकडे जावयाचा आहे; हीच गोष्ट मँगेनीज, बॉक्साइट, क्रोमियम इत्यादि युद्धोपयोगी धातूंच्या पैदाशीच्या बाबतीत घडून यावयाची आहे. मोल्डाव्हिया, वालाचिया व ब्युकोव्हिना या प्रांतांतील भूगर्भांत निदान दहा कोटि टन पेट्रोल असावे असा अंदाज आहे. हा अंदाज खरा ठरल्यास दहा पंधरा वर्षें तरी जर्मनीला पेट्रोलचा तुटवडा पडणार नाही. इतर धातूंचे आंकडे आज उपलब्ध नाहीत. याशिवाय रुमानियाच्या धान्याच्या पैदाशीचाहि जर्मनीच्या नव्या साम्राज्याला अत्यंत उपयोग होणार आहे. रुमानियांतील कालवे, रेल्वे, रस्ते, पूल, कारखाने, खाणी, बंदरें इत्यादींच्या वाढीची सर्व कामे जर्मनीला मिळावयाची असून शस्त्रास्त्रांच्या पुर-

वळ्याचाहि मोठा भाग जर्मनीच्याच वांट्याला आला आहे. या सर्व व्यवहारा-च्या सोईसाठी जर्मन कंपन्यांनी चालविलेल्या खाणी, कारखाने, बंदरें इत्यादि ठिकाणांवर केवळ जर्मन सरकाराचीच सत्ता चालावी अशीहि या व्यापारी करा-राने तरतूद केलेली आहे.

## फ्रान्सचा व्यापारी करार

या करारानंतर मार्चच्या ३१ तारखेला फ्रान्सनेहि रुमानियाबरोबर एक व्यापारी करार केला. या कराराप्रमाणे फ्रान्सने रुमानियाकडून पांच लक्ष टन पेट्रोल व एक लक्ष टन मका यांची खरेदी करावयाची आहे. या करारामुळे जर्मनी व रुमानिया यांमधील कराराला कोणत्याहि प्रकाराने बाधा पोचत नाही हे पाहिलें म्हणजे पूर्वयुरोपांतील जर्मनीच्या हितसंबंधांना विरोध न करण्याची फ्रान्स किती खबरदारी घेत आहे हें दिसून येते. खालील तारेवरूनहि हीच गोष्ट स्पष्ट होते

'The visit of the French President to London was represented by commentators in Berlin to have been disappointing to England, as the British Government found M. Bonnet reluctant to make commitments extending beyond Western Europe.'

ही केवळ बर्लिनची बातमी आहे असे नव्हे. फ्रेंच प्रेसिडेंटच्या भेटीच्या वेळीं मो. बोन्ने यांचे लॉर्ड हॅलिफाक्स यांच्याबरोबर भांडण झाल्याची बातमी पेर्तिनाक्सनेहि प्रसिद्ध केली आहे. जर्मनीच्या विरुद्ध पूर्वयुरोपांतील राष्ट्रांशीं संधि करून कोणताहि कायमचा फायदा होत नाही, असें पूर्वीच्या अनुभवावरून आता फ्रान्सच्या दृष्टोत्पत्तीस आले आहे. यामुळे त्या राष्ट्रांशीं संधि करून जर्मनीशीं शत्रुत्व करण्याच्या इंग्लंडच्या धोरणाला फ्रान्सचा विरोध असणें स्वाभाविकच आहे. इंग्लंडचेहि मुत्सद्दी या धोरणाविषयीं साशंकच आहेत. 'संडे टाइम्स'मध्ये 'स्कुटेटर'ने लिहिले आहे.

'If nations ask for our assistance the responsibility is theirs, for they must be understood to accept the normal conditions and limitations under which our assistance can

be given, but if we ask for theirs our obligation is extended beyond those limits.'

## इंग्लंडवर पडणारी जबाबदारी

परराष्ट्रांनी आपली मदत मागितली असतां आपण त्यांना मदतीचें आश्वासन देणें व आपण होऊन परराष्ट्रांशी समानशत्रुमित्रत्वाचा संधि करणे या दोन परिस्थितींतील व्यावहारिक फरक हा आहे कीं पहिल्या प्रकारच्या तहामुळे आपल्या इच्छेविरुद्ध आपण युद्धांत ओढले जात नाही व दुसऱ्या प्रकारच्या तहाने आपण आपल्या इच्छेविरुद्ध युद्धांत ओढले जातो. इंग्लंडने पोलंडशी केलेला करार हा दुसऱ्या प्रकारचा करार आहे. या कराराने पोलंड म्हणेल त्या वेळी जर्मनीविरुद्ध शस्त्र उचलण्याचे अभिवचन इंग्लंडने पोलंडला देऊन ठेवले आहे. अशा तऱ्हेचे अभिवचन महायुद्धापूर्वी फ्रान्सला देखील इंग्लंडने दिले नव्हते, ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे इंग्लंडच्या आजच्या दौर्बल्याची यथार्थ कल्पना येईल! हें अभिवचन कसे पाळले जाणार आहे, याची इंग्लंडांत कोणालाच कल्पना नाही. 'स्पेक्टेटर' म्हणतो

'That the Government should publish at this stage what detailed steps it proposes to take to assist Poland in the struggle for independence is out of the question; but in outline we ought to know what kind of assistance, it has in her mind and how it is to be rendered.'

या सर्व परिस्थितीचा विचार केला म्हणजे असेंच वाटते की पोलंडला दिलेल्या अभिवचनामुळे इंग्लंडवर युद्धाची आपदा ओढवणार नाही अशी चेंबरलेनसाहेबांची खात्री असली पाहिजे. न्यू स्टेट्समन अँड नेशन या पत्रानेहि म्हटलें आहे

'It is natural to assume, as the *Times* has assumed that the pledge was given with the intention of strengthening Poland in a negotiation with Germany rather than of actually guaranteeing Danzig or the Corridar. Stalin, as the Russian press shows, made the same deduction.'

इंग्लंडच्या अभिवचनांची यथार्थ किंमत न ओळखतां त्या राष्ट्रांशीं राशि

याचा तह घडवून आणण्याच्या नादाला लागल्याबद्दल रशियाच्या नेत्यांनी मो. लिट्व्हिनॉफ यांना नुकतेच पदच्युतहि केले आहे.

## पोलंडचा फायदाच झाला आहे

आतांपर्यंत इंग्लंडच्या दृष्टीनेच आंग्लोपोलिश कराराची चर्चा झाली. पोलंडच्या दृष्टीनेंहि या कराराचा थोडा विचार करणे आवश्यक आहे. वास्तविक पाहता जर्मनीशीं सख्य केल्यामुळे पोलंडचा पुष्कळच फायदा झाला आहे. जर्मनीने झेकोस्लोव्हाकिया देश खालसा केल्यानंतर लगेच पोलंडने जर्मनीच्या शत्रूबरोबर तह करावा, अशी सूचना कर्नल बेक यांच्या प्रतिपक्षियांनी केली असता कर्नल बेक यांच्या एका हस्तकाने लिहिले होते 'आजपर्यंत जर्मनीच्या प्रत्येक विजयाने पोलंडचा फायदाच झाला. जर्मनीने ऑस्ट्रिया देश खालसा केला तेव्हा लिथुआनियाने पोलंडचा व्हिल्ना शहरावरील अधिकार मान्य केला. जर्मनीने सुडेटेन जर्मनांचा मुलुख जर्मनीत सामील केला तेव्हा पोलंडला टेशेन प्रांत परत मिळाला. जर्मनीने झेकोस्लोव्हाकिया देश गिळला तेव्हा पोलंडची सरहद्द हंगारीला भिडून पोलंडला एक समानधर्मी मित्र मिळाला. इतःपर दक्षिणयुरोपात जर्मनीने आपले साम्राज्य वाढविण्याचा प्रयत्न केल्यास इंग्लंड जर्मनीला विरोध करील. तेव्हा आपण दक्षिणेची काळजी सोडून पोलंडच्या उत्तरेकडील राष्ट्रांशी आपले संबंध दृढतर करण्याची खटपट करूं या.'

## इंग्लंडशीं तह केल्याने जर्मन करार रद्द

पण २१ मार्चला जर्मनीने लिथुआनियाकडून मेमेल बंदर परत मिळविल्यामुळे कर्नल बेक यांच्या उत्तरेकडील राजकारणाचा डोलारा एकदम कोसळून पडला. १९३५ साली जर्मनी मेमेल बंदर घेणार, असा रंग दिसूं लागला असतां मार्शल पिल्सुड्स्की यांनी जर्मनीला कळविलें होतें कीं, जर्मन सैन्य मेमेलमध्ये घुसल्यास पोलंड व जर्मनी याचे युद्ध जुंपेल. पोलंडचे सेनापति या प्रश्नाला इतके महत्त्व देत असल्यामुळे जर्मन सैन्य मेमेलमध्ये घुसल्याबरोबर मार्शल रिड्झ स्मिगली यांनी आपल्या शिलकी सैन्याची जमवाजमव करण्याचे हुकूम सोडले. पोलंडच्या वृद्ध सेनापतीचे हे साहस पाहून ब्रिटिश

परराष्ट्रखात्याला वाटले कीं पूर्वदिग्विजयासाठी अनिर्बंध संचार करीत असलेल्या जर्मनीच्या श्यामकर्णाला हात घालणारें एक राष्ट्र अद्यापि अस्तित्वांत आहे, याच्या मदतीने जर्मनीच्या महत्त्वाकांक्षांना अजून देखील आळा घालतां येईल. याच बुद्धीने प्रेरित होऊन इंग्लंडने पोलंडशी नवा तह केला आहे. या अँग्लो–पोलिश तहाने पूर्वीच्या पोलिश–जर्मन कराराचा भंग होत नाही, अशी जर्मनीची समजूत करून देता येईल, अशी कर्नल बेक यांची अपेक्षा होती. पण ती अपेक्षा खोटी ठरली व २८ एप्रिलच्या भाषणांत जर्मन–पोलिश करार रद्द झाल्याचे हेर हिटलेर यांनी जाहीर केले.

—केसरी, ता. ९ मे, १९३९.

---

## लेखांक सातवा

आड्रियाटिक समुद्रावर आपले वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी इटालीने गेल्या महायुद्धात भाग घेतला होता व भूमध्यसमुद्रावर आपले वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी तो देश भावी महायुद्धांत भाग घेईल. इटाली आणि जर्मनी या दोन राष्ट्रांमध्ये नुकताच जो लष्करी मदतीचा तह झाला, त्या तहाने ही गोष्ट अगदी निश्चित झाली आहे. याकरिता भूमध्यसमुद्रामधील एकंदर परिस्थितीचा विचार या लेखांत करावयाचे योजलें आहे.

### भूमध्यसमुद्राची नाकेबंदी

भूमध्यसमुद्रांतील दोदेकानेज बेटांत इटालीचे सध्या सुमारे ३० हजार सैन्य आहे. अबिसीनियांतील इटालियन सैन्य ५० हजारांवर असावे, असा अंदाज आहे. लिबियांतील सैन्य १ लक्षाहून अधिक आहे. अल्बानियांत ५० हजार सैनिक गेल्या महिन्यांतच गेले आहेत व स्पेनमध्ये दोन वर्षांहून अधिक काळ ४० हजार इटालियन सैन्याचा तळ पडला आहे. बाकीचे सारे इटालियन सैन्य मुख्यतः फ्रेंच सरहद्दीवर जमा झाले आहे. एकंदर वीस लक्षांहून अधिक सैन्य सध्या इटालियन सरकाराने एकत्रित केले आहे.

यापैकीं दोदेकानेज बेटें हीं अगदी आशियामानरच्या किनाऱ्याजवळ आहेत. ही बेटे इटालीच्या हातांत असेपर्यंत रशियाचीं जहाजें भूमध्यसमुद्रांत येऊं शकत नाहीत व इंग्लंडची जहाजे काळ्या समुद्रांत जाऊं शकत नाहीत. गेल्या महायुद्धांत दार्दानेलिस व बॉस्फोरस या सामुद्रधुन्यांमध्ये ब्रिटिश आणि रशियन जहाजांना प्रवेश मिळाला नाही व त्यामुळे इंग्लंड आणि रशिया यांची परस्परांना मदत होऊं शकली नाही. भावी महायुद्धात इंग्लंड आणि रशिया यांना विभक्त ठेवण्याचे अत्यंत महत्त्वाचे कार्य दोदेकानेज बेटाच्या मार्फत घडवून आणण्याचा इटालीचा विचार आहे.

इटालीच्या डावावर इग्लंडची तोड काय आहे ते आता पाहिलें पाहिजे. लेफ्टेनंट कमांडर केनेथ एडवर्ड्स या आरमारी तज्ज्ञाने म्हटले आहे

'With the use of Greek bases there would very soon be established a close blockade of the Eastside of Italy. This blockade would also cut the communications between Italy and her Eastern Mediterranean possessions of Rhodes and the Dodecanese Islands, so that these would very soon become untenable.'

## इंग्लंडच्या शहाला काटशह

ग्रीसच्या आरमारी तळांचा उपयोग करून ब्रिटिश आरमाराला पूर्व इटालीची नाकेबंदी करतां येईल व दोदेकानेज बेटें जिंकतां येतील, इतका अंदाज इटालीच्या सरकारलाहि करतां येतो आणि हा अंदाज खरा होऊ नये, याकरिताच एप्रिलच्या प्रारंभी अल्बानिया प्रांत हस्तगत करून इटालियन सरकारने आपले सैन्य सालोनिकासारख्या ग्रीसच्या प्रमुख बंदरापासून १०० मैलांवर आणून ठेविलें आहे. भावी महायुद्धाच्या प्रारंभी ग्रीस देश इटालीच्या पक्षाला मिळाला नाही तर तो देश ताबडतोब इटालियन सैन्याकडून व्यापला जाईल व इटालीचीं सैन्ये दार्दानेलिसच्या सामुद्रधुनीपर्यंत जाऊन पोंचतील. इटालीची सैन्यें दार्दानेलिसपर्यंत पोचल्यानंतर इंग्लंड व रशिया या उभयतांमध्ये परस्परसहायाचा करार झाला असला तरी त्याचा त्या दोन्ही राष्ट्रांना कितपत उपयोग होईल, हे गेल्या महायुद्धाच्या इतिहासावरून कोणालाहि कळून येईल.

इटालीच्या सैन्याने ग्रीस व्यापिला तरी त्या देशाभोवतालची बेटे ब्रिटिश आरमाराला जिंकता येणें शक्य आहे, असें ब्रिटिश आरमारी खात्याचे मत आहे. हीं बेटें इंग्रजांच्या हातीं पडलीं तर तेथे विनाशिकांचें तळ स्थापून इटालियन पाणबुड्या बोटींच्या संचाराला प्रतिबंध करणे त्यांना शक्य होईल. वर उल्लेखिलेले मि. केनेथ एडवर्ड्स म्हणतात

'The anti-submarine measures would have to consist of patrols in the Ionian Sea. The work of these patrols would be facilitated by the use of the Greek bases and particularly Corfu.

## ग्रीसच्या बेटांचा उपयोग होणार नाही

पण भावी महायुद्धाच्या पहिल्या दिवशीच कॉर्फ्यू बेट ग्रीसच्या हातून इटालीचे हातांत जाईल, हे उघड आहे. इतर बेटांपैकी ग्रीसच्या किनाऱ्याला अगदी लागून असलेली बेटेहि ब्रिटिश आरमाराला बळकावता येणार नाहीत, क्रीटसारखीं बरींच दूर असलेली बेटे तेवढी ब्रिटिशांना काबीज करतां येतील; पण इटालियन वैमानिक दलाचे हल्ले सुरू झाल्यास त्यांचा तळ म्हणून उपयोग करतां येईल कीं नाही, याविषयी फार शंका वाटते. जहाजांतून सैन्य उतरवून एखादे बेट व्यापण्याचा प्रयत्न केल्यास त्या सैन्यावर शत्रूच्या विमानाचा हल्ला होऊन त्याचा पूर्ण निःपात होण्याचाहि संभव असतो, असे स्पॅनिश युद्धांत अनुभवाला आले आहे. या सर्व विवेचनाचा निष्कर्ष असा निघतो की इटालीने ग्रीस देश व्यापल्यास ग्रीसच्या फारच थोड्या बेटांचा इंग्रजांना उपयोग होईल व इटालीचीं दोदेकानेज बेटे बहुधा इंग्रजांना जिंकतां येणार नाहीत.

## माल्टाची वाट काय ?

इंग्रजांना ग्रीसच्या तळांचा कितपत उपयोग होईल, याचा आतापर्यंत विचार झाला. आता त्यांच्या स्वतःच्या माल्टा बेटांतील तळाचा त्यांना कितपत उपयोग होणार आहे, याची चिकित्सा केली पाहिजे. या तळाविषयी इग्लंडचे सर्वांत प्रसिद्ध आरमारी तज्ज्ञ मि. बायवॉटर म्हणतात

'Those who are familiar with Malta do not need to be told that the Grand Harbour is the most unsuitable haven

for a large fleet threatened with heavy attack from the air. The entrance is narrow and needs to be navigated with care even in good weather. In any condition it would be impossible for a large fleet lying in harbour to put out to sea expeditiously; consequently in the event of a really big air-raid most of the ships would be sitting targets.'

यासाठी माल्टाच्या बंदरांत ब्रिटिश आरमाराचा तळ ठेवणें हे युद्धकालीन परिस्थितीत अगदी आत्मघातकीपणाचें होईल.

## इजिप्तच्या बंदरांत कोंडमारा

माल्टाचा तळ सोडावा लागल्यास आपलें आरमार अलेक्झांड्रिया बंदरांत नेऊं व तेथून आपण इटाली व त्रिपोली यांच्यामधील दळणवळण तोडूं असें बहुतेक सर्व ब्रिटिश आरमारी तज्ज्ञ लिहीत असतात. या विधानाची आता थोडी चिकित्सा केली पाहिजे. ब्रिटिश आरमार इजिप्तच्या आसऱ्याला जाऊन राहिलें म्हणजे ते इटालियन विमानांच्या तावडींतून सुटेल, ही मि. केनेथ एडवर्ड्स यांच्यासारख्या तज्ज्ञांची समजूत चूक आहे. ब्रिटिश आरमार भूमध्यसमुद्रांत कुठेंहि वावरत असलें तरी तें इटालियन विमानांच्या तावडीत सांपडणारच. भूमध्यसमुद्रांत ब्रिटिश आरमाराला कोठेंहि सुरक्षितता लाभणें शक्य नाहीं. 'Winged Warfare' या ग्रंथांत सांगितलें आहे

'Aircraft can often force a reluctant fleet to action, either by compelling it to put to sea, or when it is at sea, by damaging one or two vessels, and so reducing their speed that the rest of the fleet must either accept battle or abandon them. Indeed this ability of aircraft to prevent a fleet from resting secure in harbour and of fixing a fleet when at sea, may well revolutionize naval strategy and tactics.'

बहुतेक ब्रिटिश आरमारी तज्ज्ञ आज लिहीत आहेत, त्याप्रमाणें ब्रिटिश आरमार माल्टा सोडून अलेक्झांड्रिया बंदरांत जाऊन राहिलें व इटालीच्या विमानांचे त्या आरमारावर यशस्वी हल्ले सुरू झाले तर त्याला निसटून जाण्याला

कोणताहि मार्ग शिल्लक उरणार नाही हे या तज्ज्ञभुवांच्या लक्षांत येत नाही, याचें नवल वाटतें. इजिप्तच्या आसऱ्याला जाऊन राहिलेले ब्रिटिश आरमार, सिसिली व पांतेलारिया या बेटांजवळील कोंडी फोडून जिब्राल्टरकडे येऊ शकत नाही. अगदी महत्त्वाच्या कारणाकरितां असा प्रयत्न करावा लागल्यास त्यांत त्या आरमाराचे अपरिमित नुकसान होईल. याच्या उलट पोर्ट सय्यदकडून एडनकडे जाण्याचा प्रयत्न करणे तरी शक्य होईल कीं नाही याचीहि शंका वाटते. पोर्ट सय्यदपासून एडनचें बंदर सुमारे हजार मैल अंतरावर आहे व हा सारा प्रवास सुएझच्या कालव्यांतून किंवा अत्यंत अरुंद अशा तांबड्या समुद्रांतून करावा लागेल. यापैकीं सुएझचा कालवा मोडून टाकण्याचा प्रयत्न भावी महायुद्धाच्या सुरुवातीबरोबर इटालियन विमानें करतील व तो प्रयत्न सफलहि होईल, याविषयीं कोणाहि युद्धशास्त्रज्ञाला शंका नाही. बरें, हा कालवा मोडला गेला नाही, तरी तांबड्या समुद्रांतून ब्रिटिश आरमार जात असतांना अबिसीनियांतील इटालियन विमानांचा त्या आरमारावर हल्ला होऊन त्याचा विध्वंस होणे अगदी शक्य आहे; तेव्हा ब्रिटिश आरमाराच्या सर्वांत मोठ्या काफिल्याने अशा प्रकारे पूर्वभूमध्यसमुद्रांतील सापळ्यांत अडकून पडावें कीं नाही हा युद्धशास्त्रदृष्ट्या अतिशय महत्त्वाचा प्रश्न आहे. पण या भानगडीचा यत्किंचित् विचार न करतां चेंबरलेनसाहेबांनी पूर्वयुरोपांतील तुर्कस्थान, ग्रीस, रुमानिया इत्यादि राष्ट्रांना मदतीची वचने देण्याचा सपाटा चालविला आहे. कित्येकवेळां अशीहि शंका येते की, असल्या संकटसमयीं ब्रिटिश आरमाराला काळ्या समुद्रांत निर्भय आसरा मिळावा, यासाठी तर चेंबरलेनसाहेबांनी तुर्कस्थानाशीं तह केला नाही ना !

## बायवॉटर यांचा सल्ला

मि. बायवॉटर यांनी तर आपल्या सरकाराला स्वच्छ उपदेश केला आहे

'It would be advisable to concentrate our naval forces at Gibraltar and at Aden, the two gateways of the Mediterranean, to undertake no heavy naval operations within the Mediterranean itself and to declare it out of bounds for all our Merchant shipping.'

सिसिली व पांतेलारिया या बेटांजवळची कोंडी फोडून जिब्राल्टरकडे परत

येणे ब्रिटिश आरमाराला शक्य आहे कीं नाही या प्रश्नाचा आतां विचार केला पाहिजे. असा विचार करण्यापूर्वी प्रथम इटालीचें आरमार व ब्रिटिशांचा भूमध्यसमुद्रांतील काफिला यांची तुलना केली पाहिजे. सध्या भूमध्यसमुद्रांत ब्रिटिशांची चार ड्रेडनॉट जहाजे, सहा क्रूझरे, एक विमानवाहक जहाज, ३९ विनाशिका, ७ पाणबुड्या बोटी, एक बॅटल्क्रूझर व किरकोळ ३० जहाजें आहेत. उलटपक्षी इटालीची अगदी नवीं अशीं दोन ड्रेडनॉट जहाजें गतवर्षींच बांधून झालीं व आणखी दोन यंदाच्या वर्षाअखेर तयार होतील. हीं चारी जहाजे ब्रिटिशांच्या जॉर्ज दि फिफ्थ या वर्गातील ड्रेडनॉट जहाजां-पेक्षा बलिष्ठ आहेत. ब्रिटिशांची जुनी ड्रेडनॉट जहाजे तर त्यांच्यापुढे उभीं देखील राहूं शकत नाहीत. ब्रिटिशांनी आपल्या जॉर्ज दि फिफ्थ जहाजावर १४ इंची तोफा बसविल्या आहेत, तर इटालीच्या व्हित्तोरियो–व्हेनेतो या वर्गातील जहाजांवर १५ इंची तोफा बसविल्या आहेत. असो, याशिवाय सुमारे २२ ते २६ हजार टनांचीं ४ जुनी ड्रेडनॉट जहाजे इटालीजवळ आहेत. दहा मोठीं क्रूझरे, सोळा हलकीं क्रूझरे, १६० विनाशिका, ६० टॉर्पेडो बोटी, १०६ पाणबुड्या बोटी असे इटालीचें एकंदर आरमार आहे. यांत बांधत असलेल्या जहाजांचा समावेश केलेला नाही. १९४० च्या प्रारंभीं इटालीचे एकंदर आरमार ७ लक्ष टनांवर जाईल. इटालीचे सारे आरमार ब्रिटिशांच्या भूमध्यसमुद्रांतील आरमाराचा समाचार घ्यावयाला पूर्णपणे समर्थ आहे, याविषयी कांहीहि शंका नाही.

## भूमध्यसमुद्राचा पश्चिम भाग सांभाळावा

ही सारी परिस्थिति पाहिली म्हणजे आमच्या अतज्ज्ञ बुद्धीला असेच वाटते कीं, भूमध्यसमुद्रांतील ब्रिटिश आरमाराने माल्टा सोडून अलेक्झांड्रियाकडे जाणे युद्धशास्त्राच्या दृष्टीने चुकीचे ठरेल. त्या आरमाराने फ्रेंच आरमाराशी सहकार्य करून पश्चिमभूमध्यसमुद्राचें संरक्षण केले तरी देखील आपली कामगिरी योग्य रीतीने बजाविली असें म्हणतां येईल. पश्चिमभूमध्यसमुद्रांतील दळणवळणाच्या मार्गांचें संरक्षण फ्रेंचांच्या लष्करी सामर्थ्याच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचें आहे. गेल्या महायुद्धांत उत्तर आफ्रिकेंतील फ्रेंच वसाहतींमधून फ्रेंचांना पांच लक्ष सैनिक व दोन लक्ष मजूर यांची मदत झाली होती. भावी महायुद्धांत सैनिक आणि मजूर मिळून

१५ लक्षांहून अधिक लोकांची मदत मिळेल, असा अंदाज आहे. हे लोक फ्रान्स-मध्ये पोचले नाहीत तर फ्रान्सचे सध्याचे सारे बेत फसून फ्रेंच लोकमतावरहि त्याचा अतिशय वाईट परिणाम होईल. कित्येक ब्रिटिश युद्धशास्त्रज्ञ म्हणतात की, भूमध्यसमुद्राच्या दोनहि तोडांची नाकेबंदी केली तरी तेवढ्यानेच इटालींत युद्धोपयोगी पदार्थांचा तुटवडा पडून इटालीला शरण यावे लागेल. पण ते असा विचार करीत नाहीत की, त्यांच्या या धोरणामुळे इटालीला फक्त युद्धोपयोगी पदार्थांचाच तुटवडा पडेल, पण त्याचा जीवश्चकंठश्च मित्र जो फ्रान्स त्याला युद्धोपयोगी सैनिकांचाच तुटवडा पडेल. या सैनिकांच्या दळणवळणाचा मार्ग सुरक्षित करावयाचा म्हणजे इटालीचे सार्डिनिया बेट व स्पेनचीं माजोर्का, मिनोर्का आणि इव्हिझा ही बेटे फ्रान्सच्या किंवा फ्रान्सच्या मित्रांच्या ताब्यांत असणे जरूर आहे. सार्डिनियापासून मिनोर्का बेट अवघे १७५ मैलांवर आहे व माजोर्का सुमारे २५० मैलांवर आहे. उत्तर आफ्रिकेमधून फ्रान्स कडे जाणाऱ्या सर्व आगबोटींना या बेटांच्या मधील समुद्रातूनच जावे लागते. सर्व फ्रेंच तज्ज्ञांचे म्हणणे असें आहे की माजोर्का, मिनोर्का व सार्डिनिया या साऱ्या बेटांतून पाणबुड्या बोटी, क्रूझरे, विनाशिका किंवा विमाने यांचे हल्ले सुरू झाले तर एक देखील जहाज उत्तर आफ्रिकेंतून फ्रान्सचे बंदरांत जाऊं शकणार नाही. याकरिता फ्रेंच आणि ब्रिटिश आरमारांनी एकत्र होऊन ही बेटे जिंकण्या-करिता झटणें अत्यंत आवश्यक आहे. पण फ्रेंच आरमारी तज्ज्ञांच्या योजनांत या योजनेचा कोठेहि उल्लेख आढळत नाही.

## सैन्याची वाहतूक कशी करणार ?

त्याचे कारण असे दिसते की, सहा महिन्यांच्या आंत १५ लक्ष लोक उत्तर आफ्रिकेंतून फ्रान्समध्ये वाहून नेण्याइतक्या उतारूंच्या बोटीदेखील फ्रान्स-मध्ये नाहीत. या विधानाचा थोडा अधिक खुलासा केला पाहिजे. युद्धकालीन परिस्थितीमध्ये सुरक्षितपणे सैन्य वाहून नेण्याकरिता सैन्यवाहक जहाजांचा वेग बराच असावा लागतो. फ्रान्समध्ये तर ताशी २२ ते २३ मैल जाणाऱ्या व सैन्य वाहून नेण्याला उपयोगी पडतील अशा, अवघ्या सहा मेलबोटी आहेत. या आगबोटीदेखील मुख्यतः भूमध्यसमुद्रांतून प्रवास करण्याच्या दृष्टीनेच बांधलेल्या

असल्याने त्या अटलांटिक महासागरांतून प्रवास करावयाच्या लायकीच्या नाहीत व भूमध्यसमुद्रांतून सैन्याची ने-आण करावयाची नाही, असा तर फ्रान्सचा दृढ-निश्चय झालेला दिसतो. ही स्थिति कांही एखाद्या वर्षांत बदलण्याजोगी नाही. वास्तविक पाहता कोणत्याहि साम्राज्याला आपल्या वसाहतींचें संरक्षण करावयाचें असल्यास त्याच्या क्षेत्रफळाच्या व दूरत्वाच्या प्रमाणांत आपल्या नौसाधनांची वाढ करणे आवश्यक असते. जगांतील वसाहतीवरील साम्राज्यात फ्रान्सचा दुसरा क्रमांक लागतो. पण जहाजांच्या बांधणीत मात्र त्याचा क्रमांक नववा आहे. या सर्व परिस्थितीचा विचार केला म्हणजे असें स्पष्ट दिसून येते की व्यापारी दळणवळ-णाच्या सुरक्षिततेकरिता किंवा लष्करी दळणवळणाच्या सुरक्षिततेकरिता भूमध्य-समुद्रांत आंग्लो-फ्रेंच आरमारांचा उपयोग होणे अशक्य आहे. भूमध्यसमुद्रांत या आरमारांचा कांही उपयोग असलाच तर तो मुख्यतः स्वदेशाच्या किनाऱ्याच्या संरक्षणासाठीच आहे. इजिप्त, पॅलेस्टाइन, सायप्रस, माल्टा, जिब्राल्टर वगैरे मुलु-खांच्या संरक्षणाला मदत व्हावी म्हणून इंग्लंडला आपल्या आरमाराचा एक काफिला भूमध्यसमुद्रांत ठेवावाच लागेल. फ्रान्सला तर स्वदेशाच्या किनाऱ्याच्या संरक्ष-णासाठी व वसाहतींच्या संरक्षणासाठी आपल्या आरमाराचा मुख्य भाग भूमध्य-समुद्रांत ठेवणे भागच आहे. पण ही दोन्ही आरमारे एकत्र होऊन इटालीविरुद्ध चढाई करतील, हे संभवनीय दिसत नाही. उलटपक्षी या आरमारांचा कांटा काढण्यासाठी इटाली व जर्मनी यांची आरमारे एकत्र होऊन भूमध्यसमुद्रात चढाईचे धोरण स्वीकारतील, अशी लक्षणे दिसत आहेत. गेल्या महायुद्धांत जर्मनीचे बहुतेक सर्व आरमार उत्तर समुद्रांतील किंवा बाल्टिक समुद्रांतील बंद-रांतून निकामी पडून राहिले होते. तशी चूक भावी महायुद्धांत पुन्हा करावयाची नाही, असा जर्मनीच्या आरमारी खात्याचा संकल्प होऊन चुकला आहे. याकरितांच यंदा आरमारी युद्धाच्या तालमीच्या निमित्ताने जर्मनीने आपल्या आरमाराचा एक मोठा काफिला भूमध्यसमुद्रात पाठविला आहे. भावी महायुद्धांत जर्मनीचे आरमार मुख्यतः स्पेनच्या किनाऱ्याचा आश्रय करून जिब्राल्टर येथील ब्रिटिश आरमाराला हांकून देण्याचा व अटलांटिक महासागरांतील ब्रिटिश आणि फ्रेंच व्यापारी जहाजें बुडविण्याचा प्रयत्न करील, असा आरमारी तज्ज्ञांचा अंदाज आहे. भावी महा-

मुळांत स्पेन देश जर्मनीच्या पक्षाला मिळेल, असे तूर्त गृहीत धरण्यास कांहीं हरकत दिसत नाही.

## जर्मनीच्या लढाऊ जहाजांची फेरी

स्पेनचे आरमारी तळ इंग्रजांनी बळकावून बसूं नये म्हणून ते आधीच आपल्या कबजांत घेणें, जिब्राल्टर व तांजीर बंदरें जिंकून घेण्याला मदत करणें, इटालियन आरमारावर एखादें संकट आलें तर त्याला मदत करणे, स्पॅनिश मोरोक्कोमध्ये बंड घडवून आणणे, अटलांटिक महासागरांतील आंग्लो-फ्रेंच व्यापारी जहाजें बुडविणें हे सारे हेतू मनांत धरून जर्मनीची ४० लढाऊ जहाजें सध्या भूमध्यसमुद्रांत आली आहेत. स्पेनमधील यादवीत विजयी होऊन सुमारें ८०००० मूर आता मोरोक्कोमध्ये परत आले आहेत. हे मूर लोक फ्रेंच मोरोक्कोत बंडे उपस्थित करावयाला व तांजीरचें आंतरराष्ट्रीय बंदर जिंकावयाला उपयोगी पडतील, असा स्पॅनिश सरकाराचा अंदाज आहे. सोशॅलिस्ट सरकारच्या सैनिकानी फ्रान्समध्ये नेलेली युद्धसामुग्री परत करण्याचे अभिवचन फ्रान्सने अद्यापि पाळले नाही, यामुळे फ्रान्स व स्पेन यांच्यामध्ये भांडणे चालूच आहेत. इटाली व जर्मनी या देशांतील सैनिक अजून स्पेन सोडून बाहेर निघाले नाहीत; या दोन्ही देशांनी पुरविलेली युद्धसामुग्री परत जाण्याच्या गोष्टी तर कोणीच बोलत नाही. अशा परिस्थितीत युद्धाची ठिणगी केव्हा पडेल, याचा नेम उरलेला नाही.

## सगळी भिस्त हिंदुस्थानावर

इतःपर भूमध्यसमुद्र आपल्या हाती राहणे शक्य नाही, याची ब्रिटिश मुत्सद्दी लोकांना आता जाणीव होऊं लागली आहे व त्यामुळे पूर्वयुरोप आणि पश्चिमआशिया या भागांतील आपल्या हितसंबंधांचें संरक्षण करावयाला हिंदुस्थानाच्या मनुष्यबलाचा कितपत उपयोग होईल, याची ते काळजीपूर्वक वाटाघाट करीत आहेत.

Gibraltar and the Mediterranean या ताज्या पुस्तकाचे कर्ते मि. गॅरट म्हणतात " Much would depend on our ability to send immediately a sufficient and capable army to the Near East

The solution seems to lie in a larger and far better-equipped army in India. The difficulty of a larger permanent army in India is partly political and partly economic. When a crisis arises which is so urgent that the rule of 'immediacy' applies then the Government can settle political problems quickly enough. This was seen in the Egyptian agreement made under the pressure of the Ethiopian affair. A similar arrangement could be reached with Indian politicians—some concessions about their status and their autonomy combined with an agreement to pay for British troops in India would bring them willingly in a scheme for a larger army, trained to be an expeditionary force."

हा उतारा थोडा लांबला खरा. पण भूमध्यसमुद्रांतील सामरिक परिस्थितीचा हिंदी राजकारणावर कसा परिणाम होत आहे व सध्या गांधी आणि व्हाइसरॉय यांच्यामध्ये कशा तऱ्हेची बोलणीं चालली आहेत याची त्यावरून वाचकांस यथायोग्य कल्पना येईल.

—केसरी, ता. २६ मे, १९३९.

